नाहीं. फाटकांचा माझ्या पुस्तकावर एक मोठा आक्षेप असा कीं, त्यांची माझ्यासंबंधीं अपेक्षा फसली ! पण सर्व टीकाकारांच्या सर्व अपेक्षा एकाच ग्रंथकाराला कशा भागवितां येणार ! एकच ग्रंथ अनेक दृष्टींचें समाधान होण्यासारखा लिहितां येत नाहीं हें मीं आपल्या प्रस्तावनेंत अत्यंत स्पष्ट करून ऐच्छिक रीतीनें आपणाकडे थोडासा कमीपणाहि घेतला आहे. पण तेंच फाटकांना तक्रारीचें कारण होऊन बसलें ! आपल्या पहिल्या टीकालेखांत ते लिहितातः—“ केळकरांना आपल्या लेखांत न्यूनें राहिल्याची जाणीव होती. वाचकांची टीकाबुद्धि नरम पडून लेखकांविषयीं सहानुभूति उत्पन्न व्हावी हा उद्देश प्रस्तावनेंत त्यांनीं सिद्धीस नेला आहे. ” मीं माझी प्रस्तावना अहंकारबुद्धीनें लिहिली असती तर तो उघडच दोष घडला असता. पण मी आपणाकडे कमीपणा घेऊन व माझ्या ग्रंथांतील उणेपणा मीच कबूल करून प्रांजळपणानें लिहिलें तरी तेंहि फाटकांना खपत नाहीं ! फाटकांची टीकाबुद्धि नरम पडली हीच त्यांची तक्रार ! अर्थात् त्यांना हें हवें होतें कीं, मीं प्रस्तावनेंत स्वतःच्या ग्रंथाविषयीं अहंकारबुद्धि दाखवावी आणि मग फाटकासारख्यांना खूप सडकून टीका करण्याला वाव ठेवावा. पण माझ्या लीनतेनें मी त्यांच्या हातचा लोण्याचा गोळा काढून घेतला. त्यांची शिकार दवडली ! तथापि वर जें फाटकांच्या आक्षेपांचें प्रदर्शन मीं उत्तरासकट मांडून दाखविलें आहे त्यावरून हें स्पष्टच होईल कीं, हातचा लोण्याचा गोळा निघून गेला तरी मडक्याची कडा चाटीत बसण्याला त्यांनीं कांहीं कमी केलें नाहीं. हातची शिकार गेली तरी होता नव्हता तेवढा सर्व दारूगोळा वायबार काढण्यांत खर्च करून आपली मृगयेची हौस त्यांनीं भागविलीच.

असो. टीकांना उत्तर देण्याच्या कारणानें टिळक-चरित्राच्या वाचकांची केसरीद्वारां फिरून एक वेळ गांठ घेण्याची संधि मिळाली याबद्दल टीकाकारांचे आभार मानून हा लेख पुरा करतों.

## १७ लोकमान्य-स्मारक-मंदिरसमारंभ

[ ता. १ ऑगस्ट सन १९२५ रोजीं लोकमान्य स्मारक-मंदिर उघडण्याच्या समारंभाचे प्रारंभीं स्मारकट्रस्टचे चिटणीस या नात्यानें केलेलें भाषण. ]

टिळक-स्मारकसंस्थेच्या ट्रस्टींच्यातर्फे मीं आपणांस या प्रसंगीं या ठिकाणीं येण्याचें निमंत्रण दिलें, तें स्वीकारून आपण आलां याबद्दल मी आपले सत्कार-

पूर्वक आभार मानतों. आजचा हा प्रसंग एका अर्थानें दुःखकारक व एका अर्थानें आनंददायक, म्हणून मिश्रभावनात्मक आहे. लो. टिळक हे निवर्तल्यामुळें सर्व हिंदुस्थानाची व त्यांतूनहि विशेषतः महाराष्ट्राची जी हानि झाली आहे तिच्या आठवणीमुळें हा प्रसंग दुःखद वाटतो. पण त्याचबरोबर त्या लोकोत्तर पुढाऱ्याची स्मृति आपल्या नजरेसमोर मूर्त स्वरूपानें ठेवण्याचा एक प्रयत्न आज या इमारतीच्या रूपानें सिद्धीस जात आहे, यामुळें त्यांतल्या त्यांत किंचित् समाधान वाटतें. सर्वभक्षक काळ हा आपणाला प्रिय अशा वस्तु बलात्कारानें ओढून नेण्यास सिद्ध झाला असतां, स्मृतिरूपानें तरी त्या वस्तु आपल्या नजरेसमोर कायम ठेवण्याचा मनुष्यप्रयत्न नेहमीं सुरू असतो. कोणाचेंहि स्मारक करणें म्हणजे वरील हेतूनें काळाविरुद्ध केलेला सक्रिय सत्याग्रहच होय.

लो० टिळक यांच्या मृत्यूपासून आज पांच वर्षांचे अवधींत त्यांचीं जीं स्मारकें अनेक ठिकाणीं झालीं त्यांचा इतिहास सांगण्याचें या ठिकाणीं प्रयोजन नाहीं. तथापि इतकें सांगितलेंच पाहिजे कीं, हिंदुस्थानांत असे प्रांत किंवा मोठीं शहरें थोडींच असतील कीं, ज्यांनीं आपापल्या परीनें शक्य त्या मार्गानें लो० टिळकांचें स्मारक केलें नाहीं. खुद्द पुणें शहरानें येथील मंडईपुढें टिळकांचा पुतळा उभारून गतवर्षी हें स्मारक केलेंच आहे. त्याच बुद्धीनें बृहन्महाराष्ट्रानेंहि प्रथम टिळक विद्यापीठ व महाविद्यालय आणि नंतर प्रस्तुतची स्मारक-संस्था स्थापन केली. सन १९२२ मध्यें डिसेंबरच्या १० व्या तारखेस यवतमाळ येथें 'इंडियन होमरूल लीग' ऊर्फ 'टिळकस्वराज्यसंघ' या संस्थेची सहावी वार्षिक परिषद् भरली होती. मुंबईचे सुप्रसिद्ध नागरिक व टिळकांचे परम स्नेही बॅ. बॅप्टिस्टा हे परिषदेचे अध्यक्ष होते. सदर परिषदेंत नं. ३ चा ठराव सर्वसंमत होऊन असें ठरलें कीं, "संघाचे संस्थापक व अध्यक्ष लो. टिळक यांच्या स्मारकाचें काम सध्यांच्या कार्यकारी मंडळानें ताबडतोब हातीं घेऊन तें पूर्ण करावें." हें काम करण्याकरितां बॅप्टिस्टाप्रभृति सात गृहस्थांची कमिटी नेमण्यांत आली. कमिटीकडून स्मारकाची योजना पूर्ण होतांच ती विचारांत घेऊन, तिला मूर्त स्वरूप येण्याकरितां संघाच्या निधींतून जरूर तो पैसा खर्च करून, पुढील कायम व्यवस्थेकरितां त्याचा ट्रस्ट करावा, असेंहि या ठरावांत सांगितलें होतें.

## स्मारकाची योजना

सदर ठरावान्वयें या कमिटीनें स्मारकाची योजना मुक्रर केली. तिचा विचार ता. २८ जानेवारी १९२३ रोजीं मुंबई येथें सरदारगृहांत कार्यकारी मंडळाची जी सभा भरली तिनें केला, व मूळ योजनेंत आपल्या मनाप्रमाणें कांहीं फेरफार करून ती मंजूर केली. पुढें तारीख ७ जून १९२३ रोजीं स्मारकसंस्थेचा ट्रस्ट मुंबई येथें नोंदण्यांत आला. टिळकस्वराज्यसंघापाशीं जी रक्कम होती तिच्यापैकीं एक लक्ष रुपये वेगळे ठेवून स्मारकसंस्था बनवावी, व ही रक्कम सदर ट्रस्टच्या अधिकाऱ्यांचे स्वाधीन करावी अशी मंजुरी मिळाली होती, त्याप्रमाणें ट्रस्टींनीं ती रक्कम आपले स्वाधीन करून घेतली. या एक लक्ष रुपयांपैकीं तीस हजार रुपयांच्या रकमेंतून पुण्यास स्मारकाची इमारत व तींत ठेवण्याकरितां लो. टिळकांचा अर्धपुतळा करावा असें ट्रस्टडीडमध्यें एक कलम आहे. त्यास अनुसरून हल्लींची ही इमारत बांधण्यांत आलेली आहे. परंतु ट्रस्टींचे या कामांतील तज्ज्ञ सल्लागार श्री. विनायक त्रिंबक आगाशे, पेन्शनर इंजीनियर, यांच्या सल्ल्यानें इमारतीचें काम पुढें वारंवार होणार नाहीं म्हणून, वेळींच कांहींसें वाढविण्यांत आलें व मूळ योजनेंत विशेष सोईकरितां बऱ्याच दुरुस्त्याहि करण्यांत आल्या. या कारणानें मूळच्या अंदाजापेक्षां इमारतीस सुमारें दीडपट खर्च लागणार असें दिसतांच तोहि कार्यकारी मंडळानें पुढें मंजूर केला.

## श्रीमंत जगन्नाथमहाराजांची देणगी

हल्लींच्या इमारतीवर यापूर्वींच सुमारें चाळीस हजार रुपये खर्च झाला असून यापुढील अवश्य खर्च आणखी सुमारें पांचसहा हजार होईल असा अंदाज आहे. तथापि एक गोष्ट मुद्दाम सांगितली पाहिजे ती ही कीं, इतर कोठेंहि नवीन जागा घेऊन, असली व येवढी इमारत बांधावयाची असती तर ही रक्कम फारच अपुरी पडली असती. परंतु श्री. जगन्नाथमहाराज यांनीं या विस्तृत प्राकारासह आंतील बहुतेक जागा या स्मारकाकरितां दिली आणि या जागेंतील पहिल्या जुन्या चबुतऱ्यावर ही इमारत बांधतां आली म्हणूनच एवढ्या रकमेंत हें काम झालें. कांहीं तज्ज्ञ लोकांचा असा अभिप्राय पडतो कीं, हल्लींची विस्तृत मोकळी जागा, तिच्या भोंवतालचा मजबूत तट व हा जुना चौथरा या सर्वांची किंमत सुमारें एक लक्ष रुपये होईल. यावरून श्रीमंत जगन्नाथमहाराज यांनीं या स्मारककृत्यास अर्पण केलेल्या मौल्यवान् मिळकतीच्या मानानें स्मारक-कमिटीनें इमारतीवर खर्च

केलेली रक्कम फारच अल्प आहे आणि इमारत उठावदार व शोभिवंत अशा परिस्थितींत आज जी दिसते तिचें श्रेय मुख्यतः श्री जगन्नाथमहाराज यांसच दिलें पाहिजे. इमारतीचा नकाशा मंजूर करण्यापूर्वी जुना पाया कितपत मजबूत आहे हें पाहण्याकरितां इंजिनियरसाहेब यांनीं खोदून पाहिलें. तेव्हां दहा पंधरा फूट खालीं खणलें तरी तो संपत नाहीं असें आढळून आल्यावर मगच जुन्या पायावर इमारत बांधण्याला त्यांनीं संमति दिली. अशा रीतीनें या स्मारक-मंदिरांत जुन्या नव्याचा उत्कृष्ट मेळ पडलेला असून, कोणत्याहि कामांत नव्याला जुन्याचा आधार कसा असावा याचें हें एक नमुनेदार उदाहरण म्हणून दाखवितां येण्यासारखें झालें आहे.

## उरलेलें कार्य

स्मारक-संस्थेचें एक कार्य म्हणजे ही इमारत आज आपणास दिसते अशा स्थितींत, प्रवेशसमारंभ करण्यापुरती, पुरी झाली आहे; तथापि अद्यापि खुद्द इमारतींत व इमारतबाहेरच्या जागेंत सुधराई-सफाईचें काम व्हावयाचें उरलें आहे व तें महिना-पंधरा दिवसांत पुरें होईल. तें झाल्यावर इमारत व भोंवतालची मोकळी जागा यांचा निरनिराळ्या सार्वजनिक कार्यांकरितां कसा उपयोग व्हावयाचा याचा विचार ट्रस्टी लवकरच करतील. स्मारक ट्रस्टमध्यें नमूद केलेलीं आणखी तीन कामें आहेत तीं अशीं:— १ लो. टिळकांच्या आवडत्या विषयांना अनुलक्षून या इमारतींत ग्रंथसंग्रह करणें. २ वरील प्रकारच्या विषयांसंबंधाचें व लो. टिळक यांचीं मतें प्रतिपादन करणारे ग्रंथ मुद्दाम लिहून प्रसिद्ध करणें व दुसऱ्या कोणी ते लिहिलेले असल्यास त्यांच्या प्रसिद्धीस व प्रसारास मदत करणें. आणि ३ राष्ट्रोपयोगी कार्य करण्यास तयार असणाऱ्या कांहीं थोड्या तरुण विद्यार्थ्यांस या कार्यास लागणारें शिक्षण देणें. हीं तीनहि कामें स्मारक-ट्रस्ट लवकरच हातीं घेणार आहे; व त्यांच्या कचेरीला ही इमारत मुख्यतः उपयोगी पडणार आहे. हीं तीनहि कार्यें पुष्कळ दिवस चालणारीं असून त्यांना पुष्कळ पैसा व पुष्कळ लोकांची मदत लागेल हें उघड आहे. पण हीं दोनहि साधनें यथाकाल मिळतील अशी ट्रस्टींना आशा वाटत आहे.

शेवटीं मुख्यतः एक गोष्ट सांगावयाची ती ही कीं, प्रस्तुत स्मारक-संस्थेची इमारत, जरी कोठें तरी एका ठिकाणींच होणें शक्य म्हणून मध्यवर्ति अशा आणि लो० टिळकांचें वसतिस्थान झालेल्या पुण्यांत बांधली गेली आहे, तरी तिच्या-

विषयीं ममत्व बाळगण्याचा हक्क मुंबई शहर, छोटामोठा महाराष्ट्र व कर्नाटक या सर्व प्रांतांना आहे. खुद्द या इमारतीवर खर्च झालेला पैसा व पुढें या इमारतींत स्थापल्या जाणाऱ्या कचेरीवर व तिजकडून होणाऱ्या कार्यांवर खर्चिला जाणारा पैसा हा मूळ 'इंडियन होमरूल लीग' किंवा त्यानंतर नामांतर पावलेल्या 'टिळक स्वराज्य-संघ'याच्या तहाहयात व इतर सभासदांच्या वर्गणीच्या रकमेंतूनच संघाकडून दिला गेला आहे. होमरूल लीग किंवा टिळक स्वराज्य-संघ या संस्थेच्या शाखा मुंबई, मध्यप्रांत, वऱ्हाड, दक्षिण-महाराष्ट्र व कर्नाटक या प्रांतांत पसरलेल्या होत्या व या सर्व प्रांतांत मिळून त्याचे सुमारें एक हजार तहाहयात सभासद प्रत्येकीं १०० रुपये देऊन झालेले होते. अर्थात् स्वामित्व किंवा ममत्व यांपैकीं कोणत्याहि दृष्टीनें हा स्मारकट्रस्ट व त्याचें जुनें—नवें कार्य या अनेक प्रांतांत पसरलेल्या राष्ट्रीय भावना प्रेरित सद्गृहस्थांचेंच आहे यांत काय संशय !

स्मारक संस्थेच्या कार्यासंबंधानें पाहतां यवतमाळ येथील परिषदेचे अध्यक्ष बॅरि० बॅप्टिस्टा यांनीं आपल्या भाषणांत खालील उद्गार काढलेले नमूद आहेत.

## प्रतियोगी सहकारिता

"लोकमान्यांनीं अमृतसर येथें प्रतियोगी सहकारिता महात्माजी व बेझंट या जोडीनें सुचविलेल्या पूर्ण सहकारितेच्या ऐवजीं सुचविली. अमृतसरहून परत आल्यावर काँग्रेस डेमोक्रॅटिक पार्टीची संघटना करण्याचा त्यांचा विचार होता व त्यांनीं तूर्तातूर्त एक योजना प्रसिद्ध करून निवडणुकी करण्याची तयारी चालविली होती. जिकडे तिकडे यशाची आशा दिसत होती. अशा वेळीं कलकत्त्याची स्पेशल काँग्रेस भरली. लोकमान्यांना आपल्यांतून घेऊन जाणें ईश्वरास इष्ट वाटलें. कलकत्त्यास या "सैतानी सरकारा" कडून स्वराज्य हिसकावून घेण्याचा कृतनिश्चय झाला त्यावेळीं एकाहि टिळकभक्तानें कौन्सिलबहिष्काराकरितां आपलें मत दिलें नाहीं. आणि कौन्सिलांत शिरणें हें काँग्रेसचें वैर होऊं शकत नाहीं असें जरी महात्माजींनीं सांगितलें तरी एक खेरजि करून बाकी कोणताहि टिळकानुयायी कौन्सिलांत गेला नाहीं. स्वराज्य एका वर्षांत देऊं असें आश्वासन देण्यांत आलें, परंतु आज तें एका पिढीमागें ढकलण्यांत आलें आहे. नॉन्-को-ऑपरेशनच्या शस्त्रागारांतलीं मुख्य हत्यारें म्हणजे कायदेभंग व कर न देण्याची चळवळ, परंतु हीं दोनहि आज एकमतानें दूर फेंकून दिलीं गेलीं आहेत. कोणीहि तीं

साधनें हातीं धरण्यास तयार नाहीं. अशा परिस्थितींत कौन्सिलांत शिरावें कीं न शिरावें हा प्रश्न राष्ट्रापुढें येऊन पडला आहे. ह्या संघाचें त्याला काय उत्तर आहे ? संघाचे सभासद या नात्यानें आपल्याला स्वराज्यसाधनाकरितां कोणताहि उपाय टाकून देणें इष्ट नाहीं, मग तें को-ऑपरेशन असो, रिस्पान्सिव्ह को-ऑपरेशन असो किंवा नॉन्-को-ऑपरेशन असो."

बॅप्टिस्टा यांनीं आपल्या भाषणांत वरील उद्गार निराशाजनक अशा परिस्थितींत काढले होते. तथापि, होमरूल लीग काय किंवा टिळकस्वराज्यसंघ काय, यांच्या उद्देशाविषयीं व कार्यांच्या धोरणाविषयीं त्यांना किंवा संघाच्या इतर सभासदांना विस्मरण पडलें नव्हतें किंवा कायमची निराशाहि वाटत नव्हती. यवतमाळ येथील सभेनंतरच्या दोन वर्षांत या दृष्टीनें दिशा अधिक उजळूं लागल्या आहेत, आणि मुख्यतः तो हेतु व तें कार्य यांच्या संरक्षणार्थ संघानें स्थापन केलेली ही स्मारकट्रस्टची संस्था आपल्या अंगावर पडलेली जबाबदारी पार पाडण्यास लवकरच समर्थ होईल असा भरंवसा वाटतो.

केवळ इमारती बांधून व पुस्तकसंग्रह करून टिळकांसारख्या तेजस्वी पुढाऱ्याचें खरें स्मारक होऊं शकत नाहीं ही गोष्ट अगदीं उघड आहे. तथापि अशा विभूतींचें अल्पस्वल्प सक्रिय अनुकरण होण्यासहि त्यांचा स्मृतिप्रसाद अवश्य असतो, हें हिंदुस्थानांत झालेल्या टिळकांच्या अनेक स्मारकांनीं सिद्ध केलें आहे; आणि प्रस्तुतची इमारत उभारून उपरिनिर्दिष्ट कार्यें तींत घडवून आणण्याचा स्मारकसंस्थेचा उपक्रमहि वरील सिद्धान्तास धरूनच आहे.

## १८ लो. टिळकांची प्रथम श्राद्ध-तिथि

( केसरी, ता. १९ जुलै १९२१ )

लो. टिळकांनीं सुरू केलेल्या पंचांगाप्रमाणें त्यांची प्रथमश्राद्धतिथि उद्यां पडते. ही तिथि महाराष्ट्रभर व इतरत्रही श्राद्धतिथीप्रमाणें पवित्र म्हणून पाळली जाईल यांत शंका नाहीं. प्रत्यक्ष श्राद्धाप्रमाणें विधि न होतां फक्त दानधर्म व पुण्यस्मरण वगैरे गोष्टी ठिकठिकाणच्या लोकांच्या अनुकूलतेप्रमाणें केल्या जातील असें दिसतें व तसेंच होणें योग्यहि आहे. लो. टिळक व महाराष्ट्रजनता यांचा संबंध पितापुत्रासारखा नसून गुरुशिष्यासारखा किंवा पूज्यपूज्यकांसारखा आहे. यामुळें त्यांच्या स्मरणार्थ केलेल्या कृत्यास श्राद्ध असें नांव लाक्षणिक अर्थानें दिलें तरी,

पुत्रकृत श्राद्धाप्रमाणें त्यांत पिंडदानादि क्रिया असूं शकणार नाहीं हें उघड आहे. शिवाय हें श्राद्धहि टिळकांना सद्गति मिळावी अशा इच्छेनें करावयाचें नसून ( कारण त्यांच्या सुकृतानें त्यांना ती मिळालेलीच आहे ) त्यांच्या स्मरणबलानें आपल्या सर्व समाजाला सुस्थिति मिळावी अशा उद्देशानेंच तें करावयाचें आहे. श्राद्धकर्माचे शेवटीं पितरांकडून जो आशीर्वाद मागावयाचा असतो तोहि टिळकांच्या श्राद्धप्रसंगीं केवळ ठराविक स्मृत्युक्त शब्दांनीं मागावयाचा नसून अधिक व्यापक असाच मागितला पाहिजे. 'दातारो नोऽभिवर्धन्तां वेदाः संततिरेव च। श्रद्धाच नो मागमद्बहुधेयं च नोस्त्विति ॥' हाच आशीर्वाद पण थोड्या निराळ्या अर्थानें मागावयाचा आहे. आपणालाहि दात्यांची अवश्यकता आहे, संततीची इच्छा आहे, श्रद्धेची अपेक्षा आहे व धनादि साधनांची जरूरी आहे पण या सर्व गोष्टी केवळ व्यक्तिनिष्ठ किंवा कुलनिष्ठ राहिल्यानें भागणार नाहींत. त्या सर्व राष्ट्राकरितां मिळून हव्या व त्या विषयीं सर्व राष्ट्रोपयोगी असा आशीर्वाद जर टिळकांच्या आत्म्यापाशीं मागितला तर तो आपणांस खचित मिळाल्याशिवाय राहणार नाहीं.

एक वर्षापूर्वी आपल्या देशाची स्थिति जितकी बिकट होती तितकीच ती आजहि आहे. पंजाबासंबंधीं मुख्य तक्रारी अद्यापि दूर झाल्या नाहींत आणि होण्याचा रंगहि दिसत नाहीं. लष्करी कायद्याच्या अमलामुळें तुरुंगांत पडलेले कांहीं निरपराधी लोक कदाचित् लॉर्ड रेडिंग हे बंधमुक्त करितील. परंतु या पलीकडे, म्हणजे खऱ्या गोऱ्या गुन्हेगारांना शासन करण्याचे बाबतींत, कांहीं होईल अशी अपेक्षा न करण्याबद्दल त्यांनीं बजावूनहि सोडलें आहे! खिलाफत-प्रकरण अद्यापि जवळ जवळ आहे तेथेंच असून, उलट इंग्लंड फिरून तुर्कांविरुद्ध युद्ध पुकारतें कीं काय अशी शंका वाटूं लागली आहे. स्वराज्यासंबंधानेंहि पाऊल बहुधां आहे तेथेंच आहे. हिंदी लोकांना लष्करी सत्ता देण्याचें बाजूसच राहो, पण लष्करी खर्चहि कमी न करण्याचा सरकारचा निश्चय दिसतो व या धोरणाला संमति मिळविण्याकरितां बड्या कौन्सिलांत भोळ्या सभासदांना मोटारींत घालून सरहद्दीचा अपूर्व देखावा दाखविणें, आणि सरहद्दीपलीकडील फक्त कल्पनागम्य शत्रूचें दर्शन घडवून मनांत भीति उत्पन्न करणें या गोष्टी सुरूच आहेत. लष्करी सत्ता दूरच राहो, पण मुलकी जमाखर्चावरील वरिष्ठ सत्ताहि देण्याची इच्छा अद्याप सरकाराला होत नाहीं. दरम्यान इकडे सुधारलेल्या कायदे-कौन्सिलांतील सभासदांची पाठ थोपटून "तुम्ही

साळसूद, निरुपद्रवी, बिनतक्रारखोर निघालां हीच तुमच्या सत्पात्रतेची खूण होय," असें त्यांना सांगण्यांत येत आहे. अशा वेळीं टिळकांसारखा स्वराज्यवादी राष्ट्रीय पुढारी असता तर हवा होता, असें प्रत्येक हिंदी मनुष्यास वाटत असल्यास नवल नाहींच. पण दैवगति अशी विचित्र आहे कीं, टिळक जिवंत असते तर बरें झालें असतें अशा प्रकारचे उद्गार मवाळ पुढाऱ्यांच्या आणि वरिष्ठ अधिकाऱ्यांच्याहि तोंडून निघालेले ऐकण्याचें सद्भाग्य कित्येकांना लाभतें असें आमच्या कानावर आलें आहे. मग महात्मा गांधींसारख्या स्वराज्यवादी कर्त्या पुढाऱ्याला टिळकांची गरज भासावी यांत आश्चर्य नाहीं.

मवाळ व वरिष्ठ गोरे अधिकारी यांना टिळक कां आठवतात याचें कारण उघडच आहे. 'पुढचा येतो तो मागच्याला बरा म्हणवितो' ही मुळीं म्हणच आहे, व त्या म्हणीप्रमाणें येथेंहि प्रकार घडून आला आहे. टिळक जिवंत असतां त्यांना सरकारनें शत्रुवत् लेखलें. पण आतां ते वारल्यावर सरकारच्या प्रत्ययाला असें आलें कीं, टिळक सर्वस्वीं सहकारी होणें शक्य नसलें तरी ते कदाचित् प्रतियोगी सहकारी तरी राहिले असते. ' जशास तसें वागणें ' ही टिळकनीति असल्यानें, आपण एखादा बरा शब्द बोललों किंवा बरी कृति केली तर, तेवढ्यापुरता जपूनच कां होईना, बरा शब्द टिळकांनीं बोललेला ऐकूं येता, मग पुढच्या क्षणीं ते किती का शिव्या देईनात ! शिवाय टिळकांचें नांव एकदां बद्दू होऊन राहिलें असल्याकारणानें, त्यांनीं दिलेल्या शिव्यांच्या बिब्यावरां तो उतूं नये म्हणून त्यांच्यावरील शत्रुत्वाच्या आरोपाचा चुना सरकारास फासतां येत होता, पण आतां गांधीमहाराज पाहावें तों टिळकांच्याहि हातभर पुढें ! सरकारला त्यांच्याकडून प्रतियोगी सहकारिताहि लाभावयाची नाहीं. सदा हातांत 'सैतानी' शिवीचा सोटा घेऊनच ते उठलेले ! त्यांना शत्रू या नांवानें बाटवावें तर पूर्वीं सरकारी मित्र म्हणून स्वतः सरकारनेंच त्यांचा गौरव केलेला. त्यांना अराजनिष्ठ म्हणण्याची सोय नाहीं; कारण टिळकांप्रमाणें त्यांना कधीं न्यायकोर्टांत शिक्षा झालेली नाहीं. त्यांना शांतताभंग करणारे म्हणावें तर 'अनत्याचारी' हा शब्द त्यांनीं आपल्या निशाणावर लिहिलेला ! अशा रीतीनें गांधींनीं सरकारची कुचंबणा करून त्यांना टिळकांचें स्मरण करावयास लावलें आहे.

मवाळांचीहि स्थिति कांहीं अंशीं अशी झाली आहे. तेहि एखाद वेळ 'टिळक पुरवले, पण गांधी नकोत' असें म्हणण्याचा आव घालण्याचें धाडस करतात.

त्यांचेंहि झालें तरी कारण हेंच, कीं टिळकांना बरें म्हटल्यानें ते पुनः जिवंत होऊन थोडेच त्रास द्यावयास येतात ! उलट गांधींचें प्रकरण मवाळांना 'कुऱ्हाडीचा दांडा गोताला काळ' असें होऊन बसलें आहे. गांधींना टिळकांप्रमाणें शिवी देण्याचीहि सोय नाहीं. कारण स्वतः गांधी हे मवाळांना कधींहि प्रेमाच्या शब्दाशिवाय बोलत नाहींत, आणि त्यांनीं गांधींना तिरस्कारानें दूर झिडकारून टाकावें म्हटलें तर अजूनहि ते नामदार गोखल्यांना गुरु म्हणून जिव्हाळ्यानें जवळ येऊन चिकटूं पाहतातच. मवाळांना टिळक हे शत्रु पुरवले असते; कारण रागीटपणानें यांच्या तोंडून एखादा अपशब्द निघाला असतां तो उचलून घेऊन जन्मभर त्यांच्या नांवानें तोच उगाळीत बसण्याचा मानभावी उद्योग त्यांना लाभता. टिळक बरे, कारण ते कायदे कौन्सिलांमध्यें शिरून त्यांचा उपयोग करावा असेंहि म्हणत असत. टिळकपक्षानें कौन्सिलांत घुसून सोयीच्या जागा अडवाव्या अशी मवाळांची इच्छा असण्याचें वास्तविक कांहींच कारण दिसत नाहीं; पण 'कौन्सिलांत जावें' इतकी मोजक्या शब्दांची पडत्या फळाची आज्ञा तरी टिळकांकडून मवाळांना मिळणारी होती; आणि एरवीं टिळकांच्या प्रत्येक शब्दाला जरी त्यांची हरकत असली तरी कौन्सिलांत शिरण्याविषयीं टिळकांची संमति ही त्यांनीं आज्ञेप्रमाणें शिरसावंद्य मानली असती. तात्पर्य, टिळक आज जिवंत असते तर बरें झालें असतें, असें मवाळ म्हणतात; पण तें, त्यांच्या तुलनेनें, गांधींना नांवें ठेवण्याला किंचित् काल्पनिक जागा मिळते म्हणून !

पण टिळक आज जिवंत असते तर हवे होते हे शब्द मवाळ लोक किंवा गोरे वरिष्ठ अधिकारी यांच्या तोंडून निघाले तरी ते, टिळकांना गुरूप्रमाणें पूज्य व वंदनीय मानणाऱ्या राष्ट्रीयपक्षाच्या तोंडून ज्या अर्थानें निघतील, त्या अर्थानें निघणें शक्य नाहीं, हें उघड आहे. फार काय, पण गांधी हे स्वतः टिळकांना गुरु न मानितां गोखल्यांनाच गुरु मानणारे आहेत; तरींहि त्यांच्या तोंडून ज्या अर्थानें टिळकांच्या स्तुतीचे शब्द निघतात त्या अर्थानें मवाळ व गोरे अधिकारी यांच्या तोंडून ते निघणें शक्य नाहीं. ता. १३ जुलैच्या 'यंग इंडिया' च्या अंकांत अभावितपणें गांधींनीं टिळकांसंबंधानें कांहीं उद्गार खुल्या दिलानें काढले आहेत. कोणा एका टिळकभक्तानें महात्मा गांधींना नुकतेंच एक निनांवीं पत्र पाठवून त्यांत टिळकांसंबंधीं खालील मजकूर लिहिलेला होता--

" लो. टिळकांच्या अंतःकरणाला जें कार्य नेहमीं प्रियतम वाटत होतें तेंच तुम्हीं उचललें आहे याबद्दल तुमची मी तारीफ करतों. तुमच्या ठिकाणीं टिळकांचेंच आत्मचैतन्य वास्तव्य करीत आहे व तुम्ही टिळकांचे खरे अनुयायी आहां यांत शंका नाहीं. टिळकांचे अनुयायी असल्यामुळें तुम्हांला स्वराज्यप्राप्तीविषयीं निराश होण्याचें कारण नाहीं. मात्र एक गोष्ट तुम्हीं करूं नये ती ही कीं, अशा रीतीनें टिळकांचेंच कार्य करीत असतां आपण गोखल्यांचेच शिष्य आहां असें मिथ्या भासवून तुम्हीं लोकांची फसवणूक करूं नये ! " 'अनामिक बहादुर' कोणास काय लिहितील नियम नाहीं, याचा पुष्कळांना अनुभव असतो. पण गांधींचें गांधीत्व यांतच दिसून येतें कीं, त्यांनीं या निनांवी भ्याड लेखकाचा सन्मान जाहीर परामर्षानें घेतला आहे !

या गृहस्थाला उत्तर देतांना गांधी 'यंग इंडियां'त लिहितात, " लो.टिळकांचा अनुयायी म्हणवून घेण्याचा मान स्वीकारण्याचा मला हक्क नाहीं. टिळकांच्या अंगीं दुर्दम इच्छाशक्ति होती, त्यांची विद्वत्ता अगाध होती, त्यांची देशप्रीति अतुल होती, विशेषतः त्यांचा स्वार्थत्याग व त्यांचें खासगी वर्तन अत्यंत शुद्ध होतें; या सर्व गोष्टींबद्दल इतर लोकांप्रमाणें मी त्यांची तारीफ करतों. आधुनिक काळीं झालेल्या सर्व लोकांत स्वकीयांच्या कल्पनाशक्ति जिंकून हस्तगत करणारा टिळकांयेवढा पराक्रमी पुरुष दुसरा कोणीहि झाला नाहीं. त्यांनींच आम्हां सर्वांच्या मनांत स्वराज्याच्या कल्पनेची खरी प्रेरणा केली. हल्लींच्या राज्यपद्धतीच्या दोषांचें खरें विज्ञान टिळकांइतकें दुसऱ्या कोणाला केव्हांहि झालें नाहीं. आणि टिळकांचा कोणताहि खास सच्छिष्य टिळकांचा स्वराज्यविषयक आदेश जितक्या यथार्थ व विश्वसनीय रीतीनें लोकांस शिकवीत आहे, तितकाच मीहि पण शिकवितों असें म्हणण्याचा हक्क मीं नम्रपणें मागून घेतों. पण हें सर्व होत असतां अशी एक जाणीव पूर्णपणें माझ्या मनांत उभी राहाते कीं, टिळकांचे मार्ग व माझे मार्ग हे कांहीं एकच नाहींत. ते भिन्न आहेत ! आणि म्हणूनच अद्यापि महाराष्ट्रांतील कांहीं पुढाऱ्यांच्या मनाला माझे मार्ग पटविण्याची अडचण मला भासते. पण मला अशी खात्री वाटते कीं, माझ्याहि मार्गावर टिळकांचा अविश्वास नव्हता. त्यांचे अंतःकरणांतील खोल विचार ते मला सांगत. टिळकांच्या मृत्यूपूर्वीं अवघे पंधरा दिवस त्यांच्यापाशीं माझें शेवटचें संभाषण झालें त्यावेळीं अनेक मित्र हजर होते. त्यांच्या देखत ते मला म्हणालें कीं, " तुमचे मार्ग लोकांना पटविनां आले तर ते फारच उत्तम ठरतील. पण

त्याबद्दल मला अनेक शंका येतात!" इतकें सांगून गांधी पुढें लिहितात "पण मला तर अनत्याचारी असहकारितेशिवाय दुसरा मार्गच माहीत नाहीं, व परीक्षेची वेळ जेव्हां अखेर केव्हां येईल तेव्हां राष्ट्राच्या गळीं माझे मार्ग उतरून वचनींहि पडले असेंच आढळून येईल, अशी मला आशा आहे."

लो. टिळक व महात्मा गांधी या उभयतांचा संबंध वर्णन करणारे याहून समर्पक व सत्यस्वरूप असे उद्गार अन्यत्र मिळणें अशक्य आहे. या उद्गारांवरून पहिला बोध घेण्याचा तो हाच कीं, टिळक व गांधी यांचे मार्ग कितीहि भिन्न असले तरी त्या उभयतांच्याहि मनांत परस्परांविषयीं पराकाष्ठेचा आदर वसत होता. गांधींनीं टिळकांविषयीं किंवा टिळकांनीं गांधींविषयीं एकहि वावगा शब्द कोठें काढलेला कोणासहि दाखवितां येणार नाहीं. उभयपक्षींहि अहंभाव निघून गेल्याचा, किंवा परस्परांविषयीं मन निःशंक व निर्मळ झाल्याचाच हा परिणाम होय. टिळक वयानें थोर, अनुभवानें प्रौढ, गांधींपेक्षां आधीं बरींच वर्षें राजकारणाच्या आखाड्यांत उतरून सक्रोध विधीचे तडाखे खाल्लेले व स्वार्थत्यागानें पुनीत झालेले असल्यामुळें गांधींना त्यांच्याबद्दल वडील भावाप्रमाणें आदर वाटत होता. उलट गांधी वयानें लहान व हिंदी राजकारणाच्या कक्षेबाहेर अनेक वर्षें असले तरी त्यांचा सात्त्विक स्वभाव, त्यांची कार्याची चिकाटी, अलौकिक स्वार्थत्याग व स्वभावधैर्य या गोष्टींचा पगडा टिळकांच्या मनावर न बसणें अशक्य होतें. म्हणून तेहि त्यांना आपल्या धाकट्या भावाप्रमाणें मानीत. उपरिनिर्दिष्ट लेखांत म. गांधींनीं म्हटलें आहे कीं, "पहिल्याच भेटींत टिळकांनीं दाखविलेली प्रेमळपणाची सलगी पाहून त्यांच्याविषयीं माझ्या मनाला वाटणारी सर्व भीति एकदम निघून गेली." गांधी हिंदुस्थानांत आल्यावर 'सर्व्हंटस् ऑफ इंडिया' सोसायटीचे सभासद होते तर या उभयतांचे संबंध कसे राहिले असते हा एक प्रश्नच आहे; पण गोखले जिवंत असतां, व गोखल्यांना गांधी गुरुस्थानीं मानीत असतांहि, सर्व्हंटस् ऑफ इंडियाच्या गुरुकुलांत जाऊन गांधींनीं आपली पडशी उतरली नाहीं, यावरून ते तोंडानें एका नेमस्ताग्रणीचे शिष्य म्हणवीत होते तरी स्वतः त्यांचा नेमस्तपणा कांहीं वेगळ्या प्रकारचा होता हें टिळकांना तेव्हांच दिसून आलें आणि अमृतसरसारख्या ठिकाणीं गांधी व टिळक यांचा जरी मतभेद झाला तरी गांधी हे राष्ट्रीयसभावाले आहेत, नेहमींच्या चिरपरिचित मवाळांपैकीं खास नाहींत–ते थोडे लहरी किंवा

व्यक्तिस्वातंत्र्याचे विशेष भोक्के दिसले तरी ते मवाळ नाहींत, अस्सल जहाल आहेत; अशी टिळकांची खात्री दृढ झाली. व राष्ट्रालाहि दिसून आलें कीं, हिंदुस्थानचें चित्त आकर्षून घेईल असा आज टिळकांच्या खालोखाल किंवा बरोबरीचा एकच पुढारी आहे व ते महात्मा गांधी हे होत.

अशी स्थिति असल्यामुळें या उभयतांचे संबंध पुढें कसे काय राहतात याविषयीं लोकांना कुतूहल वाटणें स्वाभाविक होतें. पण या अनिश्चित स्थितींतच टिळकांना मृत्यु आला. ता. ३१ जुलै व १ आगस्ट १९२० या संधिकालीं ज्योतिषशास्त्रदृष्ट्या काय अपूर्व योग असतील हें ज्योतिषांनीं सांगितलें तर बरें होईल. त्या दिवशीं पंचांगांत तर पौर्णिमाच होती. पण लौकिकदृष्ट्याहि लोकांना असें भासलें कीं, हिंदी जगाला राजकीय शिक्षणाचा प्रकाश देण्याचें आपलें कार्य सारून टिळकरूपी प्रखर प्रवृत्तिसूर्य दुसऱ्या गोलार्धावर प्रकाशमान होण्याकरितां पश्चिम क्षितिजावर टेकला, आणि शीतळ प्रकाश देणारा शांततावादी निवृत्तिपर गांधीरूपी चंद्रमा पूर्वक्षितिजावर उगवला. महात्माजी कितीहि शांततावादी असले तरी आज एक वर्ष लोटल्यावर त्यांना ही चंद्राची उपमा कायम ठेवणारीं माणसें क्वचितच भेटतील, इतकी राजकीय चळवळीची आग गांधी यांनींहि पसरवून सोडली आहे. पण टिळकांचा ज्या दिवशीं मृत्यु त्याच दिवशीं गांधींच्या असहकारितेच्या प्रचंड चळवळीचा पहिला दिवस हा योग लक्षांत घेतला असतां फक्त पौर्णिमेच्या दिवशीं आकाशांत एकाच वेळीं व तेंहि तुल्यबलानें दिसून येणाऱ्या अस्तोदयोन्मुख सूर्यचंद्राची उपमा लोकांच्या मनाला पछाडून राहिली असल्यास नवल नाहीं. कोणी लोक असें म्हणूं लागले कीं, पौर्णिमेचा चंद्र अत्यंत तेजस्वी असतो खरा, पण त्याचें सर्व तेज सूर्यापासूनच मिळालेलें असतें व सूर्य अदृश्य झाल्यामुळेंच तें चमकतें. कोणी, अमेरिकन तत्त्ववेत्ता एमरसन याच्या वाक्याचा आधार घेऊन,म्हणूं लागले कीं, "Nature never sends a great man into the planet without confiding the secret to another," म्हणजे "एका महात्म्याच्या आध्यात्मिक किमयेचा मंत्र पूर्णपणें दुसऱ्याला शिकवून होईपर्यंत त्याला निसर्गदेवता या भूगोलावरून दुसऱ्या जगांत पाठवीतच नाहीं." अर्थात् टिळकांनींच गांधींना असहकारितेचा मंत्र शिकविला, व त्यांचीच शिकवणी गांधी हे आज घटवीत आहेत ! पण हें निवळ पक्षाभिमानाचें बोलणें झालें, व तें कोणींहि बोलूं नये. कारण गांधी हे स्वतंत्र

विचाराचे व स्फूर्तीचे गृहस्थ आहेत. हिंदुस्थानांत येण्यापूर्वीपासूनच या असहकारितेचा मार्ग त्यांनीं पसंत करून चोखळलाहि होता. हा मार्ग त्यांनीं टिळकांपासून उचलला नाहीं. तसाच पण ज्यांना ते गुरुस्थानीं मानीत त्या गोखल्यांपासूनहि, त्यांना तो मिळालेला नाहीं.

उपरिनिर्दिष्ट 'यंग इंडिया'तील लेखांतच गांधी यांनीं असें जाहीर केलें आहे कीं, १८९६ सालीं ते गोखल्यांना भेटले त्या वेळीं 'आत्यंतिक शांतताप्रधान मार्गावर आपला विश्वास नाहीं' असें गोखल्यांनींहि त्यांना प्रांजलपणें सांगितलें. तात्पर्य, गांधी हे स्वतंत्र बुद्धीचे गृहस्थ असल्यामुळें त्यांनीं हिंदुस्थानांत आल्यावर गोखले किंवा टिळक यांपैकीं कोणाहि एकाचें शिष्यत्व न पत्करतां आपला स्वतंत्र असा पंथ काढला व ही गोष्ट त्यांना भूषणभूतच आहे. 'My method is not Mr. Tilak's method' माझा मार्ग तुमच्याहून भिन्न आहे हें जसें गांधींना टिळकांस सांगतां आलें असतें तसेंच तें त्यांना गोखल्यांसहि सांगतां आलें असतें. "गोखले आज हयात असते तर मी आज त्यांच्या हाताखालीं काम करीत राहिलों असतों" असें जें गांधींनीं आपल्या लेखांत म्हटलें आहे तें ते खुशाल म्हणोत. कारण गांधींचा तसा विश्वास आहे व कोणाच्या विश्वासाला कोणीं दुखवूं नये. परंतु गोखल्यांचें व त्यांचें मुळींच बनलें नसतें असें आम्हांस तरी प्रामाणिकपणानें वाटतें. आज ना० शास्त्र्यांचें व त्यांचें जितपत पटत आहे तितकेंच गोखल्यांचें पटलें असतें. गोखल्यांचें गुरुत्व पत्करून गांधी हे जर आपल्या उद्योगास लागते तर त्यांना लवकरच, समर्थांनीं म्हटल्याप्रमाणें, पण किंचित् शब्दाचा फरक करून असें आढळून आलें असतें कीं, " गुरूची मर्यादा राखतां । विवेकबुद्धि क्षोभे तत्त्वतां । तेथें विवेक रक्षुं जातां । गुरुक्षोभ घडे ॥ ऐशीं सांकडीं दोहींकडे । तेथें व्यर्थ परतावा घडे । अन्यमार्गीयां गुरुत्व न घडे । याकारणें ॥ आतां असो हा विचारू । स्वयातीचा पाहिजे गुरु । नाहीं तरी भ्रष्टाकारु । नेमस्त घडे ॥ जरी आवडली घेतली जीवें । तरी आपणचि भ्रष्टावें । बहुत जनांसि भ्रष्टवावें । हें तों न घडे ॥" असें म्हणून गांधींना गोखल्यांशीं फक्त व्यक्तिशः गुरुबुद्धि ठेवून असहकारितेचा मार्ग स्वीकारल्यावर झगडावेंच लागलें असतें.

हें गोखल्यांविषयीं झालें. पण स्वतः टिळक आज हयात असते तर त्यांचें व गांधींचें कसें काय बनलें असतें हा प्रश्न राहतो व त्याचेंहि उत्तर देणें जरूर आहे.

आम्हांला तर असें वाटतें कीं गांधी हे गोखले आपले गुरु मानीत असले, व आपले आणि टिळकांचे मार्ग भिन्न आहेत असें प्रतिपादीत असले, तरी गोखल्यांपेक्षां टिळकांशींच त्यांचें अधिक पटलें असतें. याचीं कारणें अगदीं उघड आहेत. पहिलें हें कीं, राष्ट्रीय सभा हें गांधी व टिळक यांना समानाधिष्ठान होतें. या संस्थेची शक्ति वाढवून तिच्या द्वारें राष्ट्रकार्य करावयाचें हा दोघांचाहि निश्चय दृढ होता. गांधींची असहकारिता ही टिळकांच्या 'प्रतियोगी' ऊर्फ शबल असहकारितेहून भिन्न असली तरी गोखल्यांच्या शुद्ध सहकारितेपेक्षां पुष्कळच जवळ होती. टिळकांचें म्हणणें कायदेकौन्सिलांत घुसावें असें असलें तरी असंतोषजन्य क्षोभच या प्रवेशाच्या मुळाशीं असतो; उलट गोखले हे 'झाल्या त्या सुधारणा पुष्कळच आहेत' असें म्हणणारे असते हें त्यांच्या अनुयायांच्या उदाहरणावरून दिसून येतें. अर्थात् गुरुशिष्य गोखले–गांधी हे दोन टोकांना, व टिळक दोहोंच्या दरम्यान पण त्यांतल्यात्यांत गोखल्यांहून गांधींना अधिक जवळ असेंच दिसलें असतें. सर्वांत मोठें कारण हें कीं, असहकारितेची जी चळवळ आज गांधींनीं सुरू केली तीच थोड्या पर्यायानें व मर्यादित स्वरूपांत बारा वर्षांपूर्वीं टिळकांनीं सुरू केली होती. पूर्वीं केसरीच्या एकदोन अग्रलेखांत बहिष्कारयोगासंबंधानें टिळकांनीं खालील उद्गार काढले आहेतः—

'बहिष्कार' हा मूळ शब्द जरी धार्मिक शिक्षेचा वाचक असला तरी 'काळें-पाणी' या रूपानें त्याचा राजकीय शिक्षाग्रंथांत म्हणजे पीनल कोडांत समावेश झालेला आहे. या राजकीय रूपांतराप्रमाणेंच त्याचें व्यावहारिक रूपांतर व्हावयास पाहिजे; असें केसरींत पहिल्या वर्षीं, म्हणजे सन १८८१ सालीं; आयर्लंडच्या लँड लीगसंबंधानें लिहितांना आम्हीं लिहिलें होतें. 'एकदां बहिष्कारास व्यावहारिक शिक्षेचें स्वरूप मिळाल्यास त्यापासून आपणांस पुष्कळ उपयोग करून घेतां येईल, व ज्या हजारों गोष्टी आपल्या नुकसानीस कारण होतात त्यांचा चांगला बंदोबस्त करतां येईल' असें त्यावेळीं आम्हीं म्हटलें होतें. पंधरा दिवसांपूर्वीं लिहिलेल्या राष्ट्रीय बहिष्कार या लेखांत हेंच मत प्रतिपादन केलें आहे; आणि तेंच बरोबर आहे अशी आमची खात्री आहे. हिंदुस्थानसारख्या सर्वतोपरी पंगु झालेल्या देशास आपलें म्हणणें तडीस नेण्यास जर कांहीं साधन किंवा योग राहिला असेल तर तो 'राष्ट्रीय बहिष्कार' हाच होय. ( केसरी ५-९-०५ )

"इंग्लंडचे लोकांस आमच्यावर प्रेम करावयास शिकविण्यास या बहिष्कार-योगाच्या साधनाशिवाय दुसरें साधन आम्हांस तरी दिसत नाहीं. जे आपल्यावर प्रेम करीत नाहींत त्यांचा संबंध होतां होइल तों टाळणें ही जगाची सहज प्रवृत्ति आहे. मँचेस्टरनें आपल्या मालाची किंमत कमी करून आम्हांस या योगापासून भ्रष्ट करण्याचा प्रयत्न केला तरी आम्हीं त्याच्या प्रयत्नास भुलतां कामा नये. जेथें प्रेम नाहीं त्या ठिकाणीं अपरिहार्य प्रसंगाशिवाय जाणें निंद्यच मानलें जाईल. भारतीय युद्धास आरंभ होण्यापूर्वीं श्रीकृष्ण शिष्टाईस गेले असतां दुर्योधनानें उत्तम थाटमाट करून श्रीकृष्णास अन्नग्रहण करण्यास पाचारण केलें. त्यावेळीं श्रीकृष्णांनीं दिलेलें उत्तर आम्हीं लक्षांत ठेवलें पाहिजे—

संप्रीतिभोज्यान्यन्नानि आपद्भोज्यानि वा पुनः।
न च संप्रीयसे राजन् न चैवापद्गता वयम् ॥

म्हणजे एक तर प्रेमानें मेजवानीचा उपभोग घ्यावयाचा असतो किंवा नाइलाज म्हणून पोट भरावयाचें असतें. हे राजा, तुझें आमचें प्रेमहि नाहीं व आम्हीहि अन्नान्नगत झालों नाहीं. तर तुझ्या अन्नाचें ग्रहण काय म्हणून करावें!" (केसरी १९-९-०५.)

वरील उताऱ्यांवरून टिळक हेहि बहिष्कारवादी म्हणजे असहकारितावादी होते हें उघड दिसून येईल. टिळकांनीं झालें तरी आजन्म असहकारितेच्या तत्त्वाचेंच आचरण केलें; याला साक्ष म्हणजे सरकारनें त्यांना 'सरकारचे शत्रू' हें नांव देऊन ठेवलें होतें. शत्रू हा कधीं तरी सहकारी असूं शकेल काय? टिळकांनीं वंगभंगाच्या चळवळीच्या वेळीं नुसत्या परदेशी कापडावरच बहिष्कार घातला होता असें नाहीं, तर केसरींतून त्यांनीं 'राष्ट्रीय' बहिष्काराचेंच समर्थन केलें होतें, व या बहिष्कारांत परदेशी माल, विदेशी सरकाराची सेवा वगैरे सर्व प्रकारच्या तत्त्वांचा समावेश त्यांनीं केला होता. कलकत्त्याच्या राष्ट्रीय सभेंत पालबाबूंनीं बहिष्काराच्या चळवळीच्या ठरावावर भाषण करितांना "जी एका मुद्यावरून दुसऱ्यावर व दुसऱ्यावरून तिसऱ्यावर चळते व वळते तीच खरी बहिष्काराची चळवळ" अशी कोटी केली होती व टिळकांनीं बहिष्काराला राष्ट्रीय हें जें विशेषण लावलें तेंहि याच अर्थानें. त्यावेळीं तत्त्व आजचेंच होतें, पण शब्द निराळे होते. आज ज्याला आपण असहकारिता म्हणतों त्यालाच त्यावेळीं बहिष्कार, स्वावलंबन वगैरे प्रतिशब्द होते. भिक्षां-

देहीचा राष्ट्राला कंटाळा आला होता व याचनाधर्माचा वीट आला म्हणजेच अयाचित धर्म सुचतो. हा 'अयाचित धर्म' फार पुरातन आहे व त्याचा उल्लेख उपनिषदांतहि आढळतो.

"एतस्मै प्राणाय ब्रह्मण एताः सर्वा देवता अयाचमानाय बलिं हरन्ति एवं ह वास्मै सर्वाणि भूतान्ययाचमनायैव बलिं हरन्ति य एवं वेद तस्योपनिषत् न याचेदिति । तद्यथा ग्रामं भिक्षित्वा अलब्धोपविशेन्नाहमतो दत्तमश्नीयामिति त एवैनमुपमन्त्रयन्ते ये पुरस्तात्प्रत्याचक्षीरन्नेष धर्मोऽयाचतो भवत्यन्नदास्त्वेवैनमुपमन्त्रयन्ते ददाम त इति !"

वर दिलेला तेजस्वी संस्कृत मंत्र कौषीतकि ब्राह्मणोपनिषदाच्या दुसऱ्या अध्यायांत आहे. त्याचा सारांश असा—"या प्राणरूप ब्रह्माला सर्व देवता तो न मागत असतांहि बलि आणून देतात. त्याचप्रमाणें सर्व भुतें तो मागत नसतांहि त्याला आणून देतात. हें जो जाणतो तो 'मी मागणार नाहीं' असाच मनांत गुप्त संकल्प करितो. (कां कीं, व्यवहारांत तसेंच घडून येतें.) एखादा भिकारी प्रथम गांवांत जाऊन भिक्षा मागतो, पण ती त्याला मिळत नाहीं. तेव्हां तो निश्चयानें (मांडी घालून) बसतो व भासवितो कीं, यापुढें कोणीं अन्न आणून वाढलें तरी मी तें खाणार नाहीं. असें झालें म्हणजे मग, पूर्वीं ज्यांनीं त्याला भिक्षा वाढली नाहीं ते आपण होऊन त्याजकडे येतात, त्याला अन्न देऊं लागतात, व म्हणूं लागतात 'महाराज, ही अन्नभिक्षा आम्हीं आपणांकरितां आणली आहे ती कसेंहि करून घ्याच, नाहीं म्हणूं नका'. हा श्रुतिमंत्र धर्मग्रंथांतला आहे. त्याचें पर्यवसान तत्त्वज्ञानात्मक आहे. ज्यानें तो मंत्र "पाहून लिहिला' त्यानें तो आध्यात्मिक सत्य सांगण्याकरितांच लिहिला. तथापि सत्य हें जसें त्रिकालाबाधित असतें त्याप्रमाणें तें विषयानें मर्यादितहि होत नाहीं. यामुळें जें व्यवहारांत खरें तेंच वेदांतांत खरें व जें वेदांतांत खरें तेंच व्यवहारांत खरें ठरतें. आत्मस्वरूपाची चर्चा करितांना अयाचित धर्माचा जो दाखला किंवा दृष्टांत ऋषींनीं दिला तो राजकारणांतहि सारखाच लागूं पडतो.

अयाचित धर्म म्हणजेच असहकारिता. मागितल्यानें जें न मिळालें तें नंतर दिलें असतां प्रथम न घेणें याचेंच नांव अयाचित धर्म, व राजकारणांतील असहकारितेचें मर्महि तेंच आहे. याचनेनंतर अयाचित धर्म प्राप्त होतो. सहकारितेनंतर असहकारिता सुरू होते. याचनाविफलेंत अयाचित धर्माचा जन्म आहे.

सहकारिता निष्फल झाली म्हणजे असहकारिता सहजच सुचूं लागते. याचना व सहकारिता हें प्रवृत्तीचें लक्षण आहे. अयाचितपणा व असहकारिता हें निवृत्तीचें लक्षण आहे. ही निवृत्ति मात्र उपजत किंवा जन्मसिद्ध नव्हे तर प्रवृत्तीची विटंबना झाल्यावर सुचलेला निवृत्तिरूप अयाचितपणा किंवा असहकारिता ही वैराग्यासारखी आहे. शेंकडा नव्याण्णव मुमुक्षूंना वैराग्य हें उपजतांच स्फुरत नाहीं. तर संसारांतील दुःखें भोगावयास लागल्यानंतर स्फुरतें. श्रीरामदासांनीं

'जन्म दुःखाचा अंकुर। जन्म शोकाचा सागर।
जन्म भयाचा डोंगर। चळेना ऐसा॥'

असें जन्माचें वर्णन केलें आहे. पण हें वर्णन पटूं लागण्यापूर्वी मनुष्यानें त्रिविध तापाचीं दुःखें कसकशा प्रकारचीं भोगलेलीं असतात याचें जें वर्णन त्यांनीं केलें आहे तें वगळून चालावयाचें नाहीं. त्याच न्यायानें असहकारितारूप वैराग्य हिंदी लोकांना सुचण्याचे आधीं त्यांनीं सहकारितेचीं सर्व दुःखें सोसलीं आहेत व सहकारितेची अखेर विटंबना झाल्यावरच त्यांना उपरति झाली हें लक्षांत ठेवलें पाहिजे. हिंदी सहकारितेचा इतिहास जवळ जवळ हिंदुस्थानांतील ब्रिटिश राज्याच्या इतिहासाइतकाच जुना आहे. आज सुमारें दीडशें वर्षें हिंदी लोकांनीं सरकारशीं सहकारितेशिवाय दुसरें काय केलें ? ही दीडशें वर्षांची सहकारिता फुकट गेल्यामुळेंच असहकारिता प्राप्त झाली कीं नाहीं ?

हें सर्व खरें; तथापि टिळक आज हयात असते तर त्यांनीं काय केलें असतें हा प्रश्न शिल्लक राहतोच. याचें उत्तर महात्मा गांधी यांनीं स्वतः जें दिलें आहे तें आम्हीं वर उद्धृत केलेच आहे; 'टिळक व मी यांचे मार्ग भिन्न आहेत. माझा मार्ग हा टिळकांचा मार्ग नव्हे, ही जाणीव गांधींच्या मनांतून ता. १३ जुलै १९२१ पर्यंत गेलेली नाहीं हें ध्यानांत ठेवण्यासारखें आहे! व ते म्हणतात तें खरेंच आहे. गांधींनीं टिळकांच्या शेवटच्या संभाषणांतील जे उद्गार दिले, त्यांवरून टिळकांच्या व गांधींच्या मार्गांत तत्त्वतः सूक्ष्म भेद आहे याची जाणीव टिळकांनाहि अखेरपर्यंत होती. टिळक गांधींना म्हणाले कीं, "लोकांना पटवून देतां येईल तर तुमचा मार्ग उत्कृष्ट आहे यांत शंका नाहीं." याचा उघड अर्थ असा होतो कीं, तो मार्ग लोकांना ताबडतोब पटवून देतां येईल कीं नाहीं याची शंका टिळकांना होती. **किंबहुना आपल्याला शंकाच आहे असें टिळक स्पष्ट शब्दांनीं गांधींना म्हणालेहि.** आतां टिळक हयात असते तर त्यांनीं महात्मा गांधींना कोणत्याहि रीतीनें

प्रत्यक्ष विरोध न करितां, त्यांच्या आपल्या दरम्यान कांहीं तरी मध्यम मार्ग काढून राष्ट्रीय चळवळीचा गाडा पुढें हांकला असतां यांत शंका नाहीं, तथापि या उभयतांच्या मार्गांतील सूक्ष्म भेद त्यामुळें नाहींसा झाला असताच असें मात्र नाहीं. व जी गोष्ट गांधींना माहीत आहे ती स्वतः टिळकांच्या अनुयायांना माहीत नसेल असें कसें होईल ?

टिळकांचे विचार त्यांच्या अनुयायांना माहीत होते म्हणूनच त्यांनीं कलकत्याच्या जादा सभेंत असहकारितेच्या ठरावास विरोध केला. पण बहुमत आपल्याविरुद्ध गेल्यावर राष्ट्रीय सभेचा मान ठेवणें हें आपलें कर्तव्य आहे असें टिळकांनीं मानलें असतें हेंहि माहीत असल्यामुळेंच त्यांच्या अनुयायांनीं कायदेकौन्सिलावर जाणूनबुजून बहिष्कार घातला. कौन्सिलावर बहिष्कार घालूं नये, त्यांत घुसून लढावें अशी टिळकांची इच्छा होती ही गोष्ट कोणासहि नाकबूल करितां यावयाची नाहीं. तीच गोष्ट कोर्टावरील बहिष्कारासहि लागू आहे. योग्य असो वा अयोग्य असो, टिळकांचा जन्म न्यायकोर्टांतून सरकारशीं झगडण्यांत गेला हें प्रसिद्ध आहे. त्यांची मुंबईची अखेरची खेप, असहकार पुकारला जाण्याच्या आधीं एकच आठवडा, न्यायकोर्टांतिल भांडणासंबंधाची होती. अर्थात् कोणीहि बोटानें खुणावल्याबरोबर उठून तुरुंगांत जावें किंवा दुष्ट प्रतिपक्षाच्या हातावर सर्वस्वाचें दान घालावें हें मत टिळकांना कसें ग्राह्य झालें असतें ? तात्पर्य, आपल्या व टिळकांच्या मार्गांत भेद आहे या गांधींच्या विधानांत इतरांनीं समजून घेण्यासारखें पुष्कळ मर्म आहे; व या भेदामुळेंच महाराष्ट्राच्या कांहीं पुढाऱ्यांची समजूत अद्यापि आपणांस घालतां आली नाहीं हें गांधींना कळून चुकलें आहे. ज्या मार्गभेदामुळें, टिळकांबद्दल अत्यंत आदर असतांहि, गांधींना टिळकांचे अनुयायी किंवा शिष्य म्हणवून घेतां येत नाहीं त्याच मार्गभेदामुळें अनेक महाराष्ट्रीय पुढाऱ्यांनाहि महात्मा गांधींबद्दल टिळकांइतकाच आदर असतांहि, गांधींचे शिष्य किंवा अनुयायी म्हणवून घेतां येत नाहीं.

राष्ट्राचें खरें हित व राष्ट्रीय सभेविषयीं एक प्रकारची निष्ठा यावर नजर देऊनच, व असहकारितेपैकीं कांहीं कांहीं कलमें महाराष्ट्रीयांना पटतात म्हणूनच ते त्यांची अंमलबजावणी करितात; गांधींचे अनुयायी म्हणून नव्हे. यामुळें तपशिलाच्या बाबतींत त्यांचा महात्मा गांधींशीं मतभेदहि होऊं शकतो. असहकारितेच्या सामान्य तत्त्वासंबंधानें गांधींचा व टिळकांच्या अनुयायांचा मतभेद

नाहीं. पण तपशिलासंबंधानें खचित आहे. उदाहरणार्थ, परदेशी कापडावरील बहिष्कारासंबंधीं त्यांचें व गांधींचें मत भिन्न नाहीं. पण न्यायकोर्टें व स्थानिक स्वराज्याच्या संस्था, किंबहुना कायदेकौन्सिलें, यांच्यासंबंधानें त्यांचीं मतें सर्वस्वीं जुळती नाहींत व केव्हांहि पूर्णपणें जुळतील असें वाटत नाहीं. फार काय पण बहिष्कार हा देखील एक महिन्यांत घडवून आणतां येईल असें गांधींना वाटतें तसें महाराष्ट्रीयांना वाटत नाहीं. पण ही गोष्ट नुसती महाराष्ट्रीयांचीच आहे अशी कोणाची समजूत असेल तर ती चूक आहे. महाराष्ट्रांत असहकारितेवर दृढ विश्वास नाहीं असें अविचारानें म्हणण्यांत येतें तें येवो. पण विश्वास असणाऱ्या गुजराथेच्या मानानें पाहू जातां महाराष्ट्र असहकारितेच्या बाबतींत कितीसा मागें आहे हें कोणी सप्रमाण दाखवून देईल तर तें हवें आहे. उगाच महाराष्ट्राच्या नांवानें खडे फोडण्यांत अर्थ नाहीं. खुद्द गुजराथेंत किती लोकांनीं वकिली सोडली, गुजराथेंतल्या कायदेकौन्सिलाच्या किती जागा रिकाम्या पडल्या? किती राष्ट्रीय शिक्षणाचीं कॉलेजें निघालीं? किती लोक चळवळीकरितां खटले होऊन तुरुंगांत गेले? किती न्यायकोर्टें बंद पडलीं? परदेशी कापडाची आयात किती प्रमाणानें बंद झाली? या सर्व बाबतींत महाराष्ट्र फारसा मागें राहिला आहे असें आम्हांस वाटत नाहीं; व राहिला असें घेऊन चाललों तरी, महाराष्ट्राची मार्गपरंपरा भिन्न आहे हें स्वतः गांधीच कबूल करितात, यामुळें ती गोष्ट सकारणच ठरेल. महाराष्ट्राकडे पाहावयाचें तें महाराष्ट्र गांधींचा अनुयायी नसतांहि त्यानें काय केलें, भिन्नमार्गी टिळकांचा तो अनुयायी असतांहि, त्यानें राष्ट्रीय सभेच्या आज्ञेनुसार काय केलें, या दृष्टीनेंच पाहावयाचें आहे.

मद्रास, बंगाल, बहार, संयुक्त प्रांत याहि प्रांतांच्या मानानें महाराष्ट्र मागें आहे असें म्हणतां येणार नाहीं. विठ्ठलभाई पटेल, जम्नादास मेथा, हे गुर्जर पुढारी खचित महाराष्ट्रीय नाहींत. पण त्यांनाहि महाराष्ट्रीयांप्रमाणेंच असहकारितेचें तत्त्व मान्य असतां महाराष्ट्रीयांप्रमाणें कित्येक तपशिलाच्या बाबी अमान्य आहेत. पटेल यांना स्थानिक स्वराज्यावरील बहिष्कार मान्य नाहीं, व ते स्वतः अद्यापि म्युनिसिपालिटीचे व लोकल बोर्डाचे मेंबर आहेत. जम्नादास मेथा यांनीं कायदेकौन्सिलावर बहिष्कार घातला तरी त्यांना तो कायम राहावा असें वाटत नाहीं. अंबालाल साराभाई यांना स्वदेशी चळवळ पूर्णपणें मान्य आहे, पण असहकारिता पसंत नाहीं. मुंबईच्या गुजराथी व्यापाऱ्यांना असहकारिता मान्य

आहे, पण एका महिन्यांत विलायती कापडाचा नायनाट करतां येईल असें वाटत नाहीं. गांधींप्रमाणें टोपी घालणाऱ्या त्यांच्या कित्येक अनुयायांनीं आपल्या परदेशी व्यापाराचीं सर्व वळणें ( Foreign trade relations ) अद्यापि बुजवून टाकलीं नाहींत असें सहज सिद्ध करितां येईल. तात्पर्य, असहकारितेचें तत्त्व मान्य असून तें पदोपदीं पुढें ढकलण्याची इच्छा असणाऱ्या लोकांच्याहि मनांत तपशिलाच्या बाबतींत मतभेद होण्याचा संभव असतो. हा सर्व प्रश्न नुसत्या तात्त्विक विश्वासाचा नाहीं. तत्त्वावर अखेर विश्वास असतांहि, तपशिलाची कोणती गोष्ट केव्हां किती व्यवहार्य आहे याबद्दल एकाच्या मनावर दुसऱ्याचा अविश्वास असूं शकेल. गांधी व टिळक यांच्या मार्गांमध्यें फरक आहे असें गांधी म्हणतात, तो मुख्यतः तपशिलाच्या व्यवहार्यतेच्याच बाबतींत. टिळकांनीं गांधींना बोलूनच दाखविलें कीं, 'तुमचा मार्ग लोकांना एकदम पूर्णपणें पटेल कीं नाहीं याविषयीं मला शंका वाटते' व टिळकांचें म्हणणें खरें कीं खोटें हें एक वर्षाच्या चळवळीचा आढावा काढून कोणींहि ठरवावें.

टिळक गांधींपेक्षां अधिक व्यवहारज्ञ म्हणा किंवा गांधी टिळकांपेक्षां अधिक ध्येयाभ्यासी म्हणा, 'एकदम सर्वस्वीं सर्वस्वत्याग करण्यास सांगितलें तर तें कोणासहि पटणार नाहीं व कोणाच्याहि हातून तें सहसा घडणार नाहीं, हें मनुष्यस्वभावाचें मर्म गांधींपेक्षां टिळक अधिक जाणत होते ही गोष्ट स्वतः गांधीहि कदाचित् कबूल करितील. पुढाऱ्याच्या हांकेला ओ देऊन कांहीं नियमित मर्यादेपर्यंतचा स्वार्थत्याग लोक केव्हांहि करूं शकतात. पण वृत्तिछेदाचा प्रसंग सर्वस्वीं येऊन व सर्व जुनी परंपरा एकदम मोडून मनुष्याला दारें लावलेल्या खोलींत कोंडलेल्या मांजरासारखें झालें म्हणजे तो उलट फिरतो हा अनुभव गांधींना परवां मुंबईस कापड–मार्केटमध्यें आलाच आहे. तोच अनुभव वकील व विद्यार्थी यांच्याहि बाबतींत इतरत्र आला आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. टिळकांच्या व गांधींच्या मार्गांत असला तर मुख्य फरक हाच कीं, टिळकांनीं सर्व द्वारें एकदम कोंडून घेण्यास विशेषतः विवक्षित वर्गाच्या नांवानें राष्ट्रीय सभेच्या आज्ञा सोडण्यास केव्हांहि संमति दिली नसती. वाहत्या प्रवृत्तिनदीच्या पाण्याला राष्ट्रीय सभेच्या ठरावांच्या फळ्या घालून तें सर्व एकदम कोंडून टाकणें ही गांधींची रीत आहे. उलट वरच्या बाजूस जागोजाग पाट काढून देऊन हळुहळू नदी कोरडी पाडणें ही टिळकांची रीत आहे असें म्हणतां येईल. 'माझ्या व टिळकांच्या मार्गांत

भिन्नता आहे' असें गांधी म्हणतात तें कदाचित् या अर्थानेंच म्हणत नसतील कशावरून ?

असो. असहकारितेच्या तपशिलाबद्दल मतभेद असला तरी असहकारितेच्या नुसत्या उच्चारानें बरेंचसें काम झालें आहे. 'का कथा बाणसंधाने ज्याशब्देनैव याज्जिनः' ! मतभेदाच्या कांहीं बाबी वर्ज्य केल्यातरी इतरांच्या योगानें हिंदी लोकांचा स्वराज्यप्राप्तीचा दृढ निश्चय सरकारास कळून येण्यासारखा आहे. म्हणून सर्वसाधारण असहकारितेच्या तत्त्वाची जी प्रचंड चळवळ गांधींनीं केली तिनें देशाचें पाऊल पुढेंच पडलें यांत शंका नाहीं. कोणी गांधींना आपले गुरु मानोत वा न मानोत, ते या सर्वसामान्य तत्त्वाच्या उपदेशापुरते तरी गांधींवर अढळ निष्ठा ठेवून वागतील यांत शंका नाहीं. टिळक व गांधी यांच्या मार्गांत फरक असला तरी, राष्ट्रीय स्फूर्ति व तपस्या यांच्या दृष्टीनें पाहतां टिळकांनंतर टिळकांचें राष्ट्रप्रधानपद घेण्यास व संभाळण्यास, विशेषतः हिंदुस्थानच्या सर्व भागांत एकसमयावच्छेदेंकरून उत्साहाचें असें भरतें आणण्यास, गांधींसारखा योग्य पुरुष दुसरा कोणीच नव्हता ! कालिदासानें म्हटल्याप्रमाणें 'प्रवर्तितो दीप इव प्रदीपात्' एका दिव्याच्या ज्योतीला लावून दुसऱ्या दिव्याची ज्योत पहिल्याइतकीच तेजोमय निर्माण करावी त्याप्रमाणें टिळक मालवले व गांधी उगवले असा लोकोत्तर चमत्कार घडून आला खरा ! स्वतः टिळकांनींहि आनंदानें मान डोलविली असती इतक्या स्फूर्तीनें, उत्साहानें, उद्योगानें व नेटानें महात्मा गांधींनीं ही प्रचंड राष्ट्रीय चळवळ सतत सुरू ठेवली आहे. शिवाय टिळकांनीं सजीव देहानें नसला तरी आपल्या नामाचा आधार देऊन या चळवळीला हातभारच लावला आहे. महात्मा गांधींना ही जाणीव असून त्यांनीं स्वराज्य-फंडाला टिळकांचें नांव जोडलें यांत त्यांची समयसूचकता व आदरबुद्धि हीं दोनही दिसून येतात. अशा रीतीनें या उभय थोर विभूतींनीं सहकारितेनें चालविलेल्या राष्ट्रकार्याला सर्व देशानें जोरानें पुढें ढकलणें हें त्याचें कर्तव्य आहे. गांधी व टिळक हे सामान्य मनुष्याला तरी हरिहरांच्या अवतारांसारखेच आहेत. आणि हरिहरांत भेद मानणें हें जितकें पाप तितकेंच टिळक व गांधी यांच्यांत भेद मानणें हेंहि पापच होईल. टिळकांच्या प्रथम श्राद्धतिथीच्या दिवशीं सर्व टिळकभक्तांनीं वरील सर्व गोष्टी मनांत ठेवून कार्यनिश्चय केल्यास तो राष्ट्राला आजच्या आणीबाणीच्या प्रसंगीं खचित उपयोगी पडेल.

## १९ लो० टिळकांची द्वितीय श्राद्धतिथि

( केसरी, ता. १ ऑगस्ट १९२२ )

लो. टिळकांच्या द्वितीय श्राद्धतिथीनिमित्त प्रसिद्ध होणाऱ्या आजच्या या जादा अंकाकरितां लेख लिहिण्याविषयीं आम्हीं अनेक गृहस्थांना विनंति केल्याप्रमाणें त्यांनीं ते लिहून पाठविले याजबद्दल आम्ही त्यांचे फार ऋणी आहों. त्यांच्या या मदतीमुळें स्वतः आम्हांला आजच्या मुख्य विषयावर लिहावयासारखें कांहींच शिल्लक राहिलें नाहीं असें म्हटलें तरी चालेल. आम्हांला आज एकच गोष्ट प्रमुखपणें सांगावयाची ती ही कीं, लो० टिळकांच्या प्रथम श्राद्धतिथीच्या वेळीं देशाची जी स्थिति होती, तिच्याहूनहि ती आजच्या या द्वितीय श्राद्धतिथीस अधिक बिकट झाली आहे. राजकारणाच्या दृष्टीनें, म्हणजे सरकारच्या मनःप्रवृत्तीच्या दृष्टीनें यंदां देशस्थिति गतवर्षाहून कोणत्याहि प्रकारें कमी बिकट झालेली नसून, दुसऱ्या एका दृष्टीनें म्हणजे म० गांधी हे कैदेंत पडल्यामुळें ती अधिकच नाजूक झाली आहे. असहकारितेच्या तपशिलासंबंधानें यंदासारखाच गतवर्षींहि लोकांत मतभेद होता, नाहीं असें नाहीं. तथापि गतवर्षीं महात्मा गांधी हे मोकळे असून सर्व चळवळीची जबाबदारी आपल्या शिरावर घेऊन ती नेटानें तशीच पुढें चालविणें किंवा परिस्थित्यनुरूप तींत फेरफार करणें यांविषयीं ते स्वतः समर्थ होते. पण यंदा ते कारागृहांत पडल्यामुळें लो० टिळकांच्याहून वेगळ्या कारणानें कां होईना, पण लो० टिळकांसारखेच ते केवळ स्मरणविषय होऊन राहिले आहेत. गतवर्षीं आजच्याच प्रसंगीं लिहितांना आम्हीं असें म्हटलें होतें कीं, 'गांधी व टिळक हे सामान्य मनुष्याला तरी हरिहराच्या अवतारासारखेच आहेत ! व हरिहरांत भेद मानणें हें जितकें पाप तितकेंच टिळक व गांधी यांच्यांत भेद मानणें हें पापच होईल.' पण भक्तिभावनेच्या दृष्टीनें उभयतांतील जी अभेद स्थिति आम्हीं तेव्हां वर्णिली, ती दुर्दैवानें आज इतर रीतीनेंहि, म्हणजे त्यांना भेटून सल्ला विचारण्याच्या दृष्टीनेंहि, अनुभवास येऊन बसली आहे. आणि कोणच्याहि रीतीनें कां होईना, विद्यमान स्थितीला कलाटणी मिळाल्याखेरीज महात्माजी सहा वर्षांपूर्वीं येऊन भेटतील अशी आशा कोणास करितां येत नाहीं. लो० टिळकांच्या शिक्षेचें माप सरकारनें बहुतेक पुरें पदरांत ओतून घेतलें, तसेंच तें म० गांधींसंबंधानेंहि करणार, अशी गूढ सूचना त्यांना शिक्षा देणाऱ्या न्यायाधिशाच्या तोंडूनच

निघाली असें म्हणण्यास हरकत नाहीं. पूर्वींच्या एका प्रसंगाप्रमाणें आजच्या या दुसऱ्या प्रसंगींहि हिंदुस्थानांतील लोकांनीं यथाशक्ति व यथाबुद्धि आपला मार्ग आपणच आक्रमिला पाहिजे. पण हा मार्ग आक्रमितांना जे स्वाभाविक मतभेद उत्पन्न होणार त्यांचें निदर्शन किंवा प्रतिपादन करितांना, त्या उभय महात्म्यांचीं नांवें वादांत गोंविलीं न जावीं हेंच अधिक बरें. कारण शब्द-प्रामाण्यपद्धतीनेंच चालल्यास मुख्य दोन धोरणांतील किंवा पक्षांतील विरोध तर दुस्तर होईलच, परंतु प्रत्येक धोरणाच्या किंवा पक्षाच्या कक्षेंतहि परस्पर-विरोधी वचनें घोंटाळा उडवून दिल्याशिवाय कधींहि राहणार नाहींत ! गंगाप्रवाहांतील वाळूप्रमाणें राजकारण हें पायांखालून क्षणोक्षणीं झरून जाणारें असल्यामुळें देशाचें धोरणहि प्रतिभेप्रमाणें नवनवोन्मेषशाली असावें लागतें. याचा अर्थ मनाचें स्थैर्य सुटतें असा मात्र नाहीं. केवळ याच कारणाकरितां लो० टिळक किंवा म० गांधी हे स्थितप्रज्ञ व स्थिरबुद्धि असतांहि, टिळकांच्याच निरनिराळ्या वेळच्या उद्गारांनीं टिळकांना व गांधींच्याच उद्गारांनीं गांधींना विरोध करून प्राकृत जनांना दिङ्मूढ बनविण्याइतकें दुसरें कांहींच सोपें नाहीं असें झालें आहे. पण असे आधार घेण्यापासून अनुयायी म्हणविणारांना ऐन असा फायदा कांहींच नसतां या उभय महात्म्यांचीं नांवें मात्र परस्परांशीं झगडत असल्याचा आभास उत्पन्न होतो. आम्हांला एकाच शब्दांत सर्वांना येवढीच प्रार्थना करावयाची आहे कीं, कोणी कोणाचेहि अनुयायी म्हणविणारे असोत, पण सर्व मिळून तिसऱ्याच एका देवतेचे म्हणजे देशदेवतेचेहि भक्त आहेत. प्रत्येक ग्रहोपग्रह सूर्याभोंवतीं फिरत असला तरी या सर्व ग्रहांसह सूर्यालाहि आपल्या कक्षेंत ओढणारी सर्वंकष अशी एक वेगळी जबरदस्त शक्ति आहे हें सर्वांनींच लक्षांत ठेवावयास पाहिजे. व या सर्वांनीं मिळून दाखला घ्यावयाचा तर गोकुळांतील श्रीकृष्णाच्या अनुचरांचा घ्यावा. द्वारकेंतील श्रीकृष्णाच्या अनुचरांचा घेऊं नये. गोकुळांतील अनुचरांनीं आपापल्या लहानशा काठ्या वर उचलून धरल्यानें गोवर्धन पर्वत उचलला गेला, द्वारकेंत यादव भांडूं लागले तेव्हां हातांत पडलेल्या लव्हाळ्याचीं मुसळें बनलीं ! लो० टिळकांच्या तेजस्वी असतांहि मनमिळाऊ राहणाऱ्या धोरणाचें व आचरणाचें रहस्य लक्षांत घेतल्यास आम्ही म्हणतों या गोष्टीचेंच समर्थन होईल.

---

## २० लो. टिळक व असंतोषात्मक देशभक्तीची मीमांसा

( केसरी, ता. १ ऑगस्ट १९३१ )

लो. टिळक निवर्तल्याला तारखेनें बरोबर अकरा वर्षे झालीं. सर्व हिंदुस्थान आज त्यांची मृत्युतिथि निरनिराळे कार्यक्रम करून पाळीत असून, त्यांना आपण विसरलों नाहीं हें सर्व लोक अहमहमिकेनें प्रगट करीत आहेत. आणि खरोखर लो. टिळक हे एकच पुढारी असे होऊन गेले कीं, ज्यांची मृत्युतिथि अखिल हिंदुस्थान हें घरच्या वडिलांच्या श्राद्धतिथीसारखी नियमानें पाळीत आहे. याचें एक कारण असें दिसतें कीं, महानुभाव असे जनतेचे राजकीय पुढारी जरी टिळकांचे पूर्वी व नंतर अनेक होऊन गेले, तरी " राजकारणाचें खरें बीज लोकमान्यांनींच आपल्या मनोभूमींत प्रथम रुजत घातलें " अशी हिंदी जनतेची भावना आहे. त्या बीजाची जात ' असंतोषमूलक अस्वास्थ्य ' अशी आहे. आणि व्हॅलेंटाईन चिरोलसारख्या मार्मिक चिकित्सकानें हीच गोष्ट बरोबर ओळखून " हिंदुस्थानाच्या असंतोषाचे जनक " अशी पदवी जिवंतपणींच टिळकांना अर्पण केली होती. " हिंदुस्थान हें अठरा जातींचें कडबोळें आहे असें सतत म्हणत राहण्याचा अट्टाहास करणाऱ्या, आणि हिंदुस्थानाला राष्ट्र म्हणून संबोधल्यास आपलें सगळेंच्या सगळें भांडवल गमावतें अशा सावधगिरीनें बोलणाऱ्या, हिंदविरोधी ब्रिटिश मुत्सद्यांचा एक इरसाल नमुना " असें चिरोलसाहेबांचें वर्णन अनेकांनीं केलें आहे. पण टिळकांचें यथार्थ वर्णन करण्याच्या मोहांत व झोकांत, एकटे टिळक व सगळें हिंदुस्थान असा भेद दाखवून साहेबमजकुरांनीं हिंदुस्थानला ' राष्ट्र ' ही पदवी न कळत दिली ही गोष्ट ध्यानांत ठेवण्यासारखी आहे.

मग टिळकांनीं ज्या असंतोषाचें बीज हिंद्राष्ट्रभूमींत प्रथम रुजत घातलें असें म्हणण्यांत येतें, तो असंतोष ही चिज तरी अशी काय लोकोत्तर होती कीं, जिचा ठसा चिरोलसाहेबांसारख्यांच्या मनावर उठावा ? ' असंतोष ' हा शब्द इतका व्यापक व अनेकार्थी आहे कीं, त्यापैकीं कोणत्याना कोणत्या तरी एका अर्थश्लेषानें, गेल्या पाऊणशें वर्षांतले यच्चयावत हिंदी राजकीय पुढारी, विद्यमान परिस्थितीशीं, असंतुष्ट होते असें प्रतिपादितां येईल. पण त्या अर्थश्लेषांच्या रंगछटा एकमेकांपासून इतक्या दूर जाऊं शकतात कीं शेवटीं कदाचित् काळा व पांढरा इतकी विसदृशता त्यांतून निघूं शकते. हिंदी

राजकारणांतला गेल्या पाऊणशें वर्षांतला असा कोणताहि पुढारी दाखवितां येणार नाहीं कीं तो खरोखर ' संतुष्ट ' होता असें म्हणतां येईल ! तो 'असंतुष्ट' च होता. पण तो असंतुष्ट असला तर खरोखर कुणावर होता ? कां होता ? व असंतोषाच्या शमनाचे त्याचे नियोजित किंवा उद्दिष्ट मार्ग कोणते होते ? याचा विचार हाच महत्त्वाचा ठरतो.

## असंतुष्टांचे तीन वर्ग

पैकीं या असंतुष्टांच्या वर्गांत पहिलाच विभाग ' स्वतःवर म्हणजे स्वकीयांवर असंतुष्ट ' आणि ' परक्यांवर असंतुष्ट ' असा पडतो. आणि असा विभाग केला असतां कांहीं एक प्रकारचे पुढारी पहिल्या विभागांत पडणारे, कांहीं दुसऱ्या विभागांत पडणारे, व कांहीं दोनहि विभागांत थोडथोडे पडणारे होते किंवा आहेत असें सहज दाखवितां येईल. आणि हें नीट चांगलें समजण्याकरितां किंचित् चौफेर दृष्टि व तीहि निर्विकार मनानें टाकली पाहिजे. म्हणजे मग असें दिसून येईल कीं, रा. ब. गोपाळराव हरि देशमुख, न्या. माधवरावजी रानडे, न्या. काशिनाथपंत तेलंग, न्या. नारायणराव चंदावरकर इत्यादि पुढारी हे ' स्वतःवर म्हणजे स्वकीयांवर असंतुष्ट ' या सदरांत पडतात. ना. गोपाळराव गोखले व त्यांचे शिष्य म. गांधी हे उभयविध असंतुष्टतेखालीं पडतात. आणि सर फेरोजशहा मेथा, टिळक, दास बाबू, नेहरू हे ' परक्यांवर असंतुष्ट ' या सदराखालीं पडतील.

मग या अशा प्रकारच्या तीन वर्गांच्या मनोवृत्तींत मुख्य फरक कोणता, हा प्रश्न उरतोच. पण त्याचें उत्तर फारसें कठीण नाहीं. असंतुष्ट मनाचा आघात पडावयाचा तो पडतोच; पण तो आघात कोणावर पडतो यावरून उत्तर ठरतें. स्वतःवर असंतुष्ट असणारे पुढारी आपला राग आपल्या जनतेला नांवें ठेवण्यांत खर्च करितात. त्यांची कर्तृत्वशक्ति काय असेल ती आपल्या लोकांची सुधारणा करण्याकडे खर्च होते हें खरें, व या दुसऱ्या म्हणजे विधायक कामगिरीचा उपयोग अर्थात् कोणास नाकबूल करतां यावयाचा नाहीं. पण जें काय रागानें बोलावयाचें तें आपल्याच लोकांना बोलावयाचें यामुळें, आणि त्याचबरोबर परक्याबद्दल भलेपणानें गुणग्रहण बुद्धीनें बोलावयाचें यामुळें, समाजाची राजकीय दृष्टि नुसती अंतर्मुख होते. त्याचा आत्मविश्वास नष्ट होतो.

आणि विद्यमान व भावी स्थितींतील जें महदंतर त्याला दाखविण्यांत येतें तें आपल्या हातून कसें तुटणार असें वाटून तो केवळ निराश होतो.

### एक घरगुती दाखला

कांहीं आईबाप असे असतात कीं, आपल्या मुलाला दुसऱ्या मुलानें निष्कारण अन्यायानें मारलें तर ते त्या दुसऱ्या मुलाचा प्रतिकार किंवा त्याला शिक्षा न करतां स्वतःच्या मुलालाच उलट बदडतात. आणि "तूं असाच आहेस, तूं तसाच आहेस, म्हणून तुला त्यानें मारलें हेंच ठीक केलें. आणि त्यानें तुला आणखी मारायला पाहिजे होतें तें मारलें नाहीं म्हणून हें घे तुला आम्हीच मारतों;" असें बोलून दुःखावर डागण्या देतात. दुसरे कोणी आईबाप आपल्या मुलाला मारीत नाहींत, पण इतकेंच म्हणतात कीं "तूं मार कां खाल्लास? तुझे हात काय केळीं खायला गेले होते! मला मारलें मला मारलें म्हणून रडत घरीं येऊन सांगण्याची तुला लाज वाटली पाहिजे. पुनः प्रसंग आला तर त्याला असा खरपूस मार दे कीं याद राहील." पण तिसऱ्या प्रकारचे आईबाप आपल्या मुलाला इतकेंहि बोलणार नाहींत; तर मुलाला कोणीं अन्यायानें मारिलें असें पाहतांच, धांवत जाऊन, त्याचे हात धरून दोन तोंडांत मारतील. वरील दाखल्यांचें मर्म राजकारणाला लाविलें असतां 'असंतुष्ट' म्हटल्या जाणाऱ्या तीन वर्गांचे लोक कसे वागतात हें उमजेल.

गोपाळराव हरि म्हणत, "हिन्दी लोक अज्ञानी, मूर्ख, भोळे, जगाचें ज्ञान त्यांना नाहीं, दैवावर त्यांचा हवाला म्हणून त्यांनीं राज्य घालविलें. म्हणून त्यांनीं आधीं इंग्रजांसारखे ज्ञानी व्हावें व मग स्वराज्य मिळविण्याची आकांक्षा धरावी." अशा असंतुष्ट पुढाऱ्यांवर इंग्रज कशाला रागावेल? तो उलट म्हणेल "ठीक आहे. ज्ञानी उद्योगवादी माणसांशिवाय इतरांना राज्यें मिळत नसतात." न्या. रानडे हे गोपाळराव हरीपेक्षां अधिक संभावित व सुसंस्कृत. म्हणून त्यांनीं आपल्या लोकांना कधीं 'मूर्ख' म्हटलें नाहीं. पण आमच्या राजकीय स्वातंत्र्याचा नाश व इंग्रजांच्या राज्याची या देशांत स्थापना ही गोष्ट आधिदैविक चमत्काराखालीं किंवा ईश्वरेच्छेच्या सदराखालीं घालून, स्वतःची सामाजिक अधोगति करणारांना देव अशीच शिक्षा देतो व अशा निष्ठुरपणानेंच शहाणपण शिकवितो असा तत्त्वज्ञानात्मक युक्तिवाद केला, व राजकीय अधो-

गतीची कार्यकारणमीमांसा रानड्यांनीं चतुरपणानें लावून दाखविली. असल्याहि असंतुष्टांवर इंग्रज कशाला रागावेल ? तो म्हणेल, " बाबांनों, रानडे म्हणतात त्याप्रमाणें ईश्वरानेंच आम्हांला तुमच्यावर राज्य करण्याला पाठविलें आहे. त्याची उलट इच्छा होईल तेव्हां आम्ही जाऊं. तोंपर्यंत असंतुष्ट राहून स्वतःला दुःखी कां करून घेतां व आम्हांला त्रास कां देतां ? आम्ही गुरु तुम्ही शिष्य. आमच्यापासून शिकावयाचें तें शिकून घ्या. तुम्ही शहाणे झाल्यावर—तुम्हाला राज्य करतां येऊं लागल्यावर—राज्य तुमचेंच आहे. "

## गोखले व गांधी यांचा असंतोष

त्यानंतर गोखले किंवा गांधी यांची विचारसरणी पाहिली तर त्यांचा असंतोष दुतर्फी होता. गोखल्यांनीं जन्मभर राजकीय चळवळच केली. मात्र त्याचबरोबर राष्ट्रांतील सामाजिक दोषहि दाखविले. पण ही चळवळ करितांना गोखल्यांनीं इंग्रज हे गुरु व आपण हिंदी लोक हे शिष्य ही रानड्यांचीच भावना कायम ठेवली. यामुळें त्यांनीं इंग्रजांवर कधींहि आंतड्यांला पीळ पाडून टीका केली नाहीं व शिव्या तर दिल्या नाहींतच नाहींत. म्हणूनच इंग्रजांनीं जरी गोखल्यांना असंतुष्टांच्या सदरांत घातलें, त्यांच्या युक्तिवादाला आपण भितों असें दाखविलें, तरी त्यांना एकप्रकारें मित्र असेंच मानलें, शत्रु असें मानलें नाहीं. आणि महात्मा गांधी यांचाहि प्रकार गोखल्यांसारखाच पण थोडा वेगळा होय. ते रागाच्या भरांत इंग्रज सरकारला सैतान असें तरी म्हणूं शकतात. गोखल्यांनीं असलें खाष्ट विशेषण सरकारला कधींच लाविलें नसतें. पण आपल्या असंतोषाचा मोर्चा लोकांकडे वळला म्हणजे गांधी जवळजवळ असें भासवितात कीं, खरोखर हिंदी राजकारण म्हणजे तें फक्त वाढतें सद्गुणसंवर्धन होय. त्याशिवाय दुसरें कांहीं एक नाहीं. गांधी व गोखले यांच्यांत आणखी एक फरक असा आहे कीं, गोखल्यांप्रमाणें गांधी हे इंग्रजाला गुरुस्थानीं मानीत नाहींत. आध्यात्मिक सामर्थ्यावर ते स्वतःलाच जगाचे गुरु मानतात ! पण इंग्रजांविषयीं त्यांना मित्रत्वाचें प्रेम वाटतें तें इतकें कीं, सर्व हिंदुस्थानभर राजकीय चळवळीचा धुमाकूळ माजला व अत्याचार सुरू असले, तरी कोणताहि इंग्रज गांधीजी किंवा त्यांचा कोणताहि कट्टा पट्टशिष्य यांच्या मांडीवर निर्धास्तपणें मान ठेवून निजेल. यामुळेंच गांधींबद्दल इंग्रजाला एक प्रकारचा जिव्हाळा वाटतो, व व्यक्तिशः त्यांची भीति कशी ती वाटतच नाहीं. इंग्रजांची लाठी गांधींच्या अन-

त्याचारी अनुयायांच्या पाठीवर हाणण्याकरितां सदा सज्ज आहे. पण स्वतः गांधींना मात्र ते फुलासारखे झेलावयाला सदा तत्पर असतात. गांधी हे आपलें एक तत्त्व म्हणून अनत्याचारित्वाचा अंगिकार करितात हें खरें. पण अत्याचारीपणांत डोईबुड बुडालेल्या इंग्रजांचा त्या तत्त्वावर विश्वास नसला तरी, गांधींचा अनत्याचारित्वाचा आग्रही उपदेश, व त्यांच्यावरील निष्ठेमुळें जनतेनें यथाशक्ति चालविलेलें त्याचें आज्ञापालन, हें इंग्रजाला आपल्यामुढें या महात्म्यानें उभी केलेली ढाल आहे असें वाटतें. आणि गांधीजी अनत्याचारित्वाबद्दल बोलूं लागले म्हणजे इंग्रज जरी मनांतून हंसेल, तरी या अव्यवहार्य तत्त्वोपदेशापासून होणाऱ्या सोयीचा तो मुत्सद्दीपणानें उपयोगच करील.

## असंतुष्टांचा तिसरा वर्ग

अशा रीतीनें सूक्ष्म चिकित्सा केली म्हणजे गोपाळराव देशमुखांपासून गांधींपर्यंतच्या असंतोषाला इंग्रज कां भीत नव्हता हें आपोआप कळून येईल. आतां तिसऱ्या वर्गांतले फेरोजशहा मेथा किंवा नेहरूसारखे पुढारी लोक घेतले, तर ते राजकारणांत सर्वस्वीं सरकारला दोष देणारे होते हें खरें. तथापि त्यांच्या असंतोषाच्या विषाचा उतारा त्यांच्या स्वभावांतच आढळत असल्यामुळें, इंग्रज त्यांच्याहि असंतोषाला फारसा भ्याला नाहीं. मेथा हे तेजस्वी होते पण आळशी होते. ते इंग्रजांशीं जितक्या मानी स्वभावानें वागत त्यापेक्षां स्वकीयांशींच ते अधिक मानी स्वभावानें किंबहुना आढ्यतेनें व उद्दामपणानें वागत. त्यांनीं इंग्रजाला कधीं मित्र म्हटलें नाहीं तरी शत्रुहि मानलें नाहीं. त्यांनीं राजकारणांत सरकारलाच दोष दिला, तथापि दरवर्षांअखेर एकदोन दिवस भरणाऱ्या, मार्मिक पण रंगेल व खुशालचेंडू मुत्सद्यांच्या, मजलशींतील शाब्दिक ठरावांपेक्षां या दोषदर्शनाला त्यांनीं अधिक किंमत स्वतः दिली नाहीं व शक्य तेथवर दुसऱ्यालाहि ती देऊं दिली नाहीं.

पंडित मोतीलाल नेहरू यांच्या असंतोषाचीहि तीच गत. पंडितजी हे राजकारणांत उच्च ध्येय रंगवूं शकतील. सभांतून किंवा कायदेमंडळांत बोलतांना एखादा शब्द फार जहाल म्हणून त्यावर अडखळणार नाहींत. सापाला चिमट्यांत धरावें त्याप्रमाणें, कायदेबाज युक्तिवादाच्या चरकांत सरकाराला चिरडून त्याच्या अंगांतून बेइमानी दुष्टपणाचा विषबिंदु गाळून लोकांना दाखवितील. आणि आपल्या करारीपणाचा पुरावा म्हणून स्वार्थत्यागाची व वैराग्याची चुणू-

कहि मधून मधून प्रगट करतील. पण लगेच चार घटकांनंतर हे व यांचे प्रतिपक्षी इंग्रज एका टेबलाशीं बसले म्हणजे, किरीटकुंडलें फेकून देऊन रंगपटांत चहाकॉफी किंवा पार्थिव अमृत पीत बसणाऱ्या नाटकी रामरावणांप्रमाणें, हे राजकीय देवदानव एकमेकांच्या अंगाचा घाम पुसून, रंगभूमीवरील युद्धाचा शीण घालवित आहेत असेंच पाहणाराला वाटे. खासगी व्यवहारामध्यें कोणाहि परकीयाशीं समरस होण्याची पंडितजींची पात्रता, इंग्रज समाजाविषयीं व त्यांच्या चालीरीतीविषयीं त्यांची स्वाभाविक आवड व अनुकरणलालसा, त्यांच्या अंगांत मुरलेल्या जागतिक संस्कृति, एखाद्या नमुनेदार दरबारी मुत्सद्याला शोभेल असला त्यांचा नाजूक विनोद व गुदगुल्या करणाऱ्या नर्मकथा, या सर्वांचा निकट परिचय घडणाऱ्या इंग्रजाला पंडितजी हे गंगा नदीला आग लावतील असें कधींहि न वाटलें तर त्यांत काय आश्चर्य !

मेथा–नेहरू यांच्याप्रमाणें दासबाबू व टिळक हे असंतोषाची धार सर्वस्वीं सरकारवर चालविणारे. त्यांनीं हिंदी जनतेवर कधींहि तोंडसुख घेतलें नाहीं. पण त्या दोघांत व या दोघांत मुख्य फरक काय होता, हें मेथा व नेहरू यांचें जें वर्णन वर दिलें त्यावरून सहज लक्षांत येईल तथापि उरलेल्या जोडींतील टिळक हेच घेऊं, व त्यांच्या असंतोषालाच तेवढा खरा असंतोष असें इंग्रज कां मानीत हें पाहूं.

## टिळकांचा सर्वांगीण असंतोष

थोडक्यांत बोलावयाचें तर असें म्हणतां येईल कीं, कोणतीहि एखादी बाब अशी नव्हती कीं जींत टिळकांचें व इंग्रजांचें जुळलें असतें. इंग्रजांबद्दल त्यांना वाटत असलेला असंतोष सर्वस्पर्शी, सर्वतोमुख असा होता. धर्म, सामाजिक स्थिति, संस्कृति या सर्व बाबतींत इंग्रज हा टिळकांना आपल्यापेक्षां कमी व हीन दर्जाचा वाटे. आणि हिंदी राजकारणांत तर एका उद्योगप्रियतेशिवाय इंग्रजांत सारेच्या सारे अवगुणच आहेत असें टिळकांना वाटत असल्यामुळें, असल्या हीन मनुष्यांनीं आपल्यावर राज्य करावें हें त्यांना विपरीत गमे व त्याचा पराकाष्ठेचा राग येई. ईश्वराचा हा दुहेरी अन्याय होय असेंच ते म्हणत म्हणूनच रानड्यांच्या, गोखल्यांच्या ‘ ईश्वरी योजना ’ या शब्दांत ईश्वराचा जो न्यायीपणा ध्वनित होतो तो टिळकांना मुळींच मान्य नव्हता. हिंदुस्थानची गुलामगिरी ही त्याच्या कर्माचें फळ म्हणण्यापेक्षां, इंग्रजांविषयीं ईश्वराच्या

अन्यायी पक्षपाताचें फळ असें मानण्याची त्यांची तयारी होती. म्हणून इंग्रजांशीं त्यांचा चौफेर दावा सुरू होता. सुधारणा व संस्कृति यांची गोष्ट निघाली असतां " आम्ही रामराज्यें करीत होतों व उपनिषदांसारखे ग्रंथ लिहीत होतों तेव्हां या इंग्रजांचे पूर्वज अंगाला रंग फांसून व कातडीं पांघरून उत्तर–जर्मनीच्या अरण्यांतून अर्धनागवे भटकत होते, मग यांची आमच्यापुढें काय किंमत ! " असें ते अभिमानानें म्हणत. मॅक्समुल्लरप्रभृति आधुनिक विद्वानांबद्दल त्यांच्या मनांत आदर वसत असला तरी, ते व त्यांच्या विचारांचे इतर इंग्रज पंडित हे वेदग्रंथांच्या पुराणत्वांतून हजारों वर्षें चोरून घेऊन त्यांना अन्याय व त्यांचा अपमान करतात याबद्दल टिळक मनांतून जळफळत; व या भावनेनेंच आपले 'अग्रहायण' व 'आर्यांचें वसतिस्थान' हे दोन ग्रंथ इंग्रजांपर्यंत थेट जाऊन भिडावे म्हणून त्यांनीं मुद्दाम इंग्रजींत लिहिले. इंग्रजांच्या सामाजिक नीतीविषयीं तर त्यांना पराकाष्ठेचा तिटकारा वाटे, व त्यांच्या चालीरीति आपल्या लोकांनीं अंगीं लागू दिल्यास राष्ट्रीयत्वाचा ऱ्हास झाल्याशिवाय राहणार नाहीं असेंच त्यांचें मत होतें.

हिंदी राजकारणांत तर इंग्रज हा बुद्धिमान् व कर्तृत्ववान् असला तरी दुष्ट, निर्दय, अन्यायी, कपटी, स्वार्थी, उलट्या काळजाचा, ढोंगी, मायावी आहे असा त्यांचा दृढविश्वास असे. म्हणून उलट लोकांच्या दृष्टीनें पाहतां, त्यांना इंग्रजांशीं साधेल तेथें साधेल त्या उपायांनीं लढावें, व कोणीकडून तरी त्यांचा पाडाव करावा या मताचे ते होते. " स्वार्थाविषयीं फकिरी आणि साधनाविषयीं बेफिकिरी बाळगली " तरच इंग्रजांवर मात होऊं शकेल, त्यांच्याशीं धर्मयुद्धाच्या गोष्टी बोलण्यांत अर्थ नाहीं, अशा मताचे टिळक असल्यामुळें, त्यांनीं स्वतः कोणालाहि अत्याचारप्रवृत्त न केलें तरी कोणा तरुणांनीं अत्याचार कोठें केला तर म. गांधींप्रमाणें ते त्याच्या निषेधाला धावून जात नसत. सत्त्व, रज, तम या त्रैगुण्यानें जग भरलेलें असून, हिंदुस्थानावर आलेल्या आपत्कालांत यांपैकीं कोणत्याहि गुणाचें वर्चस्व असणाऱ्या हिंदी मनुष्यानें आपआपल्या स्वभावानुसार देशासाठीं जें करतां येईल तें खुशाल करावें. त्याला नांवें ठेवण्याचा इतरांना अधिकार नाहीं, असें ते म्हणत. यामुळें इकडे अत्याचारी तरुणांनीं टिळकांना मवाळांत ढकललें तर तिकडे सरकारनें त्यांना अत्याचारप्रवर्तक या सदरांत घातलें.

## लो. टिळक व म. गांधी

तात्पर्य, हा आपल्यासारखा पोषाख करीत नाहीं, आपल्या पंक्तीला बसून जेवणाखाणांत भूषण मानीत नाहीं, आपल्या आचारविचारांकडे तुच्छता व तिरस्कार या भावनेनेंच सदा पाहतो, आपल्या संसर्गाला जवळ उभा राहत नाहीं, आपल्या राजनीतीबद्दल पूर्ण खंती बाळगतो, आपल्या वर्चस्वाबद्दल जळफळतो, आपलें कधीं निसंतान होईल हें पाहण्याला टपून बसतो, आपल्या राजसत्तेबद्दल जळता द्वेष बाळगतो, आणि आम्ही इंग्रज परके म्हणून, एरवीं, कितीहि गुणवान् असलों तरी आम्हांला जितकें दूर करतो, तितकेंच आपले राष्ट्रबांधव निर्गुण किंवा सदोष वाटत असले तरी ते स्वकीय म्हणून हा जवळ करतो, अशी टिळकांविषयीं समजूत करून घेऊन इंग्रजानें त्यांना खरा इंग्रज-द्वेष्टा, खरा शत्रु असें मानल्यास त्यांत काय आश्चर्य ?

निव्वळ चळवळीच्या दृष्टीनें पाहिलें असतां लो० टिळकांपेक्षां म० गांधींनीं केलेली चळवळ अधिक व्यापक व अधिक परिणामकारक भासते. इंग्रजांच्या कट्ट्या शत्रूच्या हातून झालेल्या चळवळीपेक्षां त्यांचा खरा मित्र म्हणविणाराच्या हातून झालेली चळवळ अधिक यशस्वी व्हावी हा चमत्कारसा वाटतो. पण त्याला अनेक कारणें आहेत. एक कारण आधीं काळाचा ओघ व परिणति. सर्वच गोष्टी संवयीनें वाढत असतात. एकाचें पाहून दुसरा तयार होतो. स्वार्थत्यागासारख्या सात्त्विक गोष्टींतहि ईषणेसारख्या तामसी वृत्ति प्रगट होतात, आणि अहमहमिका सुरू होते. याहून अधिक निर्णायक कारण म्हटलें म्हणजे टिळकांपेक्षांहि महात्मा गांधींनीं केलेला सामान्य हिंदी जनतेच्या अंतरंगांतील प्रवेश. फेरोजशहा मेथा यांच्या मानानें लो. टिळक जनतेला फारच अधिक विनयानें वागवीत. तथापि पोषाख, खाणेंपिणें व राहणी या तिहींच्या दृष्टीनें ज्या तेल्या-तांबोळ्यांचे पुढारी असें टिळक आपणाला म्हणवीत त्यांच्या खासगींत ते सर्वस्वीं मिसळून समरस होऊं शकले नसते. या तीनहि गोष्टींत टिळकांचा देखील साधेपणा अत्यंत वाखाणण्यासारखाच होता. पण स्वतः हातानें स्वयंपाक करून खाणें, जातिनिर्बंध झुगारून सर्रास अशनपानादि नित्य व्यवहार करणें, किंवा स्वतःच्या हातानें भंग्याप्रमाणें घरचें शुद्धिकार्य संपादणें, अशा गोष्टी करण्याला स्वभावानें टिळक प्रवृत्त किंवा अनुकूल नव्हते ही गोष्ट नाकबूल करण्यांत अर्थ नाहीं. हिंदुधर्माच्या अभिमानामुळेंहि टिळकांना मुस-

लमानादिकांत गांधीजींइतक्या मोकळ्या मनानें वावरतां आलें नसतें. म. गांधींच्या आश्रमांत ज्याप्रमाणें स्त्री–पुरुष हा भेदभाव मुळींच पाळला जात नाहीं, व पुरुषांप्रमाणें मिस स्लेड किंवा बेन यासारख्या शिष्यिणी, सेविका, परिचारिका व मिसेस नायडूसारख्या मैत्रिणी यांचा घोळका जसा म. गांधी यांच्या भोंवतीं पडूं शकतो, तसा टिळकांभोंवतीं पडणें शक्य नव्हतें. तुमचा धंदा काय तर "विणकराचा" असे शब्द टिळकांच्या तोंडून कधींहि निघाले नसते आणि साधेपणाचें किंवा कपड्याच्या मितव्ययाचें उदाहरण लोकांना घालून देण्याकरितां, लंगोटी नेसून उघड्या अंगानें व बोडक्या डोक्यानें राष्ट्रीय सभेसारख्या जनसमूहांत वावरणें हें त्यांच्या उत्कट स्वदेशी बहिष्काराच्या चळवळींतहि त्यांना शक्य झालें नसतें.

## गृहस्थ व बुवा यांतील फरक

कांहीं मनुष्यांचा स्वभावच असा असतो कीं, वागणूकसवरणूक रीतरिवाज यांविषयींच्या त्यांच्या मर्यादा ठरून गेलेल्या असतात; व त्या उभ्या जन्मांत केव्हांहि बदलूं शकत नाहींत. लो. टिळक जर अशा वर्गांत पडत, तर म. गांधी हे दुसऱ्या एका अशा वर्गांत पडतात कीं, त्याला वरील गोष्टींत वाटेल तितका फेरबदल करण्याला मुळींच दिक्कत वाटत नाहीं, हें गांधींचें जीवनचरित्र वाचणाराला तेव्हांच दिसून येईल. या दोन्ही प्रकारांत नैतिकदृष्ट्या अमुक चूक व अमुक बरोबर किंवा अमुक श्रेष्ठ व अमुक कनिष्ठ असें कांहींच म्हणण्यासारखें नसतें. तो फक्त स्वभावाच्या ठेवणीचा परिणाम असतो. पण म. गांधींच्या स्वभावाची ही ठेवण त्यांना सामान्य जनतेच्या अंतरंगांत प्रवेश करण्यास उपयोगी पडली यांत शंका नाहीं. त्यांनीं एकदां असहकारितेच्या चळवळींत व दुसऱ्यानदां सत्याग्रहाच्या चळवळींत जें जनतेचें रान उठविलें तें त्यांच्या या विशिष्ट गुणांच्याच जोरावर यांत बिलकुल शंका नाहीं. पण साधेपणाची परमसीमा हा जसा गांधींचा राष्ट्रोपयोगी असा एक गुण आहे तसाच, पण त्याहूनहि अधिक परिणामकारक असा त्यांचा दुसरा गुण म्हणजे त्यांचा सर्वसंगपरित्यागी फकिरी बाणा हेंहि नाकबूल करण्यांत अर्थ नाहीं. टिळक साधे होते पण गृहस्थ होते. गांधी त्यांच्याहून साधे आहेत पण बुवा आहेत. आणि अत्यंत नमुनेदार गृहस्थालाहि जी जनता वश

नसते ती एखाद्या बुवाला सहज वश होते अशी आम्हां हिंदी लोकांचीच काय पण सर्व जगांतील जनतेची ख्याति आहे.

वर गांधींनीं जें जनतेचें रान उठवून सरकारामागें लाविलें म्हणून सांगितलें, त्यांत देशभक्त होतेच पण त्याप्रमाणें बुवाभक्तहि पुष्कळच होते. सामान्य प्रतीचे सांप्रदायिक बुवा आपल्या अनुयायांना देशकार्याच्या मार्गानें चालवीत नाहींत, तर आपण मोठेपणा दिलेलें दैवत किंवा देवस्थान आणि त्याबरोबर स्वतःची व्यक्ति यांची पूजाअर्चा, आरती, भजन-पूजन व हरतऱ्हेची सगुणसेवा यांच्या-कडेच त्यांची भाविक बुद्धि खर्च करतात. पण म. गांधी यांनीं तसें केलें नाहीं. त्यांनीं देश हेंच दैवत असें मानण्यास आपल्या शिष्यांना–अनुयायांना–शिक-विलें. हा त्यांचा मोठेपणा किंवा त्यांची अलौकिकता झाली. तथापि बुवा म्हणून एखाद्याच्या मागें लागण्याचा जो जनतेचा धर्म तोच गांधींसंबंधानेंहि तिनें अनुसरला असें बिनधोक म्हणतां येईल. बुवा म्हणवून घेण्यासारखा तऱ्हेवाईकपणा टिळकांसंबंधींच्या कोणत्याहि गोष्टींत नव्हता. पण अशा किती तरी गोष्टी गांधींना संलग्न झालेल्या आढळतात. आणि त्यांचें कौतुक हिंदीच नव्हत तर इंग्रज व इतर युरोपियन लोकहि फार करितात.

## म. गांधींच्या कौतुकाचे प्रकार

गांधी हे शेळीचें दूध पितात असें ऐकून लंडनांत उद्यां ते ज्या मोहोल्यांत राहणार तेथें, इरसाल शेळ्यामेंढ्यांचा एक लहानसा कळपच त्यांचे इंग्रज भक्त आणून उभा करणार आहेत! ते थर्ड क्लासांतून प्रवास करतात म्हणून ते विलायतेंत प्रवास करतील त्या फर्स्ट क्लासच्या कंपार्टमेंटावर थर्ड क्लास अशी पाटी रेल्वे कंपनी लावण्याचा संभव आहे! कारण गांधींच्या लहरी संभाळून त्यांतल्यात्यांत त्यांच्या सुखसोई कराव्या अशी इंग्लंडांतील इंग्रजांनाहि इच्छा दिसते. ते संध्याकाळानंतर कांहीं खात नाहींत हें माहीत, यामुळें व्हाइसरीगल लॉजमध्येंच त्यांच्या सायंप्रार्थनेची व फराळाची तजवीज ठेवण्यांत येते. आणि त्यांचा थाळा धरण्यास जवळ कोणी नाहीं म्हणून लाटसाहेबांनीं स्वतः तो उच-लून धरला असेंहि त्यांचे कांहीं भक्त सांगतात! कृत्रिम दातांची कवळी दुसऱ्या देखतां काढून धुणें हें सभ्यपणाचें मानलें जात नाहीं. पण महात्माजींनीं, म्हणतात, तेंहि लाटासाहेबांसमक्ष केलें! गांधींच्या मौनव्रताचें कौतुक करण्या-करितां त्यांचा सोमवार संभाळून आपला रविवार मोडण्यांत लाटसाहेबांस आनंद

वाटतो ! गांधींच्या खादीव्रताचा परिणाम लेडी–अमुक यांच्यावर इतका झाला म्हणे कीं, स्वतः गांधींनीं कातलेल्या सुताची मागणी त्यांनीं केली असून, त्याचें कापड विणून त्यांतून आपली चोळी बेतून स्वतः शिवून घालण्याची इच्छाहि त्यांनीं गांधींना बोलून दाखविली आहे ! त्यांचा टीचभर लंगोट पाहून, एका साहेबानें " आमच्या शॉर्टसचाच हा एक नवा प्रकार आहे " असें बोलून दाखविलें, व या पद्धतीचा लंगोट शिवून देण्याला आपल्या शिंप्याला सांगितलें असल्याचेंहि प्रसिद्ध केलें ! महात्माजी माणसांनीं ओढलेल्या रिकशा गाडींत बसत नाहींत हें कळल्यामुळें सिमल्यास त्यांच्या मोटारीला फिरण्यास स्पेशल परवाना दिला. आतां वास्तविक गांधी काय खातात, काय पितात, ते कोणते नियमधर्म पाळतात, याचा व त्यांच्या राजकारणाचा कांहीं संबंध नाहीं. इंग्रजांचें काय ? त्यांना गांधींना सुखासुखी फुकटांत खूष करतां आलें, व आपणांस महामित्र म्हणणाराचा प्रत्युपकार फेडतां आला तर हवाच आहे. तथापि या गोष्टींवरच दिलखूष होऊन गांधींना आपले बुवा मानून त्यांचा गुरूपदेश घेऊन, त्यांच्या अनुयायांच्या मेळ्यांत सामील झालेले किती तरी भोळे हिंदी देशभक्त आढळतील !

बिचाऱ्या टिळकांजवळ, परक्यांकडून अशा मायावी पद्धतीनें कौतुक करून घेण्यासारखें, व भोळ्या श्रद्धाळू सांप्रदायिक भावनेनें स्वकीयांकडून बुवा किंवा महंत म्हणवून घेण्यासारखें कांहीं नव्हतें. त्यांचें खाणें पिणें, त्यांच्या फर्मासी, त्यांचे यमनियम, त्यांचीं व्रतें, त्यांचें तत्त्वज्ञान यांत लोकविलक्षण असें कांहींच नव्हतें. आपल्या या खासगी गोष्टींचा उच्चारहि स्वतः टिळकांनीं कधीं केला नाहीं, मग त्यांच्या सयुक्तिकतेचें प्रतिपादन वर्तमानपत्रांत करून त्याच्या जाहिराती फडकविणें तर दूरच राहिलें. हिंदुस्थानांत ते इतर चार सद्गृहस्थांच्या रीतीप्रमाणेंच राहिले. आणि विलायतेला ते गेले तरी, एकपक्षीं इंग्रजांत समरस होऊन जरी फारसे मिसळले नाहींत तरी दुसरेपक्षीं लोकविलक्षण असें कांहीं न करतां, सभेंत किंवा भोजनसमारंभांत इंग्रजांची गांठ पडली असतां संकटाप्रमाणें त्यांनीं ते प्रसंग कोरड्या हातानेंच पण कसेतरी निभावून नेले. हिंदी राजकीय पुढाऱ्यांची परीक्षा इंग्रज जेव्हां करितो तेव्हां, ती प्रायः मार्मिक असते. टिळक वारले तेव्हां त्यांना पाण्यांत पाहणारा चिरोलसाहेब यानें त्यांच्यावर लिहिलेल्या लेखांत खालील उद्गार काढले आहेत. " हल्लींच्या काळीं

टिळकांइतका लोकोत्तर पुरुष कोणीच झाला नाहीं. कदाचित् गांधी हे त्यांच्या बरोबरीला येतील. गांधींचा सौम्यपणा व विनय टिळकांच्या अंगीं नव्हता. पण बुद्धिमत्ता व राजकारणांतील मार्मिकपणा हा गुण गांधींपेक्षां टिळकांच्या अंगीं फार अधिक प्रमाणानें होता."

## संप्रदायविरहित टिळक

पण ही बुद्धिमत्ता व हा मार्मिकपणा यांच्याहि योगानें टिळकांना गांधी यांच्याइतका अनुयायांचा मेळा लाभला नाहीं ! त्यांची देशभक्ति, स्वार्थत्याग व धैर्य या अमूर्त गुणांखेरजि कौतुक करण्यासारखें असें टिळकांजवळ दुसरें काय होतें ? आणि अमूर्त गुण हे संप्रदाय बनविण्याला फारसे उपयोगी पडत नाहींत. टिळकांचा संप्रदाय असा कांहीं नव्हताच; व संप्रदाय असला तरी तो बाहेरून ओळखण्यासारखा नव्हता. मुसोलिनीचा काळा शर्ट, ग्यारिबाल्डीचा तांबडा झगा, रामदासांची भगवी कफनी, आणि गांधीजींची शुभ्र खादी टोपी व पिशवी, यांसारखें टिळकांनीं आपल्या संप्रदायाचें कांहींएक बाह्य लक्षण ठरविलें नव्हतें; आणि जे स्वतः बुवा बनूं इच्छित नाहींत ते दुसऱ्याला सांप्रदायिक चेलेहि बनवूं इच्छित नाहींत. संनिध उपस्थित झालेल्या खऱ्या भावनेच्या भक्तांच्या पोषाकाकडे टिळकांनीं कधींच आपली दृष्टि रोखली नाहीं, किंवा अमुकच द्वारानें मठांत प्रवेश करावा म्हणून क्रीडचीं तोरणें बांधून ठेविलीं नाहींत. अर्थात् टिळकांवर निष्ठा ठेवणें म्हणजे कांहीं चार दोन ढोबळ राष्ट्रीय गुणांवर विश्वास ठेवणें इतकाच अर्थ होई. यामुळें त्यांच्या परिवारांत सर्व स्वभावाचे, सर्व विचारांचे, सर्व कार्यपद्धतीचे लोक असलेले आढळून येत. आणि टिळकांचाहि स्वभाव असा कीं, वेळीं हातीं सांपडेल त्याकडून त्याच्या लायक असें आपलें सार्वजनिक कार्य करून घ्यावयाचें. त्यांनीं ना. गोखल्यांसारखी, शपथा घेऊन सामील झालेल्या लोकांची, एखादी सोसायटी काढली नाहीं. किंवा म. गांधींप्रमाणें आश्रम स्थापले नाहींत. त्यांच्या सोसायट्या व आश्रम हे राष्ट्रीय वृत्तीच्या लोकांत सर्व प्रांतांतून पसरलेले होते. फक्त स्वराज्य-संघ काढला तेव्हांच त्याचें खास असें एक प्रतिज्ञापत्रक त्यांनीं तयार केलें. आणि काँग्रेस डेमोक्रॅटिक पार्टी निघाली तेव्हां त्याच्या कार्यक्रमाचा जाहीरनामा काढला.

## टिळकांचें ब्रीदवाक्य

पण या प्रतिज्ञापत्रकांत व्यक्तिशः आचरण करण्याचीं विशिष्ट बंधनें नाहींत; व जाहीरनाम्यांत कार्यक्रम असा आहे कीं, तो कोणासहि आचरतां यावा. पण हीं दोनहि विचारपुरःसर लिहिलेलीं असलीं तरी, त्यांच्या तोंडून प्रथम सहज-स्फूर्तीनें निघालेलें, व नंतर सुंदर समर्पक म्हणून लोकांनींच पुनरुक्तीनें टिळकांच्या बिरुदावळीस बांधलेलें, ब्रीदवाक्यहि असेंच व्यापक स्वरूपाचें आहे. 'अनत्याचारी रहा व खादी वापरा' याशिवाय म. गांधींचें खास असें एखादें ब्रीदवाक्य ( कीं जें त्यांच्या पुतळ्यावर उद्यां कोरून ठेवतां येईल ) नाहीं असें आम्हांला वाटतें. टिळकांचें ब्रीदवाक्य प्रसिद्धच आहे तें असेंः– "स्वराज्य हा माझा जन्मसिद्ध हक्क आहे म्हणून तें मी मिळवीनच मिळवीन." आणि खरोखरच हें वाक्य हिंदुस्थानांत हल्लीं चालू असलेल्या स्वराज्याच्या चळवळीचा समाधानकारक निकाल लागेपर्यंत अबाधित राहील.

या सूत्रवाक्यांत राष्ट्राचें साध्य व तें मिळविण्याचा निश्चय या गोष्टी प्रमुख आहेत; मात्र तें साध्य मिळविण्याच्या साधनांचा उल्लेख नाहीं हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. साध्याविषयीं पाहतां त्यांत 'स्वराज्य' हा अगदीं साधा शब्द आहे. स्वराज्य या शब्दाचा अर्थ परिस्थितीप्रमाणें निरनिराळा होऊं शकतो असें टिळकांचें मत होतें. तें हप्त्यांनीं प्राप्त होणारें आहे, म्हणून त्यांना त्यांच्या ह्यातींतच स्वराज्य म्हणजे आंग्लनिर्मक्षिक लोकशाही असा त्याचा अर्थ सांगतां आला नाहीं. गोरे लोक अधिकारांच्या जागांवरून हटत जात जात त्यांच्या जागीं काळे लोक यावयाचे, म्हणून टिळक प्रथम स्वराज्य म्हणजे काळ्या–गोऱ्यांचें स्वराज्य असें म्हणत असत. नंतर हळूहळू ते स्वराज्य हा शब्द स्वातंत्र्यार्थी वापरूं लागले, म्हणजे स्वातंत्र्य हें परम ध्येय, पण तूर्त स्वराज्य म्हणजे काळ्या-गोऱ्यांचें व वसाहतइतकें स्वतंत्र स्वराज्य असा अर्थ ते सांगत आणि हें योग्यच होतें. कारण आज मोठ्यांत मोठें तोंड उघडून स्वराज्य मागितलें तरी त्याची घटना प्रथम पदरांत पडावयाची ती पार्लमेंटाच्या कायद्यानें, बंड करून व स्वातंत्र्याचा जाहीरनामा काढून नव्हे, असें ते उघडपणें घेऊन चालत. त्यांत आत्मवंचना किंवा परवंचना करण्याची इच्छा नव्हती. आणि आज जरी दहा वर्षांत स्वराज्याच्या चळवळीची मजल टिळकांच्या पुढें पुष्कळच गेली आहे तरी स्वराज्याची योजना पूर्वींच्याच जागीं आहे.

## टिळकांचा जाहिरनामा व नेहरू रिपोर्ट

१९२८ च्या नेहरु रिपोर्टांत वसाहतींच्या स्वराज्याचीच घटना असून, तिला कायद्याचें स्वरूप यावयाचें तें पार्लमेंटांत कायदा होऊनच यावयाचें ही टिळकांची योजना त्यांत गृहीत धरल्यासारखीच होती. पण लाहोर कॉंग्रेसनें नेहरु-रिपोर्ट रावी नदींत फेकून दिला व स्वातंत्र्याचें निशाण उभारलें. असें झालें, तरी आज, कॉंग्रेसच्या अनुज्ञेनें, गांधीप्रभृति जे गोलमेज परिषदेला जाणार आहेत ते काय संपूर्ण स्वातंत्र्याच्या सनदेचे नक्की शब्द ठरविण्या-करतां ? हिंदुस्थानाला स्वातंत्र्याचा जाहिरनामा लिहिण्याचा सुप्रसंग येईल तेव्हां त्याचा मसुदा अखेरच्या युद्धावर निघालेले किंवा तें युद्ध जिंकून विजयी झालेले, हिंदी पुढारीच लिहितील. "तो मसुदा पार्लमेंटाकडून लिहून घेण्या-करितां इकडून शिष्टमंडळ जाईल व त्याची चर्चा गोलमेज परिषदेसारख्या सभेंत होईल" ही कल्पना करणें म्हणजे हास्यास्पदतेची परमसीमा गांठण्या-सारखेंच होय. तात्पर्य, टिळकांनीं आपल्या सूत्रांत 'स्वराज्य' हा जो मोघम शब्द वापरला तो सर्वार्थसंपादक असून, लखनौच्या कॉंग्रेस–लीग स्कीमपासून तों भावी स्वातंत्र्याच्या जाहिरनाम्यापर्यंत एकसारखाच लागू पडणार आहे.

आतां 'माझा जन्मसिद्ध हक्क आहे' या शब्दांचें स्वारस्य काय आहे तें पाहूं. माझा यांतील मी हा शब्द पुरुष व स्त्री या दोहोंचाहि सारखाच वाचक आहे. अर्थात् स्वराज्य मिळविण्याचें कर्तव्य व तें भोगण्याचा अधिकार हिंदी पुरुषांप्रमाणेंच स्त्रियांनाहि आहे, त्यांत अणुमात्र कमीपणा नाहीं, हें सिद्ध होतें. 'जन्मसिद्ध हक्क' याचें स्वारस्य तर फारच आहे. तें असें कीं, स्वराज्य भोगण्याचा हक्क आम्हांला कोणीं बाहेरून दान म्हणून दिलेला किंवा देण्याचा नाहीं. किंवा सज्ञान झाल्यावर परक्यांशीं करार करून, मोबदले देऊन, विकत घ्यावयाचा नाहीं. स्वराज्योपभोगांत अर्थातच मतदारी व जबाबदारी दोनहि येतात. आणि टिळकांच्या सूत्रानेंहि Fundamental Rights आणि Adult Franchise म्हणजे "मूलभूत नागरिकत्वाचे हक्क व केवळ वयांत आल्याबरोबर आपोआप मतदारीच्या हक्काची प्राप्ति" या गोष्टी ध्वनित होतात. मूलभूत हक्क हे जन्माबरोबरच जन्मतात. याचा अर्थ एक दिवसाचें मूल व एक्याण्णव वर्षांचा म्हातारा या दोहोंनाहि जगण्याचा, क्रियास्वातंत्र्याचा, आत्मसंरक्षणाचा व राष्ट्रसरकारकडून संरक्षण मिळविण्याचा हक्क सारखाच

असतो. नव्या स्वराज्यघटनेंत या मूलभूत हक्कांचा भाग फार महत्त्वाचा ठरेल. कारण आजपर्यंत त्यांचा तशा रीतीनें उल्लेख झालेला नाहीं. या दृष्टीनें टिळकांचें सूत्र मतदारीच्या परिणतस्थितीला केव्हांहि लागू पडण्यासारखें आहे.

### ' साधनानामनेकता '

यानंतर ' तें (स्वराज्य) मी मिळवीनच मिळवीनच ' हे शब्द. यांत राष्ट्रीय चळवळीच्या मुळाशीं लागणारा निश्चय, निर्धार व प्रतिज्ञा हीं आलीं. पण अमुकच रीतीनें स्वराज्य मिळवीन अशा प्रकारचें साधनासंबंधीं निष्कारण बंधन मात्र यांत घालून घेतलेलें नाहीं. याचें कारण पूर्वी सांगितलेंच आहे. आणि तें हें कीं, टिळकांचा त्रिगुणात्मक मनुष्यस्वभावावर विश्वास अढळ असल्यानें ज्या वेळीं ज्याला जें युक्त व शक्य वाटेल तें त्यानें करावें, पण आपल्या कृत्याच्या फळाची आसक्ति धरूं नये. मिळेल त्या बहुमानाप्रमाणें होईल त्या शिक्षादिक संकटांनाहि तयारच असावें असें त्यांचें मत होतें. हिंदुधर्माची त्यांनीं जी व्याख्या केली ती एका शब्दाच्या फरकानें राजकारणाच्या त्यांच्या कल्पनेलाहि लागूं पडण्यासारखीच आहे. ' प्रामाण्यबुद्धिः स्वाराज्ये साधनानामनेकता, उपास्यानामनियमः ' हें वर्णन टिळकांच्या राजकारणाच्या तत्त्वज्ञानाला समर्पक लागू पडत नाहीं असें कोण म्हणेल ? " कोणी मेथांना भजा, कोणी गोखल्यांना भजा, कोणी अरविंदांना भजा, कोणी सुरेंद्रांना भजा; पण एकंदर जनता मनांत धरील तेंच बरोबर, व जें करील तेंच देशाचें भवितव्य, अशा प्रकारची प्रामाण्यबुद्धि धरा. आणि ईश्वरदत्त गुणाचें जें हत्यार या परकी राजसत्तेवर तुम्हांला फेंकून मारतां येईल तें मारा. म्हणजे केव्हां तरी तुम्हां देश दास्यमुक्त करण्याचें श्रेय मिळालेंच पाहिजे. " हाच टिळकांचा संदेश राष्ट्राला केव्हांहि होता.

त्यांच्या राजकीय तत्त्वज्ञानाचें हें सूत्र त्यांचें त्यांनींच बनविलें, आणि जन्मभर त्यांनींच त्यावर आपल्या लेखांतून व भाषणांतून भाष्य केलें. गांधींना ज्याप्रमाणें आपल्या गेल्या चळवळीनें हजारों लोक तुरुंगांत घालतां आले तसे कदाचित् टिळकांना घालतां आले नसते. म्हणजे एका अर्थानें टिळकांपेक्षां गांधींचा अनुयायीवर्ग अधिक मोठा आहे हें उघड आहे. तथापि गांधींपेक्षां टिळकांना सरकार अधिक भीत होतें हें मात्र कोणालाहि मान्य करावें लागेल. टिळक विलायतेला गेले तेव्हां त्यांच्याकरितां कोणीं स्वागतमंडळ बनविलें नाहीं.

" आमच्या घरीं तुमची उतरण्याची व्यवस्था करतों " असें म्हणणारा कोणी इंग्रज त्यांना भेटला नाहीं. टिळक जहाल जातील म्हणून राष्ट्रीय सभेनें प्रथम त्यांना आपले प्रतिनिधि नेमले नाहींत. त्यांना अमेरिकेचीं निमंत्रणें आलीं नाहींत. व्हाइसरॉय गांधींशीं मुलाखतीचे सप्ताह बसवितात. पण ज्या सिलेक्ट कमिटीपुढें साक्ष देण्यास स्वतः होमरूल लीगचे अध्यक्ष व प्रतिनिधि म्हणून टिळक गेले, त्या कमिटीनें त्यांच्याशीं एक शब्दहि न बोलतां त्यांचें म्हणणें तेवढें ऐकून घेऊन त्यांना परत पाठविलें. ते विलायतेस असतां एकहि बडा इंग्रज त्यांना आपण होऊन भेटावयाला आला नाहीं. इतकेंच नव्हे तर अनेकांनीं कांहींना कांहीं सबब सांगून त्यांना भेटण्याचें टाळलें. येऊन जाऊन उदयोन्मुख अशा नव्या मजूर पक्षानें त्यांच्याशीं उघड स्नेहसंबंध ठेवला. पण त्या पक्षाच्या मुखपत्राला तीस हजार रुपये दिले असतांहि आपला अमुक एक इतका मजकूर डेली हेरल्डमध्यें येईलच येईल अशी त्यांना खात्री वाटण्यासारखी स्थिति नव्हती. याचें कारण टिळकांना इंग्रज हा आपला खरा शत्रू मानीत होता. व टिळकांनींहि इंग्रजांना आपले मित्र असें कधींहि म्हटलें नाहीं हेंच होय.

## सादर चिकित्साबुद्धि असावी

म. गांधींचें याच्या उलट आहे. त्यांनीं इंग्रज सरकार व इंग्रज लोक यांमध्यें आपण जमीन–अस्मानाइतकी तफावत मानतों हें इतक्या परोपरीनें निदर्शनास आणलें आहे कीं, ज्या उद्गारवाहक हजाऱ्यांतून आज इंग्रजी राज्यपद्धतीवर सैतानी या शब्दाच्या दुर्गंधाचा वर्षाव व्हावा, त्यांतूनच उद्यां ती राज्यपद्धति चालविणाऱ्या इंग्रजांवर स्तुतिमिश्रित स्नेहाच्या सुगंधी गुलाबपाण्याच्या धारा वर्षाव्या. यामुळें गांधींनीं शिव्या देणें म्हणजे घरच्या लाडक्या मुलानें वडील माणसाच्या तोंडांत मारणें किंवा मिशा उपटणें यासारखें इंग्रजांना वाटल्यास नवल नाहीं. याशिवाय सांप्रदायिक महंताच्या नात्यानें त्यांच्या लोकाविलक्षण लहरी आचारांचें कौतुक कसें होतें हें वर सांगितलेंच आहे. आतां हिंदुस्थानाला उद्यां स्वराज्य मिळावयाचें तें कोणी एखाद्या योग्यानें आपल्या योगशक्तीच्या साधनानें इंग्रजांना भुरळ पाडून मिळवून दिलें तर तें नको असें कोण म्हणेल ? ' साधनानामनेकता ' असेंच आम्हीं टिळकसंमत सूत्राचा आधार देऊन वर म्हटलेंच आहे. तथापि साधनांची विविधता मान्य असली तरी त्याबरोबर कोणत्या साधनाचें कोणतें खरें वैशिष्ट हें समजण्याइतका विवेकहि बुद्धींत

असावा लागतो. याच दृष्टीनें, टिळक व गांधी हे दोघेहि भारतजनतेला सारखेच वंद्य असतांहि, टिळकांचें वैशिष्ट्य खरें कोणतें आहे आणि गांधींचें कोणतें आहे याचा विवेक करण्याच्या हेतूनेंच हें विवेचन केलें आहे. त्यावरून टिळक हे असंतोषाचे जनक कसे आणि त्या असंतोषाचें स्वरूप काय व उद्दिष्ट काय याचा वाचकांस स्पष्टपणें बोध होईल.

---

## २१ लोकमान्य टिळक आज असते तर?

[लो. टिळकांच्या पुण्यतिथीनिमित्त शनिवार ता. १ ऑगस्ट १९३६ रोजीं टिळक स्मारक मंदिरांत श्री. ल. ब. भोपटकर यांच्या अध्यक्षतेखालीं श्री. न. चिं. केळकर यांचें वरील विषयावर व्याख्यान झालें. त्याचा विस्तृत सारांश याखालीं दिला आहे. ]

"माझ्या व्याख्यानाचा विषय 'आज (१९३६ सालीं) टिळक असते तर–' इतकाच घेतला आहे. प्रश्नाची समस्याहि मीं पुरी केली नाहीं. कारण कल्पनेला थोडा वाव उरावा. प्रश्नाचें माझें उत्तर देण्यापूर्वीं परीक्षेंत विद्यार्थी चुकीचीं उत्तरें देऊन नापास कसे होत असतात हें एक रूपक बनवून मौज म्हणून थोडें सांगतों. परवां 'नवलपूर'च्या युनिव्हर्सिटींतील मॅट्रिक परीक्षा झाली. तींत हाच एक प्रश्न म्हणून मीं घातला व त्याला उत्तरें मिळालीं तीं सांगतों; म्हणजे पुष्कळसे मॅट्रिक विद्यार्थी नापास कां होतात हें कळेल.

### टिळकांचें अंतरंग

पहिल्या एका विद्यार्थ्यानें टिळक आज असते तर? याचें उत्तर दिलें कीं, "ते आज ८० वर्षांचे झाले असते!" यावर अर्थात् असाच शेरा पडला कीं, "तुझें गणित बरोबर आहे. पण एरवीं तूं मूर्खशिरोमणि ठरतोस म्हणून नापास." दुसऱ्या विद्यार्थ्याचें उत्तर असें, "टिळक खादीचा लांडा पंचा नेसून एकाद्या ग्रामोद्धाराच्या केंद्रांत, स्वतः हातानें टकळीवर सूत काढीत, तोंडानें गीतापाठ म्हणत, आणि दळण्याच्या उद्योगावर देखरेख करीत बसले असते." हें उत्तर देणाराहि विद्यार्थी मीं मूर्खच ठरविला. त्याला तारतम्य नाहीं. व टिळकांच्या अंतरंगाचें ज्ञान त्याला दिसत नाहीं. कारण आपणाला आवडेल तशा प्रकारची खादी मिळाली असतां ती वापरणारच नाहीं असा दुराग्रह टिळकांनीं धरला नसता. पण खादीच वापरीन अशी शपथहि त्यांनीं घेतली नसती. गांधी टोपी कधीं घातली नसती. पोषाकाचें दास्य पत्करलें नसतें.

## बुद्धिप्रधान टिळक

या बाबतींत टिळकांचें वर्तन व बंगाली पुढाऱ्यांचें वर्तन वेगळें झालें. पण बंगाल्यांत पोषाक साधा व खादीचा करण्याची लाट आली आहे ती भावनामूलक आहे बुद्धिमूलक नाहीं. स्वदेशी चळवळीपूर्वी बंगाली सुशिक्षित लोक इतका विदेशी कापडाचा व पद्धतीचा पोषाक करीत कीं त्याविरुद्ध प्रतिक्रिया सृष्टिनियमानें येऊनच ठेपली होती. तोंडीं स्वदेशी चळवळ व अंगावर विलायती पोषाक अशी त्यांची स्थिति होती असे–याची लज्जास्पद जाणीव होऊन प्रतिक्रियेच्या लंबकाबरोबर ते थेट दुसऱ्या टोंकाला गेले. टिळक प्रथमपासूनच मध्यबिंदूवर उभे. त्यांनीं केव्हांहि स्वदेशी पोषाकच ठेवला. यामुळें स्वदेशी चळवळ स्वीकारतांना त्यांना आचारांत प्रतिक्रिया करावी लागली नाहीं. याच भावनावशत्वामुळें दासबाबूसारखे लोक, त्यांचें तत्त्वज्ञान टिळकांचेंच असतां, गांधींच्या आहारीं कांहीं वेळ जाऊन त्यांनीं गांधीशिष्य म्हणवून घेतलें. पण हें फारच थोडा वेळ. तात्पर्य, हें दुसरें उत्तर देणारा विद्यार्थीहि नापास.

## प्रवचनापेक्षां चळवळीवर भर

तिसरें उत्तर असें कीं, " गीताधर्म मंडळांत ऐकूं न जाईल अशा हलक्या आवाजांत गीतेवर प्रवचनें करीत ते बसले असते." हें उत्तर देणाऱ्या विद्यार्थ्यांच्या डोळ्यापुढें वर्ध्याचे विनोबाजी भावे यांचें चित्र बहुधा असावें. स्वतः मी त्यांचें गीताप्रवचन एकदां ऐकायला बसलों तेव्हां पांच हातांवरहि मला तें नीट ऐकूं येईना, व बसल्याजागीं मला माझे कानही लांब करतां येईनात. आवाज इतका हलका ठेवण्याचें कारण मोठ्या आवाजानें हिंसा होते हेंच कदाचित् असेल ! या आश्रमांत हिंसा होऊं नये म्हणून दिव्याची ज्योतहि नेहमीं बारीक ठेवतात म्हणतात ! टिळकांचा आवाज सहज किती मोठा होता हें पुष्कळांच्या स्मरणांत असेल ! पण मुख्य मुद्दा गीताप्रवचनाच्या उद्योगाचा. त्यांचे कित्येक अनुयायी हल्लीं सर्वप्रकारच्या चळवळींतून मुक्त झालेले, किंबहुना ज्यांनीं चळवळ किंवा उद्योग असा स्वतः कधीं कांहींच केला नाहीं असे प्रवचनें करीत असतात हें मला माहीत आहे. पण टिळकांनीं असें कधींच केलें नसतें. अगदीं बसल्या बसल्या देखील कांहीं तरी चळवळ चालू ठेवली असती.

## कॉंग्रेसचे अध्यक्ष ?

चौथें उत्तर असें कीं, " राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष होऊन निवडणुकी यशस्वी

करण्याच्या दौऱ्यावर ते निघाले असते." हें उत्तर कांहींसें समंजसपणाचें आहे. पण त्यांत चूक अशी आहे कीं, टिळकांना आज काँग्रेसचें अध्यक्षपद खास लाभलें नसतें! तथापि पूर्वी लजपतराय यांना अध्यक्ष करण्याचें सुचवून त्यांनीं निःस्वार्थीपणें काँग्रेसची निवडणुकीची चळवळ केली तशी आज केली असती किंवा काँग्रेसशीं न बनल्यानें स्वतःच्या होमरूल लीगच्यातर्फे निवडणुकीची चळवळ त्यांनीं केली असती. दोन्ही गोष्टी संभवनीय वाटतात. टिळकांना काँग्रेसचें अध्यक्षपद न मिळण्याचें कारण असें कीं, गांधींचें व त्यांचें कधींच बनलें नसतें. दोघांच्या तत्त्वज्ञानांत जमीनअस्मानाचा फरक. आणि गांधी हे आपले गुरु नाहींत असें जो म्हणेल त्याला काँग्रेसचें अध्यक्षपद लाभणेंच शक्य नाहीं. किंबहुना टिळकांचें तत्त्वज्ञान नष्ट व्हावें म्हणूनच माझा अवतार आहे असें गांधी समजतात! यामुळें टिळक असते तर त्यांना अध्यक्षपद मिळालें नसतें. इतकेंच काय, आज गांधींना जितके अनुयायी लाभले आहेत तितके टिळकांच्या मागें राहिले नसते. टिळकांनीं इतर प्रांतांतील कांहीं पुढारी बरोबर घेऊन झुंज चालविलें असतें. पण त्यांच्या पूर्वचरित्रांत त्यांना नेमस्त काँग्रेसमध्यें जशी मान्यता मिळाली नाहीं, तशीच या गांधी-युगांतील काँग्रेस-मध्येंहि मान्यता मिळाली नसती. ते आमच्यापेक्षांही सहजच अधिक तीव्रतेनें लढत राहिले असते. पण शिरगणतींत तेहि कमी भरले असते. असो.

## समाजसत्तावाद व टिळक

पांचवें उत्तर असें कीं, "काँग्रेसला विरोध करण्यांत यश यावें म्हणून त्यांनीं समाजसत्तावादी अशा तरुण पक्षाला हातीं घेऊन त्यांच्या पुढारीपणानें काँग्रेस-वर हल्ला चढविला असता." हें उत्तर देणाराचा तर्क धूर्तपणाचा खरा. कारण त्याची समजूत अशी कीं, राष्ट्रांत नेहमीं ताजें बळ कोणत्या पक्षांत किंवा तत्त्व-ज्ञानांत आहे हें पाहून टिळक त्यांशीं एकजीव होऊन विजय मिळवूं पाहणारे होते. टिळकांच्या हयातींत विलायतेंत त्यांनीं तत्कालीन पार्लमेंटरी सोशॅलिस्ट मजूर पक्षाशीं सहकार्य केलें. पण सकलातवाल्यासारख्या कम्युनिस्टांना त्यांनीं थारा दिला नाहीं. आणि हॉर्निमन, चमनलाल इत्यादि प्रसंगसाधु अविचारी जहाल लोकांनीं टिळकांना गोत्यांत आणण्याचा प्रयत्न केला तोहि त्यांनीं हाणून पाडला. आज हिंदुस्थानांत देखील सोशॅलिझमचीं कांहीं तत्त्वें त्यांनीं मान्य केलीं असतीं, व मजूर-वर्गाच्या दुःखांचा परिहार होण्याला सर्वस्वीं मदत केली असती. तरी

रशियन कम्युनिझम, विशेषतः त्यांतील सामाजिक जीवनाचें धोरण, त्यांना आणांतींहि मान्य झालें नसतें. तथापि स्वयंस्फूर्तीनें तेजस्वी चळवळ करणारा कोणी भेटला असतां त्याचा तेजोभंग होईल असा निषेध त्यांनीं कधींहि केला नसता.

## दुहेरी धोरण

बंगाल्यांतील क्रांतिकारक अत्याचारी चळवळींशीं ते कधींच समरस झाले नव्हते. तथापि म. गांधींप्रमाणें त्या पक्षाचा निषेध व निंदाही त्यांनीं कधीं केली नाहीं, हा फरक लक्षांत ठेवण्यासारखा आहे. टिळकांच्या या दुहेरी धोरणामुळें सरकाराच्या मनांतील संशय कधींच गेला नाहीं व त्यामुळें त्यांना तुरुंगवास भोगावा लागला. पण ते स्वतः अत्याचारप्रवर्तक होते ही गोष्ट सरकारालाहि पुराव्यानें शाबीत करतां आली नाहीं. उलट हिंसावादी क्रांतिकारक देखील टिळक आपल्यांतलेच आहेत असें कधीं मानीत नव्हते; तथापि ते आपली निषेध–निंदा तरी करीत नाहींत ना असला अकरणरूपी आशीर्वाद भिन्नमतवादी पण थोरामोठ्या देशाभिमानी पुरुषाचा आपणाला पुरे आहे असें ते मानीत. तात्पर्य, आज टिळक असते तर ते तरुण समाजसत्तावादी पक्षाला अनेक प्रकारचें साहाय्य करते. तथापि त्यांचे सेनापति होऊन काँग्रेसशीं लढते हें संभवनीय वाटत नाहीं.

## नजरकैदेंत असते !

आतां सहावें उत्तर असें कीं, " टिळक सिंहगडावर सरकारच्या नजरकैदेंत स्थानबद्ध होऊन पडले असते. " हें उत्तर मला सर्वांत अधिक बरोबर असें वाटतें. कारण टिळकांचीं मतें गांधींशीं किंवा कम्युनिस्टांशींहि सर्वस्वीं जुळतीं नव्हतीं, म्हणून ते काँग्रेसविरोधी पक्षांतच असते. पण त्यांनीं सरकारलाहि आपल्या परीनें शांतता लाभूं दिली नसती, यामुळें सरकारनें त्यांना नजरकैदेंत स्थानबद्ध करून ठेवलें असतें.

## शेवटचीं उत्तरें

त्यानंतर आणखी एकदोन उत्तरें आहेत तींहि सांगून टाकलीं पाहिजेत. सातवें उत्तर असें कीं, " टिळक आज असते तर काय करते हें सांगणें कठीण. त्यांच्या जिवंतपणाचे इतर फायदे काय झाले असते ते असोत. पण आम्हां

परलोकविद्यावादी लोकांची बेसुमार हानी झाली असती. ती अशी कीं आज प्लँचेट चालवून खुद्द त्यांचे संदेश म्हणून जीं विधानें आम्हांला जाहीर करतां येतात तीं करतां आलीं नसतीं. कारण जीवंत टिळकांचा आत्मा प्लँचेटवर कसा येणार ? " पण शेवटचें आठवें उत्तर एकानें दिलें त्यानें या सातव्या उत्तरवाल्याचें समाधान होण्यासारखें आहे. हा आठवें उत्तर देणारा म्हणतो, "टिळकांची प्रकृति १९२० सालींच किती क्षीण झाली होती, आणि शिवाय आपल्या आवडत्या कामाकरितां केव्हांहि सर्व शक्ति खर्ची घालून जिवापाड मेहनत करण्याचा त्यांचा स्वभाव लक्षांत घेतां, ते १९३६ सालापर्यंत जगलेच नसते. अर्थात् उत्तर देण्याला प्रश्न उरत नाहीं व परीक्षकानें प्रश्न घातला तोच मुळांत बरोबर नाहीं. " हा विद्यार्थी फारच धूर्त व बुद्धिमान् दिसतो. पण परीक्षेंत सांकेतिक प्रश्न घालतां येतात, आणि म्हणून तसे घातले असतां त्यांचीं उत्तरें द्यावीं लागतात, व तीं न दिलीं तर नापास व्हावें लागतें हें या विद्यार्थ्याच्या लक्षांत असलेलें दिसत नाहीं.

## स्वातंत्र्याचा पुरस्कार

असो. ही प्रश्नोत्तराचिकित्सा थोडी मौजेची म्हणून मीं केली तरी तींत आपणांला कांहीं तरी स्वारस्य लाभलेंच असेल, कांहीं मर्म आढळलें असेल. व्याख्यानाकरितां मीं घेतलेल्या प्रश्नाचें उत्तर देतांना मुख्य गोष्ट लक्षांत घेतली पाहिजे ती ही कीं, आज टिळक असते तर ते ८० वर्षांचें झाले असते तरी त्यांच्या बुद्धीनें आपला सूक्ष्म विवेक सोडला नसता. नित्य नैमित्तिक भेद संभाळला असता आणि आपलें धैर्य अढळ ठेवून त्यांनीं एका पत्रांत लिहिल्याप्रमाणें आभाळ कोसळलें असतें तरी उलट त्यापासून घ्यावयाचा तो फायदाच घेतला असता. चिरडून गेले नसते ! मृत्युपूर्वीं अवघे २ महिने त्यांनीं कॉंग्रेस डेमोक्रॅटिक पक्षाचा जो जाहीरनामा प्रसिद्ध केला त्यांतील विचारसरणी, म्हणजे उत्क्रांतितत्वाची विचारसरणी, त्यांची कायम रहाती. १९२९ सालीं कॉंग्रेसनें नेहरू रिपोर्ट फेंटाळून देऊन स्वातंत्र्य हा शब्द घालून तिनें जें ब्रीदवाक्य नवें तयार केलें त्यांतील गांधीप्रणीत शांततामार्गाला हरकत घेतली असती, तरी स्वातंत्र्य अमान्य केलें नसतें. उलटपक्षीं स्वातंत्र्य हा शब्द ब्रीदवाक्यांत घातला म्हणून राजकीय व्यवहारांत खरोखरीची क्रांति सिद्ध झाली असेंहि त्यांनीं मानलें नसतें. निदान गांधींप्रमाणें स्वातंत्र्य शब्दाचें आपल्या सोयीप्रमाणें व

लहरीप्रमाणें पातळ लाहीपीठ त्यांनीं केलें नसतें; व स्वातंत्र्य तें काय ! मनानें मानलें तें मिळूनच चुकलें, असला कोटिक्रम, त्यांनीं केला नसता ! त्यांना स्वातंत्र्य ' सिद्धावस्था ' जशी माहीत होती तसाच राजकारणांतील ' व्यवहार ' हि माहीत होता. म्हणून हल्लीं राजकीय सुधारणांचा शक्य तितका उपयोग, प्रतिकाराची बुद्धि सदा जागृत ठेवून, प्रतिसहकारी रीतीनें करून घेतला असता.

## काँग्रेसला पूर्ण वाव दिला असता

येथें मात्र दोन प्रश्न सुचतात ते असे कीं, निवडणुकींत त्यांनीं काँग्रेसला पाठबळ दिलें असतें कीं काँग्रेसला विरोध करून निवडणुकी लढविल्या असत्या याचें उत्तर मला असें वाटतें कीं, प्रथम त्यांनीं सर्वस्वीं काँग्रेस पक्ष हा, अधिकारग्रहणाच्या नव्या इष्टापत्तीला किंवा आपद्धर्माला अनुसरून आज वाढवून प्रबळ केला असता. कारण अधिकारग्रहणाला लागणारें बहुमत, अर्थात् इतरांची मदत घेऊन काँग्रेस पक्षालाच मिळवून द्यावें असें त्यांनीं ठरविलें असतें. आजहि ते स्वतः काँग्रेसमध्ये आमच्यासारखेच अल्पमतवाले असते. शिवाय आपण राष्ट्रीय सभेचें तोंड कौन्सिलाकडे फिरविलें, व अधिकारग्रहणालाहि काँग्रेस पक्ष तत्पर दिसतो, त्याअर्थी त्याला अधिकारग्रहणाची इच्छा दुर्दम व्हावी अशी स्थिति जाणूनबुजून उत्पन्न करण्याकरतां कां होईना, पण काँग्रेस पक्ष कौन्सिलांत सबळ करावा असेंच त्यांनीं ठरविलें असतें. घोडा पाणी पित नव्हता तो पाणवठ्यावर गेला आणि पाणी पिण्याकरितां तोंडहि उघडूं पाहतो असें झाल्यावर, कोणता धनी त्यावर चाबूक उगारील किंवा त्याला बुजवील ! हट्टी मूल फार वेळ हट्ट करून जेवलें नाहीं, पण शेवटीं जेवावयाला तयार झालें, तर त्याला इतर मुलांपेक्षां गोड घांस अधिक मिळतो. लग्नाला तयार नसलेला व संन्यासी होऊं घातलेला मुलगा जर लग्नाला तयार झाला तर त्याला नांवें ठेवणारे लोकहि त्याच्या लग्नाच्या तयारीला अधिक हौसेनें मदत करतात.

## स्वार्थत्यागाची वेळ

आज टिळकांचा एखादा लोकशाही स्वराज्य पक्ष असता तरी वरील धोरणानें निवडणुकीचें रान त्यांनीं खचित काँग्रेसला सगळें मोकळें सोडलें असतें. आणि आपण इतर स्वार्थत्याग करतों, त्याप्रमाणें या वेळीं व्यक्तिविषयक महत्त्वाकांक्षा किंवा काँग्रेसमध्यें समाविष्ट असलेल्या म्हणून स्व-पक्षाचा अभि-

मान सोडणें हाहि एक सात्त्विक स्वार्थत्यागच आहे असें टिळकांनीं आपल्या अनुयायांना सांगितलें असतें असें मला वाटतें. मग टिळकांचें हें उदार धोरण पाहूनहि, त्यांना व त्यांच्या पक्षाला तुच्छतेनें वागविण्याची दुर्बुद्धि काँग्रेसच्या पुढाऱ्यांना झाली असती, तर अखेर काय झालें असतें हें मी निश्चयात्मक सांगूं शकत नाहीं. पण प्रथम तरी त्यांनीं हें उदार धोरण स्वीकारलें असतें. एकंदर राष्ट्रीय राजकारणाच्या दृष्टीनें त्यांनीं असें धोरण स्वीकारणें हें योग्य व संभवनीय वाटतें. कांहीं वेळां स्वतःची महत्त्वाकांक्षा किंवा पक्षाचा अभिमान बळी देण्याच्या असतात, तशीच आजचीहि वेळ आहे. कारण त्यामुळें अधिकारग्रहणाचें व प्रतिसहकारितेचें तत्त्वज्ञान प्रस्थापित होऊन आपसांतील वाद बहुतेक मिटला असता. म्हणून आज आमचा लोकशाही पक्ष निवडणुकी लढविण्याला तयार असतांहि मीं त्याला प्रथम तरी या उदार राष्ट्रीय धोरणाचाच सल्ला दिला आहे व अजूनहि देत आहें. मग तें लक्षांत घेऊन आमच्या पक्षाशीं सन्मान्य रीतीनें सलोखा करण्याची सुबुद्धि काँग्रेसच्या पुढाऱ्यांना होवो; किंवा मदांधतेनें जुनें तुच्छतेचें धोरण पुढें चालविण्याची दुर्बुद्धि त्यांना होवो.

## अराष्ट्रीय नकोत

आज टिळक हयात असते तर, ते काय करते व त्यांचें मत काय असतें हें अशा मोठ्या राष्ट्रीय धोरणाचे प्रश्न उभे करूनच सांगावें लागतें. किरकोळ गोष्टींत टिळकांनीं काय केलें असतें यावर तर्क चालविण्यांत स्वारस्य नाहीं. त्यांनीं केसरी-कचेरी कशा प्रकारची बांधली असती किंवा केसरी अर्ध-साप्ताहिक आहे तो दैनिक केला असता कीं नाहीं, असल्या गोष्टी किरकोळ आहेत. आज कायदेकौन्सिलाविषयीं त्यांनीं काय धोरण स्वीकारलें असतें, किंवा त्याहीपेक्षां सोशॅलिझम, कम्यूनिझम, फॅसिझम, डिक्टेटरशिप अशा विषयांसंबंधानें त्यांचें मत आज काय असतें, याविषयीं तर्क चालविणें हेंच खरें महत्त्वाचें. पैकीं पहिल्या विषायासंबंधानें माझी कल्पना मीं सांगितली. टिळकांनीं आज काँग्रेसला अधिकारग्रहणाचा मोह दुस्तर होण्याकरितां तिच्या नांवाचें बहुमत कायदेमंडळांत सिद्ध होण्याला मदत केली असती असें मीं म्हटलें. यावर कोणी मला म्हणतील कीं, हा फक्त पत्रपंडितगिरीचा, कांहीं न करण्याच्या आवडीचा उपदेश आहे; पण ही टीका रास्त नाहीं.

१९२० सालीं मी निवडणुकीला उभा राहिलों व १९३० मध्यें मीं असेंब्ली सोडली. परंतु आज १५ वर्षें जी एकच चळवळ केली ती काँग्रेसचें तोंड कौन्सिल-प्रवेशाकडे वळविण्याची; व ती अशा रीतीनें आज सफल झाली असतां वेगळा पक्ष म्हणून उभा करून निवडणुकी लढविणें हें खरोखरच, मोठ्या व्यापक राष्ट्रीय दृष्टीनें, मला चुकीचें धोरण वाटतें. शिवाय आमच्या दोघांच्या भांडणांत तिसरा अनिष्ट अराष्ट्रीय मनुष्य आंत शिरणार याची मला सर्वांत अधिक भीति वाटते! त्या मानानें आमच्या पक्षाचे उमेद्‌वार कोठें पराभूत झाले तरी त्याची भीति तितकी वाटत नाहीं. काँग्रेस व आमचा पक्ष यांत समेट झाला, तर हजारों रुपये अनाठायीं खर्च होणार ते वांचतील. पण मी हें सर्व म्हणून उपयोग काय ! सलोखा करण्याची उदार बुद्धि राष्ट्रीय सभावाल्यांना सुचली पाहिजेना ?

## खरा गुरु कोण ?

वास्तविक आम्हीच काँग्रेसला अधिक जवळ आहों. पण गांधीपक्षवाले एक वेळ तिसरा अनिष्ट अराष्ट्रीय मनुष्य आपला म्हणून घेतील, पण आमचा मनुष्य घेणार नाहींत. तें कां ? तर गांधींचा अवतार टिळकांचें तत्त्वज्ञान मारण्याकरितां झालेला आहे म्हणून, आणि असें त्यांनीं कां न समजावें ? कारण स्वतः गांधी हे गोखल्यांना आपले गुरु मानतात, टिळकांना मानीत नाहींत. गोखले हे मोठे कर्ते पुरुष, देशभक्त, उद्योगी मुत्सद्दी होते, व भारतसेवक समाज काढून त्यांनीं स्वार्थत्यागाची प्रतिमा आपल्या कल्पनेप्रमाणें उभी केली हें खरें. तथापि तीव्र स्वरूपाची चळवळ करणें या दृष्टीनें पाहतां टिळक हेच गोखल्यांपेक्षा गांधींचे गुरु शोभतात कीं नाहीं ? पण तसें म्हटलें तर आजच्या टिळक सांप्रदायी पक्षाच्या द्वेषाला बाध येतो. अशाहि स्थितींत काँग्रेसला बहुमत मिळावें असें म्हणतों याचें कारण कांहीं टीकाकार असें देतील कीं, टिळकांच्या आजच्या अनुयायांत किंवा शिष्यांत टिळकांचें तेज व विभूतिमत्त्व नाहीं. पण ही गोष्ट लोकांनीं म्हणण्याचें काय कारण ? ती आमची आम्हीच म्हणतों कीं ! दिव्याला दिवा लावून दिव्यासारखा दिवा प्रज्वलित करतां येतो, त्याप्रमाणें गुरूसारखा शिष्य होतोच असें नाहीं. आणि हा न्याय हिंदुस्थानांतील इतर प्रांतांतहि दिसून येत आहे. पंजाबांत लजपतरायांचा शिष्य त्यांच्यासारखा कोण झाला ? बंगाल्यांत दासबाबूंनंतर त्यांची जागा कोणीं घेतली ? आणि मद्रासेंत तर अमुक अमक्याचा शिष्य म्हणण्यासारखा पुढारी गुरुच झाला नाहीं ! या

बाबतींत मला हिणविण्यापेक्षां एकंदर महाराष्ट्रानें स्वतःलाच हिणविलें पाहिजे. पण विभूतीसारखी विभूति निर्माण होत नाहीं, म्हणूनच सर्व अनुयायांनीं मिळून ती उणीव भरून काढली पाहिजे. श्रीकृष्णाच्या करांगुलीनें गोवर्धन पर्वत खरो-खर उचलला असो वा नसो, त्याच्या सहकारी बालगोपालांनीं आत्मविश्वासानें आपल्या काठ्या गोवर्धनाखालीं लावल्याच कीं नाहीं ! महाराष्ट्रांतील लोकांनीं टिळकांची आठवण ठेवून संघटित कार्य केलें तर त्या बळावर टिळकांचें कार्य त्यांच्या मार्गेंहि कांहींसें होऊं शकेल. म्हणून मी पुनः म्हणतों कीं, काँग्रेस-वाल्यांना सलोख्याची सुबुद्धि सुचेल तर माझा पक्षहि त्यांना म्हणेल कीं, तुमचेंच बहुमत होऊं द्या, आम्ही तुम्हांला सर्वस्वीं मदत करतों. टिळकांनीं १९१६ सालीं लखनौच्या राष्ट्रीय सभेंत मुसलमानांना जसें अधिक देऊं केलें तसेंच आमचाहि पक्ष काँग्रेसला देऊं करील. कारण तेव्हांप्रमाणें आतांहि सरकारा-विरुद्ध एक अखिल राष्ट्रीय पक्ष प्रबल करणें हेंच खरें राष्ट्रीय धोरण होईल व बलिष्ठ राजकारणहि होईल.

## व्यावहारिक तत्त्वज्ञान

टिळकांचें ध्येय नेहमीं परमोच्च असे. परंतु व्यवहारांत ते अगदीं खालच्या पातळीवरहि येऊ शकत. साध्याला धक्का न लावतां साधनाच्या कमाल व किमान मर्यादांमध्यें ते पुष्कळच वाव ठेवीत. कर्म विधियुक्त झालें म्हणजे पुरे, मग त्यांत थोडें कमी होवो, जास्त होवो. परवां प्रो. दांडेकर म्हणाले त्याप्रमाणें संध्येंत आचमन करणें हा विधि. तो केलाच पाहिजे, पण उन्हाळ्यांत पाणी गोड लागतें म्हणून एका फुलपात्राचीं तीनच आचमनें करावीत असें वाटतें तर हिंवाळ्यांत थंड पाणी नको वाटतें; म्हणून एका पळींतहि तीन आचमनें आपण बसवितों. याच रीतीनें टिळकांच्या व्यवहारानें त्यांच्या ध्येयवादाला कमी-पणा आला असें कधीं घडलें नाहीं. मोर्ले सुधारणांच्या वेळीं किंवा माँटेग्यु सुधारणांच्या वेळीं ‘ उजाडलें पण सूर्य कोठें आहे ’ असें त्यांनीं विचारलें; पण सूर्य क्षितिजावर येण्याच्या अपेक्षेनें त्यांनीं १९२० सालीं जाहीरनामा लिहिला त्यांत उत्क्रांतितत्त्वानें म्हणजे क्रमानें राजसत्ता पदरांत पाडून घेण्याचाच कार्यक्रम त्यांनीं आंखला होता. टिळकांच्या या व्यवहारकुशलतेमुळें त्यांनीं कोणत्याहि लहरीचा वेडाचा स्वीकार केला नव्हता. लोकविलक्षण गोष्टी करून प्रसिद्धीला येण्याची त्यांना हाव किंवा संवय नव्हती. तसेंच ते ईश्वराचें अस्तित्व

मानीत असतांहि आपण बोलतों तें ईश्वरप्रणित संदेशाचें बोलतों, असें त्यांनीं रोज रोज म्हटलें नाहीं. धार्मिक बृत्ति राजकारणांत आणल्यानें राजकारणाला खोडा पडतो. यमनियमांच्या जाळ्यांत पाय अडकतात. म्हणून टिळकांनीं यतिधर्मांच्या यमनियमांना राजकारणांत स्थान दिलें नाहीं. याचाच अर्थ हा कीं टिळक हे राजकारणांत गृहस्थ होते व गांधी हे बोवा आहेत !

## नवमताचा स्वीकार

आतां आणखी दोन मोठ्या प्रश्नांसंबंधानें टिळकांचें मत आज काय असतें याविषयीं दोन शब्द सांगतों. हे दोन प्रश्न म्हणजे सोशॅलिझम व कम्युनिझम् हा एक भाग व फासिझम–डिक्टेटरशिप हा दुसरा भाग. [ येथें केळकरांनीं राजा, राजपद, स्वातंत्र्य, लोकमत, क्रांति, साम्राज्य, साम्राज्यांतर्गत स्वराज्य, साधन-विवेक, समता, साम्य बुद्धि इ. मुद्यांसंबंधानें टिळकांचे विचार बीजरूपानें काय होते हें श्रोत्यांना समजून देण्याकरितां बापटकृत टिळक सूक्तिसंग्रह ग्रंथांतील कांहीं निवडक वेचे वाचून दाखविले व पुढें म्हणाले कीं], टिळकांनीं कोणत्याहि नवमताला केवळ तें नवमत म्हणून दूर लोटलें नसतें. त्यांतील तेजस्वी व उपयुक्त असें जें दिसेल त्याचा स्वीकार त्यांनीं केला असता. ते जुन्यामताचे असले तरी, नव्याकडे तें नवें म्हणूनच पाठ फिरवावी असें त्यांनीं केलें नसतें. सोशॅ-लिझम, कम्युनिझम हे प्रश्न त्यांच्या वेळीं तसे पुढें आलेच नव्हते. तेजस्वी तरुणाचें तें केव्हांहि कौतुकच करीत; पण ज्या पद्धतीनें आज नवमतवादी म्हणविणारे तरुण वागतात तीहि त्यांना पटली नसती. या तरुणांनीं आपल्या एकांतिक विचारांनीं त्यांना कदाचित् किंचित् भिवविलेंहि असतें. वर जे नव-मतवादाचे म्हणून चार प्रश्नांचे मिळून दोन गट सांगितले ते खरोखर एकमेकां-पासून उत्तर दक्षिण ध्रुवाइतके दूर व विरोधी असतांहि, एकाच कारणांतून कार्यरूपानें निघाले आहेत. म्हणजे त्यांची उत्पत्ति सृष्टिधर्मानुसार झाली आहे. मात्र एका देठांतून कण्हेरीचें व गुलाबाचें अशीं दोन्हीं फुलें निर्माण व्हावीं इतकें तें विपरीत दिसतें. या कार्याचें कारण, गेल्या दोनतीनशें वर्षांत व्यक्तिस्वातं-त्र्याच्या तत्त्वानें अतिशयोक्तीची कड पोंचविली हें होय. आणि महायुद्धानंतर सोडविण्याचे प्रश्न तर एवढे मोठे उत्पन्न झाले कीं लोकमतानुसारी राज्यपद्धति कितीहि चांगली म्हटली तरी तिच्या पदरीं निष्क्रियता येऊं लागली.

## क्रिया व प्रतिक्रिया

चक्रव्यूहांत शिरतां येतें पण बाहेर पडतां येत नाहीं याप्रमाणें डेमोक्रॅटिक राज्यपद्धतीची स्थिति झालेली दिसून आली. लोकमत हें इतकें पातळ झालें कीं, त्यावर कशाचेंहि अधिष्ठान ठरेना आणि कोणत्याहि गोष्टीची अतिशयोक्ति झाली म्हणजे तिजविरुद्ध प्रतिक्रिया होणें हीच सुधारणा. अमुक एक गोष्ट चांगली म्हणून तीच सुधारणा असें ठरवावें तर, ती कितीहि पुढें जात चालली असतां तिला कोठें तरी थांबवून धरणें हें इष्ट कसें म्हणावें? असा कोलदांडा येऊन पडतो. पण कोणतीहि गोष्ट फक्त कांहीं मर्यादेपर्यंतच चांगली असते. ती तशीच अमर्याद रीतीनें पुढें वाढत गेली तर चांगली हें नांव तिला राहत नाहीं. आपणांत पूर्वीं बालविवाह इतका बोकाळला कीं, कांहीं जातींत पाळण्याला बाशिंगें बांधून लग्नें होत, किंवा गर्भारशा बायकाहि—एक आपणाला मुलगा होईल व दुसरी आपणाला मुलगी होईल असें समजून—वाग्दान करीत; मग फक्त लग्नविधि उरे. ही बालविवाहाची अतिशयोक्ति झाली, तेव्हां तिला प्रतिक्रिया म्हणून प्रौढ-विवाह सुधारणारूपानें पुढें आला. पण या प्रौढविवाहाच्या सुधारणेला गेल्या पिढींतच फिरून प्रतिक्रियेचा आळा पडूं पहात आहे. ह्याच रीतीनें जगांतील व्यक्तिस्वातंत्र्याच्या कल्पनेविरुद्ध प्रतिक्रिया होऊन हें स्वातंत्र्य निष्क्रिय, निष्फळ म्हणून अनिष्ट असें दिसूं लागलें.

## फॅसिस्ट पण केव्हां

या स्वातंत्र्याला आळा घालणारे दोन वेगवेगळे पंथ झाले. एका भांडवल-शाहीला नामोहरम करूं पाहणारा कम्युनिझम पक्ष, व दुसरा कम्युनिझम किंवा सोशॅलिझमला नामोहरम करूं पाहणारा फॅसिस्ट पक्ष किंवा झोटिंगशाही पक्ष. पण त्यांत फिरून फरक असा कीं, सोशॅलिझम ही समाजाच्या हिताकरितां समाजाच्या नांवानें व्यक्तिस्वातंत्र्याला आळा घालणार, तर झोटिंगशाही ही समाजाच्या हिता-करितांच म्हणून पण एकतंत्री सत्तेनें आळा घालणार. मग यांपैकीं आज टिळ-कांनीं कोणता पक्ष स्वीकारला असता? मला वाटतें कीं, प्रथम कांहीं वेळ त्यांनीं कोणालाच थारा दिला नसता. डेमॉक्रसीचे कांहीं दिवस जाऊं देऊन लोक-मताला शिक्षण व वाव देऊन नंतर कम्युनिझमच्या ऐवजीं त्यांनीं डिक्टेटराशिप किंवा फॅसिझमच्या तत्त्वाचा स्वीकार केला असता. टिळकांची संस्कृति, स्वभाव व तत्त्वज्ञान या तीनहि दृष्टींनीं कम्युनिझमपेक्षां फॅसिझम त्यांना अधिक पटला

असता. हिंदुस्थानांत आपणाला झोटिंगशाहीचा फार जुना अनुभव आहे; कारण सगळी राजपरंपरा ही झोटिंगशाहीचीच परंपरा होय! दोन युगांपूर्वी रामराज्य होऊन गेलें; पण विक्रमाचा शक जाऊन जसा शालिवाहन शक इकडे सुरू झाला, त्याप्रमाणें राजधर्म पाळून रामाची कीर्ति मागें टाकणारा तसा दुसरा राजा झाला नाहीं. युरोपांतील झोटिंग झाले तरी त्यांच्यामागें लोकमताचें पाठबळ असतें. फक्त तें पार्लमेंटच्या दैनंदिन कार्यांतून प्रकट होत नाहीं इतकेंच काय तें. एरवीं झोटिंगशाहींतहि मधूनमधून निवडणुकी होतात, तेव्हां झोटिंगशहाच्या बाजूला शेंकडा ८०–९० इतकें मत पडतें तें कसें पडलें असतें! शिकलेल्या, डेमॉक्रसीचा अनुभव घेतलेल्या, राष्ट्रांतील इतकें प्रचंड बहुमत झोटिंगशहाला अनुकूल पडतें, त्याला थोडेसें कारण गुप्त भीति हें असलें तरी, झोटिंगशहा हा एकंदरींत राष्ट्राचेंच हित साधत आहे अशी खात्री त्यांची असते. आम्ही हिंदुस्थानांतील लोक जे राजेरूपी झोटिंगशहाविरुद्ध चळवळ करितों, त्याचें कारण हेंच कीं, इटालीचा मुसोलिनी किंवा जर्मनीचा हिटलर यांच्याप्रमाणें आमचे राजे, संस्थानिक, जनतेच्या कल्याणाकरितां आपली सत्ता गाजवतात असें दिसत नाहीं, तर ते ती सत्ता स्वतःच्या व स्वकीय व्यक्तींच्या फायद्याकरितां गाजवतात असें अनुभवाला येतें. आमचे राजेरजवाडे, हिटलर–मुसोलिनी यांच्या खऱ्या अंतरंगानें जर झोटिंगशहा बनतील, तर आम्ही देखील संस्थानी राजकारणाची चळवळ सोडून देऊं.

## आधीं स्वातंत्र्य

आधीं स्वातंत्र्य कीं आधीं समाजशाही–कम्युनिझम, या प्रश्नाचीं उलटीं सुलटीं उत्तरें जवाहरलाल नेहरू यांनीं अलीकडे दिलेलीं आहेत. टिळकांनीं आधीं स्वातंत्र्य व सत्ता व मग प्रजेला वाटल्यास कम्यूनिझम असें निश्चित उत्तर दिलें असतें असें मला वाटतें. टिळक-साम्यवादी नव्हते असें नाहीं, पण साम्यवादांत–समबुद्धींतहि तारतम्य कसें सांभाळावें लागतें हें टिळकांनीं कर्मयोगाच्या विवेचनांत गीतारहस्यामध्यें सांगितलें आहे. नवमतवादी साम्यसिद्धांताला राजकीय, आर्थिक व सामाजिक अशा तीन बाजू आहेत; त्यांपैकीं पहिली टिळकांना केव्हांहि मान्य होती व झाली असती. आर्थिक बाजूचें साम्यहि त्यांना सर्वस्वीं अमान्य झालें नसतें, परंतु कांहीं सिद्धांतिक अपवाद वगळून नवमतवादांतील सामाजिक बाजूपैकीं स्त्रीस्वातंत्र्य व तदनुषंगिक इतर स्वातंत्र्यें टिळकांना मान्य झालीं असतीं असें वाटत नाहीं.

## नित्सेचें तत्त्वज्ञान मान्य

जर्मन तत्त्ववेत्ता नित्से याच्या तत्त्वज्ञानावर टिळकांचा फॅसिझम अधिष्ठित झाला असता. टिळकांनीं गीतारहस्य ग्रंथ लिहून छापला तेव्हां महायुद्ध सुरू होऊन नित्सेच्या तत्त्वज्ञानाचा बोलबोला झाला होता. आणि खालील मुद्द्यासंबंधीं नित्सेच्या तत्त्वज्ञानाचा आधार प्रत्यंतरादाखल टिळकांनीं गीतारहस्यांत घेतलेला आढळेल-(१) नित्से कर्मशक्तीचा पुनर्जन्म मानतो. (२) नित्से कर्मत्यागी लोकांची निंदा करतो. (३) नित्से लोकोत्तर मनुष्यकोटी (सुपरमॅन) मानतो. (४) नित्से म्हणतो कीं, सुपरमॅन किंवा विभूति हिला सामान्य मनुष्यांचीं नीतितत्त्वें लावतां येत नाहींत; त्याची शुद्ध व्यवसायात्मिकाबुद्धि व इच्छाशक्ति हाच त्याचा नीतिधर्म होय. (५) नित्से म्हणतो कीं, युद्ध्यमान इच्छाशक्ति, सत्ताकांक्षी इच्छाशक्ति व विजिगीषु इच्छाशक्ति हेंच खरें जीवनरहस्य आहे. (६) नित्से म्हणतो कीं, कर्मयोग, गृहस्थाश्रम व राजधर्म हे निर्वैर निर्द्वेष असूंच शकत नाहींत; तसेच अहिंसात्मकहि असूं शकत नाहींत. (७) नित्सेनें स्त्री-दाक्षिण्यवादाची थट्टा केली आहे. स्त्री ही पराक्रमी पुरुषाच्या गळ्यांतील धोंड असें मानणारा तो होता ! (८) नित्सेच्या मतें डेमॉक्रसी हें निर्बळतेचें प्रतिरूप आहे. तिला नेहमीं जो ताब्यांत ठेवील तोच राज्य यशस्वी करील. यांपैकीं फक्त शेवटचा सिद्धांत टिळकांना कदाचित् प्रथम कांहीं दिवस मान्य झाला नसता; परंतु अखेर तोहि मान्य होऊन त्यांनीं फॅसिझमचा स्वीकार केला असता. बाकीचे सर्व सिद्धांत नित्सेप्रमाणें टिळकांना मान्य होते असें मला वाटतें. टिळक हे एखाद्या सैन्याचे सेनापति अशी कल्पना जितकी शोभते, तशी ते लोकमत अजमावित बसणारे मुत्सद्दी अशी कल्पना शोभत नाहीं. पण या दिवसांत सैन्य आाणि सेना या गोष्टी कशा बोलाव्या ? या गोष्टीचा टिळकांनाहि मोठा विषाद वाटे आणि तें खरेंच. परिस्थितिच अशी आहे कीं, आज शिवाजी जन्मास येता, तर फार तर तो डॉ. मुंजे यांच्या लष्करी शाळेंत जाऊन चांगला विद्यार्थी ठरता. कै. वासुदेवशास्त्री खरे यांनीं नाना फडणविसांचें सुंदर चरित्र लिहिलें. त्याच्या शेवटच्या परिच्छेदांत 'त्यांचा नातु आज बेलबागेंत राहून मॅट्रिकचा अभ्यास करतो' असें खरे यांनीं लिहिलें तें वाचून टिळकांनीं पुस्तक फेंकून दिलें. ते म्हणाले, ही गोष्ट पुण्यांत आम्हांला माहीत आहे. परंतु अशा थोर पुरुषाच्या चरित्राचा शेवट अशा अपकर्षानें न होतां स्फूर्तिदायक उत्कर्षभावनेनेंच व्हावयास पाहिजे.

असो. पण हेहि दिवस जातील. अकबर बादशहाच्या हातांत आंगठी होती तिजवर लिहिलेले शब्द आपणहि आज ध्यानांत ठेवावे. "हेहि दिवस जातील" असे ते शब्द होते. जसे उत्कर्षाच्या वेळीं तसेच अपकर्षाच्याहि वेळीं सारखेच उपयोगी पडणारे, असेच ते शब्द नाहींत काय !

---

# भाग ५ वा

# केसरीविषयक

## १ लो. टिळकांचें पहिलें मृत्युपत्र (१९०९)

[ हें मृत्युपत्र पुढें, ता. ५ एप्रिल १९१८ रोजीं, टिळकांनीं कोलंबो येथें केलेल्या मृत्युपत्रानें रद्द झालें. तथापि पहिल्या मृत्युपत्राला कायदेशीर नसलें तरी ऐतिहासिक स्वरूप असल्यामुळें, किंबहुना तेथूनच या ट्रस्टच्या मूळ कल्पनेचा अस्पष्ट पण निश्चित असा उगम असल्यामुळें तें येथें दिलें आहे. ]

**मेकटिला येथील तुरुंग, उत्तर ब्रह्मदेश**

ता. २० ऑगस्ट १९०९.

१ माझें वयाला चोपन्नावें वर्ष सुरू आहे. सहा वर्षांच्या कैदेंपैकीं फक्त एकच संपलें आहे. म्हणून आतां हें मृत्युपत्र करून ठेवतों. त्या पूर्वींचीं लेखी किंवा तोंडी सर्व प्रकारचीं असतील तीं मृत्युपत्रें या लेखानें मी रद्द करीत आहें.

२ माझी बहुतेक सर्वच मिळकत स्वार्जित आहे.

३ माझी एकंदर मिळकत खालीलप्रमाणें आहे—

१ कोंकणांतील चिखलगांव येथील लहानसें ठिकाण.

२ पुण्यांतील गायकवाडा म्हणतात ती जागा व इमारत.

३ सिंहगड येथील बंगला.

४ लातूर येथील जिनिंग फॅक्टरींपैकीं तिसरा हिस्सा.

५ छापखाना, यंत्रें, टाइप, फौंडरी इत्यादि.

६ कुटुंबाचे दागिने व इतर जिन्नस.

७ मुंबई स्वदेशी को-ऑपरेटिव्ह कंपनीचे १० शेअर्स व पोस्टल बँकेंतील लहानशी रक्कम.

८ ग्रंथसंग्रह.

९ घरांतील कपडालत्ता, सामानसुमान, भांडींकुंडीं इ.

१० केसरी व मराठा या दोन वर्तमानपत्रांचे मालकीचे हक्क, गुडवुईल व त्यासंबंधीं मालमिळकत.

११ विम्याची पॉलिसी.

१२ वर उल्लेख झाला नाहीं अशी किरकोळ मिळकत.

४ माझें येणें ( १ ) बाबामहाराज यांचे इस्टेटीकडून सुमारें रु. २० हजारांवर हिशेबी निघेल तें, ( २ ) कोंकणांत जमिनीच्या तारणावर कर्जाऊ दिलेली लहानशी रक्कम व ( ३ ) इतर लोकांकडून किरकोळ हिशेबी घेणें निघेल तें असें आहे.

मी लोकांचें देणें आहे त्या रकमा--

रु. ७००० चित्रशाळेचे रा. वासुदेवराव जोशी यांचे.

रु. १५०० कै. माधवराव नामजोशी यांच्या मुलीची मजजवळ असलेली ठेव व हिशेबी कांहीं इतर किरकोळ देणें निघेल तें.

५ मी बाबामहाराजांचे इस्टेटीचा एक ट्रस्टी आहें. तसेंच पुणें डेक्कन बँकेंत सरदार बाळासाहेब नातू यांचे नांवें जमा असलेली रक्कम रु. २५००० व आर्यभूषण प्रेसकडे असलेली लहानशी रक्कम—या दोहोंचा मी एक ट्रस्टी आहें, व या दोन रकमा रायगड स्मारक फंडाच्या आहेत.

६ बाबामहाराजांच्या इस्टेटीच्या ट्रस्टींतून माझें नांव काढून घ्यावें. इतर ट्रस्टींनीं रा. यशवंतराव कुलकर्णी, इस्टेटीचे कारकून, यांना त्यांच्या चांगल्या नोकरीबद्दल, श्री. जगन्नाथ-महाराज हे इस्टेटीचे मालक झाल्यावर, कांहीं बक्षीस देववावें अशी माझी शिफारस आहे.

७ रा. दाजी आबाजी खरे यांना मीं कळविल्याप्रमाणें, त्यांनीं सरदार नातू यांजकडून रायगड फंडांतील रक्कम घेऊन रायगडावरील श्रीशिवाजीमहाराजांचे छत्रीचें कार्य उरलें आहे तें करावें.

८ चित्रशाळेचें कर्ज लातूर फॅक्टरीच्या नफ्यांतून हळुहळु फेडावें. पण त्यांतून तें फिटत नसल्यास फॅक्टरींतील माझा हिस्सा योग्य किंमतीला रा. वासुदेवराव जोशी यांचे नांवें खरेदी करून द्यावा.

९ बाबामहाराज यांच्या इस्टेटीकडून माझे येण्याची रक्कम सर्व वसूल झाल्यास त्यांतील अर्धी माझ्या मुलांना द्यावी व अर्धी रक्कम केसरी-मराठा प्रेस इन्स्टिट्यूटकरितां ' इशुअरन्स फंड ' म्हणून, किंवा आकास्मिक कारणाकरितां खर्चाला ट्रस्ट मिळकत म्हणून बाजूला काढून ठेवावी.

१० कुटुंबाचे दागिने तिचे तिला स्त्रीधन म्हणून द्यावे.

११ माझ्या नांवें असलेल्या रु. १५०० च्या प्रॉमिसरी नोटांच्या व्याजांतून माझी विधवा भावजय बहिणाबाई हिला दरसाल रु. ७० पोटगी म्हणून आणि माझ्या इतर मिळकतींतून एकदां रु. ५०० काशीयात्रेचा खर्च म्हणून द्यावे.

१२ कोंकणांतील खोती इस्टेटीवर माझ्या चुलतीच्या अन्न-वस्त्राचा हक्क आहे. तिच्या मरणोत्तर माझ्या हिश्याची वांटणी न करतां त्याच्या उत्पन्नाचा कायमचा ट्रस्ट करावा; व त्याचें उत्पन्न कुलस्वामी लक्ष्मीकेशव यांचे पूजे-अर्चेकडे खर्च करीत जावें. तसेंच रु. २०० रकमेवरील व्याज दरसाल देवळाच्या दुरुस्तीकरितां देत जावें. वाड्यांतील गणपत्युत्सव पूर्वींसारखाच चालू ठेवावा व त्याचा खर्च प्रेस इन्स्टिट्यूटनें सोसावा.

१३ हल्लीं नुकतेंच, माझा वाडा, त्यांतील सामान व ग्रंथसंग्रह यांचें बक्षिसपत्र मुलांचे नांवानें मीं करून दिलें आहे. तथापि आमच्या राहात्या घरभागाखेरीज इतर इमारत ग्रंथसंग्रह व सामानसुमान वगैरे हें प्रेस इन्स्टिट्यूकरितां; माझे मुलांनीं ट्रस्ट मिळकत म्हणून सांभाळावें. पुढें मागें वाड्याची वांटणी करण्याचा प्रसंग आल्यास मुलांनीं पूर्वेकडील राहता घरभाग; समोरील मोठा दिवाणखाना, पिंपळाचा पार वगैरे भाग स्वतःकडे घ्यावा.

१४ प्रेस इन्स्टिट्यूटशिवाय बाकीची सर्व मिळकत मुलांनीं घ्यावी. विम्याच्या पॉलिसीची रक्कमहि त्यांनाच मिळावी. प्रेस इन्स्टिट्यूटकडे वर सांगितल्याप्रमाणें लावून दिलेल्याशिवाय इतर सर्व मिळकत दोघां मुलांना द्यावी. त्यांना इकडे किंवा परदेशांत जाऊन मिळण्यासारखें असेल तें उत्तम उच्च प्रतीचें शिक्षण द्यावें. व श्री. जगन्नाथमहाराज यांजकडील कर्ज वसूल न झालें तरी दोघां मुलांना प्रत्येकीं दहा दहा हजार रुपये वरील शिक्षणाकरितां देतां यावे म्हणून वीस हजारांची रक्कम बाजूला काढून ठेवावी. ही रक्कम त्यांच्या परदेशांतील शिक्षणाला किंवा इकडे एखादा स्वतंत्र धंदा करण्याला सुरवातीचें भांडवल म्हणून उपयोगी पडेल.

१५ या मृत्युपत्राचे एक्झिक्यूटर म्हणून मी खालील गृहस्थ नेमीत आहें:—

| | |
|---|---|
| १ रा. धोंडोपंत विद्वांस | ४ रा. पांडुरंग गोपाळ बाळ |
| २ ,, विश्वनाथपंत केतकर | ५ ,, दादासाहेब खापर्डे |
| ३ ,, वासुदेवराव जोशी | ६ ,, दाजीसाहेब खरे |

यांनीं रीतसर अधिकारपत्र मिळवून, किंवा माझ्या मुलांची पालनकर्त्री म्हणून माझ्या कुटुंबाचे सल्ल्यानें, सर्व व्यवस्था करावी.

१६ केसरी व मराठा या वर्तमानपत्रांची मी ' इन्स्टिट्यूट ' करीत आहें. व त्याच्या उपयोगाकरितां, ट्रस्ट मिळकत म्हणून छापखाना, यंत्रें, टाईपफौंड्री, सामान, पुस्तकें व केसरी—मराठा पत्रांवरील स्वामित्वाचे हक्क इत्यादि मी लावून देत आहें. या ट्रस्टला ' प्रेस इन्स्टिट्यूट ' किंवा इतर कोणतेंहि योग्य तें नांव द्यावें.

१७ या ट्रस्टकरितां दोन किंवा अधिक ट्रस्टी असावेत. त्यांच्या ताब्यांत वरील सर्व मिळकत राखीव रिझर्व्ह फंड म्हणून असावी. वाडा मुलांचेकडे राहावा. तथापि वर सांगितल्याप्रमाणें त्यांतील कांहीं भाग या इन्स्टिट्यूटकरितां ट्रस्ट मिळकत म्हणून त्यांनीं समजावा. माझ्या मुलांपैकीं जर कोणी एखादा सज्ञान व लायक असेल तर त्याला ट्रस्टींपैकीं एक ट्रस्टी नेमण्यांत यावा.

१८ केसरी—मराठा वर्तमानपत्रांची व्यवस्था, वरील ट्रस्टान्वयें, श्री. नरसिंह चिंतामण केळकर व श्री. कृष्णाजी प्रभाकर खाडिलकर यांजकडे द्यावी. त्यांनीं ती नाकारल्यास मगच दुसऱ्या कोणाला द्यावी. श्री. केळकर खाडिलकर हे स्वतः किंवा त्यांचे वंशज यांचा इन्स्टिट्यूटच्या मिळकतीवर कोणत्याहि प्रकारचा खासगी हक्क राहणार नाहीं.

१९ श्री. धोंडोपंत विद्वांस यांना, वरीलप्रमाणेंच, मॅनेजर म्हणून त्यांजकडे व्यवस्थापकाचें काम द्यावें.

२० केसरी पत्र, मराठा पत्र, व फौंडरी हीं तीन स्वतंत्र खातीं करावीं, जरूर तर त्यांना स्वतंत्र नांवेंहि द्यावींत.

२१ हल्लींप्रमाणें महाराष्ट्रांतील राष्ट्रीय पक्षाचीं मुखपत्रें या स्वरूपानेंच केसरी व मराठा हीं वर्तमानपत्रें चालविलीं जावींत. संपादकांना पत्रांचें धोरण बदलण्याचा अधिकार नाहीं. त्यांच्यामध्यें मतभेद झाल्यास खालीं दिलेल्या बोर्डानें निर्णय द्यावा व तो अखेरचा समजला जावा.

२२ या सल्लागार बोर्डांत किंवा मंडळांत सातापेक्षां कमी नाहींत व दहाहून अधिक नाहीं इतके प्रमुख राष्ट्रीय वृत्तीचे गृहस्थ नेमावे. ते मध्यमहाराष्ट्र, नागपूर प्रांत, वऱ्हाड या सर्वांतून मिळून नेमावे. संपादक हे एक्सऑफिशिओ म्हणून राहावे. हें बोर्ड नेमण्याचा हक्क प्रथमतः मजकडे राहील. व या नेम-

णुकी मीं न केल्यास खालीं दिलेल्या गृहस्थांच्या बोर्डानें त्यांची नेमणूक करावी.

२३ इन्स्टिटयूटची व्यवस्था व पत्रांचें धोरण याविषयीं संपादकांनीं मागितल्यास, किंवा बोर्डाला आपण होऊनहि, सल्ला देण्याचा अधिकार राहील. तसेंच बोर्डाला लागेल ती माहिती मागण्याचा हक्क राहील.

२४ बोर्डाचे सभासदानें त्याला वाटल्यास आपल्या जागीं दुसरा मनुष्य नेमून घ्यावा किंवा तसें न झाल्यास इतरांनीं तो नेमावा.

२५ इन्स्टिटयूटची अंतर्गत सर्व व्यवस्था दोन संपादक व छापखान्याचे व्यवस्थापक यांचे हातीं राहील; व त्यांनीं हिशेब ठेवणें, स्वतःचे व इतर लोकांचे पगार ठरविणें, व सर्वसामान्य व्यवस्था चालणें यासंबंधानें पद्धतशीर नियम करावे. यांत मतभेद झाल्यास किंवा झालेले नियम ट्रस्टच्या हेतूविरुद्ध आहेत असें वाटल्यास सल्लागार बोर्डानें त्यांत वाटेल ती योग्य ती दुरुस्ती करावी.

२६ कांहीं असलें तरी, प्रेस इन्स्टिटयूटच्या उत्पन्नांतून ट्रस्टींनीं, माझे मुलगे २५ वर्षांचे होईपर्यंत; त्यांच्या शिक्षणाकरितां दरमहा ७५ रुपये घरीं पोहोंचते करावे. त्यांचें वय २५ वर्षांचें झाल्यावर दरसाल ट्रस्ट इस्टेटींतून ५०० रुपये रिझर्व्ह फंडादाखल काढून ठेवावे.

२७ माझ्या एखाद्या मुलाची इच्छा इन्स्टिटयूटमध्यें काम करण्याची असल्यास व तो कामाला लायक असल्यास, त्या कामावर त्याचा पहिला हक्क आहे असें समजावें. तथापि केव्हांहि संस्थेच्या इतर सभासदांहून खास किंवा खासगी असा कोणताही हक्क माझे मुलाचा इन्स्टिटयूटच्या मिळकतीवर राहणार नाहीं.

२८ ट्रस्ट इन्स्टिटयूटचें काम चालणें अशक्य झाल्यास त्याची मिळकत माझे मुलगे किंवा त्यांचे वंशज आणि खालील सभासदांचें बोर्ड यांजकडे परत जावी. मग ती त्यांनीं विकून येईल त्या रकमेचा स्वतः उपयोग करावा. किंवा ती मिळकत वाटल्यास दुसऱ्या एखाद्या शिक्षणविषयक किंवा सार्वजनिक कार्याकडे लावावी.

२९ 'ट्रस्ट इन्स्टिटयूट' संबंधीं या मृत्युपत्रांत जो भाग आहे त्याची अंमलबजावणी करण्याकरितां मी खालील गृहस्थ ट्रस्टी किंवा एक्झिक्यूटर नेमीत आहें.

| | |
|---|---|
| १ रा. दादासाहेब खापर्डे | ४ रा. कृष्णाजी प्रभाकर खाडिलकर |
| २ ,, दादासाहेब करंदीकर | ५ ,, वासुदेव गणेश जोशी |
| ३ ,, नरसिंह चिंतामण केळकर | ६ ,, वासुदेव सदाशिव बापट |

या सर्वांनीं ट्रस्ट इस्टेट आपल्या ताब्यांत घेऊन तिची व्यवस्था करावी.

३० मला वाटल्यास या मृत्युपत्रांत फेरबदल करणें किंवा तें रद्द करणें त्यांविषयीं सर्व अधिकार मीं स्वतःकडे राखून ठेविले आहेत.

---

## २ लो. टिळकांचें दुसरें व अखेरचें मृत्युपत्र ( १९१८ )

कोलंबो, ता. ५-४-१९१८.

मी बाळ गंगाधर टिळक, राहणार पुणें, हल्लीं मुक्काम कोलंबो, या लेखानें शेवटची व्यवस्था किंवा मृत्युपत्र करून ठेवितों तें येणेंप्रमाणें--या मृत्युपत्रांत सामान्य दिग्दर्शन केलें आहे. विशेष बाबी निघाल्यास त्यांचा निकाल या सामान्य दिग्दर्शनाप्रमाणें करावा.

१ चि. गं. भा. बहिणाबाईस मी हयात आहेंपर्यंत दरसाल रुपये शंभर देणें. माझेनंतर दोन हजार रुपयांच्या प्रॉमिसरी घेतलेल्या आहेत. त्याचें व्याज रुपये सत्तर येईल तें व भरतीस पांच रुपये घालून एकंदर पाऊणशें देणें; व तिला आगर व घर बांधून केळशी येथें दिलें आहे. त्याचा उपभोग तिनें हयात आहे पर्यंत घेणें. नंतर सदर आगर व घर चिरंजीव गंगाधर वासुदेव विद्वांस माझा भाचा यांस देणें. याचेवर दुसरा कोणाचा हक्क नाहीं.

२ चिखलगांवची सर्व इस्टेट तेथील देव श्रीलक्ष्मीकेशव यांस ट्रस्ट करून देणें व देवास १०००-१५०० ( हजार ते पंधराशें ) रुपयेपर्यंत निराळे देणें.

३ लातूर जिनिंग, सिंहगडचा बंगला ही इस्टेट मुलांस म्हणजे चिरंजीव रामभाऊ व बापूस देणें. राहतें घर त्यांचे नांवें केलेलेंच आहे.

४ घरांतील दागिने व पॉलिसी मुलांस देणें.

५ दोनशें रुपये दरमहा चि. रामभाऊ व बापूस मिळतील अशी तजवीज करणें व चि. धोंडूस दहा हजार मिळतील ( एकदम ) अशी तजवीज करावी.

६ चि. गणपति व अंतू केतकर यांची बी. ए. अगर एलएल. बी. होईपर्यंत विद्या माझे खर्चानें करणें. यांत अंतर करूं नये.

७ चि. श्रीरंगराव साने यांस माझ्या घरची सर्व व्यवस्था करून झाल्यावर नंतर निदान पांच हजार रुपये तरी देणें. शिवाय मुंबई को. ऑ. स्टोअरचे दहा

शेअर आहेत ते चि. सा. मथूस तिची खाजगी रक्कम म्हणून तिला बक्षिस दिले आहेत.

८ श्री. जगन्नाथमहाराज यांचेकडील लवादाची रक्कम चि. रामभाऊ व बापूस देणें. दुसरे कोणीं घेऊं नये. कलम ५ मध्यें त्यांस दिलेल्या रक्कमेच्या भरतींत ही रक्कम धरावी.

९ कै. प्रो. जिनसीवाले यांची लायब्ररी कोणते तरी संस्थेस त्यांचे नांवानें देणें.

१० आर्क्टिक होम, ओरायन, व सर्व भाषांतील गीतारहस्य यांचा कॉपीहिक्क चि. रामभाऊ व बापूचा आहे.

## चिरोल केस

१ चिरोल केस जिंकल्यास यापेक्षां अधिक पैसे शिल्लक राहतील. ह्याचा विनियोग कसा करावयाचा तो मागाहून मी ठरवीन.

१ परंतु केस हरल्यास त्याचें कर्ज फेडणें आहे. तें खालीं लिहिल्याप्रमाणें फेडावें:—

१ सगळा ज्युबिली फंड या कर्जास देणें.

२ कै. रा. दाजीसाहेब खरे यांचेकडील रक्कम रुपये अडीच हजार व रा. एल्. सी. बापट यवतमाळ यांचेकडील रक्कम रु. ३००० व रा. सेटलूर यांचेकडील माझी असलेली रक्कम सदर कर्जाचे भरतीस देणें.

३ बाकी सर्व खर्च झालेला आहेच. करितां निराळी तजवीज करणें नको.

## छापखाना

१ वर्तमानपत्रें, ऑफिस, छापखाना, व मशीन व फौंडरी, वर्तमानपत्राची लायब्ररी व वर्तमानपत्राचे जामिनकीचे पैसे ह्यांचा मीं पब्लिक ट्रस्ट केला आहे.

२ छापखाना, पत्रें व ऑफिस हीं वाड्यांत असेपर्यंत भाड्याबद्दल मुलांस निदान ७५ रुपये दरमहा तरी भाड्याबद्दल देणें.

३ चि. धोंडूस तो असेपर्यंत छापखाना व ऑफिसचा मॅनेजर ठेवणें व त्यास पगार एडिटरइतका देणें; त्यांत कमी नसावा.

४ पेपरांची पॉलिसी ( Editorial Policy ) आहे तशीच ठेवणें. कांहीं झालें तरी बदलूं नये.

५ गायकवाडचे वाड्यापैकीं निम्मे भाग, म्हणजे पुलापासून छापखान्यापर्यंतचा भाग, छापखान्याकडे भाड्यानें असावा व त्याचें भाडें दरमहा निदान पाऊणशें तरी द्यावें, व तो म्हणजे छापखाना बाहेर काढूं नये.

६ वाड्याचे इन्शुअरन्सकरितां कांहीं रक्कम केसरी ऑफिसनें निराळी ठेवावी; व वाड्याची दुरुस्ती व सर्व पट्ट्या ( म्युनिसिपल टॅक्स ) ऑफिसनें भराव्या.

७ या लेखानें मागील केलेलीं सर्व मृत्युपत्रें व्यवस्थापत्रें रद्द समजावीं.

८ या व्यवस्थापत्रासंबंधानें कांहीं भानगड पडल्यास कोर्टांत न जातां रा. रा. नरसिंह चिंतामण केळकर व चि. विश्वनाथ गंगाधर केतकर व श्रीरंग मोरेश्वर साने या तिघांनीं निकाल करणें व तो सर्वांनीं मान्य करावा.

घरव्यवस्थेच्या कलमांत एक व्यवस्था करणें राहिली होती. ती चि. रा. विश्वनाथ गंगाधर केतकर यांचेकडे घरासंबंधीं रक्कम येणें आहे ती मागूं नये. मीं त्यांस ती बक्षिस दिली आहे.

वरील मृत्युपत्राप्रमाणें व्यवस्था करण्याचा अधिकार चि. धोंडो वासुदेव विद्वांस यांस दिला आहे. तो नसेल तर चि. रा. रामचंद्र बळवंत टिळक यांनीं करावा.

साक्ष
**नरसिंह चिंतामण केळकर.** ( सही ) **बाळ गंगाधर टिळक.**
कोलंबो, ता. ५ एप्रिल सन १९१८. कोलंबो, ता ५-४-१८.

---

## ३ केसरी-मराठा संस्थेचें ट्रस्ट डीड

**ट्रस्ट डीड** शके १८४२ रौद्रनाम संवत्सरे माहे श्रावण शुद्ध २ रोज सोमवार ता. १६ आगस्ट सन १९२० इसवी ते दिवशीं—

**१ रामचंद्र बळवंत टिळक**, जात ब्राह्मण, धंदा शिकण्याचा, उमर वर्षे २६, राहणार पुणें पेठ नारायण घ. नं. ५६८.
**२ श्रीधर बळवंत टिळक**, जात ब्राह्मण, धंदा शिकण्याचा, उमर वर्षे २४, राहणार पुणें पेठ नारायण घ. नं. ५६८.
**३ धोंडो वासुदेव विद्वांस**, जात ब्राह्मण, धंदा मॅनेजर केसरी ऑफिस, उमर वर्षे ५३, राहणार पुणें पेठ नारायण घ. नं. ५६८
} लिहून ठेवणार

या लेखानें आम्ही **ट्रस्ट डीड** लिहून ठेवतों ऐसाजे—

आम्हांपैकीं नं. १ व नं. २ यांचे वडील व नं. ३ चे मामा परमपूज्य **लोकमान्य बाळ गंगाधर टिळक** हे मुंबई येथें ता. १ ऑगस्ट सन

१९२० इसवी रोजीं कैलासवासी झाले. त्यापूर्वी कोलंबो येथें ता. ५ एप्रिल सन १९१८ इसवी रोजीं त्यांनीं आपले स्वसंपादित मिळकतीचें एक मृत्युपत्र केलेलें आहे. त्यानंतर त्यांनीं दुसरें मृत्युपत्र केलेलें आहे. सदरचें कोलंबो येथें झालेलें मृत्युपत्र अलाहिदा आज रोजीं नोंदविलें आहे. सदर मृत्युपत्र आम्हां त्रिवर्गास सर्व प्रकारें मान्य आहे. आम्हांपैकीं नं. ३ यांस सदरचे मृत्युपत्रांत एक्झिक्युटर नेमिलें आहे. व आम्हांपैकीं नं. १ व नं. २ हे मयताचे वारसपुत्र आहोंत. त्या मृत्युपत्रांत केसरी छापखाना, वर्तमानपत्रें वगैरे संबंधाची जी व्यवस्था आमच्या वडिलांनीं व मामांनीं केली तिलाच संमति देऊन त्यांचे हेतु पूर्ण होण्याकरितां व मृत्युपत्राची पूर्तता होण्याकरितां आम्ही त्रिवर्ग हें **ट्रस्ट डीड** लिहून ठेवित आहोंत. त्याचीं कलमें येणेंप्रमाणें:--

१ कै. **लोकमान्य बाळ गंगाधर टिळक** यांनीं **'केसरी'** व **'मराठा'** वर्तमानपत्रें हातांत घेतल्यापासून त्या पत्रांचे द्वारें राजकीय शिक्षणाचा प्रसार करून लोकांत राजकीय हक्कांची जाणीव उत्पन्न करणें व राष्ट्रीय ध्येयास पोषक, अशा इतर अनेक अंगांच्या सार्वजनिक चळवळी करणें वगैरे सर्व कामें ज्या हेतूनें केलीं तोच त्यांचा हेतु त्यांचे पश्चात् निरंतर व अबाधित अमलांत येण्याचें साधन म्हणून हें ट्रस्ट डीड करण्यांत आलें आहे.

२ 'केसरी' व 'मराठा' ही एक संस्था असें यापुढें मानण्यांत यावें.

३ 'केसरी' व 'मराठा' हीं पत्रें व त्यासंबंधाची सर्व मिळकत व हक्क म्हणजे वर्तमानपत्रें, पुस्तकसंग्रह, त्याचें सर्व सामान, टाईप-फौंडरी, टाईप, छापखाना, छापण्याचीं यंत्रें, ऑइल इंजिनें, शिलकी कागद, ऑफिस, छापखाना व कंपोझिंग रूम्स यांतील सर्व सामान व पुढें कलम ५ मध्यें वर्णन केलेली खुली जागा व इमारतीसुद्धां त्याच कलमांत नमूद केलेल्या शर्तीप्रमाणें वापरण्याच्या हक्कासह, हिशेबी वह्या व कागदपत्र, चालू तारखेची रोख शिल्लक, मागील सर्व देणें-घेणें, व पुढील देणें-घेणें, तात्पर्य छापखाना व वर्तमानपत्रें हीं स्वतः व त्यांस लागणारं ( वर स्पष्ट लिहिलें नसलें तरी ) सर्व प्रकारचें सामान, त्यांची गुडवुईल व मालकी हक्क या एकंदर सर्व मिळकतीचा ट्रस्ट करण्यांत आला आहे. या एकंदर सर्व मिळकतीची किंमत आज अजमासें रुपये १०८००० एक लक्ष आहे.

४ या ट्रस्ट डीडप्रमाणें व्यवस्था करण्याकरितां निदान दोन ट्रस्टी असावेत. या संस्थेचे पहिले ट्रस्टी रा. रा. नरसिंह चिंतामण केळकर व आम्हांपैकीं नं. ३

चे धोंडो वासुदेव विद्वांस यांस या ट्रस्ट डीडनें ट्रस्टी नेमिलें आहे. वर कलम ३ यांत नमूद केलेली सर्व मिळकत आजपासून या उभयतां ट्रस्टींच्या स्वाधीन करण्यांत आली आहे. ती मिळकत ट्रस्टचे कारणाकरितां त्या उभयतांनीं वरील संस्थेचे ट्रस्टी या नात्यानें आपल्या ताब्यांत ठेवून ट्रस्टी या नात्यानें सांभाळावी व तिची वहिवाट करावी. या संस्थेच्या व ट्रस्टच्या व्यवस्थेचे बाबतींत म्हणजे अंतर्व्यवस्था, वर्तमानपत्राचें धोरण, छापखाना, वर्तमानपत्रें, व सार्वजनिक चळवळीवरील खर्च या बाबतींत आम्हांपैकीं नं. १ व नं. २ यांनीं यापुढें स्वतः आपणाकडे कोणताहि अधिकार राखून ठेविला नाहीं. सर्व अधिकार व हक्क ट्रस्टी या नात्यानें वर नमूद केलेले ट्रस्टी यांस दिले आहेत. त्यांनीं वर्तमानपत्रांचे धोरणासंबंधानें कै० लोकमान्य टिळक यांचे मृत्युपत्रांतील 'छापखाना' या मथळ्याखालील कलम ४ यांत लिहिल्याप्रमाणें वर्तण्याचें आहे.

५ छापखाना, वर्तमानपत्रें, कचेऱ्या वगैरेंची जागा व इमारती खालीं लिहिल्याप्रमाणें सदर संस्थेच्या उपयोगाच्या असल्यामुळें सदर ट्रस्टमध्येंच समाविष्ट केल्या आहेत व त्या जागा व इमारती सदरचे ट्रस्टी यांनीं ट्रस्टी या नात्यानें वहिवाटण्याच्या आहेत. या जागा व इमारती म्हणजे शहर पुणें येथील नारायण पेठेंत म्युनिसिपल कमिटी नंबर ५६८ तुकडी पुणें पोटतुकडी हवेली सब-रजिस्ट्रार यांचे हद्दींतील व सिटी सर्व्हेनंबर ५६८ चा वाडा ज्यास 'गायकवाडवाडा' म्हणतात त्या वाड्यांत आम्हांपैकीं नं. १ व नं. २ यांचे खासगी राहण्याचे जागेंत जाण्याचा दरवाज्यावर जो पूल आहे त्याच्या पश्चिम अंगची सर्व जागा व त्यांतील सर्व जुन्या व नव्या इमारती व खुली जागा यांसुद्धां ( यांत आम्हांपैकीं नं. १ व नं. २ यांचे खाजगी जागेंत जाण्याचा जिना व शौचकूप आहेत त्या लाइनीचे आंतील जागा म्हणजे खाजगी इमारतीच्या भिंतीपासून पश्चिमेकडील बारा फूट रुंदीची व जिन्याजवळ आंत जाण्यास जें लोखंडी फाटक आहे तेथपासून दक्षिणेकडील वाड्याचे भिंतीपावेतोंच्या लांबीची जागा सोडून बाकीची पश्चिमेकडील जागा ) याची लांबी पूर्व-पश्चिम फूट १४८ व दक्षिण उत्तर फूट १८० ची जागा व त्यांतील नव्या व जुन्या इमारती व खुली जागा यांच्या उपयोगाबद्दल सदर ट्रस्टींनीं आम्हांपैकीं नं. १ व नं. २ यांस मिळून तारीख १ ऑगस्ट सन १९२० इसवीपासून दरमहा रुपये १०० ( शंभर ) भाडें

द्यावें. व त्याबद्दल सदरचे ट्रस्टी यांनीं आम्हांपैकीं नं. १ व नं. २ यांस निरंतरची भाडेचिठी लिहून द्यावी. ही भाड्याची रक्कम कोणत्याहि सबबीवर कमी करण्याचा ट्रस्टींना अधिकार नाहीं व कोणत्याही कारणाकरितां आम्हांपैकीं नं. १ व नं. २ यांस वाढविण्याचा अधिकार नाहीं. सदरची जागा व इमारती 'केसरी—मराठा' संस्था ( छापखाना वर्तमानपत्रें वगैरे ) अस्तित्वांत असेपर्यंत सदरचे ट्रस्टी अगर त्यांचे पश्चात् त्यांचे जागीं या ट्रस्ट डीडप्रमाणें जे जे ट्रस्टी वेळोवेळीं काम करण्यास नेमिले जातील त्यांचे ताब्यांत निरंतर व अबाधित रहावयाच्या आहेत.

६ सर्व गायकवाडवाड्याची रिपेरी व शाकारणी करण्याचा व म्युनिसिपालिटचे सर्व कर देण्याचा बोजा वर लिहिलेल्या ट्रस्ट इस्टेटीनें सोसण्याचा आहे. त्याचप्रमाणें सदरचे ट्रस्टी यांनीं सर्व वाड्याचें ताबडतोब इन्शुअरन्स करून त्याचे हप्ते सदरचे ट्रस्ट इस्टेटींतून द्यावे. दुरुस्ती व शाकारणी आजपर्यंत ज्याप्रमाणें व जितक्या मुदतीचे अंतरानें करीत आले आहेत त्याप्रमाणेंच पुढें करावी.

७ आह्मांपैकीं नं. १ व नं. २ पैकीं अगर त्यांचे वंशजापैकीं कोणीहि वरील संस्थेंत एडिटोरियल स्टाफमध्यें अगर इतर काम करण्यास तयार असेल व मुख्य एडिटर यांचे मतानें तो त्या कामास लायक असेल तर ट्रस्टी ठरवितील त्या पगारावर व त्यांना पसंत पडेल तोंपर्यंत त्यास त्या कामावर अवश्य घेतलें जावें. परंतु यामुळें त्यास वर्तमानपत्रें व कारखाना यासंबंधीं कोणताही अधिक स्पेशल हक्क प्राप्त होणार नाहीं.

८ सदर ट्रस्टींपैकीं कोणीहि ट्रस्टचें काम करण्यास कोणतेहि कारणानें असमर्थ झाल्यास ही संस्था व ट्रस्ट कायम चालण्याकरितां उभयतां ट्रस्टींचे विचारें लो. टिळक यांच्या इच्छेप्रमाणें काम करण्यास जो लायक आहे असें वाटेल तो ट्रस्टी नेमावा. कदाचित् ही नेमणूक करण्यास एकच ट्रस्टी शिल्लक असेल तर त्यानें वरील धोरणास अनुसरून ट्रस्टी नेमावा. व त्याप्रमाणें नेमलेल्या ट्रस्टीस या ट्रस्ट डीडअन्वयें सदर संस्थेच्या ट्रस्टींचे सर्व अधिकार प्राप्त होतील. कोणत्याहि कारणानें नवीन ट्रस्टी नेमिले गेले नाहींत, व पूर्वींचे ट्रस्टींपैकीं कोणीच उरला नाहीं तर लो. टिळक यांचे मृत्युपत्रांतील ' छापखाना ' या मथळ्याखालील कलम ८ यांत लिहिलेले पंचांनीं ( नवीन ट्रस्टींची नेमणूक ) अगर त्यांनीं आपल्या जागीं नेमून दिलेल्या पंचांनीं नवीन ट्रस्टींची नेमणूक करावी.

परंतु वरील प्रकारें ही नवीन ट्रस्टींची नेमणूक केली गेली नाहीं तर ट्रस्टची मिळकत अम्हांपैकीं नं. १ व नं. २ यांचेकडे अगर त्यांचे वारसाकडे Primarily ( प्रथमतः ) ट्रस्टी याच नात्यानें परत येईल. ही संस्था कांहीं कारणानें तात्पुरती बंद झाल्यास, पण फिरून ती संस्था सुरू करणें शक्य झाल्यास सदर ट्रस्ट डीडअन्वयें ती संस्था चालविण्यास जे ट्रस्टी हजर व लायक असतील त्यांना ट्रस्ट डीडअन्वयें ती संस्था फिरून चालविण्याचा अधिकार आहे. परंतु ही संस्था कोणतेहि कारणानें नष्ट झाल्यास व ती पुढें केव्हांहि सुरू करणें अशक्य आहे असें वाटल्यास ट्रस्टची मिळकत आम्हांपैकीं नं. १ व नं. २ यांची अगर त्यांचे वारसांचे मालकीची होईल. संस्थेच्या ट्रस्टींना व्यक्तिशः अगर त्यांचे वारसास या मिळकतीवर कोणताहि खाजगी हक्क राहाणार नाहीं.

९ आज तारखेपासून ' गीतारहस्य ' मराठी व त्याचीं सर्व भाषांतील भाषांतरें, ' ओरायन ' व ' आर्क्टिक होम इन दी वेदाज ' या पुस्तकांच्या व्यवहारांत वरील ट्रस्टींना कांहींहि हक्क नाहीं. परंतु पूर्वीच्या व्यवहारासंबंधीं जो वसूल सदर ट्रस्टींकडे येईल तो त्यांनीं आम्हांपैकीं नं. १ व नं. २ यांचेकडे द्यावा. तसेंच पूर्वीच्या व्यवहारासंबंधानें जीं बिलें येतील अगर जो खर्च येईल तो आम्हांपैकीं नं. १ व नं. २ यांजकडून घ्यावा. सदर पुस्तकांच्या कॉपी राईट-संबंधाच्या अगर इतर व्यवस्थेच्या संबंधानें सदरचे ट्रस्टी यांस कोणताहि अधिकार नाहीं. अगर त्यांजवर कोणतीहि जबाबदारी नाहीं.

१० आम्हांपैकीं नं. १ व नं. २ यांचे वडील लो. टिळक यांस पूर्वीं निरनिराळ्या ठिकाणीं मिळालेल्या व लोकांनीं नजर केलेल्या मौल्यवान् अगर सन्मानाच्या वस्तू आम्हांपैकीं नं. १ व नं. २ यांनीं आपल्या ताब्यांत ठेवलेल्या असून त्यांजवर सदरचे ट्रस्टी यांचा कोणताहि हक्क नाहीं अगर त्यासंबंधानें त्यांचेवर कोणतीहि जबाबदारी नाहीं.

११ आजपर्यंत गायकवाडवाड्यांत श्रीगणपत्युत्सव केसरी ऑफिसचे खर्चानें होत आला आहे त्याप्रमाणें तो उत्सव यापुढेंहि ही संस्था कायम आहे तोंपर्यंत ट्रस्टी यांनीं ट्रस्ट मिळकतींतून खर्च करून साजरा करावा.

१२ सदरचे उभयतां ट्रस्टींमध्यें अगर पुढें त्यांचे जागीं नेमलेल्या ट्रस्टींमध्यें ट्रस्टचे मिळकतींतून ट्रस्टचे कामासाठीं कोणताहि खर्च करण्याच्या कामांत

अंतर्व्यवस्थेंत संस्थेच्या हितासाठीं फेरबदल करण्याच्या कामांत अगर संस्थेच्या संबंधानें दुसरे कोणत्याहि कामांत मतभेद अगर वाद उत्पन्न झाल्यास त्याचा निकाल कै. लो. टिळक यांनीं आपले मृत्युपत्रांतील 'छापखाना' या मथळ्यांतील कलम ८ यांत लिहून ठेविल्याप्रमाणें रा. रा. नरसिंह चिंतामण केळकर, राहणार पुणें, रा. रा. विश्वनाथ गंगाधर केतकर, राहणार नाशिक व रा. रा. श्रीरंग मोरेश्वर साने, राहणार मुंबई या त्रिवर्गानीं अगर त्यांनीं नेमलेल्या पंचांनीं बहुमतानें करावा, व तो निकाल अखेरचा समजून सर्वांनीं वर्तावें. तसेंच आम्हांपैकीं नं. १ व नं. २ व सदर संस्थेचे ट्रस्टी यांमध्यें कांहीं वाद उत्पन्न झाल्यास त्याचाहि निकाल वरील त्रिवर्ग पंचांनीं अगर त्यांनीं नेमिलेल्या पंचांनीं बहुमतानें करावा व तो ट्रस्टींनीं मान्य करावा व आम्हीहि मान्य करूं.

१३ आमच्यापैकीं नं. १ व नं. २ यांचे वडील लोकमान्य बाळ गंगाधर टिळक यांचें खाजगी स्वरूपाचें एक स्मारक खुद्द गायकवाडवाड्यांत होणें इष्ट आहे, या स्मारकाकरितां 'केसरी–मराठा' संस्थेच्या हद्दींतील वाड्याचे दक्षिण अंगास होत असलेल्या नव्या इमारतीच्या वरील दिवाणखान्याची जागा या कार्याकरितां ट्रस्टींनीं उपलब्ध करून देणें शक्य असल्यास तेथें कैलासवासी लोकमान्य बाळ गंगाधर टिळक यांचें या जागेस शोभेल असें कांहीं तरी चांगलें दृश्य स्मारक करण्याची जबाबदारी आम्हां उभयतां चिरंजीवांवर आहे.

हें ट्रस्ट डीड आम्हीं त्रिवर्गांनीं स्वसंतोषानें आज रोजीं लिहून ठेविलें आहे. तारीख मजकूर दस्तुर कृष्णाजी पांडुरंग करंदीकर दस्तुर खुद्द.

साक्षी

**१ कृष्णाजी प्रभाकर खाडिलकर**

**२ अनंत वासुदेव फडणीस**

सह्या

(सही) **रामचंद्र बळवंत टिळक**

(सही) **श्रीधर बळवंत टिळक**

(सही) **धोंडो वासुदेव विद्वांस** दस्तुर खुद्द.

## ४ केसरीवरील खटला.

तारीख ६ मे १९२४ च्या केसरीच्या अंकांत दोन स्फुट सूचना प्रसिद्ध झाल्या होत्या. त्यांतील विषय असा होता—पुण्याजवळ लोहगांव येथें कांहीं सोल्जर लोक शिकारीला गेले असतां त्यांपैकीं प्रायव्हेट वॉकरच्या बंदुकीची गोळी लागून अर्जुना नांवाचा एक मनुष्य ठार झाला. त्या कामीं पुण्याचे जिल्हा मॅजिस्ट्रेट मॉंटीथ, सेशन जज्ज मि. वाइल्ड यांच्या मतें आरोपीवर निदान अविचाराचा व निष्काळजीपणाचा गुन्हा शाबीत होत असतां ज्यूरीनें त्यावर कोणताहि गुन्हा शाबीत होत नाहीं, असा निकाल दिला. सेशन जज्ज यांना तो निकाल न पटून त्यांनीं तो मुकदमा अखेरच्या इनसाफाकरितां हायकोर्टाकडे पाठविला. मुख्य न्यायमूर्ति सर नॉर्मन मॅक्लाऊड व न्यायमूर्ति फॉसेट यांजपुढें तो ता. ३० एप्रिल रोजीं निघून त्यांनीं ज्यूरीचेंच म्हणणें ग्राह्य धरलें व आरोपी वॉकर यास सर्वस्वीं निर्दोषी ठरवून सोडून दिलें. या विषयावर केसरीला योग्य वाटली ती टीका करण्यांत आली होती. परंतु सरकारच्या दृष्टीनें ती टीका अयोग्य ठरल्यानें सरकारी वकील मि. पाटकर यांनीं केसरीचे संपादक श्री. न. चिं. केळकर यांस नोटीस काढण्याविषयीं पुढीलप्रमाणें अर्ज केला.

### सरकारी वकिलांचा तक्रार-अर्ज

( १ ) नरसिंह चिंतामण केळकर हे 'केसरी' वर्तमानपत्राचे संपादक, मुद्रक व प्रकाशक आहेत.

( २ ) या पत्राच्या ता. ६ मे १९२४ च्या अंकांतील नं. ४ व ५ या पत्रकर्त्यांच्या स्फुट सूचनांमध्यें, हायकोर्टापुढें आलेल्या सोल्जर वॉकर नांवाच्या सोल्जरासंबंधींच्या ( नं. १९ सन १९२४ ) च्या फौजदारी खटल्यासंबंधीं मजकूर होता.

( ३ ) वर दिलेले संपादक, मुद्रक व प्रकाशक, यांनीं या स्फुट सूचना प्रसिद्ध करून कोर्टाच्या बेअदबीचा गुन्हा केला आहे.

( ४ ) सबब नामदार हायकोर्टाकडे असा अर्ज आहे कीं, सदर संपादकांवर कोर्टाच्या बेअदबीबद्दल हायकोर्टानें काम चालवावें.

### आक्षिप्त लेख

" गेल्या नोव्हेंबर महिन्यांत कांहीं गोरे सोल्जर्स पुण्यानजीक लोहगांव येथें शिकारीस गेले असतां त्या खेडेगांवांतील लोकांशीं त्यांची बाचाबाची झाली आणि

वॉकर नांवाच्या सोल्जराची गोळी लागून एक खेडवळ ठार झाला. या गुन्ह्याच्या आरोपावरून वॉकर याजवर येथील सेशन्स कोर्टांत खटला चालला आणि युरोपिअन ज्यूररांनीं आरोपी निर्दोषी आहे असा अभिप्राय दिला! हा निकाल मान्य करणें सेशन्स जज्ज मि. वाइल्ड यांसहि गैर वाटून त्यांनीं हायकोर्टाकडे शास्त्रार्थ विचारला आणि हायकोर्टांतले सरन्यायाधीश व न्या. मू. फॉसेट या उभयतांनीं ज्यूरीचें मत ग्राह्य धरून आरोपी सोल्जर वॉकर यास निर्दोषी ठरवून सोडून दिलें! न्यायासनावरून होणाऱ्या गोऱ्या आरोपीच्या चौकशीचे असले फार्स कांहीं आजकालचे नवीन नाहींत; वॉरन् हेस्टिंग्जच्या काळाइतके ते जुने आहेत. खेदाची गोष्ट एवढीच कीं, असलीं उदाहरणें धडधडीत डोळ्यासमोर घडत असून देखील आमच्यांतले कांहीं बृहस्पति इंग्लिशांचे भाट बनून त्यांच्या न्यायाची तारीफच करीत असतात, हा देखावा पाहिला म्हणजे इंग्लिशांच्या मायावीपणाचें कौतुक अधिक करावें का या भाटांच्या विवेकहीनतेची कींव अधिक करावी हें एक कोडेंच येऊन पडतें.

"खुनी आरोपी वॉकर याला निर्दोषी ठरवितांना न्यायमूर्तींनीं तर्कशास्त्राचा मात्र दिवसाढवळ्या खून केला आहे. वॉकरनें मुद्दाम रोख धरून गोळी झाडली, का रोंख न धरतां केवळ दहशत बसविण्याकरितां हवेंत गोळी झाडली अथवा बंदुकीचा घोडा अकस्मात् दाबला जाऊन बंदूक आपोआप उडाली या तिहींपैकीं बंदूक अकस्मात् उडाली असण्याचा संभव जास्त आहे असें न्यायमूर्ति म्हणतात! संभव तोलण्याचा हा ताजवा कोर्टानें कोठून पैदा केला कोण जाणें! न्याय जोखण्याच्या ह्या तराजूचीं दोनहि पारडीं एकाच रंगाचीं नसून एक पारडें काळें व एक गोरें असल्यामुळें गोरें पारडें काळ्या पारड्यापेक्षां जड ठरून खालीं बसावें यांत नवल तें काय? असल्या खोट्या मापानें मिळालेला न्याय योग्य समजून समाधान मानणारे कांहीं पक्षांध लोक या देशांत आहेत ही मात्र मोठ्या शरमेची गोष्ट होय. असो. मनुस्मृति जाळून टाकावी असें म्हणणाऱ्यांनीं ब्रिटिश राज्यांत हिंदी प्रजाजनांच्या प्राणाची किंमत किती आहे व त्यांना न्याय किती चोख व निःपक्षपातीपणानें मिळतो याचें स्मारक म्हणून लोहगांवास एखादा न्यायस्तंभ उभारावा आणि त्यावर या खटल्याची साग्र हकीकत कोरून ठेवावी!"

हा अर्ज रुजूं होऊन केळकर यांजवर नोटिस बजावण्यांत आली. चौकशीची तारीख प्रथम २४ जुलै ठरली होती. पण केळकर यांनीं पुणें कोर्टांतील कागदपत्रांच्या सहीशिक्क्याच्या नकला मिळण्यास थोडा अवधि पाहिजे म्हणून मुदत

मागितली. त्यावरून ३० जुलै ही तारीख ठरली. परंतु ती कोर्टाच्याच कांहीं कारणानें आणखी एक आठवडा पुढें ढकलण्यांत आली. त्याप्रमाणें ता. ६ रोजींच खटला निघावयाचा. परंतु कोर्टापुढील इतर कामें संपल्यावर अखेर ता. ७ रोजीं सायंकाळीं साडेचार वाजतां खटला न्या. मार्टेन व न्या. किंकेड यांजपुढें सुनावणीस निघाला, व दुसरे दिवशीं फिरून सकाळीं बारा वाजतां सुनावणीस सुरुवात होऊन अडीच वाजतां सुनावणीचें काम संपलें. ता. ८ शुक्रवार रोजीं सायंकाळीं साडेचार वाजतां उभयतां न्यायमूर्तींनीं तोंडीच निकाल सांगितला. त्यांत त्यांनीं केळकर यांजवर कोर्टाच्या बेअदबीचा गुन्हा शाबीत धरून ५००० रु. दंड व कोर्ट–खर्चाकरितां २०० रु. मिळून एकूण दंड ५२०० रु. भरावा अशी शिक्षा सांगितली. दोनहि दिवशीं प्रेक्षकांची गर्दी इतकी झाली होती कीं, कोर्टांत प्रेक्षकांनाच काय पण वकील-बॅरिस्टरांनाहि उभें राहण्यास जागा मिळेना!

## न. चिं. केळकर यांचें प्रतिज्ञापत्रक

हायकोर्टाच्या नोटिशीला उत्तर म्हणून केळकर यांनीं आपलें लेखी प्रतिज्ञापत्रक ता. ६ रोजींच कोर्टापुढें सादर केलें. त्याचा सारांश पुढें दिला आहे—

" मी केसरीचा संपादक व प्रकाशक असून ता. ६ मे रोजींच्या अंकांत छापलेल्या स्फुट सूचनांची सर्व जबाबदारी माझेवर आहे. याच स्फुट सूचनांबद्दल कोर्टानें मजवर बेअदबीचा आरोप केलेला आहे. दोनहि स्फुट सूचनांचा विषय एकच असून त्यांत एकंदर तीन मुद्दे आहेत. **पहिला** मुद्दा म्हणजे आरोपी वॉकर यांस दोषमुक्त करण्याच्या हायकोर्टाच्या निकालावरील टीकेचा. **दुसरा** मुद्दा, हिंदुस्थानांतील सदोष न्यायपद्धतीची सामान्य चर्चा, हा होय. हल्लींच्या कायद्यांत सुद्धां वर्णभेद व वर्णवैशिष्ट्य असल्यामुळें त्याचा सरळ परिणाम या न्यायपद्धतीवर होऊन खरा न्याय मिळत नाहीं, व सध्यांचा खटला माझ्या मतानें असल्या अन्यायाचेंच एक समर्पक उदाहरण होय. माझा **तिसरा** मुद्दा म्हटला म्हणजे हिंदुस्थानांतील ब्रिटिश न्यायपद्धतीवर अंधपणें विश्वास ठेवणारांसंबंधीं आहे. हे लोक ( मनुस्मृतीसारख्या ) जुन्या हिंदुधर्मशास्त्रांतील विषमतेवर टीका करीत असतात. सर्व समाज चार वर्णांत विभागून तो समतोल ठेवण्याचें ध्येय पुढें धरल्यामुळें ही विषमता उत्पन्न झालेली आहे हें खास; मग तें ध्येय बरोबर असो किंवा चुकीचें असो. पण त्यावर टीका करतांना हे लोक धर्मसहिष्णु म्हणविणाऱ्या, जात न मानणाऱ्या व केवळ ऐहिक ध्येयवादी अशा सरकारच्या कायद्यांतील वर्णभेदांकडे डोळेझांक करतात !

यांपैकीं नं. २ व ३ हे मुद्दे कोर्टाच्या बेअदबीसंबंधीं कायद्याच्या कक्षेबाहेरचे आहेत. नं. १ च्या मुद्यांत हायकोर्टाच्या निकालावर मीं जी टीका केली आहे तीहि कायदेशीर आहे. न्यायाधिशांच्या मनावर अजाणतपणें वर्णभेदाचा पगडा बसला होता, अशी या टीकेमध्यें व्यंजना आहे हें मी कबूल करतों. परंतु मुद्दाम जाणूनबुजून पक्षपात केल्याचा आरोप त्यांजवर करण्याचा माझा बिलकूल उद्देश नव्हता हें मी सत्य प्रतिज्ञेवर सांगतों. याउपर कोर्टानें काय ठरवावयाचें असेल तें ठरवावें. "

## खटल्याचा पहिला दिवस

खटल्यास गुरुवार ता. ७ रोजीं दुपारीं ४॥ वाजतां सुरुवात झाली. प्रथम श्री. शिंगणे हायकोर्ट वकील यांनीं कोर्टास अर्ज केला कीं, माझें वकीलपत्र केळकर यांचेतर्फे पूर्वी या कामीं दाखल झालें होतें, परंतु केळकर यांनीं स्वतःच आपला खटला चालविण्याचें ठरविल्यानें माझें वकीलपत्र यापुढें रद्द करण्यांत यावें. कोर्टानें त्याप्रमाणें तें रद्द केलें. नंतर माझा खटला मी स्वतःच चालविणार आहें, असें केळकर यांनीं उठून कोर्टास कळविलें.

नंतर सरकारी वकील श्री. पाटकर यांनीं आपली तक्रार मांडण्यास सुरवात केली. वॅकरला दोषमुक्त करणारा हायकोर्टाचा निकाल व त्यावरील केसरीची टीका यांचा उल्लेख करून ते म्हणाले–" केसरींतील ही टीका अयोग्य आहे. चौथ्या स्फुट सूचनेंत असे शब्द आहेत कीं, " न्याय जोखण्याच्या या तराजूचीं दोनहि पारडीं एकाच रंगाचीं नाहींत. एक पारडें काळें व एक गोरें असल्यामुळें गोरें पारडें काळ्या पारड्यापेक्षां जड ठरून खालीं बसावें यांत नवल तें काय ! " यावरून स्पष्ट असें दिसतें कीं, जज्जांवर वर्णविषयक पक्षपाताचा आरोप केला आहे. यांत " एक पारडें " या शब्दानें सोल्जरच्या गोळीनें जखमी झालेला मनुष्य व " दुसरें पारडें " या शब्दानें त्या सोल्जरचा उल्लेख केला आहे. याच्यापुढील वाक्यांत असें म्हटलें आहे कीं, " न्यायासनावरून होणाऱ्या गोऱ्या आरोपीच्या चौकशीचे असले फार्स कांहीं आजकालचे नवीन नाहींत. वॉरन् हेस्टिंग्जच्या काळाइतके ते जुने आहेत. खेदाची गोष्ट एवढीच कीं, असलीं उदाहरणें धडधडीत डोळ्यासमोर घडत असून देखील आमच्चांतले कांहीं बृहस्पति इंग्लिशांचे भाट बनून त्यांची तारीफ करीत असतात. हा देखावा पाहिला म्हणजे

इंग्लिशांच्या मायावीपणाचें कौतुक अधिक करावें का या भाटांच्या विवेकहीनतेची कींव अधिक करावी हें एक कोडेंच येऊन पडतें. "

या गुन्ह्यासंबंधाचा कायदा स्पष्ट आहे. (२४ बॉम्बे लॉ-रिपोर्टर पृष्ठ १२४ पाहा.)

**न्या. मॉर्टन**—वॉकरच्या प्रकरणांतील हकीकतीशीं मला कांहीं कर्तव्य नाहीं. पण त्याचेजवळ रायफल जातीची बंदूक होती कीं साधी बंदूक होती ?

**पाटकर**—रायफल होती.

**न्या. मॉर्टन**—गोळी झाडली गेली त्या वेळीं ती रायफल कोठें कशी होती ?

**पाटकर**—ती त्याच्या कमरेशीं होती.

**न्या. मॉर्टन**—वॉकरवर कोणत्या कलमाखालीं गुन्हा शाबीत धरावा असें सेशनजज्जांचें मत होतें ?

**पाटकर**—पिनलकोड ३०३ अ.

**न्या. मॉर्टन**—ज्यूरीनें तर हा गुन्हा नाशाबीत हें मत सर्वानुमतें दिलें आहे.

**पाटकर**—होय. ज्यूरींत चार युरोपियन होते, पण एक इंडियन होता.

**न्या. मॉर्टन**—मुंबई शहरासंबंधानें तरी हायकोर्टाचा रिवाज असा नाहीं काय कीं, ज्यूरीनें सर्वानुमतें दिलेला निकाल कोर्टानें सहसा अमान्य करूं नये ? फक्त कायद्याचाच प्रश्न असेल किंवा सेशन जज्जानें ज्यूरीचा कांहीं गैरसमज करून दिलेला असेल तरच तो फिरवावा ? पण मुंबईशहराबाहेरील निकालासंबंधानें काय रिवाज आहे ?

**पाटकर**—क्रि. प्रो. ३०७ कलमाप्रमाणें हायकोर्टाला ज्यूरीचा निकाल अयोग्य वाटल्यास तो फिरविण्याचा अधिकार आहे.

**न्या. मॉर्टन**—आरोपी वॉकर याला ज्यूरींत युरोपियन लोकांचें बहुमत असावें असें मागण्याचा अधिकार होता, व नवीन कायद्याप्रमाणें आतां हिंदी मनुष्यालाहि तोच अधिकार प्राप्त झाला नव्हे काय ?

**पाटकर**—होय. लेख लिहिण्यांत कोर्टाचा अपमान करण्याचा आपला हेतु नव्हता असें केळकर म्हणतात. परंतु लेखाचा उद्देश काय हें तो लेख वाचून त्यावरूनच ठरविलें पाहिजे. आरोपी वॉकरच्या वर्तीनें कोर्टानें पक्षपात केला असाच लेखाचा रोख आहे. निकाल देण्यांत एकाद्या कोर्टाची तारतम्यबुद्धि चुकली असें कोणीं म्हटलें तर त्यांत कांहीं वावगें होत नाहीं. परंतु जज्जांनीं ' खोट्या मापानें ' न्याय दिला असा त्यांजवर आरोप करणें ही रास्त टीका नव्हे.

यानंतर पाटकर यांनीं पूर्वींच्या अनेक खटल्यांच्या निकालांतील उतारे वाचून दाखवून कोर्टाची बेअदबी झाली असें केव्हां मानण्यांत येतें याविषयीं चर्चा केली. त्यांत १९०८ सालच्या 'मराठा' पत्रावरील खटल्याचाहि उल्लेख केला. शेवटीं पाटकर म्हणाले, केसरींतला हा लेख रास्त टीकेच्या मर्यादेंत आहे कीं काय हें ठरविण्याचें काम न्यायमूर्तींचें आहे. असल्या सार्वजनिक स्वरूपाच्या खटल्यावर टीका करण्याचें वृत्तपत्रांना स्वातंत्र्य आहे, परंतु या **लेखनस्वातंत्र्याची मर्यादा व्यक्तीच्या स्वातंत्र्याहून अधिक नसते,** असा ४१ इंडियन अपील्स पृ. १६९ यांत अभिप्राय दिलेला आहे. केसरींतील टीकेनें जनतेचा कोर्टाच्या न्यायीपणावरील विश्वास डळमळतो असें कोर्टाचें मत झाल्यास कोर्टानें प्रतिवादीवर काम चालवावें.

## न. चिं. केळकर यांचें भाषण

यानंतर न. चिं. केळकर हे आपल्या बचावाचें भाषण करूं लागले. प्रथमतः त्यांनीं आपल्या कैफियतीचा उल्लेख केला. ते म्हणाले, मीं एक प्रतिज्ञालेख कोर्टांत दाखल केला आहे, तो पाटकर यांनीं वाचलाच आहे. त्याबरोबर मी आपली लेखी कैफियतहि दाखल करून तिच्या प्रती उभयतां न्यायमूर्तींस देण्याकरितां शिरस्तेदार यांजजवळ दिल्या होत्या त्या आपणांस मिळाल्या असतीलच.

**न्या. मार्टेन**—मीं तुमची कैफीयत काळजीपूर्वक वाचली. त्यांतला बराच भाग गाळावा लागेल असें माझें मत आहे. लॉर्ड कर्झन काय बोलले अगर रंगाचार्य काय म्हणतात हें पाहाण्याचें आम्हांस येथें प्रयोजन नाहीं. फक्त हायकोर्टाचे लॉ-रिपोर्टच येथें मंजूर आहेत. कोर्ट ही एखादी राजकीय सभा किंवा डिबेटिंग सोसायटी नाहीं. आमच्यापुढील मुद्दा अगदीं मर्यादित आहे. तुम्ही आपल्या लेखांत जज्जांवर अप्रामाणिकपणाचा आरोप केला कीं नाहीं, एवढाच विचार आम्हांस कर्तव्य आहे.

**केळकर**—ठीक आहे; माझी लेखी कैफियत मी परत घेतों. पण माझ्या भाषणांत त्यांतलेच आधार मी देणार आहें. त्यांत एकादा मुद्दा गैरलागू असल्यास तो आपण कळवालच. कोर्टाच्या व सरकारी वकिलाच्या व माझ्या माहितीकरितां मीं हें 'ब्रीफ' म्हणून तयार केलें होतें.

**न्या. मार्टेन**—तोंडी तक्रार सांगतांनाही अमुक असें म्हणतो, तमुक असें

म्हणतो असे आधार तुम्हांस दाखवितां येणार नाहींत. मुख्य मुद्दा फारच सूक्ष्म आहे.

**केळकर**—ठीक आहे. पण लागू कोणतें, गैरलागू कोणतें याविषयीं कोर्टाचें मत मला आधीं कसें कळणार होतें ? तरी मी बोलत जाईन तेव्हां कोर्टानें वेळोवेळीं लागू-गैरलागू याविषयीं योग्य ती सूचना मला करावी, ती मी खचित मान्य करीन. माझें म्हणणें मांडण्याची अर्थात् मी कसोशी करणार, पण त्यावरील कोर्टाचा निर्णय केव्हांहि मला मान्यच करावा लागणार.

**न्या. मार्टेन**—( हंसून ) तुमची लेखी कैफीयत फार मोठी आहे. इतके कागद खर्ची कां घातलेत ?

**केळकर**—या कामीं माझा सॉलिसिटर मी व माझा बॅरिस्टरहि मीच असल्याकारणानें कागदाच्या खर्चाकडे मला दुर्लक्ष करतां आलें ! कैफियत लांब खरीच. पण माझ्या धंद्यांत पुष्कळसें लिहिण्याची मला संवय आहे. मीं एलएल. बी. असून सनदहि घेतली आहे. पण मी वकिलीचा धंदा करीत नसल्यानें " चटावर " तक्रार सांगण्याची-मोजकें बोलण्याची-वकिली खुबी मला साधलेली नाहीं. पण हा मुद्दा निघाला म्हणून येथेंच हें सांगतों कीं, या कामीं केवळ वकिली तक्रारच कोर्टास सांगावयाची असती तर माझ्या प्रतिष्ठित स्नेही मंडळीपैकीं कोणींहि तें काम मजकरितां आनंदानें केलें असतें. पण या कामीं वकिलांना तसदी देण्याची माझी इच्छाच नव्हती. शिंगणे यांचें वकीलपत्र प्रथम दाखल असतांहि मागाहून तें रद्द करण्यांत आलें याविषयीं एरवीं न्यायमूर्तींचा कदाचित् गैरसमज झाला असता म्हणून ही गोष्ट मला उघड सांगावी लागत आहे.

**न्या. मार्टेन**—त्यांत गैरसमज कसला ? आरोपी या नात्यानें तुमची इच्छा असल्यास जातीनें हजर राहून खटला चालविण्याचा तुम्हाला अधिकारच आहे. शिंगणे काम चालविते तर कायदेशीर मुद्द्यांच्या चर्चेत आम्हांला अधिक मदत मिळाली असती ती आतां मिळणार नाहीं इतकेंच काय तें !

**केळकर**—त्याचीहि काळजी आपणांला फारशी नको. मींहि हा कायदा थोडाबहुत पाहिला आहे हें लवकरच आपल्या नजरेस येईल. शिवाय माझे मित्र म्हणून तरी शिंगणे हे मजजवळ बसणार आहेत. त्यांची मदत कोर्टाला न झाली तरी मला खास होईल. मीच जातीनें 'डिफेन्स' देणार याबद्दल

दुसरीहि एक विनंति मला कोर्टाला करावयाची आहे. ती अशी कीं, वकील न देण्यांत वकिलीच्या धंद्यासंबंधानें माझा अनादर आहे किंवा जातीनें काम चालविण्यांत माझी यत्किंचित्‌हि अहंकारबुद्धि आहे, अशी समजूत कोर्टानें कृपा करून, करून घेऊं नये. बाहेर इतर लोकांनाहि माझी तीच विनंति आहे. वकिलीच्या धंद्यासंबंधानें माझी फार आदरबुद्धि आहे. स्वतः मीहि एक सनदी वकील आहें, परंतु वर्तमानपत्रकाराचा धंदा मला अधिक आवडतो येवढ्याकरितांच त्यांत शिरलों. अहंकारबुद्धीमुळें मीं माझा खटला स्वतः चालविला तर कदाचित्‌ त्यानें माझा तोटा काय होईल हेंहि मी जाणतों. मला वकिली कामाची संवय नसल्यानें, आपण जरी कृपा करून वेळोवेळीं संभाळून घ्याल, तरी कांहीं कांहीं चुका माझे हातून होणारच. येवढी जबर किंमत देण्याइतकी माझी अहंकारबुद्धि वर आलेली नाहीं. पण स्वतः खटला चालविण्याचें माझें खरें कारण हेंच कीं, हा खटला मजवर व्यक्तिशः आहे असें मी मानीतच नाहीं. माझ्या धंद्यांतील इतर भाऊबंदांचें कामहि याच कामांत थोडेंबहुत मजकडून होण्याचा प्रसंग आहे म्हणूनच हें काम मीं अंगावर घेतलें आहे. हें काम म्हणजे वर्तमानपत्राचें स्वातंत्र्य अधिक प्रस्थापित करण्याविषयींचें. माझ्या स्नेही वकीलमंडळींनींहि, याच कारणामुळें, माझी तक्रार मींच मांडावी हें योग्य आहे असा सल्ला मला दिला. आक्षिप्त लेख म्हणून जीं दोन माझीं स्फुटें आपणांपुढें आलीं आहेत त्यांच्याच अनुरोधानें अवांतर विषयांची चर्चा आपणांपुढें मला करतां येऊन, ज्या मनःस्थितीवरून मीं लेख लिहिले ती मला कोर्टापुढें मांडतां येईल. आपण ती मनःस्थिति जरूर तपासून घ्यावी. व मला वाटतील ते प्रश्न विचारावे. आतां मी स्वतःच आरोपी असल्याकारणानें माझ्या मनांतील सर्वच विचारांचा गोळीबार मला कोर्टावर करतां येणार नाहीं. पण कोर्टाच्या विचारांचा गोळीबार होईल तो तूर्त आपल्या अंगावर मला घेतलाच पाहिजे व तो घेण्याची माझी तयारीहि आहे."

याप्रमाणें भाषण चालूं असतां कोर्टापुढें दुसरा एक खटला त्याच वेळीं चालावयाचा असल्यानें या खटल्याचें काम शुक्रवारपर्यंत तहकब ठेवण्यांत आलें.

## दिवस दुसरा

शुक्रवार ता. ८ ऑगस्ट

दुसऱ्या दिवशीं कोर्टांतील इतर किरकोळ काम झाल्यावर १२ वाजण्याचे सुमा-

दुसरीहि एक विनंति मला कोर्टाला करावयाची आहे. ती अशी कीं, वकील न देण्यांत वकिलीच्या धंद्यासंबंधानें माझा अनादर आहे किंवा जातीनें काम चाल-विण्यांत माझी यत्किंचित्हि अहंकारबुद्धि आहे, अशी समजूत कोर्टानें कृपा करून, करून घेऊं नये. बाहेर इतर लोकांनाहि माझी तीच विनंति आहे. वकिलीच्या धंद्यासंबंधानें माझी फार आदरबुद्धि आहे. स्वतः मीहि एक सनदी वकील आहें, परंतु वर्तमानपत्रकाराचा धंदा मला अधिक आवडतो येवढ्याकरितांच त्यांत शिरलों. अहंकारबुद्धीमुळें मीं माझा खटला स्वतः चालविला तर कदाचित् त्यानें माझा तोटा काय होईल हेंहि मी जाणतों. मला वकिली कामाची संवय नस-ल्यानें, आपण जरी कृपा करून वेळोवेळीं संभाळून घ्याल, तरी कांहीं कांहीं चुका माझे हातून होणारच. येवढी जबर किंमत देण्याइतकी माझी अहंकारबुद्धि वर आलेली नाहीं. पण स्वतः खटला चालविण्याचें माझें खरें कारण हेंच कीं, हा खटला मजवर व्यक्तिशः आहे असें मी मानीतच नाहीं. माझ्या धंद्यांतील इतर भाऊबंदांचें कामहि याच कामांत थोडेंबहुत मजकडून होण्याचा प्रसंग आहे म्हणूनच हें काम मीं अंगावर घेतलें आहे. हें काम म्हणजे वर्तमानपत्राचें स्वातंत्र्य अधिक प्रस्थापित करण्याविषयींचें. माझ्या स्नेही वकील-मंडळींनींहि, याच कारणामुळें, माझी तक्रार मींच मांडावी हें योग्य आहे असा सल्ला मला दिला. आक्षिप्त लेख म्हणून जीं दोन माझीं स्फुटें आपणांपुढें आलीं आहेत त्यांच्याच अनुरोधानें अवांतर विषयांची चर्चा आपणांपुढें मला करतां येऊन, ज्या मनःस्थितीवरून मीं लेख लिहिले ती मला कोर्टापुढें मांडतां येईल. आपण ती मनःस्थिति जरूर तपासून घ्यावी. व मला वाटतील ते प्रश्न विचा-रावे. आतां मी स्वतःच आरोपी असल्याकारणानें माझ्या मनांतील सर्वच विचारांचा गोळीबार मला कोर्टावर करतां येणार नाहीं. पण कोर्टाच्या विचा-रांचा गोळीबार होईल तो तूर्त आपल्या अंगावर मला घेतलाच पाहिजे व तो घेण्याची माझी तयारीहि आहे."

याप्रमाणें भाषण चालूं असतां कोर्टापुढें दुसरा एक खटला त्याच वेळीं चाला-वयाचा असल्यानें या खटल्याचें काम शुक्रवारपर्यंत तहकूब ठेवण्यांत आलें.

## दिवस दुसरा

शुक्रवार ता. ८ ऑगस्ट

दुसऱ्या दिवशीं कोर्टांतील इतर किरकोळ काम झाल्यावर १२ वाजण्याचे सुमा-

**न्या. मार्टेन**—या खटल्यांत वॉरंट केस कसली काढतां ? ज्या पद्धतीनें हें काम चाललें आहे तीच बरोबर आहे.

**केळकर**—खुद्द ही केस वॉरंट केस आहे असें मीं म्हटलें नाहीं. ऑस्वोल्ड यानें अशा खटल्यांत "आरोपीविर चार्ज असेल तो स्पष्ट करून मांडावा" असें म्हटलें आहे. या कामीं मुद्द्यांचा संकोच झाला तर मलाहि इष्टच आहे असें जें मीं पूर्वी म्हटलें त्याचा अर्थ आपणांला आतां कळेल. चार्जांत जीं वाक्यें आलीं नाहींत त्यांसंबंधानें आरोप नाहीं असें अर्थात् होईल, आणि मग त्यांसंबंधाची तक्रारहि मला सांगण्याचें कारण राहणार नाहीं. मला संकोच हवा, पण तो तक्रारींतील हकीकतींचा नको, तर आरोपांतील वाक्यांचा पाहिजे. माझ्या लेखांतील अथपासून इतिपर्यंत सगळेच शब्द म्हणजेच चार्ज असें मी कसें मानूं ?

**न्या. मार्टेन**—मि. केळकर, आम्ही दोनहि गोष्टी करणार आहोंत. सर्व लेखाचा साकल्येंकरून विचार करूं. निरनिराळ्या वाक्यांचाहि विचार करूं. मीं जातां जातां तीं वाक्यें तुम्हांला खुणा करून देणारच आहें. उगाच त्याची तक्रार करूं नका.

**केळकर**—वाक्यांच्या खुणा तुम्ही सांगत जाल, पण चार्ज ठेवल्याशिवाय तुमचा भर कशावर हें मला कसें समजणार ?

**न्या. मार्टेन**—खुणा केलेलीं जीं जीं वाक्यें तीं सर्व चार्जांतील वाक्यें असेंच समजाना !

**केळकर**—ठीक आहे. पण अशानें डिफेन्सचा संकोच मात्र होणार नाहीं येवढें मी आपणांस आतांच सांगतों. आतां आपण लेख वाचूं. दुसऱ्याच वाक्यांत 'युरोपियन ज्यूररांनीं अभिप्राय दिला' यांतील 'युरोपियन' या शब्दावर मी जोर देतों. कारण या कामीं मुख्य दोष ज्यूरर लोकांचा आहे. ते युरोपियन होते असें मी म्हणत आहें.

**न्या. मार्टेन.**—तें वाक्य सत्याला थोडें सोडून आहे. ज्यूरींत चार युरोपि-पियन असले तरी एक हिंदी गृहस्थ होता.

**केळकर**—पण बिचारा सरकारी पेन्शनर होता ! तें कसेंहि असो. लेखांत प्रथमदर्शनींच 'युरोपियन ज्यूरर्स' हा शब्द आल्यावरून मीं कोणत्या दृष्टीनें या प्रकरणीं पाहिलें हें कळून येईल.

**न्या. मार्टेन**--पुढें चला. "गोऱ्या आरोपींच्या चौकशीचे असले फार्स" या वाक्यांतील 'फार्स' याचा अर्थ काय समजावयाचा ?

**केळकर**--मी सांगतों. फार्स म्हणजे हास्यास्पद नाट्यप्रकार. कोणती एकादी गोष्ट एकदम अनपेक्षित रीतीनें व गांभीर्यभंग करण्यासारखी घडणें हें हास्याचें विभाव कारण होय.

**न्या. मार्टेन**--मी या (वॉकरच्या) खटल्याला (मॉक ट्रायल) "लुटपुटीच्या चौकशीचा" प्रकार असें म्हणूं काय ?

**केळकर**--तसेंच केवळ नाहीं. कारण निकालापर्यंत खटल्याचा विषय गंभीर वृत्ति उत्पन्न करण्यासारखाच होता. निकाल अनपेक्षित झाला तेव्हांच त्यांत हास्यबीज निर्माण झालें. हायकोर्टांत वॉकर निर्दोषी ठरून सुटेपर्यंत गंभीर विचारांनींच लोकांचें मन व्यग्र होतें. आणि शेवटीं एकदम पहावें तों हायकोर्टानें त्यांच्या अदमासाच्या अगदीं उलट निकाल दिला! मग हा प्रकार हास्यास्पद कां न वाटावा ? मी आपणांला स्पष्ट सांगतों कीं, हा निकाल ऐकून लोक हंसलेच असले पाहिजेत. लोक म्हणजे मात्र दूर इलाख्यांतील लोक नव्हत, तर लोहगांवचे लोक, पुण्याच्या आसपासचे लोक, म्हणजे ज्यांना सर्व प्रकार माहीत होता व अखेर निकाल काय होतो याकडे ज्यांचे डोळे लागले होते असे लोक. वॉकरच्या गोळीनें लोहगांवचा मनुष्य मेला हा विषय लोकांच्या एकसारखा तोंडीं होता. आदल्या नोव्हेंबरपासून पुढच्या मार्चपर्यंत मॅजिस्ट्रेटपुढें, सेशन जज्जापुढें खटला चालू असल्यानें विषय ताजा. पुष्कळ लोकांना या अपघातामुळें फार दुःख वाटलें. पुष्कळ लोकांची अशी समजूत असते कीं, युरोपियनांवर अशा बाबतींत खटला झाला म्हणजे तो आपला शेवटीं सुटावयाचाच! म्हणूनहि कांहीं लोक काय होतें तें पाहात होते. वरील समजूत कांहींच्या मतें चुकीची असेल. पण मी न्यायमूर्तींना स्पष्ट सांगतों कीं, ही समजूत माझ्या तरी मतें अगदीं बरोबर आहे व ती कशी हें मी पुढें दाखवून देईन. ज्यांनीं वॉकरला सोडून दिला त्यांचीं कारणें त्यांच्या दृष्टीनें कदाचित् बरोबर असतील; परंतु लोकांपुरतें बोलायचें तर आधीं सर्व गंभीर विचाराची भूमिका तयार झालेली आणि शेवटीं पाहावें तों हा अनपेक्षित हास्यास्पद प्रकार म्हणूनच लोकांना तो "फार्स" वाटला व मीं त्याला तसें नांव दिलें.

**न्या. मार्टन**—मि. केळकर, मद्रासेकडून येथील हायकोर्टाकडे **"डीलाहे"** यांच्या खुनाचा खटला आला तो चीफ जस्टिस यांनीं चालविला, त्यांत दोघेहि आरोपी सुटले. तो जसा "फार्स" झाला तसलाच हाहि एक फार्स असेंच तुम्ही म्हणालना ?

**केळकर**—अलबत होय ! आरोपी हिंदी असून ते अशाच प्रकारानें सुटले तर त्यालाहि अलबत फार्सच म्हणावें. मीं नको कधीं म्हटलें ! असले फार्स अनेक होतात. यांतलाच, पण युरोपियन आरोपींचा असा हा एक, येवढेंच मीं लिहिलें. असो. आपण आतां पुढें जाऊं. 'असले फार्स वॉरन हेस्टिंग्जच्या वेळेपासून होत आले आहेत हें इतिहासच सांगतो. त्याबद्दल मी अधिक कशाला बोलूं ? नंदकुमाराचा खटला हा एक फार्सच झाला व तो पार्लमेंटपर्यंतहि गेला. असो. "असलीं उदाहरणें धडधडीत डोळ्यासमोर घडत असून" वगैरे हें वाक्य आतां घ्या. या वाक्याचा हायकोर्टाच्या बेअदबीशीं संबंध येत नाहीं. तें सर्वसाधारण विधान आहे.

**न्या. किंकेड**—'बृहस्पति' या मराठी शब्दाचें भाषांतर 'वाईजएकर्स' हें आहे काय व तें कसें ?

**केळकर**—तें असें. बृहस्पति हा एक प्रज्ञासंपन्न ब्राह्मण व देवांचा गुरु होता. राज्यावर बसणारापेक्षां राज्यावर बसविणाराचा मान केव्हांहि मोठाच असतो. तसाच या देवगुरूला देवांपेक्षां अधिक मान होता. वाच्यार्थानें बृहस्पति म्हणजे प्रज्ञासंपन्न, खरा शहाणा मनुष्य असा आहे. पण रूढीनें शब्दार्थ बदलून 'शहाण्या'चा 'स्वतःस शहाणा समजणारा' व नंतर 'दीड शहाणा' म्हणजे 'पक्का मूर्ख' असा अर्थविपर्यास क्रमानें झाला ही गोष्ट निदान न्या. किंकेड यांना समजेल. भाषेंतील रूढि म्हणतात ती हीच. असो. या वाक्यासंबंधानें मी एवढेंच म्हणतों कीं, ब्रिटिश न्यायासंबंधानें आमच्यांतील शहाण्यावेड्यांचा हा एक नेहमींचाच वाद आहे. सार्वजनिक दृष्टीनें अशा मुद्यावर आम्हांला नेहमींच लिहावें लागतें. केसरीच्या ४४ वर्षांत असला विषय निदान हजार वेळ तरी आला असेल. यावर कोणी म्हणेल, इतके वेळ तोच विषय लिहिण्यासारखे संपादक लोक स्मृतिभ्रष्ट कसे ? पण याला उत्तर हें कीं, वर्तमानपत्र तेंच असलें तरी लेखकांची दरपिढी नवी, वाचकांची दरपिढी नवी, व अशा घडणाऱ्या प्रकारांची पिढीहि पण नवीच असते ! नवा प्रसंग, नवा लेख, हें चाललेंच आहे. पण

आम्ही वर्तमानपत्रकार कोर्टांतील वकिलापेक्षां अधिक स्मृतिभ्रष्ट खास नाहीं. आज खटल्याचा निकाल झाला कीं उद्यां त्याची हकीकत वकील विसरले! असो. प्रस्तुत वाक्याचा प्रस्तुत आरोपाशीं संबंध पोंचत नाहीं. हें वाक्य लिहितांना मुख्य मुद्यावरील टीकेला शाखा फुटत चालली होती असें आपणांस दिसेल.

**न्या. मार्टेन**--"इंग्लिशांच्या मायावीपणाचें कौतुक" यांतील 'मायावीपणा' म्हणजे काय?

**केळकर**--हेंच कीं, दिसण्यांत मात्र न्यायाच्या बाबतींत समता. इंग्रज लोक तोंडानें बोलतांना हिंदुस्थानांत सर्वांना सारखा न्याय असें म्हणत असतात. पण प्रत्यक्ष पहावें तर जातिविषयक भेदाभेदांचीं कलमें कायद्यांत आहेतच.

**न्या. मार्टेन**--इल्यूझरी (मायावी) याला शॅम (दिखाऊ) असा प्रतिशब्द चालेल काय?

**केळकर**--'मेक-बिलीव्ह' असा प्रतिशब्द मी सुचवीन. वरील दोनहि वाक्यें मिळून, ब्रिटिश न्यायाविषयीं मतभेद असलेल्या आमच्या लोकांमधील आपापसांतील वादाचा तो एक खेळ आहे. कोर्टाच्या बेअदबीशीं त्याचा काय संबंध? मुद्दा इतकाच कीं, न्यायाची खरी समता नाहीं, भेदाभेद आहेच!

## 'खुनी आरोपी' म्हणजे काय?

**न्या. मार्टेन**--बरें, पुढील वाक्यांत "ॲक्यूज्ड मर्डरर वॉकर" (खुनी आरोपी वॉकर) असें आहे. या शब्दानें कोर्टांत निर्दोषी ठरलेल्या मनुष्याला तुम्हीं फिरून खुनी म्हणतां; तसें म्हणण्याला तुम्हांस काय हक्क? त्यानें तुमच्यावर उद्यां दिवाणी दावा लावला तर?

**न्या. किंकेड**-- 'खुनी आरोपी' या तुमच्या शब्दांचें भाषांतर 'मर्डरर ॲक्यूज्ड' (खून किंवा खुनांची संवय असणारा आरोपी) असा होत नाहीं काय?

**केळकर**--कायद्याच्या दृष्टीनें तें भाषांतर करावयाचें तर 'खुनी आरोपी' म्हणजे 'खुनाचा आरोप आला असलेला आरोपी' असेंच केलें पाहिजे.

**न्या. किंकेड**--तसें कसें होईल?

**केळकर**--कसें होईल म्हणत असाल तर आतांच एखाद्या सरकारी दुभाष्याला (इंटरप्रीटराला) बोलवा पाहूं; तो जरूर माझ्यासारखेंच मत देईल.

**न्या. किंकेड**--छे, छे, मि. केळकर, तुमच्या मराठी भाषेच्या ज्ञानाविरुद्ध माझें स्वतःचें भाषाज्ञान मी लढवितों असें मानूं नका. तुम्ही कराल तोच अर्थ मी ग्राह्य मानीन.

**न्या. मार्टेन**--या वाक्यांत न्यायमूर्तीनीं 'दिवसाढवळ्या तर्कशास्त्राचा खून केला' असें तुम्ही म्हणतां, याचा अर्थ त्यांनीं जाणून-बुजून अप्रामाणिकपणें निकाल दिला, असा होत नाहीं काय ?

**केळकर**--आपलें मत मला ग्राह्य वाटत नाहीं. एखाद्या गोष्टीचा "दिवसाढवळ्या खून केला" असें म्हणणें ही एक जोरानें निषेध दाखविण्याची भाषारूढि आहे. या मुद्द्यावर न्या. किंकेड हे तरी माझ्यासारखें मत देतील असें मला खात्रीनें वाटतें.

**न्या. मार्टेन**--"पण तर्कशास्त्राचा दिसवसाढवळ्या खून केला" याचें काय ?

**केळकर**--हीहि एक भाषारूढि आहे. तिचें भाषांतर व अर्थ शब्दशः करूं जाल तर तें हास्यास्पद होईल.

**न्या. मार्टेन**--तें मलाहि कळतें. कारण वाच्यार्थानें खून म्हणण्याला तर्कशास्त्र हा मनुष्यप्राणी खचित नव्हे. पण न्यायमूर्तीनीं मुद्दाम जाणूनबुजून खोटा तर्क लढविला, असा अर्थ तरी होतो कीं नाहीं ?

**केळकर**--तोहि अर्थ बरोबर नाहीं. दुसऱ्याकडून अहेतुक रीतीनेंहि झालेल्या तर्कदोषाला बोलणारा आपल्या दृष्टीनें खून म्हणेल. पण मीं मघांशीं सांगितल्याप्रमाणें केवळ ठांसून बोलण्याचा तो एक प्रकार इतकेंच समजावयाचें व त्यांतला ठांसलेपणा काढला म्हणजे 'तर्क लढवितांना घोडचूक केली' इतकाच अर्थ उरतो.

## हत्यारांचें ज्ञान नाहीं

**न्या. मार्टेन**--मि. केळकर, तुम्हाला बंदुकी वगैरे उडविण्याचा परिचय आहे काय ?

**केळकर**--नाहीं.

**न्या. मार्टेन**--पण तुम्हीं रायफल बंदूक कधीं पाहिली आहे काय ?

**केळकर**--हो, पाहिली आहे.

**न्या. मार्टेन**--हें विचारण्यांत माझा मुद्दा हा आहे कीं, सर न्यायाधीश मॅक्ली-

ऑड यांनीं सर्व जन्मभर अशा हत्यारांचा उपयोग केलेला आहे. वॉकर प्रकरणीं साधी बंदूक नसून रायफल होती व ती त्याच्या मांडीजवळ असतांना उडाली. रायफल बंदूक उडाली म्हणजे मोठा धक्का बसतो म्हणून ती खांद्याशीं धरून उडवितात. ती कोणी मांडीशीं धरून उडवील तर त्याला प्रायः इजाच होईल. नेम धरून मारणारा तर मांडीशीं बंदूक धरून कधींच उडविणार नाहीं. तात्पर्य, वॉकरला ज्यांनीं दोषमुक्त केलें त्यांना अशा हत्यारांची चांगली माहिती असल्यामुळें, कोणीहि मनुष्य दुसऱ्याला गोळी घालणार झाला तर मांडीशीं बंदूक धरणार नाहीं हें त्यांना व्यवहारांत चांगलें कळण्यासारखें होतें. वॉकरनें गोळी झाडली असती तर त्याला स्वतःला इजा झाली नसती काय ?

**केळकर**—या हत्याराविषयीं माझें अज्ञान मीं कबूल केलेंच आहे. पण माझ्या ज्ञानावर माझी भिस्त नाहीं. वॉकरला सेशनकमिट करणारे मॅजिस्ट्रेट मि. मॉंटिथ व सेशन्स जज्ज वाईल्ड हे दोघेहि युरोपियन असून त्यांना तरी या हत्यारांची माहिती होती ना ! मॅजिस्ट्रेटचा निकाल मला वाचूं द्या म्हणजे मग काय तें कळून येईल !

**न्या. मॉर्टन**—मि. केळकर, सरन्यायाधीश व न्यायमूर्ति फॉसेट यांच्या निकालावरचें अपील ऐकण्याला आम्ही येथें बसलों नाहीं, हें तुम्हीं लक्षांत ठेविलें पाहिजे. तो निकाल बरोबर किंवा चूक हें आम्ही येथें ठरविणार कोण ? मी एवढेंच म्हणत होतों कीं, बंदुक मांडीशीं होती ती उडविली गेली यावरून नेम धरून गोळी मारली नसावी.

**केळकर**—त्या न्यायमूर्तींच्या निकालाची चर्चा करणें हाच तर माझा मुख्य मुद्दा आहे. रायफलविषयीं माझ्या अज्ञानाचा आपण उल्लेख केला म्हणून तेवढ्यापुरता मींहि मॅजिस्ट्रेटच्या निकालाचा येथें उल्लेख केला. त्याचा खरा उल्लेख व त्याची खरी चर्चा मी पुढें करणारच आहें. असो. " संभव तोलण्याचा हा तावजा कोर्टानें कोठून पैदा केला कोण जाणें ? " हें वाक्य आतां घेऊं. त्याचा अर्थ हा ताजवा खोटा होता इतकेंच सुचविण्याचा आहे. हा उत्तरगर्भ प्रश्न आहे; याला " विधानार्थी प्रश्न " असें म्हणतां येईल. प्रश्नच स्वतः आपलें उत्तर देतो. त्याचें उत्तर हेंच कीं, असला ताजवा जगांत सहसा कोठेंहि मिळणार नाहीं. याचाच अर्थ ताजवा खोटा. मात्र मूळ वाक्य वाच्यार्थानेंच घ्यावयाचें नाहीं. स्वतः प्रश्नानें दिलेल्या उत्तराला भर म्हणून पुढच्या वाक्यांत

लेखकहि म्हणतो कीं, " ताजव्याचें एक पारडें गोरें व एक पारडें काळें आहे; तेव्हां एक अधिक जड होऊन खालीं बसणारच यांत आश्चर्य काय ! "

**न्या. मार्टन**—याचा मला आणखी खुलासा हवा.

**केळकर**--तो मी आणखी पुढें करणारच आहें. तूर्त आपण पुढें वाचूं. असल्या खोट्या मापानें मिळालेला न्याय इत्यादि, हें वाक्य घ्या.

**न्या मार्टन**--" खोटा ताजवा " हे शब्द महत्त्वाचे आहेत त्यांवर खूण करा.

**केळकर**--कमी अधिक जड अशीं ज्याचीं पारडीं तो ताजवा खोटा, व त्या ताजव्याचें मापहि खोटें, यांत अवघड तें काय ! असो; यापुढील वाक्यांत मनुस्मृति जाळण्याचा वाद व लोहगांवीं स्तंभ उभारण्याची चर्चा आहे.

**न्या. मार्टन**--पण त्याच वाक्यांत ब्रिटिश राज्यांतील न्याय व हिंदी प्रजाजनांच्या प्राणाची किंमत हेहि शब्द आहेत हें लक्षांत ठेवा.

**केळकर**--त्या शब्दांचें जोखीम मी पुरें जाणून आहें. पण तुमच्या कोर्टाच्या बेअदबीशीं त्यांचा संबंध काय ! राजकीय वादांतील तें सर्वसामान्य विधान आहे. त्याविषयीं माझ्या मनांत हजारों उदाहरणें येतात. प्रस्तुतच्या एकट्या एक उदाहरणावर अशा भारी अनुमानांची जड इमारत मी कशी उभारीन ! मला ही साधी गोष्ट कळत नाहीं काय ! मला परवानगी द्याल तर मी शेंकडों उदाहरणें सांगेन. लोकमत मी म्हणतों असेंच आहे. तें मत कसें मांडावें हा प्रश्न वेगळा. पण त्या मताबद्दल आपणाला शंका नको.

असो. आतां मी सर्व लेख एकत्र घेऊन त्याचा आशय सांगतों. या लेखाचे तीन विभाग स्वाभाविकपणें पडतात ते असेः--

१ हायकोर्टाच्या निकालावर टीका.

२ हिंदुस्थानांतील सर्वसामान्य न्यायदानपद्धतीवर टीका, अर्थात् त्यांतील युरोपियन लोकांचा संबंध लक्षांत ठेवून.

३ न्यायपद्धतीला अनुलक्षूनच पण आमच्या-आमच्यांतील वाद. ( या ठिकाणीं केळकर यांनीं आक्षिप्त लेखांतील निरनिराळीं वाक्यें घेऊन तीं कोण कोणत्या सदराखालीं कशीं पडतात हें दाखविलें. )

## एका उपमेचा अनर्थ !

प्रथम ही गोष्ट आपण लक्षांत घ्या कीं, जी काय सर्व जिकीर वाटते ती फक्त एका उपमेमुळें. ती उपमा ताजव्याची. लिहिण्याबोलण्यांत उपमादिकांच्या मोहाचा

पगडा मनुष्यमात्रावर किती असतो हें आपण जाणतच असाल. उपमांच्या उपयोगाचे परिणामहि कित्येक वेळां न कळत वाईट होतात. एक तर उपमा समर्पक करण्याकरितां अंगें-उपांगें सजविण्याचा मोह पडतो, व मग त्यांतून लिहिणाराच्या मनांत नाहींत असेहि अर्थ निघूं शकतात. आणि हा दोष माहीत असतांहि उपमा घेतातच. पण सुदैवानें न्यायाचे बाबतींत ताजव्याचीच उपमा सर्वत्र घेतली जाते.

**न्या. मार्टेन**--यालाहि तुम्ही आतां आधार दाखविणार कीं काय ? या हायकोर्टाच्या इमारतीच्या डोक्यावर पाहा म्हणजे तेथें तुमचीच उपमा मूर्तिमंत आढळेल !

**केळकरः**--खरें आहे. असो. आतां वर सांगितलेल्या तीन विभागांपैकीं आमच्या-आमच्यांतील वादाचा विभाग घेऊन टाकूं. या वादांतून कोर्टाच्या बदनामीचें असें कांहींच निघत नाहीं.

**न्या. मार्टेन**—मी तुम्हांला एकदांच सांगतों कीं, या तुमच्या ' मनुस्मृती ' च्या वादाशीं प्रस्तुत मला कांहींच कर्तव्य नाहीं.

**केळकर**—ठीक आहे, तर नंबर दोनचा विभाग घेऊं. त्यांतहि या न्यायकोर्टाची बेअदबी होण्यासारखें फारसें कांहीं निघणार नाहीं. तथापि त्यांतील प्रत्येक गोष्टीचें समर्थन करण्यास मी तयार आहें. फार तर ती एक प्रकारची सरकारवर टीका होईल, व सरकारला ती बदनामीची वाटली तर सरकार तिला फार तर राजद्रोहात्मक लेख म्हणेल, पण ती या कोर्टाची बदनामी खास नव्हे. सर्व सरकारापैकीं न्यायखातें हा एक भाग व त्या खात्यापैकीं हायकोर्ट हा एक पोटविभाग. या विभागांतील टीका लिहितांना माझे डोळे हायकोर्टाच्या निकालावरून क्षणभर अजीबात निघाले होते. तो विषय मी क्षणभर अजीबात विसरलों होतों असेंहि हवें तर म्हणतां येईल. तो वाद काय आहे हें सांगण्याची परवानगी दिलीत तर मात्र सर्व सांगेन.

**न्या. मार्टेन**—पण आपण कांहीं या ठिकाणीं लेजिस्लेटिव्ह असेंब्लींत बसलेलों नाहीं, म्हणून तुम्हांला सरकारच्या राज्यकारभारावर येथें टीका करूं देणें मला शक्य नाहीं, हें मीं तुम्हांला कालच सांगितलें. आपल्या पुढला मुद्दा फारच थोडका आहे आणि कोर्टाची बेअदबी काय केल्यानें होते अगर न केल्यानें होते याविषयीं हायकोर्टाच्या निकालांतून वर्तमानपत्रांना कायदा नीट समजावून

सांगून ताकीद देण्यांत आली आहे. आमच्यापुढें प्रश्न इतकाच आहे कीं, तुमचा लेख वाचून त्यांतून सरळ अर्थ काय निघतो असें सामान्य प्रतीच्या समजूतदार माणसास जें वाटेल याचा विचार करावयाचा.

**केळकर**—फिरून आपण मुद्दा अति संकुचित करीत आहां, व हें आधीं लक्षांत घेऊनच मीं या गोष्टीचा अतिरेक होऊं नये असा इशारा आज प्रारंभींच दिला होता. आपण म्हणतां तोच मुद्दा मी घेतों. माझा सर्व लेख एकत्र घेऊन मीं प्रातिज्ञा लेखांत सांगितल्याप्रमाणें, फिरून एकदम सांगून टाकतों कीं, हायकोर्ट जज्जांनीं न कळत स्वजातिपक्षपात केला आहे असें मी कबूलच करतों. अर्थात् आतां आपण म्हटल्याप्रमाणें मीं येवढेंच करावयाचें उरलें कीं, जो पक्षपात मी न कळत केला म्हणतों तो, तुम्हीं म्हटल्याप्रमाणें, जाणूनबुजून केला, हें नव्हे कसें, हें सिद्ध करावयाचें. पण 'अजाणतां' व 'जाणूनबुजून' यांतील भेद मी कोणत्या साधनांनीं दाखविणार ? मजजवळचें साधन म्हणजे मी जे अवांतर विषय आपणांपुढें मांडणार आहे ते, आणि त्यांची चर्चा करण्याला तर कोर्टच हरकत घेतें ! म्हणून फिरून मी म्हणतों कीं, मूळ नक्की चार्ज नेमक्या शब्दांनीं ठरविला गेला नाहीं हेंच गैर झालें.

**न्या. मार्टेन**--तो विषय फिरून काढूं नका. तुमच्या लिहिण्याचा सरळ अर्थ काय होतो येवढेंच पाहावयाचें आहे.

## अर्थ करण्याची जबाबदारी

**केळकर**--आणि तो सरळ अर्थ आपण ठरविणार ! हायकोर्टानें जाणूनबुजून पक्षपात केला असा अर्थ माझ्या शब्दांतून निघतो असें म्हणण्याचाच आग्रह आपण धरला तर मी तरी नाहींच असें कसें म्हणणार ? उलट, मी म्हणतों असा अर्थ निघतच नाहीं, असें आपण तरी कसें म्हणणार ? मला वाटतें, कोर्टाच्या म्हणण्याप्रमाणें अर्थ निघतच नाहीं, हें शाबीत करण्याची मजवरची जी जबाबदारी असेल त्यापेक्षां, मी म्हणतों तसा अर्थ कांहीं केल्या निघूंच शकत नाहीं, निघतो तो त्याहून अधिकच निघतो, हें सिद्ध करण्याची जबाबदारी सरकारी वकिलांवरच अधिक पडते. तरीहि पण अवांतर म्हटल्या जाणाऱ्या गोष्टींच्या चर्चेनें माझी जबाबदारी पार पाडण्यास मी तयार आहें. उदाहरणार्थ, हायकोर्टाच्या त्या निकालावर मी सरळ हल्ला चढविणार आहें. पण जातिभेदविषयक व्यवस्था हिंदुस्थानच्या कायद्यांत अद्यापि आहे असें मी शाबीत करून

देतों म्हटलें त्याला मघाशीं हरकत घेतलीत व हायकोर्टाचा निकाल चूक, अगदीं चूक, अतिशय चूक असें मी परोपरीनें दाखवीन म्हणतों त्यालाहि आपली हरकतच !

**न्या. मार्टेन**--मि. केळकर, कायद्यांतील जातिविषयक दोष दाखविण्याचें स्थान हें कोर्ट नाहीं.

**केळकर**--जातिविषयक भेदामुळें अन्याय होतो हें दाखविणें हा मुख्य मुद्दा असला तरी देखील—?

**न्या. मार्टेन**--होय. याविषयीं रंगाचार्य काय म्हणतात, लॉर्ड कर्झन काय म्हणतात, किंवा सरकारी ठराव व खलिते काय म्हणतात, किंवा फलाणा गृहस्थ काय म्हणतो हें येथें आम्ही ऐकून घेणार नाहीं. याविषयीं सर्वसामान्य चर्चा फुकट आहे. युरोपियन लोकांप्रमाणें हिंदी लोकांनाहि ज्यूरीमध्यें आपल्या जातीचें बहुमत असावें असें मानण्याचा हक्क देणारा कायदा अलीकडे झाला तोहि तुम्हांला माहीत नाहींसें दिसतें.

**केळकर**--पण हें आपण कशावरून म्हणतां ? आपल्याच हायकोर्टाचे सर-न्यायाधिश सर लल्लुभाई शहा हे 'रेशल डिस्टिंक्शन्स' कमिटीचे सभासद होते. त्यांनींच आपल्या मिनिटांत असें लिहिलें आहे कीं, न्याय मिळविण्याची एक-सारखी सोय ज्याला त्याला देतां आली असें म्हटलें तरी जातिभेदावर ( काळे-गोरे या भेदावर ) कायद्याची रचना अद्यापि शिल्लकच आहे. थोड्या वेळापूर्वीं ' मायावी ' (इल्यूझरी) या शब्दाचा खुलासा देतांना मी हेंच सांगत होतों.

**न्या. मार्टेन**—तें कांहीं नाहीं. तुमच्यावर आरोप आहे त्यासंबंधींचीं वाक्यें मीं तुम्हाला फिरून वाचून दाखवितों व त्यांचें उत्तर द्या.

**केळकर**--त्यांचें खरें उत्तर वर सांगितलेले मुद्दे नंबर १ व २ यांच्या चर्चेंत आहे. ती चर्चा मी म्हणतों तशी मला करूं द्या. तिसरा मुद्दा मनुस्मृतीसंबंधाचा, मी फार तर सोडून देईन.

**न्या. मार्टेन**--मि. केळकर, मी तुम्हांला पुनः सांगतों कीं, तुमचें राजकीय विषयावरचें भाषण येथें मी तुम्हांला करूं देणार नाहीं. लेजिस्लेटिव्ह असेंब्लींत पीनल कोड व प्रोसीजर यांची चर्चा निघेल तेव्हां तुम्ही तें करा. आम्ही येथें कायदा करीत नाहीं. फक्त कायद्याचा अंमल करतों. कोर्टाच्या बेअदबीचा कायदा व कोर्टाचा अधिकार यांचीं तत्त्वें तुम्हांला पूर्वीं समजावलीं आहेतच.

**केळकर**--दुर्दैवानें आपलें म्हणणें मला पटत नाहीं. मीं काढलेले तीन मुद्दे एकांत एक असे जोडले गेलेले आहेत. हायकोर्टाचा निकाल किती व कां चूक आहे हें मला सविस्तर दाखविलेंच पाहिजे. अशा चुका ज्या कारणानें होतात तीं विद्यमान न्यायदानपद्धतींतील कारणेंहि मला आपणांस दाखविलीं पाहिजेत. हायकोर्टाच्या निकालासंबंधानें त्या जज्जांपेक्षां ज्यूरीकडे अधिक दोष कसा येतो हें मला दाखविलें पाहिजे. तें आपण गैरलागू कसें म्हणतां ? खोट्या न्यायाचें माप दिलें येवढेंच आपण धरून बसतां, आणि येथें हातांत ताजवा धरणारापेक्षां स्वतः ताजव्याचा दोषच अधिक कसा आहे हें मी दाखवूं लागलों तर हरकत घेतां ! ताजव्याचीं दोन पारडीं सारख्या वजनाचीं नाहींत हें हल्लींच्या पद्धतीची चर्चा केल्याशिवाय मी कसें सिद्ध करूं ! ज्यूरर लोक हे सर्व जगभर कसा न्याय देतात, व त्यांच्या निकालासंबंधानें म्हणजे त्याच्या पक्षपातबुद्धी-संबंधानें सगळ्या जगांतले लोक काय म्हणतात, हें दाखविल्याशिवाय पुण्याच्या युरोपियन ज्यूरीचा निकाल पक्षपातिपणाचा असूं शकेल हें अनुमान मी कसें सिद्ध करणार ?

## चर्चा करूं द्या मग पाहा

**न्या. मार्टेन**—जातिनिष्ठ भेदाभेदासंबंधानें मी तुम्हांस चर्चा करूं देणार नाहीं.

**केळकर**—ती सोडली. पण हायकोर्टाचा निकाल किती व कसा चूक होता हें तरी सांगूं द्याल कीं नाहीं ! तो निकाल चूक होता म्हणून तो तुम्ही आज फिरवा, असें म्हणावयास का मी येथें आलों आहें ? तुम्हांला तो फिरवावासा वाटला तरी तो आतां फिरणार नाहीं, ही साधी गोष्टहि मला कळत नाहीं असें आपण समजतां काय ? निकाल झाला तो झाला. वॉकर सुटून खुशाल घरीं गेला आणि गोळी लागून मेलेला लोहगांवचा अर्जुना निजधामाला गेला ! त्याचें आतां काय ? पण त्या निकालाची चूक शिल्लकच राहाते; व ती चूक केवढी आहे, किती मोठी आहे, हें मी दाखवूं शकलों तर माझ्या लिहिण्याच्या हेतूप्रमाणेंच निकाल देणारांच्या मनःस्थितीवर प्रकाश पडेल. तो निकाल अधिक चूक असल्याचें मला ठरवितां येईल. तितका पक्षपाताच्या आरोपाचा मजवरील आरोप त्या प्रमाणानें हलका होईल. तें दाखवूं न द्याल तर मला एरवीं तक्रार सांगावयाला जागा ती काय उरणार !

**न्या. मार्टेन**—पंचवीस बॉंबे लॉ-रिपोर्टरचें पान २३-२५ काढून पाहा. तो आधार येथें लावून तुम्ही तो निकाल चूक आहे असें एकदम म्हणून टाकाना ? पण चूक नसलेला निकाल तुम्हीं चूक म्हटला हा तुमच्यावर आरोप नाहीं, तर युक्तायुक्त न पाहतां गोऱ्या आरोपीला पक्षपात करण्याकरितां तसा निकाल दिला असें तुम्ही म्हणतां हा आरोप तुमचेवर आहे.

**केळकर**—आपणास मीं असा प्रश्न विचारूं नये, पण आतां मी विचारतोंच कीं, आपण म्हणतां तो आरोप मी म्हणतों ती पद्धति वगळून मला नाशाबीत कसा करतां येईल हें उदाहरणार्थ सांगण्याची कृपा करा म्हणजे त्या रीतीनें तरी तें करून पाहीन.

**न्या. मार्टेन**—ती रीत हीच कीं, तुम्हीं योजलेल्या शब्दांतून जाणत्या पक्षपाताचा ध्वनि निघत नाहीं हें शाबीत करणें.

## खोटी तराजू, खोटें माप

**केळकर**—काळें पारडें कोणतें, गोरें कोणतें, एक खालीं कां, एक वर कां, ज्यूरीचा निकाल झाला असा कां व्हावा, हें खुलासेवार सांगण्याला परवानगी द्या म्हणजे माझ्या शब्दांचा खुलासा होईल.

**न्या. मार्टेन**—एक पारडें पांढऱ्या रंगाचें म्हणूनच तें दुसऱ्या रंगापेक्षां जड आहे, असें तुमच्या लेखांतच आहे.

**केळकर**—होय. पण त्या ' म्हणूनच ' या शब्दाचाच अर्थ मला खुलासेवार सांगावयाचा आहे. पारडें पांढरें खरें, पण पांढरें म्हणूनच अधिक जड हे नुसते शब्द झाले. पण त्या शब्दांची सयुक्तिकताच दाखवावयाला मी परवानगी मागतों.

**न्या मार्टेन**—ठीक आहे. पण जातिनिष्ठ भेदाची सामान्य चर्चा करूं नका.

**केळकर**—हायकोर्टाचा निकाल चूक खरा. पण ती त्यांची चूक कां घडली असें मला वाटतें तें कारण मीं खुलासेवार सांगितलें तरच माझें म्हणणें सयुक्तिक ठरेल; व माझी टीका वर्तमानपत्रकार या नात्यानें अवश्य व जरूरीची कां हेंहि त्यांतल्यात्यांत समजेल. हा प्रकार अगदीं पुण्याजवळ घडला यामुळें त्यावर टीका करण्याचें टाळणेंच शक्य नव्हतें. याचा अर्थ पुढें असा कीं, ज्या स्थितींत मीं टीका केली त्या स्थितींत अशीच ती करावयास पाहिजे होती. शिवाय

हायकोर्टाला झालें तरी मीं इतकेंच म्हटलें आहे, न्यायाचा कांटा त्यांनीं सरळ ताठ हातानें धरला असला तरी स्वतः पारड्यांच्या विषमतेमुळें माप खोटें दिलें गेलें. खोटेपणा पारड्यांचा, दांडी हातांत धरणारांचा नव्हे. पारडीं विषम म्हणून तराजू खोटी असली तर, माप देणारा जें माप देतों तें तो न कळत खोटें देतो पण खोटें देतो असेंच म्हणावें लागतें. ताजवा खोटा असेल तर पारडीं सारखीं करण्याकरितां हलक्या पारड्यांत पासंगाकरितां मुद्दाम वेगळें लहानसें वजन टाकावें लागतें हें प्रसिद्ध आहे. आरोपी गोरा व ज्यूरी गोरी हाच गोऱ्या पारड्याचा जडपणा; म्हणून हायकोर्टानें ज्यूरीचा निकाल सेशनजज्जाच्या शिफारसीप्रमाणें, अमान्य करणें यालाच मी मेलेल्या काळ्या मनुष्याच्या पारड्यांत पासंगाचें वजन घालणें असें म्हणतों; व तें वजन त्यांनीं घातलें नाहीं म्हणून न्यायाचें माप खोटें झालें ! या देशांत काळ्या गोऱ्यांच्या विरोधप्रसंगीं गोऱ्या ज्यूरीच्या निकालाकडे करड्या नजरेनें पाहण्याची जी जबाबदारी हायकोर्टावर येऊन पडते ती त्यांनीं या प्रसंगीं ओळखली नाहीं, हें मला आपणापुढें होईल तितक्या तीव्र भावनेनें मांडावयाचें आहे.

## एका महत्त्वाच्या तत्त्वाची चर्चा

इंग्लंडांत पूर्वीं ज्यूरींनीं न्यायाधिशाविरुद्ध आपलें स्वातंत्र्य स्थापन करण्याकरितां केवढा मोठा झगडा चालविला होता हें प्रसिद्ध आहे. व्यक्तिस्वातंत्र्य व मतस्वातंत्र्य यांकरितां तो झगडा चालू होता. म्हणजे एका अर्थानें ब्रिटिश लोकसत्तेचा आत्मा विकास पावण्याचा तो काल होता. अशा वेळीं ज्यूरीच्या निकालांत न्यायाधिशांनीं हात घालून तो फिरवूं नये हें इष्ट व योग्य होतें. हिंदुस्थानांत त्याच्या अगदीं उलट स्थिति आहे. विशेषतः हिंदी लोकांचा जीव व स्वाभिमान यांविरुद्ध गुन्हे केल्याबद्दल युरोपियन लोकांचा इनसाफ होत असतो तेव्हां तर ज्यूरीच्या निकालासंबंधीं न्यायाधिशांनीं फार दक्षता ठेविली पाहिजे. कारण युरोपियन आरोपीला आपल्या जातभाईचें बहुमत ज्यांत आहे अशी ज्यूरी मागण्याचा अधिकार असतो. शिवाय येथें हिंदी लोकांना प्रतिकूल व युरोपियन लोकांना अनुकूल अशाच अनेक गोष्टी असतात. गोऱ्या लोकांना आपण काळ्या लोकांपेक्षां श्रेष्ठ व या देशांतील सर्व गोरे लोक म्हणजे एक बंधुमंडळ आहों असें मनांतून वाटत असतें. राजकीय वर्चस्वाची भावना कळत न कळत त्यांच्या मनांत खेळत असते. गोरे लोक हिंदुस्थानांत थोडे म्हणून ज्या ज्या रीतींनें त्यांना संरक्षण मिळेल व येथील त्यांची जीवितयात्रा सुखासमाधानाची होईल

त्या त्या रीतीनें तें मिळविणें योग्य व रास्त आहे अशी त्यांच्या मनाची सहजच समजूत होते. व सर्व दर्जांच्या अधिकाऱ्यांकडून युरोपियन अपराध्यांना मदतच होते. या सर्व गोष्टी हें काळ्या लोकांना न्याय मिळण्याच्या मार्गांत आधींच विघ्न असल्यानें युरोपियन ज्यूरीचा निकाल न्यायाधिशांनीं वेदतुल्य मानला तर वरील विषम स्थितींत आणखी भरच पडावयाची 'पांचा मुखीं परमेश्वर ' हें तत्त्व चांगलें खरें. पण हिंदुस्थानांत गोऱ्या ज्यूरींच्या निकालांना तें सरसकट लावणें हें हास्यास्पद व अन्यायाचें होईल. काळ्या-गोऱ्यासंबंधानें येथील परिस्थिति विशेष प्रकारची असल्यामुळें वरील तत्त्वाला स्थानिक परिस्थितीप्रमाणें जरूर ती मुरड घातली पाहिजे. काळा फिर्यादी, काळा आरोपी व काळी ज्यूरी असें असेल, किंवा फिर्यादी, आरोपी व ज्यूरी सर्व गोरेच असतील, तेथें ज्यूरीचा निकाल अबाधित ठेवणें हें हिंदुस्थानांतहि अन्यायाचें होणार नाहीं. पण आधींच जड होऊन बसलेल्या गोऱ्या लोकांना काळ्या लोकांचे जीव घेण्याच्या खटल्यांतहि या तत्त्वाचा फायदा डोळे मिटून देणें, म्हणजे ज्याचेजवळ आधींच आहे त्यालाच फिरून देव अधिक देतो अशासारखें होईल ! अशा मुकदम्यांत हायकोर्टानें डोळ्यांत तेल घालून व नेहमींच्या उलट मुद्दाम दृष्टि ठेवूनच वागलें पाहिजे. क्रि. प्रो. कोडाच्या १७६ कलमानें ज्यूरीचे निकाल न्यायाकरितां फिरविण्याची पूर्ण मोकळीक सुदैवानें ठेविली आहे, सर्व खटला जणूं काय ज्यूरीशिवाय आपल्याच पुढें चालला आहे असें त्यांनीं समजावें व खालच्या कोर्टांत ज्यूरीनें सर्वानुमतें निकाल दिला असला तरी तो फिरवावा असा अधिकार ह्यांना दिलेला आहे. इं. लॉ. रि. १५ मुंबई पान १५ या ठिकाणीं न्या. मू. वेस्ट हे लिहितात कीं, 'या देशांत गोष्ट न्यायाची असेल तर ज्यूरीचा निकाल फिरविण्यास हायकोर्टानें मुळींच मागेंपुढें पाहूं नये. निकाल ज्यूरीचा म्हणून जज्जांनीं कानाडोळा केला तर तो न्यायाचा विश्वासघात होईल.' मी या कोर्टाला उघड व स्पष्ट बजावतों कीं, वॉकरच्या मुकदम्यांत या हायकोर्टानें ज्यूरीचा निकाल फिरविण्याच्या कामीं कानाडोळा केला त्यामुळें न्यायाचा धडधडीत घात झाला आहे. ज्यूरीचा निकालहि विपरीत असूं शकतो, व तसा तो या प्रकरणीं झाला असल्याचें पुण्याच्या सेशन्स जज्जांनीं स्वतःच वर लिहून धाडलें. इं. लॉ. रि. १ व १५ मुंबई आणि ३६ कलकत्ता, यांत माझ्या म्हणण्यास पूर्ण आधार मिळतो. एक गरीब बिचारा हिंदी खेडवळ

प्राणाला मुकतो, व गोऱ्या आरोपीला गोरे ज्यूरर धडधडीत सोडून देतात, हा डोळ्यांपुढील प्रकार पाहून तरी हायकोर्टाला दुःखितांना न्याय देण्याची उदार बुद्धि व्हावयास पाहिजे होती. या प्रकरणांतील विशेष परिस्थितीनें हायकोर्टाच्या सदसद्विवेकबुद्धीला " ईश्वराला स्मरून तुला खरें वाटतें तें बोल " असा जणूं काय खडा सवालच टाकला होता. त्याचें उत्तर देण्याचें जबर नीतिधैर्य न्यायमूर्तींनीं दाखविलें नाहीं, आणि " जाऊं दे कीं, ज्यूरीचा निकाल बदला व तो बदलण्याचीं कारणें लिहित बसा, येवढी यातायात कोण करतो ? " असा देखावा या ठिकाणीं दिसला !

## गोष्ट मूळपदावर आली ।

**न्या. मार्टेन**—वॅाकरचा उद्देश गोळी घालण्याचा असणें शक्य नाहीं हें मी म्हणतों तें कसें, हें अद्यापि तुमच्या लक्षांत येत नाहीं, काय करावें ? तुम्हांला बंदुका वगैरे हत्यारांची फारशी माहिती नाहीं यामुळेंहि तें अंशतः घडत असेल, नाहीं असें नाहीं.

**केळकर**—हत्यारांच्या बाबतींतल्या माझ्या अज्ञानाचा आपण फिरून विनाकारण उल्लेख करतां याचें वाईट व आश्चर्य वाटतें. कमिटिंग मॅजिस्ट्रेट मि. मॉंटीथ व सेशन्स जज्ज मि. वाईल्ड या दोन गोऱ्या अधिकाऱ्यांना हत्यारें वापरण्याचें ज्ञान आहेना ? मग सेशन्स जज्जाच्या मताचा खास मी आधार घेत असतां आपण तो मान्य करीत नाहीं, खोडूनहि टाकीत नाहीं, व मी सेशन्स जज्ज व मॅजिस्ट्रेट यांचे अभिप्राय वाचून दाखवीन म्हणतों तर तेहि आपण मला वाचूं देत नाहीं याला काय उपाय ?

**न्या. मार्टेन**—मॅजिस्ट्रेटच्या अभिप्रायाशीं मला कांहीं कर्तव्य नाहीं. तुम्हां वर्तमानपत्रकर्त्यांना एकाच बाजूचें समर्थन करण्याची संवय असते. आम्हां न्यायाधिशांना सर्व बाजू व सर्व प्रकारचे संभव पाहावे लागतात.

**केळकर**—पण मी म्हणतों, ज्या बंदुकींतून गोळी उडाली ती मॅ. मि. मॉंटीथ यांनीं स्वतः हातांत घेऊन तपासून पाहिली आहे. तशी ती आपण पाहिली नाहीं ! मॉंटीथसाहेब म्हणतात, " या बंदुकीचा घोडा इतका जड आहे कीं, तो आकस्मिक रीतीनें न कळत पडून गोळी उडावयाची तर एकाच्या हातानें तें काम होणार नाहीं. चार माणसांचा हात चुकून पडण्याइतका जोर बंदुकीच्या घोड्यावर पडला तरच तो पडून गोळी उडेल. " पण ही गोष्ट मी पुनः पुनः किती वेळ सांगूं ? ही गोष्ट मी सांगतों तें कोर्टाला आवडत नाहींसें दिसतें.

**न्या. मार्टेन**—मॅजिस्ट्रेटचें मत सांगून हायकोर्टानें निकाल अप्रामाणिकपणें दिला असा अर्थ तुमच्या लिहिण्यांतून निघतो कीं नाहीं तें बोला !

**केळकर**—तें बोलूं नका तर संपलें. नेणत्या पक्षपाताचा आरोप मीं हायकोर्टावर केला असल्याचें मीं प्रतिज्ञालेखांतच सांगितलें आहे. सरकारी वकिलांनीं झालें तरी यापलीकडे जाऊन जाणतेपणानें पक्षपात केल्याचा अर्थ माझ्या शब्दांतून कसा निघतो व तोच तेवढा अर्थ त्यांतून निघेल दुसरा निघणारच नाहीं, असें शाबीत केलें नाहीं. जज्ज व मॅजिस्ट्रेट यांचा आधार घ्यावयाचा नाहीं तर माझें बोलणेंच खुंटलें. माझ्या शब्दांतून कोणता अर्थ निघतो व कोणता निघत नाहीं हें आपणांस दिसेल तसें आपण ठरवालच. या कामीं तुम्हीच माझे न्यायाधीश व तुम्हीच माझी ज्यूरी आहां.

## अप्रामाणिक टीका कोणती ?

हायकोर्टावर आरोपित केलेला अप्रामाणिकपणा व माझ्या लिहिण्यांतील अप्रामाणिकपणा अशा दोन प्रकारच्या अप्रामाणिकपणाचे आरोप खोडून टाकण्याचा बोजा आपण मजवर टाकीत आहां. पैकीं हायकोर्टाचा निकाल प्रामाणिक कीं अप्रामाणिक हें सर्व खोल जाऊन व सर्व पुरावा पाहून मि. मॉंटीथ व मि. वाइल्ड यांच्या अभिप्रायाचा आधार देऊन मला ठरवावयाचें आहे. तो माझा मार्ग आपण बंद करून टाकला. तो मार्ग मोकळा असता तर पक्षपातबुद्धीशिवाय ज्याला दुसरें कांहीं कारण सांपडूंच शकत नाहीं इतका चुकीचा हायकोर्टाचा निकाल होता असें मीं सिद्ध करून दिलें असतें. स्वतः माझ्या प्रामाणिकपणासंबंधानें मीं येवढेंच सांगतों कीं, या कामीं माझा व्यक्तिशः हितसंबंध कांहींच नाहीं. माझें लिहिणें फक्त सार्वजनिक हितदृष्टीचें होतें. गोष्टी पुण्याजवळच घडलेल्या होत्या. सगळा गांव याबद्दल बोलत होता. ३–४ महिने प्रकरण चालून एक प्रकारचें लोकमत बनलें होतें. या कारणानें इच्छा नसली तरी या अप्रिय व नाजूक विषयावर लिहिणें हें माझें कर्तव्य होतें. हायकोर्टानें दिलेला निकाल अगदीं चूक असें मला नुसतें तेव्हांच वाटत होतें असें नाहीं तर आतां त्याहीपेक्षां अधिक पक्कें वाटतें. हें सर्व असें असतां मीं अजाणत्या पक्षपाताचा आरोप न्यायमूर्तींवर केला यांत माझ्या हातून अप्रामाणिकपणा तो काय झाला ? कोर्टाची बेअदबी ही जवळ जवळ खासगी व्यक्तीच्या बेअदबीसारखीच समजली पाहिजे. एक खासगी व्यक्ति व दुसरा सरकारी अधिकारी असें असलें तरी बेअदबी किंवा बेअब्रू यांच्या

गुन्ह्याच्या कायद्याचें शास्त्र जवळजवळ एकच असणार. खासगी बेअब्रूंत विलायतेंत ज्यूरीनें निकाल करावयाचा असतो, व कोर्टाच्या बेअदबींत तिकडे व इकडे कोर्ट सर्वाधिकारसंपन्न आहे. विलायतेंत ज्यूरीचे बारा लोक हा आरोपी व सरकार यांचें दरम्यान संरक्षणाचा एक प्रकारचा बुरूज असतो. इकडे आम्हांला मात्र तसा बुरूज नाहीं. त्यांतून कोर्टाच्या बेअदबीचा सर्वच प्रकार वेगळा. त्या गुन्ह्याची व्याख्या नाहीं, त्याला ठरीव शिक्षा नाहीं. त्याचें काम चालण्याची ठरीव पद्धत नाहीं. असा तो सर्व आंधळ्या कोशिंबिरीचा खेळ आहे. अशा स्थितींत कोर्टाची बेअदबी मीं केली असें कोर्टानें एकदां मनांत घेतलें तर मी तें नाशाबीत तरी कसें करणार ? लोकांचा न्यायकोर्टावरील विश्वास ढळूं नये, व तसें झाल्यामुळें जनतेला आपण कोणत्याहि राज्यांत निराधार झालों असें वाटूं नये, म्हणून हल्लींसारखे खटले भरण्यांत येतात, असें काल व आज न्यायनिवाडे वाचतांना मला सांगण्यांत आलें आहे. हें म्हणणें सर्व ठीक आहे.

## विश्वास कशानें ढांसळतो ?

पण मी आपणांला असें स्पष्ट सांगतों कीं, माझ्या लिहिण्यापेक्षांहि खुद्द हायकोर्टाच्या निकालानेंच या न्यायपीठावरील जनतेचा विश्वास अधिक ढळून गेला आहे ! न्यायकोर्ट आपल्या हातानेंच आपली बेअदबी करून घेणार असल्यावर वर्तमानपत्रांनीं गप्प बसून तरी काय होईल ! काल आज असें सांगण्यांत आलें कीं, कोणीं न्यायाधीशांना इतर हवीं तीं नांवें ठेवावीं. उदाहरणार्थ, त्यांना कायद्याचें ज्ञान नाहीं, त्यांचा निकाल मूर्खपणाचा आहे, असें टीकाकारांस म्हणतां येईल. पण त्यांना अप्रामाणिक म्हणून त्यांची बेअब्रू करतां कामा नये. प्रस्तुत टीकेंत मीं झालें तरी न्यायाधिशांची बेअब्रू केलेली नाहीं बॉंबे लॉ. रि. २८ पा. १९५ यावरील सुरजमल वि. हॉर्निमन या खटल्यांतील न्या. मू. सर फ्रेंच बीमन यांच्या निकालाचा आधार घेऊन मी असें म्हणतों कीं, बेअब्रूच्या खटल्यांत प्रतिवादीला शब्दाचे अर्थ लावण्याचे कामीं व अनुकूल प्रतिकूल अनुमानें काढण्याच्या कामीं ज्या सवलती मिळतात त्या कोर्टाच्या बदनामीच्या आरोपांत मला आरोपीलाहि मिळाल्या पाहिजेत.

**न्या मार्टेन**—पण तो बेअब्रूचा दिवाणी दावा होता. हा फौजदारी खटला आहे.

**केळकर**—खटला दिवाणी किंवा फौजदारी असला तरी बेअब्रूकारक शब्द कोणते ठरतात व कोणते ठरत नाहींत याविषयींचें मीमांसाशास्त्र एकच असणार.

माझ्या टीकेंतील आधारभूत गोष्टी सर्व खऱ्या आहेत, व त्या हकीकतविरून मीं काढलेलीं अनुमानेंहि सरळ व शुद्ध आहेत, तीं असंभाव्य नाहींत. शिवाय टीका म्हटली म्हणजे तिला थोडीबहुत आजूबाजूला मोकळी जागा वापरण्याला सोडली पाहिजे. आणि माझ्या शब्दांतून माझा अर्थ निघतच नाहीं, व जाणत्या पक्षपाताचाच अर्थ हटकून निघतो, असें दाखविण्यास कोणाला साधन नाहीं.

**न्या. मार्टेन**--अजाणता पक्षपात म्हटलें तरी त्याचा अर्थ हाच ना कीं काळ्या-गोऱ्यांचा खटला निघाला म्हणजे गोऱ्या न्यायाधिशांना न्यायबुद्धीचा निकाल देतां येऊं नये असा त्यांचा स्वभाव किंवा त्यांचें मनच बनलेलें असतें!

**केळकर**--होय. मी तसेंच म्हणतों. न्यायाधिशानें स्वाभाविकपणें अजाणता पक्षपात केला असें म्हटलें तर त्यांत काय बिघडलें ? न्यायाधीश झाले तरी माणसेंच आहेत कीं नाहींत ? आणि अजाणता पक्षपात हातून होणें हा मनुष्यस्वभाव नाहीं म्हणण्यांत काय अर्थ आहे ? मनुष्यप्राण्याच्या चुका न्यायाधिशांच्याहि हातून होतीलच. न्यायाधीश हे ‘ सुपरमन ’ आहेत म्हणजे स्वर्गांतून अवतरतात असें थोडेंच आहे ! हायकोर्टावरील अजाणत्या पक्षपाताचा आरोप रतिमात्रहि कमी करण्यास किंवा मागें घेण्यास मी बिलकूल तयार नाहीं.

**न्या. मार्टेन**--हिंदी व युरोपियन लोक यांच्या वादांत निःपक्षपातीपणाचा निकाल देण्याला इंग्रज लोक अपात्र आहेत असें तुम्ही म्हणतां. पण हिंदी न्यायाधीश असतील तर तुम्ही काय म्हणाल ?

**केळकर**--हल्लीं सारखा अन्याय त्यांनीं केला तर त्यांच्यावरहि मी अशीच टीका करीन. ते हिंदी म्हणून मी कांहीं कमी करणार नाहीं.

## खरा न्याय कसा मिळणार ?

**न्या. मार्टेन**--मग या जगांत हिंदी व युरोपियन उलट सुलट बाजूला असले तर त्याचा निकाल लावावयाचा तरी कसा ?

**केळकर**--विलायतेप्रमाणें दिवाणी व फौजदारी सर्व खटल्यांत ज्यूरीचा अधिकार लोकांना देऊन ! हल्लीं ज्यूरी आहे पण ती फक्त फौजदारी खटल्यांत त्यांतूनही कांहीं थोड्या जिल्ह्यांत व त्यांतूनहि जातिजातिविषयक संमिश्र ज्यूरी असा प्रकार आहे, तो बदलला पाहिजे. कोर्टांतील सर्व दावे ज्यूरीपद्धतीनें म्हणजे पंचायतपद्धतीनें निकालांत निघाले पाहिजेत व ज्यूरी सर्व सरकट निवडली पाहिजे. त्यांत काळ्यानें काळा मागावा, व गोऱ्यानें गोरा मागावा, असा अधि-

कार असूं नये. ( कांहीं संख्येपर्यंत चिठी निघालेली ज्यूरर व्यक्ति मला नको असें म्हणण्याचा मात्र अधिकार असावा. ) हल्लींच्या सरन्यायाधिशांचें मतहि असेंच आहेसें दिसतें. विलायतेंत झालें तरी ज्यूरीच्या निकालांना लोक नांवें ठेवीत नाहींत असें नाहीं; पण अखेर आपल्याला न्याय आपल्याच लोकांनीं दिला, मग तो बरा असो वाईट असो, इतकें तरी समाधान उरतें. शिवाय असें असूनहि इंग्लंडांतहि ज्यूरी किंवा न्यायाधीश यांच्या चुका झाल्या तर वर्तमानपत्र-कर्ते त्यांना नांवें ठेविल्याशिवाय रहात नाहींत. नुकतेंच न्या. मॅकार्डी यांनीं नायर-ओडवायर खटल्यांत जें अप्रशस्त वर्तन केलें त्याबद्दल मँचेस्टर गार्डियन व इतर पत्रें यांनीं त्याच्यावर टीका केली ती केसरीच्या प्रस्तुत टीकेहून अधिक कडक आहे. तात्पर्य, न्यायाच्या पद्धतींचा प्रश्न शिल्लकच आहे; पण न्यायपद्धति चांगली असली तरी त्यांत पक्षपाताचे प्रकार केव्हां घडणारच व ते घडले म्हणजे लोक टीका करणारच

**न्या. मार्टेन**--तुम्ही म्हणतां तसे प्रकार विलायतेंत शक्य नाहींत. कारण विलायतेंत इथल्यासारखी जातींची खिचडी नाहीं. म्हणून तेथें न्यायाधिशांकडून जातिविषयक पक्षपात होण्याचा संभव नाहीं. इकडे अनेक जातींची खिचडी असल्यामुळें न्यायाधिशांचें काम अवघड होऊन बसतें.

**केळकर**--आपण म्हणतां तें मला मान्य नाहीं. विलायतेंत जन्मसिद्ध जातींची खिचडी नसली तरी, इंग्रज, स्कॉच, आयरिश वगैरे जातींच्या मनांत स्वाभिमानाच्या तीव्र भावना असतातच. मी १९१९ सालीं विलायतेस गेलों होतों व मी म्हणतों ही गोष्ट तेथें डोळ्यानें पाहिलेली आहे.

**न्या. मार्टेन**--पण तो वाद पुरे झाला.

## वर्तमानपत्रें व लोकमत

**केळकर**—माझ्या लेखांत मिथ्या विधान नाहीं ही पहिली गोष्ट. त्या विधानावरून पुढें मीं अनुमानें काढलीं तीं युक्तिसिद्ध आहेत, चुकीचीं नाहींत ही दुसरी गोष्ट. इतकें झाल्यावर मग त्या विधानांतून काय ध्वनि निघतो हें पाहण्याचें काम माझें नाहीं; व न्यायमूर्तींना अप्रामाणिकपणाचा आरोप लावण्याचा ध्वनि त्यांतून निघाला तरी, मी म्हणतों तो माझा अप्रामाणिकपणा ठरत नाहीं. माझ्या अप्रामाणिकपणाचा आरोप काय तो सरकारी वकिलांनीं प्रत्यक्षपणें सिद्ध केला पाहिजे. काल कोर्टाच्या बेअदबीच्या तत्त्वासंबंधानें जे उतारे वाचण्यांत

आले ते मला अमान्य नाहींत. वर्तमानपत्रकारांचें स्वातंत्र्य झालें तरी तें इतर कोणाहि व्यक्तीच्या किंवा अधिकाऱ्याच्या स्वातंत्र्याहून अधिक नाहीं. जो तो आपल्या हक्कमर्यादेपुरता स्वतंत्र असतो. एकानें दुसऱ्यावर अतिक्रमण करूं नये पण सामान्य मनुष्यावर जी टीका केल्यानें बेअब्रूचा गुन्हा घडत नाहीं ती टीका न्यायाधीशावर केल्यानेंहि बेअब्रूचा गुन्हा घडत नाहीं. न्यायाधीश लोकांनीं सामान्य समंजस माणसाप्रमाणें वागण्यास व टीका करून घेण्यास मनाची तयारी ठेविली तरच कोर्टाविषयीं खरी आदरबुद्धि व त्यांच्या न्यायकार्यावर लोकांचा विश्वास बसेल. सामान्य मनुष्याचे सामान्य दोष न्यायाधिशांतहि असतात असें मानणें गैर नाहीं व टीकाकारांच्या टीकेपेक्षां आपल्या चुकीच्या निकालांनींच आपण हा विश्वास ढळण्यास अधिक कारणीभूत होतों हें त्यांनीं लक्षांत ठेवावें. ज्यावर मीं टीका केली त्या निकालाइतका चुकीचा, सर्वस्वीं अयोग्य, असा निकाल देऊन वरती लोकांचा विश्वास ढळूं नये म्हणून बेअदबीचा खटला करण्यांत येतो, त्यानें काय साधणार ? लोकांचा विश्वास ढळला तो निकाल ऐकून परस्पर ढळला. मीं या बाबतींत टीका करून फक्त लोकमत प्रगट केलें. आतां मी वर्तमानपत्रकार नसतों तरीहि या निकालाविषयीं हेंच बोललों असतों; मात्र तें खाजगी संभाषणांत बोललों असतों. पण **लोकमताला वाचा फोडण्याकरितांच वर्तमानपत्राचा जन्म आहे.** मनुष्य मेला तो विसरून गेला, ज्याची गोळी लागली तो सुटून गेला ! मृताच्या कुटुंबाला नुकसानभरपाई तरी मिळावी. पण तें काम म्हणे वरिष्ठ सरकारचें! मेलेला मनुष्य हा मुंबई सरकारचा प्रजाजन नव्हता काय?

**न्या. मार्टेन**—हें पहा, या विषयाची चर्चा येथें आम्हांला नको. त्यांत या कोर्टाचा काय संबंध !

**केळकर**—संबंध हाच कीं लोकांचा न्यायावर विश्वास बसावा म्हणतां तो कसा बसणार हें या हकीकतीनें मीं दर्शविलें. सेशन्स जज्जाच्या शिफारशीप्रमाणें वॉकर यानें अविचार व बेसावधगिरी केल्याचा गुन्हा शाबीत धरून थोडी कां होईना, पण हायकोर्टानें त्याला शिक्षा दिली असती तर लोकांचें थोडेंबहुत समाधान झालें असतें. वॉकर फांसावर चढला पाहिजे अशी मागणी कोणींच केली नाहीं, व नसती. पण ज्यूरीनें त्यावर कोणताहि गुन्हा शाबीत नाहीं तो सर्वस्वीं निर्दोषी आहे, असें ठरवून सोडून दिलें हेंहि लोकांना पटलें नाहीं. ज्यूरीच्या निकालाचा हा अडथळा मार्गांत नसता तर स्वतः हायकोर्टानें वॉकरला

थोडीतरी शिक्षा दिली असती असा माझा भरंवसा आहे. तीच गोष्ट ज्यूरीचा निकाल पुढें असतांहि त्यांनीं केली असती, तर हलक्या पारड्यांत पासंगापुरतें वजन घालून त्यांनीं ताजव्याचा खोटेपणा काढून टाकला असें झालें असतें. तें करण्याला जी एक न्यायबुद्धीची आंतून उठावणी लागते ती तेथें दिसली नाहीं इतकाच हायकोर्टाला मीं येथें दोष दिला. हें ज्यामुळें घडलें तो पक्षपात अजाणतां होता. स्वजातीचा पक्षपात खरा होता तो ज्यूरीच्या निकालांत, असा माझा लिहिण्याचा आशय होता. सेशन्स जज्जाच्या व मॅजिस्ट्रेटच्या निकालानें आठदहा ठळक प्रश्न हायकोर्टाच्या डोळ्यापुढें उभे राहण्यासारखे होते. व त्यांचीं उत्तरें समर्पक देऊन मग त्यांनीं असा निकाल दिला असता तर कोणीं असें लिहिलें नसतें. माझ्या अहेतुक शब्दांचा स्वाभाविक परिणाम म्हणून तो मला भोंवावा, आणि हायकोर्टाच्या हयगयीच्या कृत्याचा परिणाम त्याला कां भोंवूं नये?

## बेअदबीच्या कार्याची चर्चा

असो. आतां या बेअदबीच्या कायद्यासंबंधानें थोडें सांगतों. हा कायदा निर्गुण, निराकार व म्हणून मोठा गमतीचा आहे. असें असून त्याला शिक्षा पाहावी तर अमर्यादित. न्यायकोर्टाला ही केवढी सत्ता!

**न्या. मार्टेन**--होय, ही सत्ता फार मोठी आहे, म्हणूनच तिचा उपयोग फार जपून केला जातो.

**केळकर**--बॉंबे लॉ-रिपोर्टर २५ पान १९ यांतील एका अवतरणाचा आधार घेऊन मी असें म्हणतों कीं, केवळ सार्वजनिक हितदृष्टीनें जर न्याय-कोर्टाच्या निकालावर टीका केली असेल तर तो बेअदबीचा गुन्हा होत नाहीं. माझ्या टीकेंत सार्वजनिक हितबुद्धीशिवाय मुळांत दुसरें काय आहे? हें म्हणणें आपणांस पटलें तर, पूर्वीं एका खटल्यांत आपण निकाल दिल्याप्रमाणें, या प्रसंगींहि बेअदबीच्या कायद्याचा पुनः एकदां नुसता स्पष्ट खुलासा लोकांच्या समजुतीकरितां करून मला दोषमुक्त करावें. रास्त टीका व अप्रामाणिक टीका यांतील अंतर केव्हां सुटलें, व अतिक्रमण नक्की कोठें झालें, हें ठरविणें कठीण असल्यानें आमच्यासारख्या टीकाकारांना मर्यादेची किंचित् तरी सवलत मिळाली पाहिजे. पण ती न देतां कायद्याच्या नांवानें करडा अंमल झाल्यास, व काळ्या

गोऱ्यांच्या विरोधी हितसंबंधांत न्यायकोर्टांनीं अधिक काळजी न घेतल्यास, लोकांचा विश्वास न्यायकोर्टांवर खचित राहणार नाहीं.

शेवटीं आतां या गुन्ह्याच्या शिक्षेसंबंधानें दोन शब्द सांगून मी आपलें भाषण पुरें करतों. हा मुद्दा नाजूक तर खराच, पण तो आतांच सांगितला पाहिजे. न्यायकोर्टाच्या बेअदबीच्या कायद्यांतील शास्त्री व सिद्धान्तवादी, मनाशीं अशी कल्पना बांधून बसलेले दिसत आहेत कीं, बेअदबीच्या पापाला माफी-शिवाय दुसरें प्रायश्चित्त नाहीं. पण हें तत्त्व सर्वस्वीं अन्यायाचें आहे. इतर कोणत्याहि गुन्ह्यांच्या शास्त्रार्थांचा आधार याला मिळणार नाहीं. पिनल कोडां-तील काय, किंवा इतर कोणताहि काय, गुन्हा झाला तरी त्याला लहान किंवा मोठी पण निश्चित शिक्षा सांगितलेली असते. यामुळें आरोपीची इच्छा असेल तर त्याला ती शिक्षा भोगल्यानें, अप्रामाणिकपणाचा डिफेन्स देणें किंवा माफी मागून स्वाभिमानहानि करणें या गोष्टी टाळतां येतात. पण हा बेअदबीचा गुन्हा माफी मागितल्याशिवाय निस्तरतच नाहीं असें मानलें, व माफी मागण्यास कोणी मनानें तयार नसला, तर त्यानें कोर्टाची इच्छा असे तोंपर्यंत—म्हणजे कदाचित् आरोपीच्या जन्मभरहि—तुरुंगांत राहिलें पाहिजे ! मतस्वातंत्र्यावर हा कोण जुलूम ! जन्मठेप काळेपाण्याची शिक्षा म्हटली तरी तिची मुदत वीस वर्षें मानली जाते. बरें, 'कांद्याकरितां भिसमिल्ला' म्हणजे कोर्टाच्या बेअदबी-करितां जन्मभर तुरुंगांत कोणीं रखडावें, जुलमानें माफी लिहून घेतील तर ती त्यांची त्यांनाच लखलाभ असो ! अशा विचारानें कोणी माफी देण्यास अखेर तयारहि होईल. पण ती केवळ शाब्दिक, औपचारिक, खोटी, ढोंगी, मनाला न पटलेली अशीच असणार ! असल्या माफ्या अधिकाराच्या जोरावर वाटतील तितक्या कोर्टास मिळवितां येतील. पण त्यांनीं त्यांचा मानमरातब किंवा त्यांच्या न्यायकार्यावरील लोकविश्वास या गोष्टी कोर्टांना कशा लाभणार ? म्हणून या प्रकरणीं माझें असें म्हणणें आहे कीं, ज्याच्या योगानें कोर्टाचा अधिकार व आरोपीची सदसद्विवेकबुद्धि व स्वाभिमानबुद्धि यांचा मेळ पडूं शकतो, अशी निश्चित व समर्याद, मग ती कोणतीही असो, शिक्षा देणें हेंच युक्त होईल. अशा शिक्षेनें दोघांचेंहि इष्ट कार्य घडण्यास वाव राहील; व न्यायपीठ हें अमर्यादित राजसत्तेचें प्रतीक होय, व ही राजसत्ता देखील ईश्वरप्रणीत, अशा प्रकार जुन्या काळच्या वेड्या समजुतींचें सल कोर्टाच्या बेअदबीच्या कायद्याच्या पोटांत अजून जिवंत राहिलेलें आहे तेंहि निघून जाईल.

## अखेरचे शब्द

शेवटीं मी माझें म्हणणें फिरून एकदां स्पष्ट करतों. तें असें:--माझ्या लेखापैकीं बराचसा भाग म्हणजे विद्यमान न्यायपद्धतीवरील माझी टीका रास्त हक्काची आहे. जाणत्या पक्षपाताचा आरोप मीं केला नाहीं हें प्रतिज्ञेवर सांगतों. नेणत्या पक्षपाताचा आरोप केला हें मीं प्रतिज्ञालेखांतच कबूल केलें आहे. तें माझें मत कायम आहे व बदलणें शक्य नाहीं. असलें मत प्रगट करणें यानेंहि बेअदबी होते म्हणून तें प्रगट करण्याची मला परवानगी नाहीं म्हणाल तर आपण न्यायबुद्धीनें या प्रकरणीं जी शिक्षा योग्य म्हणून ठरवून द्याल ती मी आनंदानें सोशीन. कारण जन्मभर जें काम मीं खुषीनें पत्करलें व केलें म्हणजे लोकमत दिसतें तें माझ्या बुद्धीप्रमाणें वर्तमानपत्रें वगैरेंतून प्रगट करणें-तें करण्याच्या अनुषंगांत अशा तऱ्हेची जोखीम असणारच हें मला पूर्णपणें माहीत आहे. तथापि ही गोष्ट देखील कोर्टाचा अधिकार जुमानूं नये किंवा घडलेल्या कृत्यांत पुनः आग्रहानें भर टाकावी, या बुद्धीनें केली नाहीं. न्यायकोर्टाचा अधिकार व कर्तव्य हीं दोनहि उच्च दर्जाचीं असल्यानें त्यांना लोकांनीं योग्य तो मान दिला पाहिजे हें मी जाणतों, परंतु लोकमतप्रदर्शक वर्तमानपत्रकार या नात्यानें मला ही टीका करावी लागली, व या नात्यानें वर्तमानपत्रकारालाहि कांहीं विशेष हक्क असतात ते न्यायपीठापुढें व जनतेपुढें यावे एवढाच माझ्या वरील भाषणांतील मुख्य हेतु आहे.

## सरकारी वकिलाचें उत्तर

अशा रीतीनें केळकर यांचें भाषण अडीच वाजण्याचे आधीं कांहीं थोडा वेळ संपलें. ते खालीं बसल्यावर सरकारी वकील पाटकर हे उठून म्हणाले, "मीं नेमकीं आक्षिप्त वाक्यें काढून दाखविलीं नाहींत असें केळकर म्हणाले पण तशीं दाखविलीं असतीं तर तेच उलट म्हणाले असते, 'तुटक वाक्य घेऊन काय उपयोग ! सर्व लेख घेतला पाहिजे' केळकरांचे बाजूला झुकता कांटा कितीहि दिला तरी त्यांच्या लेखांत कोर्टाची बेअदबी व्हावी असा अर्थ निघाल्याशिवाय रहातच नाहीं. न जाणत्या पक्षपाताचा आरोप स्वतः त्यांनींच कबूल केला आहे. पण न जाणता पक्षपात याचा अर्थ 'न्याय बरोबर न देतां येण्यासारखें विकृत मन'. पण केवळ अजाणत्या पक्षपाताचा आरोप येथें नाहीं, जाणत्या पक्षपाताचा आरोप येथें आहे, असें मी म्हणतों. या खटल्यांतल्या

न्यायाधीशांना जज्ज व ज्यूरी या दोघांचेहि अधिकार आहेत असें केळकर म्हणाले, व त्याप्रमाणें मीहि म्हणतों. बेअदबीचा अर्थ केळकरांच्या लेखांतून निघतो कीं नाहीं, व निघाला तर तो गुन्हा आहे कीं नाहीं, हें कोर्टानेंच ठरवावें. "

इतकें झाल्यावर या खटल्याच्या सुनावणीचें काम संपलें. नंतर ' विनोद ' पत्रावरील खटल्याची सुनावणी सुरू झाली व ती मधल्या सुटीनंतर सुमारें साडेचाराच्या सुमाराला संपली. त्या नंतर न्या. मार्टेन व किंकेड यांनीं जागचे जागींच एकमेकांचा सल्ला घेऊन प्रथम न्या. मार्टेन यांनीं व नंतर न्या. किंकेड यांनीं आपआपले निकाल तोंडानें सांगितले व ते सरकारी शार्टहँड रिपोर्टरानें उतरून घेतले. निकाल सांगतांना केळकर स्वतः कोर्टांतच बसले असल्याकारणानें त्यांना उद्देशून असें कोर्टानें वेगळें कांहीं भाषण केलें नाहीं. निकाल सांगत असतां, शिक्षा सांगण्यास सुरुवात झाली तेव्हां सर्व कोर्टांत इतकी एकाग्रता झाली होती कीं, टांचणी खालीं पडती तरी ऐकूं येती; व शिक्षा सांगून पुरी होतांच एकदम गर्दी मोडण्याला सुरुवात झाली व लोकांच्या जाण्याचा गोंगाट इतका होऊं लागला कीं, पुढें न्या. किंकेड हे आपला निकाल तोंडानें सांगूं लागले तो एकूं जाण्याचीहि मुष्कील पडली !

न्या. मार्टेन व न्या. किंकेड यांचे निकाल पुढें दिले आहेत. दोनहि निकालांत शब्दयोजना किंचित् वेगवेगळी असली तरी **पांच हजार रुपये दंड व दोनशें रुपये कोर्टखर्च** अशी शिक्षा देण्यासंबंधानें उभयतांचें एकमतच होतें. दंडाची रक्कम दुसऱ्याच दिवशीं सकाळीं भरण्यांत आली.

## न्या. मार्टेन यांचा निकाल

जस्टिस मार्टेन यांनीं कोर्टाचा निकाल सांगतांना प्रथम मूळ खटल्याची थोडक्यांत हकीकत सांगितली. नंतर ज्यूरीनें आरोपी ' निर्दोषी ', असा निकाल दिला तरी सेशन्स जज्जाला आरोपीकडून पि. को. कलम ३०४ अ प्रमाणें अविचाराचें व निष्काळजीपणाचें कृत्य घडलें असें वाटून त्यांनीं हायकोर्टाकडे खटला धाडला. त्यावर चीफ जस्टिस यांनीं तीन प्रकारांपैकीं मुद्दाम नेम धरून गोळी झाडणें, किंवा गांवकऱ्यांना भिवविण्याकरितां कशीतरी हवेंत बंदूक उडविणें, या दोनहि गोष्टी असंभवनीय वाटतात असा अभिप्राय देऊन ज्याअर्थी अमुकच एक प्रकार घडल्याचें पुराव्यावरून सिद्ध होत नाहीं; त्याअर्थी

ज्यूरीनें दिलेला निकाल आम्हीं मान्य करतों व आरोपीस दोषमुक्त करतों असा निकाल दिला असें सांगितलें.

नंतर जस्टिस मार्टेन म्हणाले—अपेलेट कोर्टाचा निकाल बरोबर आहे कीं चुकीचा आहे हें पाहणें आपलें काम नाहीं. केसरींतील लेखानें कोर्टावर अप्रामाणिकपणाचा अथवा लांचलुचपतीचा आरोप केला कीं काय एवढेंच पाहावयाचें आहे. त्याचा विचार करण्यापूर्वी '**कोर्टाची बेअदबी**' म्हणजे काय हें सांगितलें पाहिजे. 'कोर्टाची बेअदबी' हा व्यक्तिशः कोणा जज्जाच्या मानापमानाचा प्रश्न नाहीं. हा जनतेच्या संरक्षणाचा प्रश्न आहे, असें इंग्लिश खटल्यांत दर्शविलेलें आहे. कोर्टाच्या बेअदबीचे दोन प्रकार असतात. कज्जा चालू असतां त्यावर टीका करून न्यायाचे कामांत अडथळा करणें हा पहिला होय, व निकालानंतर जज्जांच्यावर भलते आरोप करणें हा दुसरा प्रकार होय. प्रस्तुतच्या खटल्यांत पहिला प्रकार घडला नसून दुसऱ्या प्रकाराचाच विचार करावयाचा आहे.

खटल्याच्या निकालावर प्रामाणिक टीका करावयाला कोणालाहि अधिकार आहे; मग तो वृत्तपत्रकार असो वा नसो. मात्र यांत सामान्य व्यक्तींना जेवढा अधिकार आहे त्याहून पत्रकर्त्यांना अधिक सवलत नसते हें २३ मुंबई (पिकथॉल यांचा खटला ) यांत जस्टिस क्रंप यांनीं दाखविलें आहे.

प्रतिवादीचें म्हणणें असें आहे कीं, आक्षिप्त लेखावरून फार तर जज्जांचा आरोपीच्या बाजूला न कळत कल झाला असेल असें म्हणतां येईल यासंबंधांत २४ मुंबई–पृष्ठ १२८ यांत सगळ्या आधारांचा विचार करून निष्कर्ष काढला आहे. ३३ मुंबई–पृष्ठ २४० हा आधार त्यासच पुष्टि देतो. आक्षिप्त लेखांत "युरोपिअनांच्या विरुद्ध चालणारे खटले हे 'फार्स' आहेत; हा मायावीपणा आहे. जज्जांनीं दिवसाढवळ्या तर्कशास्त्राचा खून केला; तराजूचें एक पारडें गोरें व एक काळें असलें म्हणजे गोरें पारडें जड ठरून खालीं बसनें,यांत नवल तें काय !" अशीं विधानें आहेत. त्यानंतर 'खोट्या मापा' नें न्याय दिला जातो असें म्हणून "लोहगांवास स्तंभ उभारून त्यावर या खटल्याची हकीकत कोरून ठेवावी, म्हणजे ब्रिटिश राज्यांत हिंदी प्रजेच्या जिवाची किंमत किती मानली जाते आणि न्याय किती निःपक्षपातानें दिला जातो हें समजेल" असेंहि म्हटलें आहे.

आपल्या प्रतिज्ञापत्रकांत व बचावाच्या भाषणांत प्रतिवादी प्रतिज्ञेवर असें

सांगतों कीं, " हायकोर्टजज्जावर जाणून बुजून पक्षपात केल्याचा आरोप करण्याचा आपला उद्देश नव्हता; तराजूचीं पारडीं समतोल राखण्याचा न्यायमूर्तींनीं प्रयत्न केला; परंतु सेशन्स कोर्टांत ज्यूरीनें आरोपिस अनुकूल निकाल देऊन त्याचें पारडें आधींच जड करून ठेवलें असल्यानें हायकोर्टाला तें समतोल करतां आलें नाहीं. " प्रतिवादीचें हें म्हणणें मला मान्य करवत नाहीं. जज्जांनीं जाणूनबुजून पक्षपात केला; वॉकर हा निर्दोषी आहे असें त्यांस वाटलें म्हणून त्यांनीं त्यास सोडलें नसून तो गोरा आहे म्हणून त्यास सोडलें असें भासविण्याचा या लेखाचा उद्देश दिसतो. बरें, जज्जांचे हांतून नकळत पक्षपात झाला एवढाच या लेखाचा अभिप्राय धरला तरी तेवढ्यानें प्रतिवादीचा फारसा बचाव होऊं शकत नाहीं. जे जज्ज आपलें बुद्धिसर्वस्व खर्च करून रोजच्यारोज निःपक्षपातीपणानें न्यायदानाचें काम करीत असतात त्यांच्यावर होणारा शिव्यांचा वर्षाव बंद करावा हें जनतेच्या हिताच्या दृष्टीनेंच इष्ट आहे, आणि तेवढ्यासाठींच 'कोर्टाच्या बेअदबी 'च्या हत्याराचा कोर्टाकडून उपयोग होत असतो.

त्यांतूनहि हल्लींच्या दिवसांत कोर्टावर कामाचा बोजा जबर असतो. शिवाय प्रस्तुत काळीं युरोपियन व इंडियन, हिंदु व मुसलमान, ब्राह्मण व ब्रह्मद्वेष्टे अशा विविध वर्गांतून एकमेकांविषयीं धुसफूस चालू असून हातघाईचेहि प्रसंग येतात. अशा परिस्थितींत न्यायाधिशांच्या निःपक्षपातीपणावर पडणारे अप्रशस्त घाले बंद पाडणें जरूर आहे.

श्रीयुत केळकर यांनीं आपल्या तीन तासांच्या भाषणांत अनेक मुद्यांचा खल केला. त्यांतले बरेच मुद्दे अप्रस्तुत असल्यानें प्रस्तुत मुद्द्यावरच नजर ठेवण्यास त्यांस आम्हीं बजावलें. हें भाषण ऐकूनहि आमचें असें मत झालें आहे कीं, या लेखानें ' **कोर्टाची बेअदबी** ' झाली आहे व तो गुन्हा फारच गंभीर स्वरूपाचा आहे त्यावर निकाल देण्यापूर्वी केळकर यांच्या हातून एकदां असाच गुन्हा घडला होता ही गोष्ट दृष्टीआड करतां येत नाहीं. तथापि त्या गोष्टीला सोळा वर्षें होऊन गेलीं हें आमच्या लक्षांत आहेच. शिवाय पूर्वीच्या लेखांतल्याप्रमाणें प्रस्तुतच्या लेखांत न्यायाधिशावर वैयक्तिक आरोप केलेले नाहींत हेंहि आमच्या नजरेस आल्यावांचून राहिलें नाहीं. तथापि या कज्जांत शिक्षा भरपूर दिली पाहिजे असें आम्हांस वाटतें. याकरितां आम्ही असें फर्मावितों कीं प्रतिवादी केळकर यांनीं ५००० रुपये दंड आणि २०० रुपये कोर्टखर्च द्यावा. सदरहू रक्कम वसूल न झाल्यास त्याबाबत पुनः दुसरा हुकूम देण्यांत येईल.

## न्या. किंकेड यांचें जजमेंट

'केसरीवरील' हायकोर्टाच्या बेअदबीच्या खटल्यांत न्या. किंकेड यांनीं आपला निकाल स्वतंत्र सांगितला त्याचा सारांश असाः—

न्या. मार्टेन यांनीं दिलेल्या जजमेंटमध्यें मला फारशी भर घालावयाची नाहीं. सरन्यायाधीश लॉर्ड जस्टिस रसेल यांनीं सन १९०० मधील 'सरकार वि. ग्रे' या सुप्रसिद्ध खटल्यांत ( २ क्वीन्स बेंच ३६ मध्यें ) कोर्टाच्या बेअदबीच्या गुन्ह्याची व्याख्या केली आहे ती अशी " कोर्टाबद्दल अगर कोर्टाच्या न्यायाधिशाबद्दल तिरस्कार उत्पन्न करण्यासारखें किंवा त्यांच्या सत्तेला कमीपणा आणण्यासारखें कोणतेंहि कृत्य करणें किंवा लेख प्रसिद्ध करणें ही कोर्टाची बेअदबी होय." यापुढें हे सरन्यायाधीश लिहितात कीं, " अशा परिस्थितीत व अशा उद्देशानें प्रसिद्ध केलेल्या प्रतिकूल टीकेकडे कायद्यानें बारकाईनें पाहूं नये. पण अशा प्रसंगीं वृत्तपत्रांचें स्वातंत्र्य हें प्रजेच्या व्यक्तिस्वातंत्र्यापेक्षां जास्त नाहीं आणि कमीहि नाहीं." आणि शेवटीं त्या खटल्यांत आक्षेपित लेखास उद्देशून ते लिहितात कीं, "न्यायाधिशाची न्यायाधीश या नात्यानें त्यांत ग्राम्य निंदा केली आहे हें मी पुनः सांगतों."

हीं विधानें लक्षांत घेऊन मी प्रस्तुत प्रकरणाचा विचार करतों. वॉकर नांवाच्या एका सोल्जरावर लोहगांव येथें केलेल्या गुन्ह्याबद्दल ३०४ कलमाखालीं पुण्यास ज्यूरीपुढें खटला निघाला. ज्यूरीनें त्यास एकमतानें निर्दोषी ठरविलें. ज्यूरीच्या या एकमुखी निकालावर सेशन जज्जाचें भिन्न मत पडल्या-मुळें त्यानें क्रि. प्रो. ३०७ कलमान्वयें हा खटला हायकोर्टाकडे धाडला. तो सरन्यायाधीश व न्या. फॉसेट यांच्यापुढें निघून त्यांनीं असा निकाल दिला कीं, हायकोर्टानें ढवळाढवळ करण्याइतका ज्यूरीचा निकाल विपरीत नाहीं.

या खटल्यांतील मुद्द्याच्या या गोष्टी झाल्या. आतां प्रतिवादी केळकर यांच्या संपादकत्वाखालीं निघणाऱ्या 'केसरी' पत्रांत आलेल्या आक्षेपित लेखाचा विचार करूं. त्यांत त्यांनीं घडलेल्या गोष्टी देखील बरोबर दिलेल्या नाहींत. ज्यूरीपुढें आरोपीवर पिनल कोडाच्या ३०४ कलमान्वयें सदोष मनुष्यवधाचा आरोप ठेविला होता, पण केळकरांनीं आपल्या लेखांत बऱ्याच ठिकाणीं त्याचा खुनी आरोपी असा उल्लेख केला आहे. दुसरे ठिकाणीं या केसरीकर्त्यांनीं आरोपीला युरोपियन ज्यूरीनें निर्दोषी ठरविलें असें म्हटलें आहे. पण वस्तुतः ज्यूरीमध्यें ४ युरोपियन होते व एक हिंदी होता, आणि तिनें एकमतानें

आरोपांतून निर्दोषी ठरविलें. ही गोष्ट या कोर्टांत केळकरांचे नजरेस आणून दिली असतां त्यांनीं येवढाच खुलासा केला कीं, एक हिंदी ज्यूरर होता तो सरकारी पेन्शनर होता. केळकरांनीं या खटल्यांत आरंभापासून अखेरपर्यंत कशी बेमूर्वतखोर वृत्ति ठेविली त्याचें हें एक उदाहरण म्हणून मी नमूद करीत आहें.

आक्षेपित लेख समग्र वाचून हाच निष्कर्ष निघतो कीं, जो मनुष्य, खटल्यांतील खरी वस्तुस्थिति माहीत नसतां, हा लेख वाचील, त्याच्या मनांत केळकरांनीं वर्णन केल्याप्रमाणें वागणाऱ्या जज्जांबद्दल त्वेष, तिरस्कार व तुच्छता या भावना तीव्रतेनें जागृत होतील. जज्जांवर जातिविषयक पक्षपाताचा आरोप त्यांत केला आहे. याबद्दल खुलाशादाखल केळकर यांनीं असें समर्थन केलें कीं, ते अजाणतपणें पक्षपातग्रस्त होते. पण माझ्या सहकारी न्यायमूर्तींनीं सांगितल्याप्रमाणें जज्जाचा पक्षपात हा न कळत असो व जाणूनबुजून केलेला असो, पक्षकाराच्या दृष्टीनें त्यांत कांहींच फरक होत नाहीं. कोणत्याहि तऱ्हेचा पक्षपात झाला तरी तो त्याच्या हितसंबंधास सारखाच विघातक होणार. भाषांतरांत लेखकाच्या उद्दिष्ट अर्थाचें कदाचित् विकृत स्वरूप झालें असेल अशा आशेनें मीं मूळ पत्राच्या अंकांतून तो लेख वाचला, आणि तो काळजीपूर्वक वाचून, माझें असें मत झालें कीं, मूळ लेख तीव्र करण्याच्या ऐवजीं एके ठिकाणीं तरी, म्हणजे "मायावीपणा" याला 'इल्युझरी मेथड्स' असा पर्याय योजल्यानें पत्रकर्त्यांच्या मनांतील रोख भाषांतरांत थोडा सौम्यच झालेला आहे. मी पुण्याला पुष्कळ दिवस न्यायाधीशाचें काम करीत होतों व त्या वेळीं टिळकांनीं चालविलेल्या या वृत्तपत्राची मला चांगलीच माहिती होती. या पत्राइतका मोठा वाचकवर्ग हिंदुस्थानांतील दुसऱ्या कोणत्याही पत्राला नाहीं असें म्हणण्यास बिलकुल हरकत नाहीं. पत्राच्या प्रत्यक्ष खपापेक्षां वाचकांची संख्या कितीतरी पटींनीं अधिक असते. सरन्यायाधीश व न्या. फॉसेट यांच्यावरील केळकरांची टीका कमींत कमी एक लक्ष लोकांनीं वाचली असेल असें म्हणण्यांत मुळींच अतिशयोक्ति नाहीं. लॉर्ड चीफ जस्टिस यांनीं म्हटल्याप्रमाणें "अशा परिस्थितींत व अशा उद्देशानें प्रसिद्ध केलेल्या प्रतिकूल टीकेकडे कायद्यानें बारकाईनें पाहूं नये" हें खरें; पण त्याच न्यायमूर्तींच्या म्हणण्याप्रमाणें, केळकरांचा हा लेख म्हणजे 'टीका' नव्हे. ती व्यक्तिशः सरन्यायाधीश व न्या. फॉसेट यांची न्यायाधीश या नात्यानें ग्राम्य निंदा आहे.

यासंबंधांत यापूर्वी याच कोर्टाची बेअदबी केल्यामुळें केळकरांना एकदां शिक्षा झालेली आहे हेंहि मी विसरूं शकत नाहीं. केळकरांना ५००० रु. दंड व २०० रु. खर्चादाखल देण्याबद्धल झालेला हुकूम मलाहि मान्य आहे.

---

## लोहोगांव येथें घडलेली हकीकत

[ जिल्हा मॅजिस्ट्रेट यांच्या जजमेंटावरून घेतलेली ]

ता. २९ नोव्हेंबर १९२३ रोजीं श्रॉपशायर लाइट इन्फन्ट्रीचे चौघे सोजीर लोहोगांव येथें शिकारीला गेले. त्यांचेजवळ शिकारीचा परवाना होता. या शिकारी मेळ्याचा मुख्य अधिकारी कॉर्पोरल शार्मन नांवाचा होता. इतर तिघांचीं नांवें रिचर्ड वॉकर, जॉन व्हाइट व जॉन वॉकर, अशीं होतीं. त्यांचेजवळ एक ट्रूक्षिट मॅगेझिन रायफल, एक जोड नळ्यांची शिकारी बंदूक, व एक एकेरी नळीची शिकारी बंदूक होती; व हे सर्व शिकारी मिळून हीं सर्व हत्यारें लागतील तसतशीं वापरीत होते. लोहोगांवच्या हद्दींत गेल्यावर एक तळें लागलें, तेव्हां दोन शिकारी तळ्याचे एका बाजूनें व दुसरे दोन दुसऱ्या बाजूनें जाऊं लागले. शार्मन व जॉन वॉकर हे एका बाजूस पण एकमेकांपासून जरा दूर होते. शार्मन यानें एक बदक मारलें तें तळ्यांत पडलें. तें बाहेर काढण्याकरितां तळ्यांत शिरण्याबद्धल शार्मननें एका तरुण मराठ्याला सांगून पाहिलें. पण तो तळ्यांत शिरेना, कारण तळ्यांत शेवाळें माजलेलें असून त्यांत शिरणें घातक आहे अशी गांवच्या सर्व लोकांची समजूत होती. त्यावरून बाचाबाची झाली व शार्मननें त्या मराठ्याला ( नारायणाला ) मारलें; त्यामुळें त्याला तोंडावर थोडी दुखापत झाली, हें पाहून आसपास कांहीं लोक उभे होते त्यांना सहजच थोडा राग आला; व 'मला मारलें, मला मारलें' असें म्हणून नारायण ओरडूं लागला तेव्हां दुसरेहि कांहीं लोक धांवून येऊन कज्जांत सामील झाले. शार्मनला भीति वाटली व त्यानें इतर तिघां सोजिरांना हांका मारल्या. ते आल्यावर ते चौघे मिळून तेथून निघून जाऊं लागले. तेव्हां जमलेले गांवकरीहि त्यांच्या मागें चालले; व 'असे जाऊं नका, थांबा' असें म्हणून ओरडूं लागले. कांहीं वाट अशीच चालल्यावर शार्मननें आपली पडशी रिचर्ड वॉकर याचेजवळ दिली व तो स्वतः पळून जाऊं लागला. तेव्हां त्याचेमागें तिघे गांवकरी धावूं लागले व बाकीचे उरल्या तीन सोजिरांमागें जाऊं लागले. व्हाइट यानें सांगितल्यावरून असो किंवा स्वतः तोच बावरल्यामुळें असो, असें पळून जाणें मूर्खपणाचें होतें व पुढील तंटा

यामुळेंच झाला. गांवकरी शार्मनला पकडीत, पण तो फिरून त्यांना झुकांडी देऊन पळून जाई; असें बरेच वेळां झालें. तो स्वस्थ राहता तर कांहींच वाईट घडलें नसतें.

इकडे या तिघां सोजिरांच्या मागें लागलेले लोक ( हे सुमारें १०।१२ असावेत) त्यांना ' तुमचीं नांवें व पत्ते टिपून द्या ' असें म्हणत होते. होतां होतां सोजीर एकदांचे थांबले, पण त्यांचेजवळ कागद व पेन्सिल नव्हती. तेव्हां एक गांवकरी म्हणाला, ' मी गांवांत जाऊन कागद पेन्सिल आणतों व त्याबरोबर पाटील व तलाठी यांनाहि घेऊन येतों ', असें म्हणून तो गेला. या सुमारास आरोपी वॉकर यानें मागून येणारे लोकांच्या डोक्यावरून हवेंत एक गोळी झाडली. हें कृत्य अर्थात् मूर्खपणाचें होतें, कारण त्यामुळें गांवकरी अधिक रागावले. व नांवें दिल्याशिवाय आम्ही तुम्हांस जाऊं देत नाहीं असें म्हणूं लागले. एका गांवकऱ्यानें एक दगडहि फेंकला, पण तो कोणास लागला नाहीं. तथापि या गांवकऱ्यांची वागणूक एकंदरीनें भांडखोरीची किंवा धमकीची नव्हती, फक्त सोजिरांचीं नांवें व पत्ते टिपून घेऊं येवढाच त्यांचा निश्चय होता. कागद-पेन्सिल आणण्याला गेलेला गांवकरी परत येण्यापूर्वीं, नारायण माघारा येऊन या गांवकऱ्यांना सांगूं लागला कीं, शार्मनला पकडून जवळच्या एका झोंपडींत ठेवलेला आहे. तेव्हां उरलेले तिघे सोजीर व हे लोक झोपडकिडे जाऊं लागले. पण एक-दोन झोपड्यांत शार्मन न भेटल्यामुळें, हे लोक आपणांला फसवून कांहींतरी संकटांत घालीत आहेत असें वाटून, हे तिघे सोजीर बराकीकडे जाण्याकरितां निघाले. इतक्यांत पाटील व तलाठी येत असलेले दिसूं लागले. तेव्हां गांवकरी त्यांना समजावून सांगूं लागले कीं, थोडे थांबा, जाऊं नका. सोजीर न ऐकतां जबरदस्तीनें जाऊं लागले. तेव्हां लोक त्यांना दंडाला किंवा बाह्यांना धरून थांबवूं लागले. या सुमारास आरोपी वॉकर हा मागें वळला, त्याबरोबर त्याच्या कंबरेशीं असलेली परंतु त्यानें दोनहि हातांनीं धरलेली रायफल बंदूकहि मागें फिरली व गोळी उडाली; ती एका गांवकऱ्याला लागून तो खालीं पडला व पुण्यास नेत असतां वाटेंत सुमारें १॥ तासानें मेला. गोळी उडतांच गांवकऱ्यांनीं सोजिरांमागें जाण्याचें टाकून दिलें व ते जखमी मनुष्याच्या भोंवतीं बसले. तेव्हां सोजीर कांहीं अडथळा न उरल्यानें बिनत्रासानें आपल्या बराकींना परत गेले व झालेली हकीकत त्यांनीं अधिकाऱ्यांना कळविली.

## जिल्हा मॅजिस्ट्रेट यांचा अभिप्राय.

" आरोपीचें म्हणणें, मीं आपल्या बचावाकरितां बंदूक झाडली, असें असेल तर तें त्याच्याच जबाबानें अग्राह्य ठरतें. आरोपीला स्वतःचा बचाव करण्यासारखी स्थिति उत्पन्न झाली होती कीं नाहीं, किंवा आपल्यास इजा होईल असें मानण्यास त्याला सबळ कारणें होतीं कीं नाहीं, याचा विचार करण्याचें कारण नाहीं. एकंदर पुराव्यावरून असें दिसतें कीं, सोजिरांच्या मागें लागलेल्या लोकांची फार गर्दी नव्हती, व होते तेहि चवताळलेले व भय उत्पन्न करण्यासारख्या मनःस्थितींत नव्हते. शार्मनला पकडून उभा करणें हें कायदेशीर हक्कमर्यादेपलीकडे असलें तरी, नंतरच्या त्यांच्या वागणुकीनें वरील गोष्टच सिद्ध होते. त्यांतील कांहीं लोक वयानें पोक्त असल्यामुळें, त्यांनीं इतरांना अधिक रागावूं न देतां शांत करणें व थोपवून धरणें हें स्वाभाविक होतें; व तेंच त्यांनीं बहुधा केलेंहि. फक्त भाषा वेगळी पडल्यानें आपण काय म्हणतों हें त्यांना नीट समजावून देतां न आल्यामुळें त्यांच्या ओरड्यानें थोडा गोंगाट झाला असेल; व भाषा समजेना म्हणून कृतीनें त्यांनीं सोजिरांचे अंगाला हात लावून थांबवून धरण्याचा प्रयत्न केला असेल. आरोपीचा गुन्हा ३०४ कलमाखालीं येत नाहीं. परंतु त्यानें गोळी झाडली त्यावेळीं आपण काय करतों हें त्यास माहीत नव्हतें, किंवा भीतीमुळें आपण जें काय करतों त्याचे स्वाभाविक परिणाम त्याच्या लक्षांत क्षणभर न यावे, ही गोष्ट झालेल्या पुराव्यावरून खरी मानतां येत नाहीं. आधीं त्याला भीति वाटण्यासारखी स्थितीच नव्हती. थोड्याच वेळापूर्वीं लोकांच्या डोक्यावरून कां होईना पण त्यानें जाणूनबुजून गोळी झाडली होती; व यानंतरहि लोक आपल्या मागें लगट करीत आहेत व आपणांस सोडीत नाहींत असें पाहून तो मागें फिरला. त्याचे ढुंगणाशीं त्याची बंदुक असतां त्यानें ती आपल्या दोहों हातांत धरली होती, त्याचें बोट बंदुकीच्या चापावर ठेवलेलें होतें, व बंदुकीचा रोख सामान्यतः गांवकऱ्यांकडे होता; अशा स्थितींत त्यानें बंदुकीचा चाप ओढला. आरोपी तरुण आहे तरी तो शिपाई आहे. त्याला 'सर्व्हिस रायफल' वागविण्याची संवय आहे. त्याच्या हातीं या वेळीं होती ती बंदूक जवळ जवळ सर्व्हिस रायफलसारख्याच घडणीची होती. ती मीं स्वतः हातांत घेऊन पाहिली तों मला असें आढळलें कीं, बंदुकीचा चाप हलका नसून बराच जड आहे, व कदाचित् चार माणसांच्या हाताइतका भारी जोर त्यावर पडल्याशिवाय तो चाप पडणार

नाहीं व गोळी सुटणार नाहीं. तेव्हां आपण इतक्या जोरानें चाप खेंचला, मात्र आपण काय करीत होतों याची शुद्धि आपणाला नव्हती, हें शाबीत करण्याचा बोजा आरोपीवर होता. म्हणून मी असें घेऊन चालतों कीं, आपण प्राणघातक गोष्ट करीत आहों हें आरोपीस माहीत होतें, व या क्षणास तरी ३०४ कलमाखालच्या गुन्ह्याचा आरोप त्याजवर ठेवून मी त्याला इनसाफाकरितां सेशन्स कोर्टांत पाठवितों."

---

## सेशन्स जज्ज यांचा अभिप्राय

( अ ) **ज्यूरीस खटला समजावून देतेवेळीं सेशन्स जज्ज वाईल्ड** म्हणाले, आरोपीचें म्हणणें कीं, आपल्या बेशुद्धीनें म्हणजे जाणीव नसतां मीं चाप ओढला, बंदूक उडाली आणि अर्जुना याला अपघातानें चुकून गोळी लागली. त्याचे साथीदार सोजीर हल्लीं हेंच सांगत आहेत. परंतु त्यांनीं मॅजिस्ट्रेट कोर्टांत हें कांहींच सांगितलें नाहीं; व आतां आपल्या सोबत्याच्या बचावाकरितां ते तसें सांगत आहेत म्हणून तुम्ही त्यांच्या बोलण्यावर विश्वास ठेवूं नका. शिवाय आरोपी म्हणतो तें संभवनीय आहे कां, हें पहा. या रायफल बंदुकीला तटणीचा कोयंडा आहे. तो उपयोगांत असेल वा नसेल, परंतु आरोपी हा सोजीर असून त्याला रायफल बंदूक वापरण्याची संवय आहे. अर्थात् त्याच्या मनांत असल्याशिवाय बंदूक उडाली हें आपण कसें खरें मानावें ! तो सांगतो तसा त्यावर गहजब झाला असला म्हणून तरी काय झालें ? त्यानें बंदूक उडविली ती गांवकऱ्यांना भिवविण्याकरितां असेल; कारण पूर्वीं एकदां त्यानें हवेंत बंदूक उडविली, पण त्याचा कांहींएक उपयोग झाला नाहीं असा पुरावा आहे. म्हणून आतां गांवकऱ्यांच्या बाजूला पण त्यांना न लागेल इतक्या दूर त्यानें बंदूक उडाविली असावी. तात्पर्य, अर्जुनाला गोळी चुकून लागली हें शक्य आहे; पण बचावांत आरोपीनें ही तक्रार ( बंदूक जाणूनबुजून उडविली पण गोळी अर्जुनाला लागली ती उद्देश नसतां लागली ) केलेली नाहीं.

( आ ) **सेशन्स जज्ज** यांनीं ज्यूरीचा दोषमुक्ततेचा निकाल अमान्य करून वॉकर यास निदान **३०४ अ–कलमाखालीं शिक्षा व्हावी अशी शिफारस** करून मुकदमा हायकोर्टाकडे पाठविला; त्यावेळीं आपल्या पत्रांत त्यांनीं खालीलप्रमाणें अभिप्राय लिहिला आहे:—

आरोपी वॉकर याचा डिफेन्स असा आहे कीं, गांवकरी लोकांचा त्याला मोठा धाक वाटूं लागला, त्याच्या मनाची फार चलबिचल झाली, व अशा स्थितींत उद्देश नसतां त्याचे हातून बंदूक उडली गेली. ज्यूरींत चार युरोपियन व एक हिंदी असे पांच इसम होते. त्यांना आरोपीची ही तक्रार बरोबर वाटली व झाला तो निवळ अपघात असें ठरवून त्यांनीं आरोपीला सर्वस्वीं दोषमुक्त केलें. परंतु माझ्या मतें ही निवळ अपघाताची कल्पना सर्वस्वीं असंभवनीय कोटींतली आहे. तिजवर विश्वास ठेवणें शक्यच नाहीं. आरोपी हा लष्करी शिपाई असून त्याला हत्यारांची माहितगारी आहे. मला असें वाटतें कीं, गांवकरी लोक पिच्छा सोडीनात, एकदां हवेंत गोळी झाडून पाहिली तरी ते थांबेनात, असें पाहून आरोपीनें पुनः त्यांना भिवविण्याच्या उद्देशानें गोळी झाडली. अर्जुनावर किंवा इतर कोणावर त्यानें नेमका नेम धरलेला नसेल; परंतु दुर्दैवानें एका गांवकऱ्याला ती गोळी लागली. मनुष्याला ही गोळी लागणें हा अपघात असें मानलें तरी, त्यानें कलम ३०४ अ-प्रमाणें अविचाराचें कृत्य केलें इतकें तरी मानलेंच पाहिजे, याहून त्याचा गुन्हा कमी मानतांच येणार नाहीं. याकरितां क्रि. प्रो. कलम ३०७ प्रमाणें अखेरच्या निकालाकरितां हायकोर्टाकडे हा खटला मी पाठवीत आहें.

---

## न्या. मॅकलाऊड व फॉसेट

या खटल्यांतील पुराव्यावरून तीन संभव उपस्थित होतात. गोळी अर्जुनावर मुद्दाम मारली, सरसकट गांवकऱ्यांकडे बंदूक रोखून धरली पण गोळी अर्जुनालाच चुकून लागली, किंवा चापावर बोट ठेवलें असतां वॉकर एकदम मागें वळल्यानें बंदूक उडाली. यांपैकीं अमुक एकच संभव खरा असें निश्चित मानण्यास साधन नाहीं. पण सर्व संभव तोलून पाहतां आकस्मिक अपघाताचा संभवच आम्हांला पटतो. सेशन्स जज्जाला ज्यूरीचा निकाल निःसंशय चूक वाटला. पण आम्हीं तो अमान्य करावाच, इतका कांहीं तो चूक नाहीं.

---

## न्या. मार्टेन व किंकेड

केसरीकार केळकर यांना बंदुका वगैरे हत्यारांची माहिती नसल्याचें त्यांनीं कबूल केलें आहे. उलट चीफ जस्टिस मॅकलाऊड यांना अशा हत्यारांची माहिती फार चांगली होती हें आम्हांला माहीत आहे. ज्यावर केळकरांनीं

टीका केली तो हायकोर्टाचा निकाल चूक आहे कीं बरोबर आहे हें ठरविण्याचें आमचें काम नाहीं. फक्त केळकरांच्या लेखानें कोर्टावर अप्रामाणिकपणाचा हेतु लादला गेला कीं नाहीं येवढाच प्रश्न आहे. तो लादला गेला, आणि अप्रामाणिकपणाचाच हेतु नसला तरी अजाणत्या पक्षपाताच्या आरोपानेंहि बेअदबी होऊं शकते असें आमचें मत आहे.

---

## खटल्यावरील केसरीचें मत

--१--

केसरी पत्रावर मुंबई हायकोर्टाकडून बेअदबीचा आरोप ठेवण्यांत येऊन त्याच्या इन्साफाकरितां नोटीस निघाल्याची बातमी केसरींत ओझरती आल्यानें वाचकांस प्रथम त्याचें विशेष महत्त्व वाटलें नाहीं. परंतु खटल्याची समग्र हकीकत व बावनशें रुपये दंडाच्या शिक्षेची बातमी वाचल्यानंतर, केसरीवर हें एक केवढें मोठें गंडांतर अकस्मात् येऊन गेलें याविषयीं वाचकांच्या मनांत एकदम भीतीचा धक्का बसल्यासारखा झाला, असें आम्हांकडे आलेल्या सहानुभूतिपर अशा अनेक पत्रांवरून, उघड दिसतें. राजद्रोहाचे खटले आतां लोकांच्या चांगल्या परिचयाचे झाले आहेत. शिवाय त्या खटल्यांची प्रारंभींची रीत या खटल्याहून वेगळी असते. राजद्रोहाच्या खटल्यास वर्तमानपत्रकाराला वॉरंटावरून पकडण्यापासून सुरवात होते व ही धरपकड झाल्यामुळें खटल्यांतील प्रत्यक्ष चौकशीचें किंवा इन्साफाचें काम होण्याच्या आधींपासून कांहीं दिवस तरी या संकटाची भीतिप्रद छाया लोकांचे मनावर पडलेली असते. कोर्टाच्या बेअदबीच्या खटल्याचें तसें नाहीं. त्याचा प्रारंभ साध्या नोटिशीनें होतो. एवढेंच नव्हे तर विशेष कारणानें नोटिशीच्या ऐवजीं हायकोर्ट रजिस्ट्रारकडून सामनेवाल्याला यादी किंवा शिष्टाचाराचें पत्रहि जातें! केसरीवरील प्रस्तुतच्या खटल्यांत, संपादक केळकर हे ले. असेंब्लीचे सभासद असल्यामुळें, त्यांना नोटीस न पाठवितां शिष्टाचाराचें पत्रच जावयास पाहिजे होतें; व तें न पाठवितां नोटीस पाठविली गेली या गोष्टीची तक्रारहि केळकर यांस कोर्टापुढें करतां आली असती; पण असली क्षुद्र तक्रार सांगण्यांत अर्थ नाहीं अशा विचारानें त्यांनीं हायकोर्टाच्या ऑफिसविरुद्ध ही तक्रार केली नाहीं. असो. अशा कामीं जी नोटीस निघते तींत झालें तरी, सामनेवाल्यानें वाटल्यास ठरल्या तारखेस स्वतः

हजर न राहतां वकील देऊन काम चालवावें अशीहि सवलत देण्यांत आलेली असते. तात्पर्य, कोर्टाच्या बदनामीचा खटला प्रथमदर्शनीं असा सौम्य स्वरूपांत असतो. पण परिणामाच्या दृष्टीनें पाहतां त्याचें स्वरूप राजद्रोहाच्या खटल्याहूनहि अधिक भयंकर होऊं शकतें.

कारण, एक तर बेअदबीच्या खटल्याचें काम कोर्टाला झटपट चौकशीनें, म्हणजे कोणताहि पुरावा वगैरे न घेतां निकालांत काढतां येतें; राजद्रोहाच्या खटल्यांत सर्व काम खुलासेवार साक्षीपुरावा घेऊन करावें लागतें. राजद्रोहाच्या खटल्यांत मॅजिस्ट्रेटाच्या शिक्षेवर हायकोर्टाकडे अपील, व हायकोर्टापुढें खटला चालल्यास ज्यूरीमार्फत इन्साफ, अशा सवलती मिळतात. कोर्टाच्या बेअदबीच्या खटल्यांतील शिक्षेवर अपील होऊं शकत नाहीं अशी आतांपर्यंत तरी समजूत आहे. राजद्रोहाच्या गुन्ह्याप्रमाणें या बेअदबीच्या गुन्ह्यास दंड किती करावयाचा याला मर्यादा नाहीं, व शिक्षा देणें तर ती साधी किंवा सक्तमजुरीचीहि देतां येते. परंतु राजद्रोहाला काळेपाण्याची शिक्षा असली तरी ती व्यवहारापुरती समर्याद म्हणजे वीस वर्षांहून अधिक भोगावी लागत नाहीं. पण या बेअदबीच्या गुन्ह्याला शिक्षा किती हें कोठेंच सांगितलेलें नाहीं; व कोर्टाला वाटल्यास कोर्टाच्या मर्जीपर्यंत म्हणजे आरोपिताच्या जन्मभरहि त्याला कैदेंत ठेवण्याचा अधिकार न्यायकोर्टाला असतो. शिवाय पिनल कोडांत कोणत्याहि गुन्ह्याला न सांगितलेली अशी एक अपमानास्पद शिक्षा बेअदबीच्या गुन्ह्यास कोर्टाला देतां येते. ती शिक्षा माफी मागण्याची! किंबहुना अशी ही अपूर्व व लोकोत्तर शिक्षा भोगावयास लागल्याशिवाय आम्ही आमच्या गुन्हेगाराला कैदेंतून मुक्त करीतच नाहीं असें कोर्टास म्हणतां येतें! आमची समजूत या बाबतींत बरोबर असेल तर असल्या या जुलुमी माफीच्या शिक्षेचा अंमल आजवर हिंदुस्थानांत फक्त एकच वेळ घडला, व तो सन १९०८ सालीं स्वतः केळकर त्या वेळचे 'मराठा' पत्राचे संपादक असतां यांचेसंबंधानेंच घडला; कारण त्या खटल्यांत दिलेल्या शिक्षेचा प्रकारच मुळीं असा होता.—"एक हजार रुपये दंड, कोर्टखर्चाबद्दल दोनशें रुपये, चौदा दिवसांची साधी कैद व कोर्टाला पसंत पडेल अशी लेखी माफी केळकर देईपर्यंत पुढेंहि अमर्याद तुरुंगवास." अर्थात् अशा कामीं जन्मभर तुरुंगवास भोगण्याची केळकर यांची इच्छा नसल्यानें, त्यावेळीं त्यांनीं चौदा दिवसांची शिक्षा भोगल्यानंतर ही सक्तीची माफी लिहून दिली व आपली बंधमुक्तता करून घेतली.

हल्लींच्या खटल्यांतहि केळकर यांनीं कोणत्याहि प्रकारें माफी न मागत आपल्या लेखाचें समर्थनच केलें, यामुळें फिरून तशाच जुन्या प्रकारची शिक्षा त्यांना सांगण्यांत येते कीं काय, अशी शंका सहज येणारी होती. आणि या गोष्टीला उद्देशूनच केळकर यांनीं, आपल्या बचावाचें भाषण संपविण्याचे आधीं, अशा जुलुमाच्या माफीवर व अमर्याद शिक्षेवर कडक शब्दांनीं टीका करून घेतली होती. पण सुदैवानें तो प्रसंग टळला. आणि आपल्या भाषणाच्या या भागांत केळकर यांनीं म्हटल्याप्रमाणें दंडाची शिक्षा दिल्यानें व तो दंड भरल्यानें हायकोर्टाला आपल्या अधिकाराचें समर्थन आणि केळकरांना आपल्या स्वाभिमानाचें रक्षण या दोनहि गोष्टी साधतां आल्या किंवा केळकर यांनीं मुंबईच्या भाषणांत सांगितल्याप्रमाणें 'कन्व्हिक्शन्' म्हणून आरोपशाबिती व शिक्षा, आणि 'कन्व्हिक्शन्स' म्हणजे प्रामाणिक मतें या दोन गोष्टींचा मेळ पडूं शकला. तें कसेंहि असो. राजद्रोहाच्या खटल्यांत सामान्यतः अधिक कडक शिक्षा दिल्याचा अनुभव येत असला तरी तात्त्विक दृष्ट्या कोर्टाच्या बेअदबीचा हा नवा व बहुतांशीं अपरिचित असा आरोप राजद्रोहाच्या आरोपाहूनहि अधिक अनर्थकारक व संकटमय कसा होऊं शकतो एवढीच गोष्ट या ठिकाणीं आम्हांस सांगावयाची होती, व ती या विवेचनानें वाचकांच्या लक्षांत आली असेलच. याच मुद्दयाचें या लेखमालेंत पुढेंहि एके ठिकाणीं आम्हांस विवेचन करावें लागेल, तथापि हा गुन्हा अनोळखी असल्याकारणानें, प्रारंभीं केसरीवरील खटल्याचें विशेष कांहीं न वाटतां, त्याची हकीकत व दंडाची रक्कम ऐकतांच हिंदुस्थानांतील मतस्वातंत्र्यावर हें कोण नवें संकट, असा जो दचका वाचकांच्या मनाला एकदम बसला, त्याची मीमांसा करण्याकरितां हा प्रास्ताविक खुलासा येथें केला आहे. 'कोर्टाच्या बेअदबीचा कायदा' हें मतस्वातंत्र्यावर एक नवें संकट वाटत खरें; पण तें अपरिचित म्हणून नवें वाटतें; त्याविषयीं एकादा नवीन कायदा अलीकडे झाला या अर्थानें तें नवें नाहीं. तें अस्तित्वांत असतांहि तशा प्रकारचे खटले आजवर फारसे झाले नाहींत ही गोष्ट वेगळी, तथापि तसे खटले यापुढें अधिक होण्याचा कदाचित् संभव दिसतो. याकरितां कोर्टाच्या बेअदबीच्या कायद्यासंबंधानें आमच्या वाचकांना थोडीशी माहिती देण्याचा आमचा विचार आहे.

तथापि तें करण्यापूर्वी, या प्रास्ताविक लेखांत केसरीवरील खटल्यासंबंधानें दोन शब्द लिहिणें हें आमचें कर्तव्य आहे असें आम्हांस वाटतें. पहिली गोष्ट

ही कीं, १ हा खटला निष्कारण करण्यांत आला, २ केळकरांनीं बचावाचे वेळीं हायकोर्टांत योग्य तेंच धोरण स्वीकारलें व ३ न्यायमूर्तींनीं नुसत्या दंडाची कां होईना पण शिक्षा बेसुमार दिली; अशाविषयीं सर्व लोकांत जवळजवळ एकमत आहे. केसरीकडे गेल्या आठवड्यांत वाचकांकडून जीं पत्रें आलीं, व अजूनहि येत आहेत, त्यांवरून हें लोकमत आमच्या निदर्शनास प्रत्यक्ष आलें. त्यांपैकीं कित्येक पत्रांतून, केसरीस झालेला दंड हा लोकांनीं वर्गणी करून भरावा म्हणजे तेंच हायकोर्टाच्या निकालाला उत्कृष्ट उत्तर होईल असें लिहिलेलें असून, त्यांतील कित्येकांनीं तर आपल्या वर्गणीच्या मनीऑर्डरीहि पाठविल्या आहेत! वाचकांनीं दाखविलेल्या या सहानुभूतीबद्दल आम्ही त्यांचे फार आभारी आहों. तथापि हा दंड केसरीनें स्वतःच सोसणें योग्य आहे, त्याचा बोजा लोकांवर पडूं देणें बरोबर नाहीं, असें आमचें मत असल्याकारणानें आम्हीं त्या रकमा ज्यांच्या त्यांस आभारपूर्वक परतहि केल्या. केसरीला अशा कामीं केव्हां अडचणच पडली व ती दूर करण्यास केसरीनें जाहीर रीतीनें मदत मागितली तर केसरीचे वाचक ती देण्यास केव्हांहि माघार घेणार नाहींत असा आमचा दृढ भरंवसा आहे. तथापि अशी मदत होतां होईतों न मागतां, जेथपर्यंत निभावेल तेथ-पर्यंत, केसरीनें स्वतःच्या आधारावर हा प्रसंग निभावणें हेंच योग्य होय हें लक्षांत घेऊन, ज्यांच्या रकमा आम्हीं परत केल्या ते सद्गृहस्थ आमचेवर नाराज होणार नाहींत अशी आशा आहे. पूर्वीं प्रेस ॲक्ट पास झाल्यावर सिडेनहॅमशाहींत केसरीनें पांच हजार रुपयांची रक्कम जामिनकीदाखल सरकारांत ठेवली होती. पण ती सरकारजमा न होतां, प्रेस ॲक्ट रद्द झाल्यावर, आपल्या पायानें परत केसरीकडे आली. ही रक्कम त्या कायद्याचे अमलांत सरकारजमा झाली असती तर केसरी काय करणार होता? अर्थात् ती तेव्हां सरकारजमा न होतां आज या दंडाच्या रूपानें सरकारच्या खजिन्यांत परत गेली अशा विचारसरणीनेंहि मनाचें समाधान करून घेतां येण्यासारखें आहे. या जगांत ज्याचा जो अंश असेल तो त्याचा त्याला दिलाच पाहिजे.

कोणी कदाचित् असेंहि म्हणेल कीं, बावनशें रुपयांचा भूर्दंड बसला खरा, पण तीहि केसरीनें खैर झाली असेंच मानलें पाहिजे. कारण दंडाबरोबर त्या-शिवाय ऐनजिनसी शिक्षा कोर्ट देतें तर केळकरांनीं काय केलें असतें? या प्रश्नाचें उत्तर उघडच आहे. कैदेची शिक्षा कोर्टानें दिली असती तर केळ-

करांनीं काय केलें असतें, याचें दिग्दर्शन केळकरांनीं कोर्टापुढील भाषणांत केलेंच आहे. तथापि हेंहि कबूल केलें पाहिजे कीं, ऐनजिनसी निश्चित शिक्षा किंवा माफी मागेपर्यंत कैद, असली अमर्याद शिक्षा कोर्टानें दिली नाहीं ही न्यायमूर्तींची कृपाच मानली पाहिजे खरी. जन्मभर कैदेची शिक्षा देतां येण्याचा अधिकार असतां मुळींच कैद दिली नाहीं, व सगळा केसरी कारखाना विकून भरीला घातला असतांहि जो पुरा पडणार नाहीं इतका भारी दंड करण्याचा अधिकार असतां अवघा पांच हजारच दंड केला हे एका दृष्टीनें न्यायमूर्तींचे केसरीकारांवर व केसरीवर मोठे उपकारच होत. इसापनीतींतील एक गोष्टहि या म्हणण्यास आधार म्हणून देतां येईल. एका कोल्ह्याच्या गळ्यांत त्यानें मारून खाल्लेल्या प्राण्याचें हाडूक अडकलें. तें काढण्याकरितां बगळ्यानें आपली लांब मान कोल्ह्याच्या घशांत खुपसून चोचीनें तें हाडूक उपसून बाहेर काढलें. या शस्त्रोपचाराबद्दल बगळा आपली फी किंवा बक्षीस मागूं लागला, तेव्हां कोल्ह्यानें त्याला उत्तर दिलें, “ बाबा, बक्षीस कसचें मागतोस ? तूं आपली मान जेव्हां माझ्या जबड्यांत दिली होतीस तेव्हांच आपले दांत आवळून मीं ती कापून टाकली असती तर तूं प्राणासच मुकला असतास. तेव्हां तुझे प्राण वांचविले याबद्दल उलट तूंच माझे आभार मानणें योग्य आहे ! ” न्यायकोर्टाच्या हातून अयोग्य निकाल होऊन अन्याय घडतात व त्यामुळें लोकांचा विश्वास न्यायपीठावरून ढळतो म्हणून केसरीनें हायकोर्टाच्या निकालावर टीका केली. पण तो हेतु लक्षांत न घेतां कोर्टाला राग आल्यामुळें त्यानें नुसत्या दंडाची, व तीहि बावनशें रुपयांचीच शिक्षा केसरीला दिली हे त्यांचे उपकारच नव्हत काय ?

पण न्यायमूर्तींनीं केसरीला एवढा दंड करून काय मिळविलें ? असा प्रश्न यापुढें अर्थातच सुचतो. या प्रश्नाचें उत्तर देण्यापूर्वीं आम्ही हें आधींच म्हणून ठेवतों कीं, केसरीला अपराधी ठरवून व येवढी जबरदंडाची शिक्षा करून न्यायमूर्तींना व्यक्तिशः स्वतःला कांहीं एक मिळवावयाचें नव्हतें. केसरीची टीका त्यांच्या निकालावर नव्हती, यामुळें स्वतःचा सूड घेण्याच्या बुद्धीनें त्यांनीं असा निकाल दिला असें म्हणण्याचें मुळींच कारण नाहीं. बरें व्यक्तिशः केळकर यांजवर न्यायमूर्तींचा राग होता म्हणावें तर तेंहि नाहीं. कारण न्यायमूर्ति मार्टेन यांची व केळकर यांची गांठ प्रथमच या खटल्याचे

वेळीं पडली. न्या. किंकेड व केळकर यांची फार वर्षांची ओळख आहे; तथापि व्यक्तिशः एकमेकांच्या मनांत एकमेकांविषयीं इतकी अढी बसावी असा त्यांचा संबंध पूर्वीं कधीं आलेला नाहीं. अर्थात् उभयतां न्यायमूर्तींनीं हा जो निकाल दिला तो कर्तव्यबुद्धीशिवाय इतर कोणत्याहि कारणानें दिलेला असण्याचा संभव नाहीं. मग त्यांचें मन त्यांना त्यांचें कर्तव्य कोणतें आहे असें सांगत होतें ? आमच्या मतें न्यायमूर्तींना केसरीच्या टीकेनें राग आला तो त्यांच्या इतर न्यायमूर्तिबंधूंची, व त्यांच्या कारणानें हायकोर्टाची, इभ्रत थोडी कमी झाली असें वाटल्यावरूनच आला असला पाहिजे. व्यक्तिशः केळकरांचें किंवा केसरीचें नुकसान करण्याचा त्यांचा इरादा नसून, आपल्या न्यायपीठाची बेअब्रू झाली अशी त्यांनीं समजूत करून घेतल्यानें त्यांना आलेल्या रागाचा उपशम कर्तव्य म्हणून त्यांनीं तो या जबर दंडानें केला असावा हें उघड दिसतें. कालिदासानें लंकेहून परत येणाऱ्या श्रीरामचंद्राच्या तोंडीं असें एक वाक्य घातलें आहे कीं, " अमर्षणः शोणितकांक्षया किं पदा स्पृशन्तं दशति द्विजिव्हः "—याचा अर्थ, सर्प मनुष्याला जो डसतो तो रक्त पिऊन तहान भागविण्याकरितां नव्हे तर शेपटीवर पाय दिल्याच्या रागाचा उपशम व्हावा म्हणून !

असो. न्यायमूर्तींना मनांतून आलेल्या केसरीवरील रागाचा परिहार अशा रीतीनें झाला असेल. पण ही शिक्षा देण्यांत आणखीहि त्यांचा एक हेतु असावा. तो हा कीं, या शिक्षेमुळें केसरीची टीका खोटी अशी लोकांना खात्री पटावी, आणि न्यायपीठाच्या न्यायदानावर लोकांचा दृढ विश्वास बसून त्याची अब्रू वाढावी. पण या बाबतींत मात्र न्यायमूर्तींचा हेतु साधला असेल असें आम्हांस वाटत नाहीं. दुसऱ्यावर अधिकार गाजविल्यानें स्वतःस तो अधिकार आहे असें फार तर सिद्ध होतें; पण **अधिकाराची सिद्धि** म्हणजे **अब्रूची वृद्धि** असें समीकरण बसत नाहीं. त्या एका दिवशीं हायकोर्टानें दोन खटल्यांत मिळून सात हजार रुपये वसूल केले. या सात हजार रुपये दंडाच्या चुन्यानें हायकोर्टाची अब्रूच काय पण मुंबई इलाख्यांतील यच्चयावत् कोर्टाच्या इमारती देखील मशिदीसारख्या पांढऱ्या शुभ्र रंगवून काढतां येतील. पण अब्रू ही अशा चुन्याच्या सफेतीनें शुद्ध व निष्कलंक होणारी नाहीं. लोकांचीं मनें जेव्हां विश्वासपूर्ण व प्रसन्न होतील तेव्हांच ती साफ होईल. वास्तविक कोर्टाची

बेअब्रू किंवा बेअदबी करण्याचा केळकरांचा इरादाच नव्हता. वॉकर-प्रकरणीं लोकांना काय वाटतें हें जाहिर रीतीनें बोलून दाखविण्याचाच त्यांचा उद्देश होता. आणि या लोकमतावर खटल्याचें दडपण घालून तें आंतल्या आंत दडपून टाकण्याचा प्रयत्न करण्यानें तें तर दडपलें गेलें नाहींच, पण दाबलेल्या पाण्याप्रमाणें, या खटल्यावरील वर्तमानपत्रांच्या टीकांच्या द्वारें, तें शेंकडों वाटांनीं बाहेर पडलें. उदाहरणार्थ, महात्मा गांधी यांनीं गेल्या '**यंग इंडिया**'च्या अंकांत खालीलप्रमाणें उद्गार काढले आहेत, "या शिक्षेमुळें केळकर किंवा जनता यांचें मत न्यायाधिशांविषयीं अधिक चांगलें होईल काय? अजाणता पक्षपात न्यायमूर्तींनीं केला असें जें केळकरांनीं लिहिलें त्यांत त्यांनीं लोकमताचा अनुवादच केला होता. युरोपियन व इंडियन यांच्या दरम्यान खटले उपस्थित झाले म्हणजे पक्षपात होतो अशी लोकांची दृढ समजूत आहे. माझा स्वतःचा दक्षिण आफ्रिकेंतील व इकडचा अनुभव असाच आहे. आपल्या मनांत डोकावणारा अजाणता पक्षपातहि दडपून टाकला जावा अशी युरोपियन न्यायाधिशांची खरी इच्छा असेल तर त्यांनीं आपणांवर हिंदी वर्तमानपत्रांतून येणाऱ्या टीकेचें उलट स्वागतच केलें पाहिजे......असला दंड करण्यानें केळकर व केसरी यांचें कितीसें नुकसान होणार! दंड पचनीं पाडून पुनः ते डोकें वरच काढणार! केळकरांनीं जो निर्भय धैर्याचा झगडा केला त्याबद्दल वृत्तपत्रकार व सार्वजनिक कार्यांत लक्ष घालणारे इतर लोक यांजकडून त्यांचें अभिनंदनच होणें रास्त आहे. केसरी हा आधींच मोठा वजनदार आहे. हल्लींच्या निकालानें त्याचें वजन उलट वाढेलच." म. गांधी यांच्या या अभिप्रायाचा अहेर तर न्यायमूर्तींना आम्ही करतोंच; पण केसरी व केळकर हा विषय वगळून म. गांधी यांच्याबरोबर आम्हींहि न्यायमूर्तींना असें विचारितों कीं, "हल्लींच्या शिक्षेनें लोकांना जरब बसविण्याचा तुमचा विचार असल्यास तो कदाचित् साधेल. पण लोकसंरक्षण व त्याकरितां न्यायकोर्टावरील भरवंसा हे जे दोन हेतु तुम्हांला या खटल्यानें साधावयाचे होते ते तुम्हांला खरोखर साधतां आले काय?" असो. प्रस्तुत खटल्याची चर्चा येथें सोडून देऊन पुढील लेखांत न्यायकोर्टाच्या बदनामीच्या कायद्याच्या सर्वसामान्य चर्चेकडे वळूं.

— २ —

न्या. मार्टेन व न्या. किंकेड यांनीं बेअदबीचा गुन्हा शाबीत धरून केसरीला जबर दंड ठोठावला यांत लोकांना जरब लावण्याचा त्यांचा हेतु साधला असेल,

परंतु न्यायकोर्टाच्या न्यायदानपद्धतीवर जनतेचा पूर्ण विश्वास प्रस्थापित करावा हा त्यांचा दुसरा हेतु तितका साधला असें मानतां येणार नाहीं, याविषयीं मागील लेखांत आम्हीं दिग्दर्शन केलेंच आहे. न्यायमूर्तींनीं दिलेला निकाल त्यांच्या मताप्रमाणें बरोबर असला तरी आमच्या मताप्रमाणें तो तितका बरोबर कां वाटत नाहीं, तसेंच खटल्याचें काम चालू असतां ज्या कित्येक गोष्टी त्यांच्या नजरेला आणणें जरूर होतें त्या आणण्याच्या प्रयत्नांत श्री. केळकर यांना अडथळा कसा झाला व तो अयोग्य कां होता, या गोष्टींचें आज आम्ही थोडक्यांत विवेचन करणार आहों.

याच पुस्तकांत पृष्ठ ४४९ व पुढें लोहोगांव येथें घडलेला प्रकार व त्यानंतर त्यांतील गुन्हेगारीसंबंधानें निरनिराळ्या न्यायाधिकाऱ्यांचीं मतें आम्हीं एकत्र दिलीं आहेत; त्यावरून वाचकांच्या ध्यानांत प्रथम ही गोष्ट येईल कीं, न्या. मार्टेन व किंकेड यांनीं केळकर यांना आपल्या बचावाच्या भाषणांत अवांतर गोष्टी आणण्यास प्रतिबंध केला असतां त्यांनीं स्वतः मात्र तें बंधन मानलें नाहीं ही आश्चर्याची गोष्ट होय ! केळकरांचें भाषण चालू असतां न्यायमूर्तींनीं असें दर्शविलें कीं, या खटल्यांत अजाणत्या पक्षपाताची केळकरांनीं दिलेली कबुली व जाणत्या सहेतुक पक्षपाताचा सरकारी वकिलांनीं केलेला आरोप, या दोन बिंदूंच्या दरम्यान जें पडूं शकेल तेवढेंच कोर्टास ग्राह्य मानतां येईल; इतर सर्व गोष्टी गैरलागू मानल्या पाहिजेत. या दोन बिंदूंमध्यें आक्षिप्त लेखाच्या शब्दांची सशास्त्र अर्थमीमांसा एवढीच गोष्ट उरूं शकते. पण तीहि खरोखर समर्पक व्हावयाची तर लिहिणाराच्या मनःस्थितीवर ज्या अवांतर गोष्टींचा परिणाम झाला त्याहि लक्षांत घ्यावयास नकोत काय ? परंतु फोटोग्राफ काढतांना कॅमेऱ्याच्या आंत व बाहेर अंधार राखून फक्त एका म्हणजे लेन्सच्या भिंगाच्या द्वारें येईल तितकाच प्रकाश आंत घेतात, त्याप्रमाणें न्यायमूर्तींनीं आपण अवांतर सर्व गोष्टींविषयीं अज्ञान किंवा विस्मरण ठेवून वरील अर्थमीमांसेच्या द्वारें येणाऱ्या प्रकाशानेंच केळकरांच्या गुन्हेगारीसंबंधाचें चित्र आपल्या मनांत प्रगट करूं देऊं असें सकृद्दर्शनीं ठरविलें होतें. शिवाय खटला समरी पद्धतीनें चालावयाचा असल्यानें कोर्टापुढें सरकारी वकिलाचा अर्ज; केसरींतील आक्षिप्त लेख, व केळकरांचा प्रतिज्ञालेख यांशिवाय पुरावा असा कांहींच नव्हता. असें असतां न्या. किंकेड पुण्यास आल्यावेळेपासूनची त्यांची केसरीसंबंधानें माहिती व केसरीच्या आजच्या

वाचकांच्या संख्येविषयींचीं अनुमानें हीं त्यांनीं आपला निकाल लिहितांना उपयोगांत आणिलीं हें योग्य कसें ठरतें ? हायकोर्ट ही डिबेटिंग सोसायटी किंवा कायदे कौन्सिलची सभा नाहीं हें जितकें खरें, तितकेंच हायकोर्टाचा न्यायाधीश हा गुप्त पोलीस नव्हे हेंहि खरें असलें पाहिजे ! ' पण धन्याचा धनी कोण ' या प्रश्नाइतकाच न्यायाधिशाचा न्यायाधीश कोण, हा प्रश्न निरुत्तर म्हणून खेदजनक ठरतो.

न्या. मार्टेन यांनीं तर याहिपुढें मजल मारली. " वॉकरच्या खटल्यांत न्या. मॅकलाऊड व फॉसेट यांनीं दिलेला निर्णय जितक्या प्रकारांनीं व जितका अधिक चूक आहे असें मी दाखवूं शकेन तितका माझ्यावरील आरोप हलका होऊन या न्यायमूर्तींवरील जबाबदारीचें पारडें अधिक जड होईल हें मला माझ्या बचावाकरितां दाखविलें पाहिजे " असें श्री. केळकर आग्रहानें प्रतिपादीत असतां, ती गोष्ट न्यायमूर्तींनीं त्यांना करूं दिली नाहीं. " तो निकाल वाटेल तर तुम्ही चूक म्हणा, परंतु तो वस्तुतः चुकीचा होता कीं बरोबर होता हें ठरविण्याचें काम आमचें नाहीं " असें न्यायमूर्तींनीं त्यांना सांगितलें. परंतु अखेर निकाल देतांना हायकोर्टाचा पूर्वीचा निकाल बरोबर होता हें शाबित मानण्यास त्यांनीं कमी केलें नाहीं. श्री. केळकरांना हत्यारें वापरण्याची माहिती नाहीं ही कबुली स्वतः केळकरांनींच दिली होती; पण न्या. मॅकलाऊड यांनीं जन्मभर अशीं हत्यारें वापरलीं असल्यानें त्यांना वॉकरची बंदूक कशी उडाली असेल याचें बिनचूक अनुमान करतां येण्यासारखें होतें अशा अर्थाचें जें विधान न्या. मार्टेन यांनीं केलें आहे त्याला पुरावा कोणता ? न्या. मॅकलाऊड हे कांहीं साक्षीच्या पिंजऱ्यांत आलेले नव्हते. त्यांच्या हत्याराच्या ज्ञानाला उलट तपासणीची कसोटी लागलेली नव्हती, किंवा वॉकरची बंदूक उडण्यासंबंधानें त्यांनीं जे संभव तोलून पाहिले ते कसे काय पाहिले याचीहि छाननी झालेली नव्हती. अशा स्थितींत न्या. मार्टेन यांनीं श्री. केळकरांना हरकत करतां करतां या सर्व अवांतर ज्ञानाचें गांठोडें स्वतः मात्र अचानकपणें आंत फेंकून दिलें हें पाहून कोणास विचित्र वाटणार नाहीं !

पुराव्यांत कोठेंच दाखल नसलेलें न्या. मॅकलाऊड यांचें हत्याराचें ज्ञान न्या. मार्टेन यांनीं बेधडक जमेस धरून त्यावर आपल्या निकालाचा पाया तर रचलाच, पण त्याहून मौजेची गोष्ट ही कीं, " पुण्याचे सेशन जज्ज मि. वाईल्ड व डि. मॅजिस्ट्रेट मि. मॉंटीथ यांना तरी हत्याराचें ज्ञान असलें

पाहिजे व तें ज्ञान त्यांना असतांहि वॉकरच्या विरुद्ध त्यांनीं अभिप्राय दिला तो कसा ? " हा प्रश्न केळकरांनीं स्पष्टपणें पुढें मांडला असतां त्याला मात्र न्यायमूर्तींनीं कांहीं एक उत्तर दिलें नाहीं, त्या मुद्यावर अगदीं मूग गिळले. मि. वाईल्ड व मि. मॉंटीथ यांना श्री. केळकरांप्रमाणेंच हत्याराचें ज्ञान नव्हतें असें न्या. मार्टेन यांना म्हणावयाचें असतें तर त्यांनीं आपल्या निकालांत तसें स्पष्ट लिहावयासहि पाहिजे होतें. उलटपक्षीं मि. वाईल्ड व मि. मॉंटीथ याचें हत्याराचें ज्ञान न्या. मार्टेन यांना नाकबूल करतां येत नव्हतें तर, त्या दोघांनीं वॉकर याचेविरुद्ध तसा अभिप्राय कां दिला असेल याची चर्चा तरी न्यायमूर्तींनीं करावयास पाहिजे होती. परंतु मि. वाईल्ड व मि. मॉंटीथ यांच्या हत्याराविषयींच्या ज्ञानाचा किंवा अज्ञानाचा त्यांनीं कांहीं एक उल्लेखच केला नाहीं; न्या. मॅकलाऊड यांचें हत्याराचें ज्ञान मात्र पुराव्यांत पुढें आलें नसतां गृहीत धरलें गेलें. पण खटल्याच्या कागदपत्रांत वॉकर विरुद्ध नमूद असलेले त्या दोघांचे अभिप्राय गैरलागू म्हणून ते मोडून काढले नाहींत, त्यांचा उल्लेख सुद्धां केला नाहीं, व त्याचा आधारहि श्री. केळकर यांस आपल्या तक्रारींत घेऊं दिला नाहीं, ही गोष्ट कितपत बरोबर झाली याचा वाचकांनींच विचार करावा.

जातिविषयक भेदभावासंबंधानेंहि तीच गोष्ट. विद्यमान कायद्यांत हे भेदभाव आहेत असें केळकर यांचें म्हणणें होतें, व तें केळकर यांना सप्रमाण दाखवून देण्यास कोर्टानें हरकत घेतली नसती तर ज्यूरीचे निकाल चूक कसे होतात व त्याचीं स्वाभाविक कारणें काय हें त्यांना दाखवितां आलें असतें. आणि हें दाखवितां आलें असतें तर न्यायाच्या तराजूचीं पारडींच मुळीं सारखीं कशीं नसतात व त्यामुळें ताजवाच बेतोल कसा होतो हें आपोआप सिद्ध झालें असतें. पण हीहि गोष्ट त्यांना न्यायमूर्तींनीं करूं दिली नाहीं. केळकरांची मुख्य तक्रार अशी होती कीं, पुण्यांतील ज्यूरी काय किंवा इतर ठिकाणची ज्यूरी काय, चूक ही तिच्या हातून होणारच; पण तिच्या हातून झालेली चूक दुरुस्त होण्यास सवड राहावी म्हणूनच क्रि. प्रो. कोडाचें कलम ३०७ यांत कायद्यानें हायकोर्टाला ज्यूरीचा निकाल फिरविण्याला भरपूर अधिकार ठेवलेला आहे. न्या. मार्टेन यांनीं म्हटल्याप्रमाणें विलायतेंत जातिभेदभाव कमी असतील व हिंदुस्थानांत ते अधिक अस-

तील तर विलायतेंत ज्यूरीचा निकाल फिरविणें ही गोष्ट जितकी जड तितकी हिंदुस्थानांत ज्यूरीचा निकाल फिरविणें ही गोष्ट जड होऊं नये. विशेषतः काळे व गोरे लोकांची विषम परिस्थति व विरोधी हितसंबंध लक्षांत घेतां, वॅाकरच्या सारख्या खटल्यांत हायकोर्टानें ज्यूरीचा निकाल फिरविणें अगदीं योग्य होतें, एवढेंच केळकरांचें म्हणणें होतें. आणि तें सिद्ध करून देण्याला ज्यूरी—पद्धतीच्या गुणदोषांची अवांतर चर्चा थोडी बहुत तरी करणें अगदीं जरूर होतें. पण त्याला आडकाठी करण्यांत आली.

न्यायाच्या आड जातिभेद येत नाहीं असें म्हणावें तर युरोपियन लोक नेटिव्ह न्यायाधिशाच्या हातून न्याय घेण्यास कां तक्रार करतात ? किंवा ज्यूरींत युरोपियन लोकांचें बहुमत असलेंच पाहिजे असा त्यांचा आग्रह कां चालूं शकतो ? सन १८३६ सालीं लॉर्ड मेकॉले यांनीं न्यायपद्धति सर्वांना सरसकट सारखी करण्याचा प्रयत्न केला, तेव्हां अँग्लो–इंडियन लोकांचा त्यांच्यावर गहजब झाला. ते म्हणूं लागले कीं, गोऱ्या आरोपींना काळ्या न्यायाधिशां-कडून न्याय मिळेल अशी अपेक्षा करणें म्हणजे बाभळीला द्राक्षें लागणें किंवा तरवडाला अंजीर येणें यासारखेंच अशक्य होय ! मग तोच न्याय गोरे न्यायाधिश व काळे आरोपी यांनाहि कां लागूं नये ? बरें, जो प्रकार न्यायाधिशां-चा तोच ज्यूरीचाहि असणारच. ज्यूरी म्हणजे फार तर एकाचे ऐवजीं पांच न्यायाधीश. हे पांच न्यायाधीश सरमिसळ वर्णाचे असले तर सरमिसळ तरी न्याय मिळूं शकेल. पण ते किंवा त्यांतील बहुमत विशिष्ट वर्णाचें असलें, किंवा तें विशिष्ट वर्णाचेंच हवें म्हणून तसें मागून घेण्याचा अधिकार आरोपीस असला तर त्यांजकडून मिळणाऱ्या न्यायाविषयीं कोणी शंका घेतल्यास त्यांत गैरशिस्त काय होईल ? ज्यूरीच्या न्यायावर हटकून विश्वास बसत नसला तरी अखेर ज्यूरीपद्धति हीच न्यायनिवाडे करण्याचें सर्वोत्कृष्ट साधन आहे, व विलायतेप्रमाणें हिंदुस्थानांतहि दिवाणी व फौजदारी दोनहि प्रकारचे दावे ज्यूरीपद्धतीनेंच निका-लांत निघतील तर तें हवें आहे.—ज्यूरी विशिष्ट वर्णाची नसून सरसकट निव-डली जावी म्हणजे ती संकीर्ण स्वरूपाची असावी म्हणजे झालें—असें उत्तर न्यायमूर्तीच्या एका अडवणुकीच्या प्रश्नास केळकर यांनीं दिलें. इतकी ही अवांतर चर्चा होत असतां ज्यूरीच्या निकालासंबंधींहि या किंवा इतर देशांत लोक साशंक कसे असतात, व तिच्या हातून न कळत पक्षपात कसा होऊं शकतो, हें केळकर

दाखवून देत असतां तें मात्र न्यायमूर्तींनीं त्यांना करूं दिलें नाहीं. एके ठिकाणीं तर असेंहि घडलेलें प्रेक्षकांच्या ध्यानांत असेल कीं, न्यायमूर्तींनीं अवांतर विषय बोलण्याची स्वतःला मुभा घेऊन विलायतेंतील ज्यूरीपद्धति निर्दोष असूं शकते असें विधान केलें. त्यावर केळकर हे स्वतःचा विलायतेचा अनुभव व पुस्तकी दाखले देणार असें दिसतांच न्यायमूर्तींनीं तो विषय तितकाच छाटून टाकला व ते दुसऱ्या विषयाकडे वळले ! तात्पर्य, कोर्टाच्या बेअदबीचा खटला चालविण्याला ठराविक अशी कायदेशीर पद्धत कांहींएक नाहीं. न्यायमूर्ति ठरवितील तीच पद्धत खरी असा अनुभव परवांच्या खटल्यांत पुरेपूर आलाच. पण त्यांतल्या त्यांत जीं बंधनें न्यायमूर्तींनीं केळकरांना घातलीं तींहि स्वतः त्यांचीं त्यांनीं पाळलीं नाहींत असेंच कष्टानें म्हणावें लागतें !

## ५ गुजराथी केसरी

[ ता. १ ऑगस्ट १९२४ रोजीं मुंबईस गुजराथी केसरी हें साप्ताहिक पत्र सुरू झालें त्याच्या पहिल्या अंकांतील प्रास्ताविक परिचय. ]

हिंदुस्थानच्या हितशत्रूजवळ हिंदुस्थानाला नांवें ठेवण्याचीं व नाउमेद करण्याचीं अनेक साधनें आहेत. त्यांतील एक मोठें साधन असें आहे कीं, हिंदुस्थान हें एकराष्ट्र नाहीं असा त्याजवर सरळ आरोप करावयाचा. या आरोपाचा हेतु उघडच आहे. ज्या देशांत एकराष्ट्रीयत्वाची भावना नाहीं त्या देशाला सर्व प्रांत मिळून समग्र स्वराज्य मागण्याचा अधिकार कसा पोंचणार ? आणि सर्व देशाला मिळून नाहीं तर मग प्रांताला अर्थात्च कोण विचारणार ! या हितशत्रूंना कोणत्या तरी एका प्रांताचा विशेष अभिमान असतो म्हणून ते एकराष्ट्रीयत्वाच्या कल्पनेला हरताळ फासतात असेंहि नाहीं. त्यांना त्यांपैकीं कोणताच प्रांत प्रिय नसतो. परंतु सर्व प्रांत मिळून हिंदुस्थानाविषयीं मोठेपणाची जी एक स्वराज्यपोषक कल्पना येऊं शकते तीहि परकीयांच्या मनांत येऊं नये एवढाच त्यांचा कावा असतो. ' फोडा झोडा ' या कुटिलनीतीचेंच हें एक प्रतिबिंब होय.

दुर्दैवानें आमच्यांतलेच कांहीं शहाणे या कुटिलनीतीला मोठेपणाच्या खोट्या भावनेनें बळी पडतात. कित्येकांना अशा गोष्टींत स्वार्थहि साधावयाचा असतो. आपण हिंदी संस्थानिकांचेंच उदाहरण घेऊं. ज्या राजेरजवाड्यांना व्यक्तिशः आपण ईश्वराचेच अवतार किंवा अंश आहों असें वाटतें, आणि वेद हे जसे

ईश्वराचे निश्वसित तसेंच संस्थानांतील कायदेकानू हेहि आपले निश्वासित असें मानण्याइतकी ज्यांची व्यक्तिकल्पना विराटस्वरूप धारण करूं शकते, त्यांनाच प्रजाहिताच्या दृष्टीनें ' आपल्या संस्थानांत एखादें कायदेकौन्सिल स्थापा ' असें कोणीं म्हटल्यास लगेच त्यांची कल्पना संकुचित होते; व जगांत असेल नसेल ती लीनता व स्वकीयांविषयींचा क्षुद्रपणा त्यांना भासूं लागतो ! "आम्ही काय लहान, आमचें संस्थान लहान, आमचे प्रजाजन लहान; सर्वच क्षुद्रपणाचा मामला असल्याकारणानें संस्थानांत कायदेकौन्सिलें बनविण्याची कल्पना कशाला काढतां ! " असे उद्गार ते काढूं लागतात. समाजसुधारकांची स्थिति कांहीं अंशीं तशीच आहे. हिंदुस्थान अखंड असला काय किंवा त्रुटित असला काय, यांच्या समाजसेवेची धमक कुंपणापर्यंत धांव जाणाऱ्या सरड्याइतकीच. पण हिंदुस्थानला कोणीं अखंड किंवा मोठा म्हटलें, किंवा त्याला एकराष्ट्र अशी संज्ञा दिली कीं, लगेच यांच्या पायाची तिडीक त्यांच्या कपाळाला जाऊन पोंचते.

पण हे संस्थानिक काय किंवा हें समाजसुधारक म्हणविणारे काय, दोघांच्याहि लक्षांत एक गोष्ट येत नाहीं ती ही कीं, मनुष्याला किंवा देशाला मोठेपणा येणें किंवा अखंडपणा येणें ही गोष्ट त्यांच्या शरीरावर अवलंबून नसून सर्वस्वीं त्यांच्या मनावर अवलंबून आहे. आकांक्षा ही यदृच्छेनें जसें लहान किंवा मोठें स्वरूप धारण करील तशी व्यक्ति लहान किंवा मोठी होईल, अथवा देशांतील लोक स्वतःला एक मानतील किंवा अनेक मानतील. संस्थानांतील प्रजाजन हा मात्र लिलिपुट देशांतील अंगुष्ठमात्र मनुष्याप्रमाणें गुणांनीं व कर्तृत्वानें ठेंगू, व हद्दीस हद्द भिडलेल्या ब्रिटिश राज्यांतील प्रजाजन हा मात्र ब्राबडिंगनॅग यांतील मनुष्याप्रमाणें गुणांनीं व कर्तृत्वानें ताडामाडाइतका उंच असें थोडेंच आहे ! दोनहि इलाख्यांतील मनुष्य शरीरानें व गुणानें तोच, परंतु एक आकांक्षाविकास, निदान त्या विकासाला क्षेत्र नसल्यानें, खुजट राहतो व दिसतो; आणि दुसऱ्याची आकांक्षा मोठी व ती पसरण्याला क्षेत्रहि मोठें मिळत असल्यानें तो मोठा होतो व दिसतो, इतकाच दोहोंमध्यें फरक. समाज-सुधारकांच्याहि ही गोष्ट लक्षांत येत नाहीं कीं, केवळ चालीरीति किंवा भाषा हीं बदलल्यानें हिंदुस्थानांतील उपराष्ट्रांचे लोक वेगळे होऊं शकत नाहींत. अनेक दुव्यांची सांखळी व एक दुवा यांत जोडाशिवाय दुसरें अंतर कांहीं नाहीं. सांखळींत झालें तरी अनेक दुवेच असतात. प्रश्न इतकाच कीं, हे दुवे सांधले तर

सांखळी, न सांधले तर डुबे. त्याचप्रमाणें हिंदुस्थानांतील निरनिराळे उपराष्ट्रीय लोक मनानें एकच आहेत अशी ज्यांची दृढभावना असेल त्यांच्या मनोनेत्रा-समोर हिंदुस्थान हा शब्द उच्चारतांच, एकवीस उपप्रांतांचा मिळून एक अखंड देहधारी पुरुष उभा राहतो. ज्याला ही व्यापक दृष्टि नाहीं त्याला मात्र या विराटस्वरूप दर्शनाचें सुख लाभणें शक्य नाहीं. देहामध्यें अवयव वेगवेगळ्या स्वरूपाचे व वेगवेगळें कार्य करणारे असले म्हणून देहाचें समष्टिस्वरूप जसें नष्ट होत नाहीं, तसेंच भाषावार प्रांतरचनेनें किंवा परंपरागत चालीरीतींनीं हिंदुस्था-नचे एकवीस खंड पडत असले तरी ते शरीराच्या अवयवांप्रमाणें राष्ट्राचें समष्टि-रूप सिद्ध करण्यालाच उपयोगी पडतात.

राष्ट्रीय सभेची नवीन घटना करण्याचे वेळीं महात्मा गांधी यांनीं पहिली गोष्ट केली ती, हिंदुस्थानचे भाषावार एकवसि प्रांत बनविण्याची. पण असें करण्यांत फोडण्यापेक्षां जोडण्याचीच कल्पना त्यांचे मनांत अधिक स्फूर्त झाली असली पाहिजे हें कोणीहि कबूल करील. सरकारी नऊ प्रांतांचे काँग्रेसकरतां एकवीस प्रांत बनवितांना हिंदुस्थानांत पूर्वीपेक्षां एकराष्ट्रीयत्वाची कल्पनाच अधिक स्थिर करण्याचा त्यांचा इरादा होता. हिंदुस्थानांत एकवीस उपराष्ट्रें किंवा प्रांत बनविणाऱ्या गांधींपेक्षां तीं उपराष्ट्रें किंवा प्रांत नऊच ठेवणाऱ्या सरकारची राष्ट्राभिमानाची बुद्धि अधिक होती असें कोणी म्हणेल काय? पण या नऊच उपराष्ट्रांत सरकारनें कारणपरत्वें जातीजातींत फूट पाडून एकाचे एकवीस बनविले, तर उलट म. गांधींनीं हिंदी भाषा ही सर्व हिंदुस्थानला एकभाषा म्हणजे जवळ जवळ मातृभाषा अशी बनवून एकवि-सांचा एक संघ केला ही गोष्टी लक्षांत ठेवली पाहिजे. म. गांधींप्रमाणें लो. टिळक यांनींहि हिंदी भाषेला पूर्वीपासून असेंच महत्त्व दिलें होतें. बनारस येथील नागरी-प्रचारिणी सभेमध्यें लो. टिळकांचें हिंदी भाषेवरील १९०५ सालीं झालेलें व्याख्यान हें म. गांधी यांच्या १९२० सालच्या आधीं पंधरा वर्षें झालें, व गांधीकृत हिंदीच्या पुरस्काराच्या सूर्योदयाचा खरा अरुणोदय म्हटला म्हणजे लो. टिळकांचें बनारस येथील हें व्याख्यान होय.

आतां अशा रीतीनें एका हिंदी भाषेच्या द्वारें एकराष्ट्रीयत्व सिद्ध करण्याचा प्रयत्न अनेक लोक प्रत्यक्ष एकत्र येतात तेव्हांच विशेष उपयोगी पडण्यासारखा आहे. पण एकाच भावनेची वृद्धि होत असतांहि निरनिराळ्या प्रांतांतील लोकांनीं प्रत्यक्ष एकत्र जमणें ही गोष्ट फारच थोड्या वेळां घडून येणारी आहे. गेल्या

चार वर्षांत एकाच भावनेनें सर्व देशभर राष्ट्रीय चळवळ झाली हें जरी खरें, तरी वर्षांतून राष्ट्रीय सभा भरण्याचा एक प्रसंग व ऑल इंडिया काँग्रेस कमिटी भरण्याचे फार तर चारदोन प्रसंग, यांखेरीज अवांतर सर्व चळवळ झाली ती ज्या त्या प्रांतांतूनच झाली. म्हणजे मुख्य भावना एकच, परंतु तिचें उद्घाटन निरनिराळ्या भाषांतूनच होत आलें आहे. जितक्या भाषा तितक्या भावना असत्या तर ही संघटना बनलीच नसती. या विवरणावरून बोध हाच घ्यावयाचा कीं, सर्व हिंदुस्थानला मिळून केव्हां एकभाषा होईल तेव्हां होवो, किंवा न झाली तरी न होवो; परंतु तीच एक भावना व तिला पोषक असे तेच विचार जवळ जवळ त्याच पद्धतीनें सर्व उपप्रांतांतून खेळत राहिले पाहिजेत, तरच सर्व उपप्रांतांची परिणति समान होईल. किंबहुना सर्व प्रांतांतून घराबाहेर व घरांत. लिहिण्यांत व बोलण्यांत, हिंदी ही एकच भाषा हिंदुस्थानभर होईल ही कल्पना अतिशयोक्तिदूषित ठरण्याचाहि बराच संभव आहे. झाड वाढतें तें एकाच बुंध्यावर, अनेक खांद्या सारख्या प्रमाणांत पोसल्या जाऊन; सर्व खांद्यांचें मिळून एकच खोड होऊन नव्हे. मनुष्यशरीर वाढतें तेंहि निरनिराळे अवयव यथाप्रमाण पण आपल्याच ठिकाणीं पुष्ट व परिणत होऊन. झाड वाढणें म्हणजे सर्व खांद्यांचें मिळून, एकच मोठें खोड होणें नव्हे; किंवा मनुष्यशरीर वाढणें म्हणजे सर्व मिळून एकच मोठा अवयवांचा लादा बनणें नव्हे. त्याचप्रमाणें एकराष्ट्रीयत्वाची वृद्धि होणें म्हणजे उपराष्ट्रीय सर्व भाषांचा एस्पेरेंटोप्रमाणें निर्गुण असा रांधा बनणें नव्हे.

मग व्यष्टीची वृद्धि होऊन शिवाय समष्टीचीहि वृद्धि होणें ही गोष्ट कशानें घडते, तर तोच जीवनरस वृक्षांच्या अनेक खांद्यांतून किंवा मनुष्यदेहाच्या अनेक अवयवांतून खेळत राहून अखेरच्या टोंकापर्यंत पोंचल्यामुळें तोच दाखला घेऊन आम्ही असें म्हणतों कीं, नैसर्गिक रीतीनें हिंदुस्थानांत एकराष्ट्रीयत्वाची वाढ व्हावयाची तर आकांक्षारूपी एकच जीवनरस पण तो निरानिराळ्या भाषांच्या धमन्यांतून, सर्व देशभर पसरला पाहिजे. सर्व हिंदुस्थानांत एकट्या हिंदी भाषेंतीलच वर्तमानपत्रें छापलीं व वाचलीं जातील तेव्हां तो सोन्याचा दिवस असेंहि आपण वाटेल तर म्हणूं ! पण त्याच्या खालोखाल म्हणजे आजच्या स्थितीहून वरच्या दर्जाची सुधारणा म्हटली म्हणजे तीच भावना व तेच विचार ज्या त्या प्रांतांतील भाषांच्या द्वारें प्रसृत होणें ही होय. हें कसें घडेल याचीं उदाहरणें द्यावयाचीं तर आम्ही असें म्हणूं कीं, स्वदेशामित्रम् हा तामीलप्रमाणेंच बंगालींतहि निघाला पाहिजे. आनंदबझार पत्रिका ही बंगालीप्रमाणें केरळ भाषेंतहि

निघाली पाहिजे. मुंबईचा गुजराथी हा शिखांच्या गुरुमुखींतहि निघाला पाहिजे. तेज व वंदेमातरम् हीं पत्रें उर्दूप्रमाणेंच मराठींत निघालीं पाहिजेत. अभ्युदय व आज हीं पत्रें हिंदीप्रमाणें तामिलमध्येंहि निघालीं पाहिजेत. आंध्रपत्रिका ही उरीया भाषेंतहि निघाली पाहिजे. कानडींतील स्वदेशाभिमानी हा कानडीप्रमाणें सिंधींतहि निघाला पाहिजे. सिंधु, समाचार हा सिंधीप्रमाणें तेलगू भाषेंतहि निघाला पाहिजे आणि ही अद्‌भुतरम्य कल्पना जर अप्रशस्त नसेल तर केसरी हा गुजराथींत आणि हिंदींत निघावा यांत लोकविलक्षण तें काय ?

वरील इतर कल्पना अद्यापि गर्भकोषांतच गुरफटून राहिल्या असतील. केसरीनें मात्र हें कवच विदारण करून पूर्वी हिंदी भाषेंत आपलें स्वरूप प्रकट केलें तसेंच तो आज गुजराथींत करीत आहे इतकाच काय तो फरक ! यांत भाषावर्चस्वाची बुद्धि नाहीं, उपप्रांतीय स्पर्धा नाहीं, द्रव्यलोभाची बुद्धि नाहीं, तर स्वस्वरूपविस्ताराची सात्विक इच्छाच मुळाशीं असणार. पाणीदार घोड्याला कांटेलगामाचा जसा राग येतो, तसेंच तेजस्वी विचारांना भाषाबंधन दुःसह वाटतें. हें बंधन दूर होण्याला दुसऱ्यांना आपली भाषा शिकविणें हा एक मार्ग कल्पनागम्य असला तरी, त्याहून अधिक सोपा व तूर्तातूर्तचा असा दुसराहि एक मार्ग आहे, व तो आत्म्यानें परकायाप्रवेश करावा त्याप्रमाणें एका भाषेंतील विचारांनीं दुसऱ्या भाषेंत शिरून तिचें रूप धारण करून तेथें आपला खेळ मांडणें हा होय. कोणत्याहि सरहद्दीवरील लोकांना लगतच्या दोन भाषा येत असल्यामुळें दोन-दोन प्रांतांतील वर्तमानपत्रें व मासिकें वाचण्याचें सुख त्यांना लाभतें. पण वर दर्शविल्याप्रमाणें अनेकविध वर्तमानपत्रें निघालीं असतां सरहद्दीवरील लोकांना मिळणारें हें सुख प्रांताच्या कोनाकोपऱ्यांत राहणाऱ्या लोकांनाहि सहज मिळेल. केसरी गुजराथींत निघणें यांत स्वतः केसरीची किंवा तो काढणारांची कोणत्याहि प्रकारें स्पर्धेची बुद्धि नाहीं हें आम्ही एकदांच सांगून ठेवतों तर 'बहुस्यां प्रजायेय" ही जी परब्रह्माची सात्विक इच्छा तीच, म्हणजे आपण अनेकविध व्हावें अशीच सात्विक इच्छा या कामीं केसरीची आहे.

अशा प्रकारचे प्रयत्न वाङ्मयांत पूर्वी होत आलेच आहेत. पण वाङ्मयांतील विषय चालू वादासंबंधानें नसल्यामुळें एका ग्रंथाचीं अनेक भाषांत रूपांतरें झाल्यास त्याचें कोणास वैषम्य वाटत नाहीं. पण वर्तमानपत्रांत चालू राजकारणाचा संबंध येत असल्यामुळें अविचारी मनाला अहंकारी

स्पर्धेचा भास होण्याचा संभव म्हणूनच हा इषारा आम्ही मुद्दाम देत आहों. कितीतरी बंगाली वाङ्मय ग्रंथांचीं भाषांतरें नित्य मराठींत होतात व मराठी वाचक तीं आनंदानें वाचतात, त्यांत त्यांना आपल्या प्रांतावर दुसऱ्या कोणीं स्वारी किंवा चढाई केली असें वाटत नाहीं. उलट रामदास किंवा तुकाराम यांचें भाषांतर हिंदींत झाल्यास हिंदी लोकांना वाईट वाटूं शकत नाहीं. लो. टिळकांच्या गीतारहस्याचीं भाषांतरें निरनिराळ्या देशभाषांतून होऊन त्यांना मागणी एकसारखी सुरू असते. येथेंहि 'टिळकांनीं अतिक्रमण केलें किंवा लुटारू मराठ्यांनीं आपल्या प्रांतावर स्वारी केली' असें वाटून या ग्रंथाचे आड कोणी खंदक खणीत नाहीं; तर असलेल्या खंदकावर उलट सोईसवलतीचे पूल बांधून हातानें त्याचा आदर करून त्याला आपल्याकडे घेतात. आणि परप्रांतीय लोकांची जी भावना टिळकांच्या गीतारहस्याविषयीं तीच लोकमान्यांच्या केसरीविषयींहि त्यांनीं उदारपणें ठेवावी अशी आमची त्यांना सविनय विज्ञप्ति आहे. बाजारांत एकाच जिनसाचीं दुकानें होतां होईतों एकाच ठिकाणीं बसावीं असेंच व्यवहारचतुर दुकानदारांना वाटत असतें. याहि दृष्टीनें गुजराथी केसरीला व्यवहारज्ञ असे त्याचे गुजराथी व्यवसायबंधु शेजारी बसवून घेण्याची इच्छा कां न धरतील ? महात्माजींनीं नवजीवन हें सुंदर पत्र प्रथम गुजराथींत काढलें, नंतर तें हिंदींत चालूं लागलें. त्यानंतर त्याचा प्रवेश मराठी भाषेच्या द्वारेंहि थोडा वेळ झाला—पण पुढें मराठी नवजीवन बंद पडलें ही गोष्ट वेगळी. नवजीवनाचा प्रसार अनेक भाषांतून करण्यांत जी सात्त्विक बुद्धि दिसून येते तीच गुजराथी केसरी काढण्यामध्येंहि त्याच्या चालकांची आहे. व या प्रतियोगी सहकारितेच्या प्रेमळ दृष्टीनेंच गुजराथी वाचकवर्ग गुजराथी केसरीकडे पाहतील अशी आशा प्रगट करून हा लेख संपवितों.

---

## ६ केसरी-मराठा ट्रस्टींचा खुलासा

( केसरी, ता. २७ सप्टेंबर १९२७ )

केसरी व मराठा या पत्रांचा ट्रस्ट झालेला असून हीं पत्रें छापखाना वगैरेबद्दलची सर्व वहिवाट आमचेकडे ट्रस्टी या नात्यानें सोंपविण्यांत आलेली आहे. या ट्रस्टच्या उपयोगाकरितां गायकवाडवाड्याचा एक भाग आम्हांकडे ट्रस्टडीडअन्वयें व निरंतरच्या भाडेचिठ्ठीवरून आहे. अलीकडे या जागेच्या वहिवाटीस अनेक प्रकारांनीं बाध येऊं लागला, तेव्हां लोकमान्य टिळक व त्यांचे

चिरंजीव यांनीं नेमून दिलेल्या पंचांकडे आमचेपैकीं धोंडो वासुदेव विद्वांस यांनीं गेल्या मे महिन्यांत तक्रारी अर्ज गुदरून पंचकयास होण्यासाठीं आपली तयारी दर्शविली. परंतु लोकमान्यांच्या चिरंजिवांनीं लोकमान्यांची इच्छा व स्वतः ट्रस्टडीडमध्यें केलेली योजना यांस न जुमानतां पंचांसमोर हजर होण्याचें व आपलें म्हणणें मांडण्याचें नाकबूल केलें. तेव्हां नाइलाज होऊन वहिवाटीच्या हरकती कायमच्या दूर करून घेण्यासाठीं आम्हांस पुणें फर्स्ट क्लास कोर्टांत लोकमान्यांच्या चिरंजिवांवर दावा करणें भाग पडलें. या दाव्याचें काम चालू असून त्याचा निर्णय व्हावयाचा आहे. दरम्यान या वादासंबंधानें कित्येक वर्तमानपत्रांतून अयथार्थ निराधार लेख लिहिले जात आहेत, त्यांतील प्रत्येक मुद्द्यावर भरपूर व समर्पक उत्तर आम्हांस देतां येईल. तथापि न्यायकोर्टाचा निकाल होईपर्यंत या बाबतींत कांहीं लिहिण्याचा आमचा विचार नाहीं. जे लोक आमच्याविषयीं पूर्वग्रहदूषित नसतील, त्यांना सर्व खुलासा आजच करीत बसण्याचें कारण नाहीं. आणि जे तसे असतील त्यांच्यापुढें खुलासा करण्यापासूनहि कांही फायदा नाहीं. तात्पर्य, कोर्टांत गेलेलें प्रकरण कडेला लागेपर्यंत या वादाविषयीं विशेष कांहीं लिहिण्याचा आमचा विचार नाहीं. तरी आमच्याविषयीं सहानुभूति असणारांनीं व हितचिंतकांनीं कोणत्याहि प्रकारचा गैरसमज करून घेऊं नये अशी विनंति आहे. निंदकांना आमची कसलीच विनंति नाहीं. त्यांनीं आपलें कर्तव्य खुशाल करीत राहावें.

**न. चिं. केळकर,**
**धों. वा. विद्वांस,**
ट्रस्टी, केसरी–मराठा संस्था.

---

## ७ गायकवाडवाड्यांतील गणेशोत्सव

( केसरी, ता. २१ ऑगस्ट १९२८ )

### ट्रस्टींविरुद्ध दंडेलीचा निष्फळ प्रयत्न

केसरी-मराठा संस्थेचे ट्रस्टी आणि लो. टिळकांचे चिरंजीव यांच्यामध्यें अलीकडे दोन वर्षें वाद उत्पन्न झाल्याचें वाचकांना माहीत आहेच. या वादाचा निकाल कोर्टामार्फत करून घेणें गतवर्षीं ट्रस्टींना अगदीं प्राप्त झालें तेव्हां ता. १६ ऑगस्ट १९२७ रोजीं ट्रस्टींनीं वादी होऊन पुणें फर्स्ट क्लास कोर्टांत टिळक बंधूंविरुद्ध निरंतरच्या ताकिदीबद्दलचा दावा मांडला. याच सुमारास वार्षिक गणपत्युत्सव येणार होता म्हणून याच दाव्यांत ट्रस्टींनीं टिळक बंधूंविरुद्ध

तूर्तातूर्त ताकिदीची दाद मागितली व त्याप्रमाणें कोर्टानें समक्ष जागेवर येऊन तात्पुरती व्यवस्था केली. त्यामुळें गायकवाडवाड्यांतील गतवर्षीचा गणपत्युत्सव ट्रस्टींना कसा तरी पार पाडतां आला. परंतु यंदा टिळकांच्या चिरंजीवांची मजल ट्रस्टींना हरकत करण्याच्या मार्गांत आणखी पुढें गेली व तिचा परिणाम काय झाला याची हकीकत वाचकांना कळावी याकरितां संक्षेपानें ती खालीं दिली आहे.

कोर्टानें टिळक बंधूंना गतवर्षी दिलेली ताकिद त्या उत्सवाबरोबर संपली. कारण ती तात्पुरती होती. त्यानंतर या उत्सवापर्यंत वादींच्या मुख्य दाव्याचा निकाल लागेल अशी ट्रस्टींना अपेक्षा होती. पण मध्यंतरीं घडलेल्या अनेक गोष्टींमुळें या दाव्याची मजल येथपर्यंत येऊं शकली नाहीं. यंदाच्या गणत्युत्सवांतील तंटा रामभाऊ टिळक यांनींच ता. २८ जुलै रोजीं ट्रस्टींना नोटीस देऊन उपस्थित केला. या नोटिशींत " उत्सवासंबंधीं कोणताहि हक्क तुम्हांला नाहीं. आज नाहीं, उद्यां नाहीं, केव्हांहि नाहीं. आणि मी जो कार्यक्रम ठरवीन त्यांत तुम्हीं हरकत आणल्यास त्याचा खर्च व परिणाम तुम्हाला भोगावे लागतील " असें लिहिलें होतें. अर्थात् गतवर्षाच्याच कारणाकरितां यंदाहि फिरून कोर्टाकडे तूर्तातूर्त मनाईताकिदीची दाद मागणें ट्रस्टींना प्राप्त झालें. त्याप्रमाणें ता. २-८-२८ रोजीं अर्ज करण्यांत आला. त्याची सुनावणी फर्स्ट क्लास सबजज्ज यांचेपुढें होऊन ता. १६-८ रोजीं त्या कोर्टानें ट्रस्टींतर्फे निकाल देऊन रामभाऊ टिळक यांना तात्पुरती मनाईची ताकीद दिली. या निकालांतील मुख्य भागाचा सारांश आज दुसरीकडे पृष्ठ २ वर दिला आहे; हा निकाल अमान्य म्हणून त्यांनीं दुसरेच दिवशीं मुंबई हायकोर्टांत अपील दाखल केलें व त्याच दिवशीं ट्रस्टींतर्फेचा वकीलहि कोर्टांत हजर राहिल्यामुळें अपिलाची सुनावणी व त्याचा निकाल त्याच दिवशीं झाला. ( या निकालाचा त्रोटक सारांश त्याच पृष्ठावर आम्हीं दिला आहे. ) त्यावरून आजच्या घटकेला तरी कोर्टांत दाखल झालेल्या कागदपत्रांवरून केसरी-मराठा संस्थेचा अधिकार व तिच्या ताब्यांत असलेल्या स्थावर-जंगम मिळकतीची वहिवाट ही कायदेशीर रीतीनें ट्रस्टींचीच आहे ही गोष्ट पुणें फर्स्ट क्लास कोर्ट व हायकोर्ट यांनीं सिद्ध मानली आहे हें वाचकांना दिसून येईल.

फर्स्ट क्लास कोर्टाचा मनाईताकिदीचा हुकूम झाला तरी तो आपण मानणार नाहीं अशी वृत्ति रामभाऊ टिळक यांनीं प्रथमापासूनच प्रकट केली होती. प्रथम-

कोर्टानें एकदां निकाल दिल्यावर, आणि विशेषतः हायकोर्टानें तो कायम केल्यावर तरी, ते सुविचारानें वागतील अशी थोडीशी आशा कोणाकोणाला वाटत होती. परंतु तीहि व्यर्थ ठरली. फर्स्ट क्लास कोर्टाचा हुकूम झाल्यादिवशीं तो आपल्यावर बजावूं न देण्याची त्यांनीं तजवीज केली आणि हायकोर्टाचा निकाल होऊन ते पुण्यास परत आल्यावर कोर्टाचा हुकूम बजावण्याला बेलीफ आला असतां तो मी सही देऊन लागूं करूं घेत नाहीं असें त्यांनीं बेलिफला सांगितलें. तेव्हां तो हुकूम त्याला रीतीप्रमाणें दरवाजावर चिकटवावा लागला. पण रामभाऊ यांनीं लगेच तो फाडूनहि टाकला. फर्स्ट क्लास कोर्टाचा निकाल होतांच त्यांनीं असे उद्गार एकदोन ठिकाणीं प्रकट केले कीं, मी गायकवाडवाड्यांत बसवलेली गणपतीची मूर्तीच उचलून फेकून देईन! आणि रामभाऊ टिळक हे गायकवाडवाड्यांतच रात्रंदिवस राहात असल्यामुळें आणि केसरी-मराठ्याचीं कोणीहि माणसें वाड्यांत कायम राहात नसल्यामुळें रामभाऊ हे आपलें बोलणें खरें करून दाखवितील आणि उत्सवाचा भंग करतील अशी भीति सहजच उत्पन्न झाली. यामुळें ट्रस्टींनीं पोलीस अधिकाऱ्यांकडे अर्ज करून उत्सवाच्या सर्व दिवसांत हजर राहण्याकरितां व मूर्तीचें संरक्षण करण्याकरितां चार पोलीस शिपायांची पार्टी मागितली व त्याप्रमाणें ती देण्यांत आली.

रविवारीं ता. १९ रोजीं सकाळीं सुमोरें ११ वाजतां उत्सवमूर्ति आणून वाड्यांत बसविली व रीतीप्रमाणें पूजा-अर्चा होऊन तिची प्राणप्रतिष्ठा झाली. वाड्यांत मूर्ति आल्यापासून रामभाऊ टिळक यांच्या येरझारा मंडपांत व इतर भागांतून हेतुपुरस्पर टेहळणीच्या दृष्टीनें सुरू झाल्या. पुढें १२-१२॥ वाजतां इतर सर्व मंडळी आपआपल्या ठिकाणीं गेली असें पाहून रामभाऊ टिळक यांनीं प्रथम आपली किल्ली चालवून मखराचें बाजूचें दार उघडण्याचा प्रयत्न केला. पण तो निष्कळ झाला. तेव्हां समोरून मखराच्या मुख्य उघड्या भागांतून उडी घेऊन गणपतीच्या बैठकीखालीं त्यांनीं हात घातला. परंतु जवळ पोलीस शिपाई उभा होता त्यानें त्यांचा हात धरून त्यांस खेंचून मागें ओढलें व त्यांना अटक केली. अर्थात् हा प्रकार पाहून व ऐकून बरीच मंडळी वाड्यांत व वाड्याबाहेर जमली. नंतर पोलीस शिपायांच्या बोलावण्यावरून फरासखान्यांतून पो. इन्स्पेक्टर व नंतर डे. सुपरिंटेंडेंट हे आले. पो. इन्स्पेक्टर यांनीं रामभाऊजवळ बसून अनेक प्रकारांनीं त्यांची समजूत घालण्याचा प्रयत्न केला व तुमचें म्हणणें

काय आहे तें लिहून द्या असें म्हटल्यावर, रामभाऊ यांनीं झाल्या प्रकाराची लेखी कबुली दिलीच, पण आणखी असेंहि लिहून दिलें कीं, " मखरांत शिरून गणपतीची मूर्ति उचलून नेण्याचा माझा उद्देश होता व मला क्षणभर मोकळें सोडलें तर फिरून मी तीच गोष्ट करीन. " हें पाहतांच रामभाऊ यांना यापुढेंहि अटकेंत ठेवल्याशिवाय इलाज नाहीं असें समजून पो. अधिकारी त्यांना फरासखान्यांत घेऊन गेले; व तेथें त्यांनीं असें ठरविलें कीं, कि. प्रो. कोड कलम १०७ प्रमाणें शांततेचा भंग न करण्याबद्दल जामीन घेण्याचें काम चालवावें. त्याप्रमाणें सुमारें तीन वाजतां पोलीस अधिकारी व त्यांचे वकील हे रामभाऊ टिळक यांना घेऊन डि. मॅजिस्ट्रेट ट्यूडर ओवेन यांजकडे गेले व त्यांच्यापुढें पोलिसांनीं स्वतःची म्हणून फिर्याद मांडली. त्याप्रमाणें मॅजिस्ट्रेट यांनीं कच्चा हुकूम लिहून तुमच्याकडून जामीन कां मागूं नये याचीं कारणें दाखवा असा जाब विचारला. परंतु समाधानकारक उत्तर न मिळाल्यामुळें पुढील रीतसर कामास सुरवात झाली. रामभाऊ टिळक यांनीं आपल्या वकिलाचा सल्ला घेण्याची इच्छा प्रदर्शित केल्यावरून स्वतः पोलीस इन्स्पेक्टर हे गेले व रामभाऊचे वकील ॲड. चक्रनारायण यांना त्यांनीं कोर्टांत आणून दाखल केलें, तेव्हां तुम्ही रामभाऊंना एका बाजूस नेऊन चांगला सल्ला द्या असें डि. मॅजिस्ट्रेट यांनीं सांगितलें. परंतु सुमारें दहा मिनिटांनीं परत येऊन वकिलांनीं कांहींच उत्तर न दिल्यामुळें खाजगी तडजोडीचा प्रयत्न निष्फळ झाला असें समजून ट्रस्टी धोंडोपंत विद्वांस व पो. इन्स्पेक्टर यांच्या शपथेवर जबान्या घेतल्या. तसेंच रामभाऊ टिळक यांचाहि जबाब घेऊन त्यांनीं पूर्वी आपल्या हातानें लिहून दिलेला मराठींतील जबाब दाखल करून घेतला. यानंतर जामीन घेणें तो किती मुदतीपर्यंत घ्यावा याबाबत मॅजिस्ट्रेट, पोलीस व वकील यांच्यामध्यें चर्चा होऊन मॅजिस्ट्रेट यांनीं असा लेखी हुकूम दिला कीं, रामभाऊंनीं ता. १९ ऑगस्टपासून ता. २९ ऑगस्टअखेरपर्यंत म्हणजे गणपत्युत्सवाच्या दहा दिवसांच्या मुदतींत आपण फर्स्ट क्लास कोर्टाचा हुकूम तोडणार नाहीं किंवा शांतताभंग करणार नाहीं अशाकरितां एक हजार रुपयांचा जातमुचलका व प्रत्येकीं एक हजार रुपयांचे दोन जामीन द्यावे आणि हें घडून येईपर्यंत सरकारी अटकेंत राहावें.

हा हुकूम लिहिण्यास प्रारंभ करण्यापूर्वी व तो लिहून होत असतांहि मॅजिस्ट्रेट यांनी परोपरीनें रामभाऊ यांस असें सांगितलें कीं, "तुमच्याकडून जामीन मागणें हें

तुम्हींच मला अपरिहार्य करीत आहां. दोन दिवाणी कोर्टांचे हुकूम झाले ते तुम्हाला तूर्त मान्य केल्याशिवाय गत्यंतर नाहीं. उद्यां ऐनदाव्याचा निकाल तुमच्यासारखा झाला तर तुमची तक्रार कायमचीच दूर होईल. पण तोंपर्यंत आहे त्या स्थितींत समाधान मानून राहणें हेंच समजूतदारपणाचें होईल. तुमच्यावर असलें काम चालवावें यांत ट्रस्टींना, पोलिसांना किंवा मला बरें वाटण्यासारखें कांहींच नाहीं. उलट याबद्दल आम्हाला खेदच होतो. तुरुंगांत राहिल्यानें तुमच्या कार्याला कसलीच मदत होणार नाहीं. आमची ही खटपट तंटा मिटावा, बखेडा होऊं नये, दंगाधोपा होऊं नये येवढ्याकरितांच आहे. तुम्ही यापुढें तरी पूर्वींसारखा प्रकार करणार नाहीं किंवा ट्रस्टींच्या उत्सवाला इतर प्रकारांनीं अडथळा करणार नाहीं असें प्रामाणिकपणानें आश्वासन द्याल, किंवा या उत्सवाच्या दहा दिवसांत मी पुण्यास न राहतां बाहेर जाईन असें सभ्य गृहस्थाच्या इमानदारीचा शब्द म्हणून मला आश्वासन द्याल, तर तें स्वीकारण्याची माझी अजूनहि तयारी आहे व मग मी जामिनकीचा पक्का हुकूम देणार नाहीं." अशा रीतीनें सांगूनहि कांहीं उपयोग झाला नाहीं तेव्हां मॅजिस्ट्रेट यांनीं अखेरच्या हुकुमावर सही केली, व केवळ जामीन किंवा तोंडी आश्वासन देण्याचें नाकारल्यामुळें रामभाऊ टिळक यांना दहा दिवस सरकारच्या अटकेंत राहणें प्राप्त झालें. मूळ मनाई-हुकूम दिवाणी कोर्टाचा, प्रत्यक्ष राखण सरकारी पोलिसांची, असें असतां मनाई-हुकूम तोडून ट्रस्टींचा गणपति उचलून नेण्याच्या कृत्याचा उघड व बेमुर्वतखोर प्रयत्न झाल्यामुळें पोलीस शिपायांना रामभाऊंना प्रथम अटक करावी लागली. आणि आतां मोकळें सोडलें तरी पुढें प्रतिक्षणीं तोच तोच प्रकार घडून येण्याची भीति उघड दिसून येते, तेव्हां जामीन घेणें किंवा अटकेंत ठेवणें याखेरीज आपल्यावरील कायदेशीर जबाबदारी पार पाडण्याला दुसरा उपाय नाहीं असें, स्वतः रामभाऊ यांच्या लेखी जबाबावरून व नंतरच्या तोंडी संभाषणावरून, ठरल्यामुळें पोलिसांनाच मॅजिस्ट्रेटपुढें फिर्याद करावी लागली. यापुढील मुदतींत तरी कांहीं सुविचार सुचून रामभाऊ हे जामीन देतात किंवा अटकेंतच राहूं इच्छितात हें आपोआप दिसूनच येईल. अशा रीतीनें हा खेदकारक प्रकार घडून आला म्हणून, रविवारीं सायंकाळीं गायकवाड-वाड्यांत श्री. गंगाधररावजी देशपांडे यांचें व्याख्यान जाहीर झालें होतें व श्रोतृसमाजहि जमला होता तरी, सर्वांनाच खेदकारक व विमनस्क करणाऱ्या या प्रकारामुळें

व्याख्यानाचा दिवसाचा कार्यक्रम रहित करावा असें ट्रस्टींनीं ठरवून, केळकर यांनीं ट्रस्टींतर्फे त्या दिवसाचा व तत्पूर्वीचाहि चालू वादांतील वृत्तांत सांगितला व सभा बरखास्त झाली.

आतां चालू वादासंबंधानें विशेष महत्त्वाच्या अशा एक दोन मुद्द्यांच्या गोष्टी वाचकांना नीट समजणें अवश्य आहे म्हणून त्या येथें देत आहों. ट्रस्टी व रामभाऊ टिळक यांच्यामध्यें आज मुख्य वाद केसरी-मराठा संस्थेच्या वहिवाटीसंबंधाचा आहे. या संस्थेसंबंधानें झालेलें ट्रस्टडीड हें टिळक-बंधू व ट्रस्टींपैकीं धों. वा. विद्वांस अशा त्रिवर्गानीं करून दिलेलें आहे. टिळक बंधू यांनीं १९२० सालीं ट्रस्टडीड रजिस्टर्ड करून देऊन, लो. टिळकांचे मृत्युपत्रांत लिहिल्याप्रमाणें तें कार्य स्वतःच्या नात्यानेंहि करून देऊन, वडिलांचे हेतु सफळ करण्याचें श्रेय घेतलें आणि केसरी-मराठा संस्थेवरील स्वत्वनिवृत्ति केली. इतकेंच नव्हे तर १९२१ सालीं त्यांनीं असा स्वच्छ बेदावा ट्रस्टींना लिहून दिला कीं, लो. टिळकांच्या मृत्युपत्राप्रमाणें आम्हाला जें कांहीं मिळावयाचें त्याची स्वतंत्र रीतीनें व्यवस्था झाल्यामुळें यापुढें केसरी–मराठा संस्थेकडे आमचें येणें किंवा त्यावर आमचा कांहीं एक बोजा राहिलेला नाहीं. उलटपक्षीं केळकर व विद्वांस यांच्या नांवें ट्रस्टडीड झालें असलें तरी स्वतः ते किंवा त्यांच्यामागून येणारे इतर ट्रस्टी यांना केसरी–मराठा संस्थेंत खासगी किंवा व्यक्तिशः असा कोणताच हितसंबंध मिळालेला नाहीं. लोकमान्यांच्या मृत्युपत्रामुळें टिळक बंधूंकडे या संस्थेवर कांहीं स्वत्व उरतच नव्हतें; व कोणत्याहि तऱ्हेच्या अर्थानें किंवा संबंधानें जें कांहीं उरलेंसुरलें अशी टिळक-बंधूंची समजूत असेल त्याचीहि निवृत्ति त्यांनीं ट्रस्टडीड व बेदावा पत्र ( रिलीज डीड ) यांनीं करून दिली. अशा रीतीनें ट्रस्ट ही स्वतंत्र अधिकाराची व वहिवाटीची संस्था झाली. आणि याहि-उपर सहा वर्षांनीं झाली गोष्ट ही आपली चुकली किंवा ट्रस्टडीड उलथून टाकून देऊं, अशी बुद्धि स्वतः किंवा कोणा दुष्ट बदसल्लागारांच्या सल्ल्यामुळें टिळक-बंधूंना नवी उत्पन्न झाल्यास त्यांना न्यायकोर्टाचा मार्ग खुला आहे; व कांहीं बाबतींत त्यासंबंधानें उलट–सुलट दावे दाखल होऊन सुनावणी होण्यापर्यंतहि मजल आली आहे. तेव्हां अर्थातच मध्यंतरीं कोणताहि बखेडा न करणें हेंच टिळक-बंधूंना योग्य होतें. परंतु बखेडा केल्यानें आपल्यास कांहीं फायदा होईल अशा खोट्या समजुतीनें त्यांनीं मालकी वहिवाटीच्या मुद्द्याला जोड म्हणून इतर कांहीं भलत्या वादाच्या दिखाऊ गोष्टींचा आश्रय केला आहे.

गतवर्षी त्यांच्या ह्या उपद्व्यापाच्या प्रयत्नास त्यांनीं गायकवाडवाड्यांतील उत्सवांत अस्पृश्यांना येऊं देणें न देणें या प्रश्नाचें स्वरूप दिलें व ट्रस्टींच्या कार्यक्रमाची वाट न पाहतां आपणच, मालकी हक्क बजावण्याचा पुरावा करण्याच्या हेतूनें, त्यांनीं अस्पृश्यांच्या मेळ्याला स्वतःचें निमंत्रण दिलें. पण अस्पृश्यांचा मेळा मंडपांत येऊं देण्याला ट्रस्टींची अमान्यता केव्हांच नव्हती ! तर फक्त निमंत्रण द्यावयाचें झालें तर तें ट्रस्टी देतील इतकेंच चालू वादाला अनुलक्षून हक्कसंरक्षणाचे दृष्टीनें ट्रस्टींचें म्हणणें होतें. व त्याप्रमाणें अस्पृश्यांचा मेळा आला, त्याचा कार्यक्रम झाला, व त्याचा सत्कारहि ट्रस्टींनीं केला. पण गतवर्षींचसें काय, खरी गोष्टच अशी आहे कीं, टिळकांच्या हयातींत केव्हांहि व त्यानंतर केव्हांहि गायकवाडवाड्यांतील गणपतीच्या मंडपांत अस्पृश्यांना किंवा त्यांच्या मेळ्यांना येण्याला कांहींच बंदी नव्हती. थेट मखरापर्यंत त्यांचा प्रवेश होत असे. त्यांना मुख्य बैठकीवर बसूं देण्यांत येई, आणि गुलाल लावणें किंवा पानविडा देणें अशा प्रकारें रीतीप्रमाणें त्यांचा सत्कारहि होई. येथील अस्पृश्यांच्या श्रीकृष्ण मेळ्याचे चालक राजभोज यांनीं सन १९२७ सालीं जी पद्यावलि प्रसिद्ध केली तिच्या अहवालांत खालील वाक्य आहे–" गतवर्षीं ( १९२६ ) शिवाजी मंदीर, जोगेश्वरी, गायकवाडवाडा, व्यापारी मंडळ, रास्ता, शुक्रवार, सोमवार, बुधवार पेठ नेनेघाट, अस्पृश्य वस्ती वगैरे ठिकाणीं स्पृश्यांनीं मेळ्याला बोलावून सहानुभूति दाखविली." राजभोज यांची ही कबुली १९२६ सालीं घडलेल्या गोष्टीबद्दलची आहे ! आणि तेव्हां कोर्टांतील वादहि उपस्थित झाला नव्हता ! अर्थात् गतवर्षी ( १९२७ ) अस्पृश्यांना गायकवाडवाड्यांत येण्याला ट्रस्टी मज्जाव करतात व आमचा मालकी हक्क म्हणूनच आम्ही ते आणूं शकतों असा टिळक-बंधूंनीं बाहणा केला तो अगदीं खोटा होता. तसेंच आणखी एक पायरी उंच उडी मारण्याकरितांच कीं काय, यंदा रामभाऊ टिळक यांनीं गायकवाडवाड्यांतील गणपति आम्ही प्रत्यक्ष पूजेलाहि अस्पृश्यांना मोकळा ठेवूं अशी जाहिरात दिली. पण अशा बतावणीच्या झाकणाखालीं मालकी हक्काचें घोडें पुढें दामटण्याचा जो एक हेतु होता तो कसा फसला हें जामिनकीच्या खटल्याची हकीकत वर दिली त्यावरून दिसून येईल.

तसेंच प्राणप्रतिष्ठा झालेल्या मूर्तीची पूजाहि करण्याला अस्पृश्यांना नसलेली मोकळीक देण्याचा रामभाऊंचा जो औदार्याचा जाहिरनामा प्रगट झाला तोहि

फुकट होता. या बाबतींत नुकतीच घडलेली वर्धा येथील श्रीलक्ष्मीनारायणाच्या देवळासंबंधींची हकीकत सांगून व शे. जमनलाल बजाज यांचें उदाहरण देऊन लोकांची दिशाभूल करण्याचा प्रयत्न झाला तोहि पण व्यर्थच होय. कारण श्रीलक्ष्मीनारायणाच्या देवळांत आजहि अस्पृश्यांना नवी सवलत म्हणून जी देण्यांत आली आहे ती देखील सभामंडपांत जाऊन दुरून दर्शन घेण्याची. प्रत्यक्ष मूर्तीला स्पर्श करून पूजा करण्याची नव्हे ! उलटपक्षीं गायकवाडवाड्यांतील टिळकांच्या हयातींत काय किंवा त्यानंतर काय, हीच पद्धत चालू आहे. म्हणजे मखरापर्यंत अस्पृश्यांनाहि जाण्याची मोकळीक, पण प्रत्यक्ष आंत जाऊन मूर्तीला स्पर्श करून पूजा करण्याची परवानगी फक्त एका नियोजित पण पुजाऱ्यालाच. मखराच्या आंत अस्पृश्यच काय, पुजाऱ्याखेरीज इतर कोणी म्हणजे ब्राह्मणहि सोंवळा असला तरी त्याला मूर्तीची पूजा करण्याचा अधिकार नाहीं. रामभाऊ टिळक यांना खरोखर उपास्यमूर्तीला अस्पृश्यांच्या हातूनच मुद्दाम पूजा घडवावयाची असती तर स्वतःच्या घरीं देव ठेवून एखादा अस्पृश्य पुजारी मुद्दाम नेमण्याला त्यांना कांहींच हरकत नव्हती. पण लो. टिळकांच्या वेळचे घरचेच देव फडक्यांत बांधून खुंटीला कायमचे ठेवण्यांत आल्यावर हे पूजा कोणाची करणार ! तेव्हां गायकवाडवाड्यांतील ट्रस्टींच्या गणपतीला अस्पृश्यांची पूजा मोकळी ठेवण्याचा जाहिरनामा काढल्यास घरीं देवांचा उपद्रव होऊं न देतां ईश्वरभक्तीचें पुण्य लाभलें, हलवायाच्या घरावर ब्रह्मार्पण या न्यायानें अस्पृश्योन्नतीच्या औदार्याचें सोळा आणे माप त्या वर्गाच्या पदरांत टाकतां आलें, आणि या दोन फायद्यांच्या मिषानें स्वतःचा मुख्य तिसरा फायदा सहज साधला तो असा कीं, ट्रस्टींच्या हातीं असलेल्या उत्सवावर मालकी हक्क गाजविण्याचा पुरावा सिद्ध झाला. पण असले दुहेरी तिहेरी फायदे स्वार्थीपणानें साधण्याची कल्पकता सुचण्यासारखी असली तरी ती सफळ होण्याइतकी सोपी नसते हें घडलेल्या प्रकारावरून दिसून येईलच.

गतवर्षी जोडभांडण म्हणून अस्पृश्यांच्या निमंत्रणाचें निमित्त सांपडलें. यंदा त्यांच्या सुदैवानें पंचांगवादाचें आणखी एक निमित्त रामभाऊ टिळक यांना मिळालें. वास्तविक पंचांगाचा वाद किंवा अभिमान असेल तर तो जाणत्या पुढाऱ्यांमध्यें किंवा पंचांगशोधनाचें कार्य आपापल्या परीनें करीत राहणाऱ्या

लोकांमध्यें असणार. या कामीं केसरीचे ट्रस्टी हे स्वतः ज्योतिषी गणक नसले तरी त्यांच्या प्रामाणिक समजुतीनें लोकमान्यांनीं स्वीकारलेल्या अयनांशाप्रमाणें व त्यांनीं मान्य केलेल्या संस्कारपद्धतीप्रमाणें शुद्ध पंचांग एक टिळकांचें स्मारक समजून व त्यांच्या हेतुसिद्ध्यर्थ ते आज आपल्या खर्चानें सात आठ वर्षें छापवीत आहेत. शिवाय आधारभूत करणग्रंथ करण्याकरितां टिळकांनीं नियोजित केलेल्या ज्योतिष्यांस देणगी म्हणून १००० रु. केसरी-ट्रस्टींनीं टिळकांच्या मरणोत्तर दिले. या गोष्टी लक्षांत घेतां नव्या पंचांगाचा अभिमान धरून ट्रस्टींनीं गायकवाडवाड्यांतील उत्सव नव्या म्हणजे टिळक पंचांगाप्रमाणें केला तर तें कोणीहि सयुक्तिकच म्हणेल. पण रामभाऊ टिळकांनीं जुन्या पंचांगाचा अभिमान धरून व नवें पंचांग हें थोतांड म्हणून तो उत्सव आम्ही जुन्या पंचांगाप्रमाणें पुढें करणार व आज नव्या पंचांगाप्रमाणें करूं देणार नाहीं असा आग्रह धरणें यांत खरी नजर पंचांगाच्या गुणदोषावर आहे किंवा फिरून मालकी हक्काचें घोडें पुढें दामटून पुरावा उत्पन्न करण्याकडे आहे हें कोणासहि दिसून येईल. पण या असंबद्ध प्रकाराच्या सूक्ष्म वर्णनांत आम्ही शिरत नाहीं. कारण त्यांत आम्हाला व्यक्तीवर टीका करावी लागेल व ती करण्याची आमची इच्छा नाहीं. तात्पर्य, टिळक-बंधु आणि केसरी-मराठा संस्थेचे ट्रस्टी यांच्यांतील वादाचें खरें स्वरूप काय होतें व आहे आणि अवांतर वाद आगंतुक रीतीनें उपस्थित करून बेकायदा दामटल्या जाणाऱ्या मालकी हक्काच्या घोड्याच्या खुरांनीं धूळ उडवून बाहेर लोकांची दिशाभूल करण्याचा प्रयत्न कसा चालू होता व आहे, याची हकीकत केव्हां तरी एकदां लोकांच्या कानावर घालणें अवश्य झालें होतें. म्हणून या प्रसंगानें आज ती थोडी दिली आहे.

लोकमान्यांच्या इच्छेप्रमाणेंच केसरीसंस्थेची व्यवस्था करण्याकरितां स्वतः टिळकबंधूंनीं सर्व कागदपत्र केले. पण आतां ते खोटे व अप्रामाणिकपणें करविलेले आहेत असें सिद्ध करून ही व्यवस्था उलथून पाडण्याचा रामभाऊ टिळक यांचा स्पष्ट इरादा आहे! हा उद्देश साध्य करून घेण्याच्या प्रयत्नाचाच एक भाग "गणेशोत्सव आम्हीं करणार व ट्रस्टींना करूं देणार नाहीं" हा आहे. वस्तुतः मूर्तिपूजा मी धार्मिकदृष्ट्या मानीत नाहीं असें रामभाऊंनीं गतवर्षींच एका जबाबांत कोर्टापुढें सांगितलें होतें! ट्रस्टडीडमध्यें गणेशोत्सव साजरा करण्याचा हक्क व कर्तव्य ट्रस्टींकडे स्पष्ट शब्दांत सोंपविलें आहे, व तें कर्तव्य व हक्क सोडल्यास या ट्रस्टडीड-

मधील एका कार्याला बाध येणारा आहे हा यांत एक महत्त्वाचा मुद्दा आहे हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. असो; मूळ दाव्यांचा निकाल लागेपर्यंत आम्हीं टीकाकारांच्या टीकांना कोणत्याही प्रकारें उत्तर न देण्याचें ठरविलें होतें. तोच आमचा विचार बहुतांशीं आजहि कायम आहे. तथापि अखेर निकाल होईपर्यंत आम्हांस स्वस्थच बसूं न देण्याचा कोणीं निश्चय केल्यास जरूरीपुरता तरी खुलासा करणें आम्हांस प्राप्तच आहे. पण तोहि खुलासा म्हणून, टीकाकारांना उत्तर म्हणून नव्हे. तें देण्याची वेळ येईल तेव्हां रीतसर देऊंच देऊं हें टीकाकारांनीं लक्षांत ठेवावें.

शेवटीं मुद्याची अशी आणखी एक गोष्ट सांगणें अवश्य आहे ती सांगतों. ती ही कीं, गेल्या रविवारीं घडलेल्या प्रकारांत ट्रस्टींचा प्रत्यक्ष संबंध कांहींच नाहीं. उत्सवमूर्तीचें संरक्षण व्हावें इतकेंच त्यांना हवें होतें, आणि झाला तो सर्व प्रकार हायकोर्टाच्या हुकुमानें बांधले गेलेले पोलिस अधिकारी व मॅजिस्ट्रेट यांच्या दरम्यानच परस्पर घडलेला आहे. रामभाऊंनीं हुकूम मोडला तो कोर्टाचा, दंडेली केली ती पोलिस शिपायांशीं. फिरून हरघडी हीच गोष्ट करीन असें लिहून दिलें तें पोलिसांनाच, फिर्याद पोलिसांनींच केली व जामिनाचा हुकूमही याच फिर्यादीवरून मॅजिस्ट्रेटांना द्यावा लागला. हा वाद खाजगी रीतीनें तुटला तर तोडण्याची ट्रस्टींची इच्छा व तयारी होती. आणि मुनसफसाहेब मि. पारेख यांनीं तशी संधी दिली तेव्हां पुण्यांतील तीन गृहस्थ म्हणजे बापूसाहेब काळे, पेन्शनर डि. जज्ज, रा. ब. लक्ष्मणराव देशपांडे, पे. डे. कलेक्टर, आणि बाबासाहेब देशपांडे, पे. डे. पो. सु. हीं तीन नांवें वकील भोपटकर यांनीं सुचविलींहि. पण रामभाऊ टिळक यांनीं यांपैकीं कोणतेंच नांव मान्य केलें नाहीं. तेव्हां स्वतः कोर्टानें रा. ब. राळे, फ. क्लास स्पे. मॅजिस्ट्रेट व पेन्शनर यांचें नांव सुचविलें. परंतु तेंहि त्यांनीं मानलें नाहीं. अशा रीतीनें तडजोडीच्या प्रयत्नास ट्रस्टी हे कबूल होते, पण स्वतः रामभाऊ टिळक हे नाकबूल होते ही गोष्ट लोकांना कळणें अवश्य आहे.

दुसरें असें कीं, गतवर्षीं कोर्टानें ट्रस्टींच्या अर्जावरून वेळोवेळीं टिळकबंधूंना कित्येक गोष्टी न करण्याबद्दल तात्पुरत्या ताकिदी दिल्या त्या मोडून रामभाऊ यांनीं कडीकोयंडे तोडले, मखर कापलें, मखराचें कुलूप तोडलें, योजनेविरुद्ध कार्यक्रम घुसडले व ते कोर्टाच्या हुकुमानें होत आहेत अशीं खोटीं हस्त-

पत्रकें काढलीं. अर्थात् या गोष्टी ट्रस्टींचे वकील यांनीं अर्ज करून कोर्टाच्या नजरेस आणल्या व त्यावर काम चालू झालें असतें तर रामभाऊ टिळक यांजवर गतवर्षीच कोर्टानें खटला भरला असता. परंतु उत्सव होऊन गेल्यामुळें झाल्या गोष्टीबद्दल काम चालवून खटला भरला जावा, रामभाऊ टिळक यांस शिक्षा किंवा दंड व्हावा अशी ट्रस्टींची इच्छा नसल्यानें ट्रस्टींच्या वकिलांनीं कोर्टास लिहून दिलें कीं, आम्हाला याबाबत काम चालवावयाचें नाहीं. तसेंच दिवाणी दावे दाखल होण्यापूर्वी गतवर्षी टिळक-बंधूंनीं ट्रस्टींना बेजाबता धमक्या देण्याचे अत्यंत भयंकर असे कांहीं उद्गार काढल्यावरून ट्रस्टींनीं सहीसाक्षीनिशीं पोलिस सुपरिंटेंडेंट यांजकडे बंदोबस्तासाठीं अर्ज केला होता. त्यासंबंधीं पुढें त्यांजकडून विचारण्यांत आलें तेव्हांहि आजच्यासारखा जामीन घेण्याचा प्रसंग असतांहि, वाईटपणा होईल तितका टाळावा या हेतूनें, ट्रस्टींनीं पोलिस अधिकाऱ्यांस कळविलें कीं, आम्ही पुढें काम चालवूं इच्छित नाहीं. तुम्ही समजुतीच्या चार गोष्टी सांगून, जें कांहीं घडत आहे त्याची दखलगिरी सर्वांना आहे असा इषारा टिळक-बंधूंस दिल्यानें तूर्त काम भागेल असें सांगून ट्रस्टींनीं पुढील काम चालविलें नाहीं. फार काय गेल्या जून महिन्यांतच आपसांत समजुतीनें या वादाचा निकाल झाला तर अजूनहि व्हावा या इच्छेनें दोघांहि ट्रस्टींनीं रामभाऊ टिळक यांना सामोपचाराचें पत्र लिहून त्यांचें म्हणणें विचारलें असतां "चोराशीं तडजोड कोण करतो?" असा अपमानास्पद जबाब ट्रस्टी यांना देण्यांत आला. उलट टिळक-बंधूंनीं पूर्वीं ए… कामांत विश्वासघाताची खोटी फौजदारी फिर्याद ट्रस्टींवर करून त्यांना शिक्षा करण्याचा प्रयत्न कोणत्याहि प्रकारें खासगी खुलासा न विचारतां किंवा लो. टिळकांनीं नेमलेल्या पंचांकडे फिर्याद न देतां, केला होता पण तो फसला. ही व अशा इतर अनेक गोष्टी ट्रस्टींतर्फे लोकांना सांगतां येतील. परंतु आम्हीं त्यांत आज अधिक खोल जाऊं इच्छित नाहीं. या वादांत कित्येक टीकाकारांनीं बारीकसारीक गोष्टींसंबंधानें खोटी व गैरसमज उत्पन्न करणारी टीका आजपर्यंत चालविली आहे. अशा लोकांच्या बारीकसारीक सर्व शंकाकुशंका आमच्या येवढ्या खुलाशानेंहि कदाचित् नाहींशा होणार नाहींत हें आम्ही जाणून आहोंत. पण आम्हीं पूर्वी प्रसिद्ध केल्याप्रमाणें कोर्टाचा निकाल झाल्यावरच या गोष्टी साधार–सप्रमाण व संगतवार सर्व लोकांपुढें मांडतां येतील. कोर्टांत काम चालू असेपर्यंत कांहीं गोष्टी कायदेशीर दृष्ट्या तितक्या खुलासेवार मांडतां येत नाहींत.

लो. टिळकांच्या प्रत्यक्ष चिरंजिवांशीं वाद असल्यामुळें निरुपाय म्हणून ज्या गोष्टी कराव्या लागल्या तितक्याच सरळ कायदेशीरमार्गानें आजपर्यंत ट्रस्टींनीं केल्या आहेत व पुढें त्याच ते करतील. आडमार्गानें एक पाऊलहि टाकणार नाहींत, असें आजवर अनुभवास आलें आहे व पुढेंहि येईल अशी आम्हाला खात्री वाटते. एकदां कोर्टांत पाऊल पडल्यावर अखेर कोर्टाचा निकाल होईल तोच मान्य करण्याची तयारी ठेवणें सरळ बुद्धीचें होय. आतां येऊं नयेत असले खेदकारक व नाजुक प्रसंग जगाच्या व्यवहारांत सर्वांवरच नशिबानें येत असतात, तसलाच याहि वादाचा प्रकार होय ही गोष्ट लक्षांत घेऊन वाचकांनीं आजवर जशी मनाची धीरवृत्ति व समता ठेवली तशी याहिपुढें ठेवावी, व केसरी-मराठ्याचे चालक व या पत्रांचे वाचक यांच्यामध्यें एक विशेष जिव्हाळ्याचें नातें आहे हें लक्षांत ठेवून शक्य तर ट्रस्टींना या कामीं सहानुभूतिहि द्यावी, अशी विनंति आहे.

* * * *

## गणपत्युत्सवाचा वाद

( केसरी, ता. ४ सप्टेंबर १९२८ )

गायकवाडवाड्यांतील गणपत्युत्सवाच्या वादासंबंधानें गेल्याच्या मागील केसरींत आम्हीं कांहीं खुलासा केला आहे. त्यावरून पुष्कळच वाचकांचें समाधान झालें असें दिसतें. तथापि पुण्या–मुंबईच्या बाहेरच्या वाचकांना, वादांतील कित्येक मुद्द्यांच्या गोष्टींची, असावी तितकी कल्पना नाहीं असें कित्येकांनीं आमच्याकडे विचारलेल्या माहितीबद्दलच्या प्रश्नांवरून दिसतें. म्हणून या वादांतील मुद्दे व वस्तुस्थिति पुनः एकवार त्रोटक रीतीनें वाचकांचे पुढें मांडण्याचा विचार केला आहे.

( १ ) गायकवाडवाड्याचे दोन भाग आहेत. [ १ ] पूर्वेकडील राहता अर्धा भाग. यांत पूर्वी लोकमान्य राहात असत व हल्लीं तो त्यांच्या मुलांकडे आहे. या भागाला त्यांचा एक उत्तराभिमुख थेट रस्त्यावर स्वतःचा असा स्वतंत्र दरवाजा असून, वाड्याच्या मुख्य दरवाजांतूनहि पण फक्त आपल्या घरांत जाण्या–येण्याच्या वहिवाटीचा त्यांना हक्क आहे. वाड्याच्या या राहत्या भागांत पूर्वी सार्वजनिक उत्सवांतील गणपति कधींच बसविलेला नव्हता. लो. टिळक यांच्या हयातींत फक्त घरचा खासगी एक गणपति दोन दिवस घरांत बसविला जाई. [ २ ] याच वाड्यांतील पश्चिमेकडील निमा भाग हा पहिल्यापासून राहण्याच्या घरासारखा उपयोगांत येत नसून, यांतील इमारती मोकळी जागा वगैरे सर्वांचा उपयोग

लो. टिळकांच्या वेळेपासून आतांपर्यंत केसरी कचेरी, छापखाना, कागद, कंपोझिंग खातें, केसरीची लायब्ररी व राष्ट्रीय किंवा सार्वजनिक स्वरूपाच्या संस्था अथवा चळवळी यांच्या कचेऱ्या यांसाठीं उपयोगांत येई. टिळकांच्या वेळीं ह्या भागांत 'होमरूल लीग' कचेरी होती. हल्लीं तेथें प्रांतिक-काँग्रेस कमिटी, वसंत-व्याख्यानमाला, वक्तृत्वोत्तेजक सभा, वगैरे संस्थांच्या कचेऱ्या असतात. याच पश्चिमार्धांतील आवारांतच १९०६ पासून म्हणजे टिळकांनीं वाडा घेतल्यापासून उत्सवांतील गणपति बसविला जातो. या गणपतीचा पोलीस-पास जसा टिळकांच्या हयातींत तसाच त्यानंतरहि आज ८ वर्षे, केसरीचे मॅनेजर व एक ट्रस्टी धोंडोपंत विद्वांस यांच्याच नांवें काढण्यांत येत असतो. आणि या उत्सवाचा खर्च आजवर केसरी संस्थेच्या पैशांतून केला जातो. टिळकांच्या हयातीपर्यंत या खर्चाची कमी--अधिक मंजुरी स्वतः टिळक देत असत, पण त्यांच्या मरणोत्तर ह्या खर्चाचा सर्वस्वीं अधिकार केसरी संस्थेकडे आलेला आहे. आणि या बाबतींत स्वतः आपणाला कांहीं अधिकार आहे असा हक्क लोकमान्यांच्या चिरंजिवांनीं गेल्या वर्षापर्यंत सांगितलाहि नव्हता.

( २ ) जी गोष्ट खर्चाची तीच उत्सवांतील कार्यक्रमांचीहि. गेल्या सालापर्यंत म्हणजे टिळकांच्या मृत्यूनंतर सतत सात वर्षेपर्यंत, या कार्यक्रमांत अमुक एक गोष्ट करा न करा म्हणण्याचा अधिकार आपणास आहे अशी मागणी टिळक-बंधूंनीं कधींहि केलेली नव्हती. कार्यक्रम ट्रस्टी हेच ठरवीत. आणि पानसुपाऱ्यांच्या निमंत्रणावर केसरीच्या व्यवस्थापकांचीच सही असे. गतवर्षी या कार्यक्रमांत हात घालण्याची बुद्धि टिळक-बंधूंना झाली असें पाहतांच, ट्रस्टींनीं मनाई-ताकिदीचा हुकूम कोर्टाकडे मागितला व कोर्टाकडून तो देण्यांतहि आला. यंदा रामभाऊ टिळक यांनीं एक पायरी वर मजल मारली, व एकंदर उत्सवालाच प्रतिबंध करण्याचे हेतूनें ऐनजिनसी उत्सवांतील गणपतीची मूर्तिच उचलून नेण्याचा प्रयत्न केला. पण तो बेकायदेशीर असल्यामुळें कोर्टानें धुडकावून लावला. आणि रामभाऊंविरुद्ध मनाई--ताकिदीचा हुकूम दिला असतां तोहि जाणूनबुजून त्यांनीं मोडला म्हणून त्यांना सरकारी अटकेंत राहावें लागलें.

( ३ ) गतवर्षापर्यंत असला कोणताच हक्क टिळक-बंधूंनीं न सांगण्याचें कारण उघड आहे. त्यांना ही जाणीवच होती कीं, तारीख १६ ऑगस्ट १९२० रोजीं टिळक--बंधू व मृत्युपत्राचे एक्झिक्यूटर धोंडोपंत विद्वांस अशा तिघांनीं लो.

टिळकांच्या मृत्युपत्राला अनुसरून व इतर रीतीनें तें पूर्ण करण्याकरितां जें ट्रस्ट-डीड लिहून दिलें त्यांत उत्सवासंबंधानें एक स्पष्ट कलमच घालण्यांत आलेलें आहे, तें कलम असें:—

## ट्रस्टडीड कलम ११

" आजपर्यंत गायकवाडवाड्यांत श्रीगणपत्युत्सव केसरी ऑफिसचे खर्चानें होत आला आहे त्याप्रमाणें तो उत्सव यापुढेंहि ही संस्था कायम आहे तोंपर्यंत ट्रस्टी यांनीं ट्रस्ट मिळकतींतून खर्च करून साजरा करावा. "

यावरून हें लक्षांत येईल कीं ' केसरी ' व ' मराठा ' पत्रांबरोबरच केसरा-मराठा संस्थेचें एक निश्चित कार्य म्हणून, गणपत्युउत्सव ट्रस्टींकडे गेला. या उत्सवासंबंधानें टिळकांच्या चिरंजिवांना खास असा कोणताच हक्क राखून ठेवण्यांत आलेला नाहीं. अशा रीतीनें टिळकांच्या हयातींत एकाच वेळीं गायकवाडवाड्यांत दोन गणपती बसत असत. एक खासगी. तो त्यांच्या वाड्याच्या राहत्या भागांत असे व त्यांतील मूर्तीचें आवाहन, विसर्जन, पूजाअर्चा वगैरे सर्व खासगी रीतीनें दोन दिवस होत असे, त्याचबरोबर पुण्यांतील दहा दिवसांच्या सार्वजनिक गणपत्युत्सवांतील एक गणपति म्हणून वेगळी मूर्ति गायकवाड-वाड्याच्या पश्चिमार्धांतील छापखान्याच्या आवारांत बसविण्यांत येत असे, आणि तिला केवळ खासगी किंवा घरगुती असें स्वरूप नसे. केसरी-व्यवस्थापकांच्या कामांतीलच तें एक काम समजलें जाई, म्हणून ट्रस्टडीडमध्येंहि या कार्यांचा अंतर्भाव ट्रस्टींचें कार्य म्हणून करण्यांत आला.

( ४ ) गायकवाडवाड्यांतील या पश्चिमार्धासंबंधानें आणखी एक गोष्ट वाचकांनीं लक्षांत ठेवावी ती ही कीं, त्यांतलि इमारतींसह ही जागा केसरी संस्थेकडे भाड्यानें रहावी अशी टिळकांचीच योजना होती व ती त्यांच्या मृत्युपत्रांत स्पष्टपणें नमूद केलेली आहे. आणि त्याप्रमाणें १९२१ सालीं ' केसरी ' संस्थेनें ह्या आवाराची निरंतरची भाडेचिठ्ठी टिळक-बंधूंना लिहून दिली असून त्याकरितां केसरी संस्था यांना दरमहा १०० रुपये भाडें देतें. व टिळक-बंधु तें भाडें स्वीकारतात. इतकेंच नव्हे तर याच जागेंतील एक लहानसा भाग टिळक-बंधूंना वापरावयास हवा लागला तेव्हां त्यांनींहि उलट ' केसरी ' संस्थेला भाडेचिठ्ठी लिहून ती रजिस्टर करून दिली व त्या भाडेचिठ्ठीप्रमाणेंच तो त्यांना देण्यांत आला. अशा रीतीनें वाड्यांतील दोनहि भागांचे हक्क कायमचे

व पृथक् करण्यांत आलेले आहेत. अर्थात् टिळक-बंधूंच्या खासगी जागेंत त्यांच्या परवानगीशिवाय जाण्याचा केसरी संस्थेच्या ट्रस्टींना व इतर लोकांना जसा कोणताहि हक्क नाहीं, तसेंच केसरी संस्थेकडे कायमच्या भाडेचिठ्ठीनें असलेल्या या जागेंतहि स्टटींच्या परवानगीशिवाय येण्याजाण्याचा किंवा ती जागा वापरण्याचा कोणताहि हक्क ( मुख्य दरवाज्यांतून त्यांच्या राहत्या घरांत जाण्यायेण्याच्या वहिवाटीशिवाय ) टिळक-बंधूंना उरलेला नाहीं.

( ५ ) तात्पर्य, अशा रीतीनें उत्सवाची जागा ट्रस्टींच्या पूर्ण सत्तेची आहे, ट्रस्टींकडे उत्सवाचें कार्य हें एक त्यांचें काम म्हणून सोंपविण्यांत आलेलें आहे. उत्सवांत होणारा सर्व खर्च केसरी ऑफिसमधूनच व्हावयाचा असतो, आणि या उत्सवांत टिळकबंधूंना राखून ठेवलेले असे कोणतेहि अधिकार नाहींत. इतक्या सर्व गोष्टी लक्षांत घेतल्या म्हणजे रामभाऊ टिळक यांनीं उत्सवाच्या मंडपांत परवानगीशिवाय शिरावें, हिंडावें, मखराचें कुलूप काढण्याचा प्रयत्न करावा, मखराच्या पुढील दारांतून आंत जाऊन गणपतीच्या बैठकीला हात घालावा ही शुद्ध दंडेली नव्हे तर काय ? परवानगीशिवाय रामभाऊ टिळक यांनीं या जागेंत शिरणें हाच मुळीं ट्रेसपसचा ( अतिक्रमणाचा ) गुन्हा आहे. आतां जोंपर्यंत सख्य व सामोपचार हीं नांदतात तोंपर्यंत कोणाचाहि हक्क व अधिकार कसाहि असला तरी एकमेकांनीं एकमेकांच्या जागेंत भलेपणानें येणें जाणें ह्या गोष्टी चालूं शकतात. परंतु आम्ही " ट्रस्टडीड मानीत नाहीं ! आठ वर्षांची वहिवाट मानीत नाहीं ! भाडेचिठ्ठी मानीत नाहीं ! कोर्टाचा हुकूम मानीत नाहीं ! तात्पर्य, कांहींच मानीत नाहीं. मनाला येईल तेंच दंडेलीनें करणार " अशी वृत्ति रामभाऊ टिळकांची दिसूं लागल्यावर ट्रस्टींना कोर्टाकडे मनाईहुकूम मागणेंच प्राप्त होतें. अशा प्रकारच्या हक्कासंबंधाचे प्रश्न केसरीच्या हजारों वाचकांच्या स्वतःच्या अनुभवांतहि उपस्थित झाले असतील व पुढेंहि होतील. आणि अशा बिकट प्रसंगीं स्वतः त्यांनीं पूर्वी काय केलें असेल व यापुढेंहि ते स्वतः काय करतील, म्हणजे वाद उपस्थित झाल्यावरहि स्वतःच्या कायदेशीर हक्कांचें अतिक्रमण करूं देतील कीं काय, हें मनांत आणून, मगच केसरी ट्रस्टींनीं केलें तें बरोबर कीं चूक याचा निर्णय त्यांनीं मनाशीं द्यावा. स्वतःवर संकट नाहीं तोंपर्यंत लोकांना उपदेश करण्याचें पांडित्य कोणालाहि असतें. परंतु अशा गोष्टींत दुसऱ्याला दोष देतांना आत्मौपम्य दृष्टीनेंच पहावें लागतें.

( ६ ) आपल्या मनासारखा कांहीं विशेष कार्यक्रम व्हावा; किंवा अस्पृश्यादिकांना प्रत्यक्ष मूर्तीची पूजा करूं द्यावी, एवढीच गोष्ट रामभाऊ टिळक यांना हवी असली तर ती त्यांना स्वतःच्या राहत्या जागेंत गणपतीची दुसरी मूर्ति आणून स्थापून सहज करतां आली नसती काय? त्याकरितां ट्रस्टींचा गणपति उचलण्याचें कांहीं कारण नव्हतें. दुकानांतून दुसरा गणपति त्यांना मिळूं शकला असता, आणि जेथें आज आठ वर्षांत गणपतीचें नांव नाहीं, तेथें त्यांनीं यंदा उत्सव केला असता तर त्यालाहि एक प्रकारें त्यांना 'आमच्या गायकवाडवाड्यांतील गणपत्युत्सव' असें म्हणवून घेतां आलें असतें. पण बोलूनचालून आडमार्गांत शिरावयाचें, पंचांगवाद व अस्पृश्यतानिवारण यांचें निमित्त करून पर्यायानें केसरी ट्रस्टींच्या जागेंत होणाऱ्या उत्सवावर मालकी प्रस्थापित करावयाची, व यावर मालकी म्हणून मग इतरांवरहि मालकी असा आपमतलबी क्रम सुरू करावयाचा असा रामभाऊ टिळक यांचा हट्ट उघड दिसून आल्यामुळें आपल्या हक्कसंरक्षणाकरितां ट्रस्टींना दिवाणी कोर्टाकडे जाण्याशिवाय मार्ग राहिला नाहीं. "उत्सव ट्रस्टींचा, तो करणार मी, पण खर्च मात्र द्यावा ट्रस्टींनीं" असला विचित्र कोटिक्रम कोर्टास पटला नाहीं हें साहजिकच आहे. टिळक-बंधूंना ट्रस्टींच्या कारभारांत ढवळाढवळ करण्याला कोणत्याही प्रकारें वावच राहूं नये म्हणून त्यांच्या विरुद्ध कायम मनाई हुकुमाचा दिवाणी दावा ट्रस्टींनीं गतवर्षीं मांडला आहे. त्यांत मुद्दे निघून आतां मुकद्दमा पुराव्यापर्यंत आला आहे व लवकरच त्याचा निकालहि होईल. तेव्हां तो निकाल होईपर्यंत थांबणें हेंच रामभाऊ टिळकांना सरळपणाचें झालें असतें. पण तशी वाट न पाहतां केवळ मनाच्या हक्कावर व अधिकारावर आपण वाटेल तें करूं असें वर्तन रामभाऊ टिळक यांनीं चालविल्यावर ट्रस्टींनींहि आपल्या कायदेशीर हकांचें संरक्षण करणें हेंच त्यांचें कर्तव्य होतें.

( ७ ) कित्येकांना अशी कल्पना सुचते कीं, या वादामुळें केसरी ट्रस्टींनीं यंदा उत्सवच अजीबात न केला असता तर काय झालें असतें? पण त्याला उत्तर हेंच कीं, या बाबतींत ट्रस्टींना नेमून दिलेलें काम जर त्यांनीं केलें नाहीं तर उलट त्यांच्यावरच कित्येक लोकांनीं शब्द ठेवला असता. आणि ट्रस्टींच्या हक्काला एक बाधक पुरावा म्हणून त्याचा चालू खटल्यांत उपयोगहि केला गेला असता. आज गणपत्युत्सव करूं नका म्हणाले, उद्यां 'आमची मालकी आहे'

असें म्हणून केसरी–मराठा पत्र काढण्याच्या बाबतींतहि जर रामभाऊ टिळक असाच हक्क सांगू लागले तर तो ट्रस्टींनीं मानावा कीं काय ?

( ८ ) असो. एकदां मनाईहुकूम मिळाल्यावर मग खरा विरोध रामभाऊ टिळक व ट्रस्टी यांच्यामध्यें उरला नव्हता. तो रामभाऊ टिळक व दिवाणी कोर्टांचे अधिकारी यांच्यामध्यें उरला. म्हणून पोलिसांना ही गोष्ट हातीं घेऊन मॅजिस्ट्रेटपुढें मांडावी लागली. बरें पोलिसांनीं रामभाऊ टिळक यांना प्रथम अटक केल्यानंतर जरी त्यांनीं माघार घेतली असती तरी देखील पुढील दहा दिवसांची अटक उपस्थित झाली नसती. पण पोलिस अधिकाऱ्यांना रामभाऊ टिळक यांनीं आपल्या हातानें जी जबानी म्हणून लिहून दिली तींत त्यांनीं असें स्पष्ट लिहून दिलें आहे कीं, यापुढें मी क्षणभरहि जरी मोकळा राहिलों तरी गणपति उचलून नेण्याचा हट्ट मी पुरा करीन असें त्यांनीं निक्षून लिहून दिल्यानंतर त्या दिवशीं नाहीं तरी पुढें उत्सवांतील दहा दिवसांत हा प्रसंग क्षणोक्षणीं उद्भवणारच अशी पोलिस अधिकाऱ्यांना परस्पर खात्री पटली म्हणूनच त्यांनीं तसें न करण्याविषयीं जामीन मागितला. अशा जबानीनंतर जामीन घेतल्याशिवाय त्यांना मोकळें ठेवणें ही गोष्ट पोलिस किंवा मॅजिस्ट्रेट यांना अधिकारी या नात्यानें शक्यच नव्हती. यावरून रामभाऊ टिळक यांना दहा दिवसांचा जो कारागृहवास घडला तो त्यांनीं आपण होऊन आपल्या हातानें ओढवून घेतला, पोलिस व मॅजिस्ट्रेट हे नको नको म्हणत असतांना ओढवून घेतला, हें वाचकांच्या लक्षांत येईलच.

## रामभाऊ टिळक यांची सुटका

( ९ ) कोर्टांचा व पोलिसांचा हुकूम मोडून केसरी ट्रस्टींच्या उत्सवांत दंडेली करण्याचा हट्ट धरल्यामुळें, व मॅजिस्ट्रेटांनीं परोपरीनें सांगितलें असतां अखेर-पर्यंत जामीन देण्याचें नाकारल्यामुळें, रामभाऊ टिळक यांना दहा दिवस येरव-ड्याच्या तुरुंगांत रहावें लागलें. तेथें त्यांस युरोपियन वॉर्डमध्यें ठेवण्यांत आलें होतें. गुरुवार ता. ३० ऑगस्ट रोजीं सकाळीं त्यांची सुटका होणार त्या दिवशीं त्यांची मिरवणूक काढण्याचें पुण्यांतील केसरीचा द्वेष करणाऱ्या कांहीं मूठभर मंडळींनीं ठरविलें. रामभाऊ टिळकांची दंडेली ही वास्तविक केवळ ट्रस्टींविरुद्ध मालकी हक्काच्या भांडणासाठीं आहे ही गोष्ट आतां सर्व समंजस लोकांना कळून चुकली आहे. तथापि पंचांगवाद व

अस्पृश्यता–निवारण या गोष्टी मुद्दाम कांहीं अर्धवट लोकांची दिशाभूल करण्यासाठीं, व कांहीं केसरी संस्थेशीं साधेल त्या मार्गानें विरोध करण्यास नेहमीं तयार असलेल्या लोकांचें साह्य मिळविण्यासाठीं, या मालकी हक्काच्या भांडणांत घुसडण्यांत आलेल्या आहेत. रामभाऊंच्या दंडेलीला 'सत्याग्रह' हें नांव देऊन त्यांचा पाठपुरावा करणाऱ्या लोकांपैकीं प्रत्यक्ष सत्याग्रहास कोणीहि पुढें आलें नाहीं, व लिखाणानें पाठपुरावा करणाऱ्या ज्ञानप्रकाशाच्या कंपूंतील मंडळी या मिरवणुकीच्या बाबतींतहि उदासीन राहिली. मिरवणुकीचें हस्तपत्रक निघालें त्यावर ज्ञानप्रकाश कंपूपैकींहि कोणाच्या सह्या नव्हत्या. मिरवणुकीच्या हस्तपत्रकावर चार मुसलमान, कांहीं अस्पृश्य, कांहीं सत्यसमाजिस्ट ब्राह्मणेतर, कांहीं दुराराध्य कट्टर, कांहीं नवीन समतासंघवाले ब्राह्मण व रामभाऊ टिळकांचे नातेवाईक वि. दा. परांजपे अशा अनेक रंगी अनेकविध ४० लोकांच्या सह्या होत्या. व पुढें ' आणखी दीडशें लोक ' असें मोघम म्हटलें होतें ! हस्तपत्रकांत रामभाऊ टिळकांना ' सत्याग्रही ' म्हटलें आहे. त्यांना तुरुंगवास पत्करावा लागला त्यांत " जुन्या पंचांगाचा खरेपणा व विशेषतः अस्पृश्यतानिवारण या दोन गोष्टींचा प्रामुख्यानें समावेश होतो " असें म्हटलें असून रामभाऊंच्या दंडेलीला ' प्रशंसनीय नीतिधैर्य ' म्हणून संबोधिलें होतें ! पण वास्तविक या सत्याग्रहाच्या मुळांतलें सत्य काय आहे हें वर स्पष्ट करून सांगितलेंच आहे !

( १० ) रामभाऊ टिळक यांनीं पोलिसाला लिहून दिलेल्या जबाबांत त्यांनीं आपण गणेशोत्सवाचे मालक आहोंत म्हणून व ट्रस्टींना उत्सव करण्याचा हक्क नाहीं म्हणून मीं गणपतीची मूर्ति उचलून नेण्याचा प्रयत्न केला असें स्पष्ट म्हटलें आहे. जुन्या पंचांगाच्या खरेपणासाठीं अगर अस्पृश्यतानिवारणाचें तत्त्व प्रस्थापित करण्यासाठीं आपल्याला ही गोष्ट करावी लागली असें त्यांनीं जबाबांत अगर मॅजिस्ट्रेटपुढेंहि म्हटलेलें नव्हतें. पण ज्यांना केसरीविरुद्ध येनकेन प्रकारेण हुल्लड उठविण्याची संधि साधावयाची होती त्यांना या गोष्टीची चौकशी करावयाचें कारणच नव्हतें ! यांतील कट्टर म्हणविणारांना गांधींच्या अनत्याचारी सत्याग्रहाच्या व्याख्येंत रामभाऊंच्या दंडेलीचा अंतर्भाव करून सत्याग्रहाच्या तत्त्वाची आपण विटंबना करीत आहोंत याचेंहि भान राहिलें नाहीं. आणि अस्पृश्यतानिवारण करावयाचें तें हिंदूंनीं करावें असें म. गांधी वारंवार सांगत असतां गणेशोत्सव, पंचांग–शुद्धि व अस्पृश्यतानिवारण या वादांत मुसलमानांना

पाचारण करण्यासहि त्यांना कांहीं हरकत वाटली नाहीं ! यावरून त्यांची वेळीं अवेळीं प्रगट होणारी गांधीभक्ति केवळ केसरीच्या द्वेषासाठीं पांघरलेली आहे हें उघड झालें आहे. ज्यांना पंचांगवादांत कांहीं ओ चें ठोहि कळत नाहीं, गणेशोत्सवाशीं ज्यांचा धर्मदृष्ट्या कांहीं संबंध नाहीं, ज्यांनीं सत्याग्रहहि जन्मांत कधीं केला नाहीं, अशा अनेकविध लोकांचा मेळा जमवून त्यांनीं केलें काय ? तर रामभाऊ टिळकांच्या मानीव वैयक्तिक हक्कशाबितीच्या दंडेलीला सत्याग्रहाचें स्वरूप देऊन, पण स्वतः प्रत्यक्ष 'सत्याग्रहांत' सामील न होतां अभिनंदन करण्याच्या मिषानें केसरीविरुद्ध द्वेष उगवून घेतला ! खादीप्रेमाकरितां म्हणून खादीचें कार्य करतों असें म्हणणारें पुण्याचें खादीभांडारहि या केसरीद्वेष-प्रदर्शनांत सामील होतें हेंहि लक्षांत ठवण्यासारखें आहे.

( ११ ) रामभाऊंची गुरुवार ता. ३० रोजीं सकाळीं ८ वाजतां येरवड्याच्या तुरुंगांतून सुटका झाली. तेथें बाबुराव जेधे, श्रीपतराव शिंदे, जवळकर, राज-भोज, पोतनीस इ. मंडळी मोटार घेऊन गेली होती. जेधे यांनीं रामभाऊंना हार घातला. तेथून मोटार पुणें स्टेशनाजवळ आल्यावर मिरवणूक सुरू झाली ती ससून हॉस्पिटल, रास्ता पेठ, या रस्त्यानें 'डिप्रेस्ड मिशन'जवळ आली. तेथें जेधे यांच्या अध्यक्षतेखालीं रामभाऊंचें अभिनंदन करण्यांत आलें. तेथून नाना पेठ व गणेश पेठ या भागांतून मोतीचौकांतून बुधवार चौकांत मिरवणूक आली. वाटेंत वस्ताद हमजेखान यांच्या तालमीतर्फे रामभाऊंना हार घालण्यांत आला ! बुधवार चौकांत व मार्केटांतहि रामभाऊंना कांहीं ठिकाणीं हार घालण्यांत आले. खादीभांडारातर्फे रामभाऊंना हार घालण्यांत आल्याचें ज्ञानप्रकाशांत प्रसिद्ध झालें आहे. तें खरें असेल तर आश्चर्य होय. कारण रामभाऊंचे अंगाला आजपर्यंत कोणीं कधींहि खादीच्या कपड्याचा विटाळ झालेला पाहिला नाहीं. मिरवणुकीला बुधवारांत साधारणतः दोनशें मंडळी दिसत होती. पत्रकावर सह्या करणाऱ्यां-पैकींहि कित्येक इसम मिरवणुकींत दिसत नव्हते. गायआळींत 'स्वराज्य' पत्राच्या कचेरीतर्फे श्री. ललीत यांनीं रामभाऊंना हार घातला ! मिरवणुकीचा रस्ता आंखतांना त्यांत श्री. न. चिं. केळकर यांचें घर न वगळण्याची व्यवस्थापकांनीं खबरदारी घेतली होती व त्यांच्या घरावरून जातांना "केसरी कंपूचा" धिःकार करण्याची हौस कित्येकांनीं भागवून घेतली. केसरी कचेरींतील कारकून श्री. यशवंतराव कुलकर्णी यांचे घरावरून जातांनाहि हाच प्रकार झाला. गाय-

कवाडवाड्यांत मिरवणूक ११॥ चे सुमारास आली. तेथेंहि केसरीच्या मंडळींचा नांवानिशीवार धिःकार करण्यांत आला. शेवटीं वाड्यांतील ट्रस्टींच्या ताब्यांतल्या आवारांत अनधिकृत रीतीनें सभा भरगिण्यांत आली. त्या ठिकाणीं श्री. जवळकर यांनीं रामभाऊंच्या अभिनंदनपर भाषण केलें. ते म्हणाले, "मी जन्मभर टिकळांना शत्रु मानीत असलों तरी 'बापाची इस्टेट मुलाला मिळावी' या न्याय्यतत्त्वासाठीं रामभाऊ हे भांडत आहेत म्हणून मी त्यांना मदत करीत आहें." म्हणजे पंचांगवाद व अस्पृश्यतानिवारण हीं निमित्त मात्र घेतलेलीं सोंगें बाजूस राहून या अभिनंदनांतील खरें अंतःकरणाजवळ बाळगलेलें बिंग जवळकरांच्या तोंडून बाहेर पडलें! एकूण हा बहुरंगी मेळा रामभाऊंना वडिलांची संपत्ति मिळवून देण्यासाठीं जमला होता म्हणावयाचा! पण ज्यानें संपत्ति मिळविली त्याच्या इच्छेप्रमाणेंच ती खर्च व्हावी हें अधिक न्याय्य तत्त्व होय. वडिलांची संपत्ति मुलास मिळावी या सर्वसामान्य गोष्टीचा प्रचार आज कायदा कोर्ट वकील इ. करीतच आहेत. त्या बाबतींत सार्वजनिक चळवळ करण्याची आजपर्यंत कोणाला जरूर भासलेली नाहीं. असो. रामभाऊ उत्तर देतांना म्हणाले, "खालच्या कोर्टानें व हायकोर्टानें माझ्याबद्दल अन्याय केला आहे. दहा दिवस येरवड्यास राहून मीं जो सत्याग्रह केला तो पुढील सत्याग्रहाचा प्रारंभ आहे! पुढील महिन्यांत जुन्या पंचांगाप्रमाणें उत्सव होऊन अस्पृश्यांसाठीं सत्याग्रह होणार त्या वेळीं आपणां सर्वांचें साह्य मला मिळावें."

(१२) तात्पर्य, रामभाऊ टिळक यांच्याभोंवतीं या वादांत किती कोणत्या दर्जाचे व कोणत्या मताचे लोक जमा झालेले दिसतात हें वाचकांच्या लक्षांत येईलच. ज्यांनीं लो. टिळकांना जन्मभर उघड शिव्या दिल्या, जे कित्येक अजूनहि त्यांना अपशब्दाशिवाय उल्लेखित नाहींत, जे टिळकांची निंदा प्रत्यक्ष त्यांच्या मुलाच्या तोंडावर करतात, केसरी संस्थेचें वाटोळें झालेलें पाहिल्याशिवाय आपणाला हायसें वाटणार नाहीं असें जे म्हणतात अशा कित्येक लोकांची संगत केल्यानें आज रामभाऊ टिळकांना आपल्याला बाहेर जगांत कोणी साहाय्यकर्ते या 'असत्याग्रहां'त आहेत असें वाटत असेल. पण या त्यांच्या कृत्यानें अप्रत्यक्ष टिळक-द्रोहाच्या पातकाशिवाय दुसरें कांहीं त्यांच्या पदरीं पडणार नाहीं हें त्यांनीं लक्षांत ठेवावें. टिळकांना अस्पृश्यतानिवारण मान्य होतें असें जर स्वतः रामभाऊ कबूल करतात तर टिळकांना मान्य असलेला असा कोणता

अस्पृश्यतानिवारणाचा प्रकार आज केसरीला अमान्य आहे किंवा ट्रस्टींना अमान्य आहे, हें तरी त्यांनीं सांगावें ! नव्या पंचांगाच्या विरोधकांपैकीं चिंतामणराव यांनीं असें कबूल केलें आहे कीं, सांगलीसंमेलनांत कांहीं ठरलें असो अगर नसो, पण स्वतः टिळकांना १८ अयनांश इष्ट होते असें असतां रामभाऊ टिळक यांनीं तेवढें आपल्या वडिलांचा नव्या पंचांगाशीं कांहीं संबंध नाहीं असें कां म्हणावें ! तात्पर्य, रामभाऊंना नवें पंचांग काय जुनें काय दोहोंचीहि गरज तितपतच आहे. तसेंच अस्पृश्यतानिवारणासंबंधानें त्यांना आपले वडिलांचीं मतें व केसरी ट्रस्टींचीं मतें यांत फरक दाखवितां येणार नाहीं. अर्थात् हे दोन वाद आडमार्गांत शिरतांना रामभाऊंच्या पायाला लागले तेच ट्रस्टींवर फेकण्याकरितां त्यांनीं उचलून घेतले. याहून त्यांच्या तत्त्ववादित्वाला अधिक किंमत नाहीं हें केसरीच्या वाचकांना सहज कळून येईल.

---

## ८ पिसाळलेल्या कुत्र्याचा दंश !

( केसरी १९२८ )

केसरी–मराठा संस्थेचे ट्रस्टी व श्री. रामभाऊ टिळक यांचे दरम्यान तडजोडीचें बोलणें सुरू असल्याचें वाचकांस विदितच आहे. त्याचा निकाल होईल तो वाचकांस योग्य वेळीं कळविण्यांत येईलच. या वादांत बाहेरचे अनेक लोक अनेक हेतूंनीं व अनेक दृष्टींनीं लक्ष घालीत असतात ! पैकीं पुण्याचे डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर हेहि एक होत. यांनीं, पूर्वीं त्यांचें अल्पायुषी वर्तमानपत्र 'पुणें समाचार' हें चालू असतां, केसरी–मराठा ट्रस्टींवर व विशेषतः केळकर यांचेवर कशा प्रकारची टीका केली होती हें केसरीच्या वाचकांना ठाऊक नसलें तरी, स्वर्गवासी 'पुणें समाचार' पत्राच्या मूठभर वाचकांना तरी तें माहीत असेलच. डॉ. केतकर यांचा स्वभाव कसा काय आहे याचा पूर्वींचा थोडाबहुत परिचय केसरीच्या वाचकांनाहि नाहीं असें नाहीं. शिवाय तोच परिचय टिळक चरित्रांत छापलेल्या त्यांच्या एका नामांकित पत्रानें दृढच झाला असेल, व केवळ त्याच हेतूनें तें पत्र छापलें असलें पाहिजे हें कोणीहि सांगेल. असो. हल्लीं डॉक्टरसाहेबांनीं श्री. न. चिं. केळकर यांना ट्रस्टच्या वादासंबंधीं पाठविलेलें एक पत्र खालीं देत आहों तें वाचून व त्यांत प्रकट झालेल्या मनुष्यस्वभावाचा मासला पाहून वाचकांना कौतुक वाटल्याशिवाय राहाणार नाहीं. हें पत्र असें—

Dr. Shridhar V. Ketkar,
21 Kahun Road Poona,
१३-९-२८

" वि. वि. आजपासून चाळीस दिवसांनीं तुमचा मृत्यु आहे असें समजून तुम्हीं आतां काय करावें याच्या तरतुदीला लागावें अशी तुम्हास माझी सूचना आहे. तुम्हास मी हें स्नेहबुद्धीनें लिहित आहें. मला पिसाळलेलें कुत्रें चावलें तेव्हां आपणांस कदाचित् लवकरच इहलोक सोडावा लागेल असें वाटलें. त्याचा मनावर फार इष्ट परिणाम झाला. कोणतेंहि शत्रुत्व वाढविण्यांत अर्थ नाहीं असें वाटूं लागलें. प्रेम व द्वेष या दोनहि गोष्टींचा फोलपणा अशा वेळेस वाटूं लागतो व निराळी दृष्टि उत्पन्न होते. सांगितलेला विचार लक्षांत घ्यावा हे विज्ञापना.

आपला,
**श्री. व्यं. केतकर**

**ता. क.** " आपल्या तडजोडीच्या प्रयत्नास यश येवो आणि आपली अप्रियता न वाढो. आम्हीं तुमच्यावर खुषीनें हल्ला केला नाहीं. आपली तडजोड झाली म्हणजे राजकारण अधिक स्वस्थ चित्तानें करतां येईल व आम्हीहि आपणांस मदत करूं. "

*
* *

या जगांत आचरट रिकामटेकडे लोक अव्यापारेषु व्यापार कसा करीत असतात याचें हें एक उत्तम उदाहरण नाहीं काय? दुसऱ्याला सदुपदेश करणारानें स्वतःची उपदेशक होण्याची पात्रता कांहीं थोडी तरी पाहिली पाहिजे. केळकर यांचें राजकारण डॉ. केतकर यांच्या मदतीच्या अभावामुळें कधींच खोळंबलेलें नव्हतें. ट्रस्टसंबंधाच्या वादाची आग भडकविण्याचें श्रेय डॉ. केतकर यांच्याकडे किती आहे याची अंतस्थ माहिती ज्याला असेल त्याला डॉक्टरसाहेबांनीं केळकरांना केलेल्या या पत्रांतील उपदेशाच्या मायावीपणाची खरोखर किळसच वाटेल. डॉक्टरसाहेबांना पिसाळलेलें कुत्रें कधीं चावलें याची तारीख त्यांनीं लिहिली नाहीं ती ठरविणें अवश्य आहे. कारण त्यांना श्वानदंशाची बाधा होऊन पुष्कळ पावसाळे लोटले असले पाहिजेत असाच त्यांचे अनेक लेख व ग्रंथ पाहून पुष्कळ वाचकांचा समज झालेला आहे. डॉक्टरसाहेबांना 'स्मशानवैराग्या' ऐवजीं 'श्वानवैराग्य' उत्पन्न झाल्याचा उल्लेख या पत्रांत आहे व त्यांना प्रेम व द्वेष दोनहि व्यर्थ वाटूं लागल्याचें ते लिहितात. पैकीं प्रेमाचें वैयर्थ्य त्यांना वाटूं

लागलें असल्यास तें कधींपासून व कशामुळें याची माहिती आम्हास नाहीं. पण द्वेषाचें वैयर्थ्य ते तोंडानें बोलून दाखवीत असले तरी तो द्वेष अजूनहि त्यांच्या मनांत जळत आहे हें त्यांच्या पत्रावरूनच दिसून येण्यासारखें आहे. केळकरांच्या भावी मृत्यूसंबंधीं डॉक्टर केतकर यांनीं आपल्या पत्रांत नक्की भविष्य केलें आहे. त्या बाबतींत आम्हाला इतकेंच म्हणावयाचें कीं, डॉक्टरसाहेबांच्या घरांत भुताटकीची विद्या निर्माण झाल्याचें टाईम्स वगैरे पत्रांतून पूर्वीं जगजाहीर झालें आहे. पण या विद्येबरोबरच जारणमारण उच्चाटन आणि भविष्य वर्तविण्यासारखी योग–विद्या त्यांच्या घरीं प्रगट झाल्याचें कोणास माहीत नाहीं. केळकर यांच्या मुदतबंद मृत्यूच्या भविष्याबरोबरच त्या मृत्यूचा प्रकार व प्रसंग याचें भविष्यहि त्यांनीं आपल्या पत्रांत लिहिलें असतें तर ते केसरी ट्रस्टच्या वादांत आणि समेटाच्या प्रयत्नांत किती सूक्ष्म व कोणत्या बाजूनें लक्ष घालतात हेंही लोकांना समजलें असतें!

---

## ९ केसरीचें छोटें फाईल अर्थात् “ सारसंग्रह ”

केसरींतील महत्त्वाचा व संगाह्य असा थोडाबहुत तरी मजकूर आपल्याला कायमचा संग्रहीं ठेवतां आला तर बरें, असें अनेक वाचकांना नेहमीं वाटत असतें. तथापि ही गोष्ट जितकी इष्ट वाटते तितकी ती कठीणहि असते. केसरीचीं काय किंवा दुसऱ्या कोणत्याहि वर्तमानपत्रांचीं काय फाइलें नीट बांधून संग्रहीं ठेवणारे वाचक फारच थोडे असतात. त्याचें कारण प्रथम असें कीं, एका वर्तमानपत्रावर अनेक वाचकांची भूक भागावयाची असते यामुळें कोणताहि अंक एकदां हातोहात गेला म्हणजे सहसा परत येत नाहीं. आला तर फाटून, विसकटून, मळून परत येतो. आणि मग तो फाइलींत ठेवावासा वाटत नाहीं. बरें कोणाच्या अंकावर इतरांच्या उड्या नसल्या तरी प्रत्येक अंक वाचून, वेळींच नीट बाजूला काढून शिल्लक ठेवला जातो असें क्वचितच घडतें. कोणी वर्षाचे सर्व अंक अशा रीतीनें ठेविले तरी केसरीच्या ५१ अंकांचें फाईल इतकें जड व अवजड होतें कीं, तें पुठ्ठा घालून बांधवून घेण्याला बराच खर्च येतो. तसेंच कोणताहि विषय हुडकून काढण्याकरितां अंक चाळीत बसण्याला फार वेळ व श्रम लागतात याशिवाय महत्त्वाची गोष्ट ही कीं, कोणतेंहि वर्तमानपत्र घेतलें तरी त्यांतील सगळाच्या सगळाच मजकूर संग्रहीं ठेवण्यासारखा असतो असें नाहीं. अर्थात् ज्याच्या त्याच्या आवडीप्रमाणें कांहीं थोडा मजकूर बाजूला काढून ठेवण्यासारखा असतो. पण तो तसा कातरून काढून व चिकटवून ठेवणें हें देखील

तितक्याच परिश्रमाचें काम असून तसें करण्याला लागणारी चिकाटी, फुरसत, किंवा व्यवस्थितपणा पुष्कळांना असत नाहीं. संग्रहालयें वगैरे संस्था ज्या काय समग्र फाइली ठेवतील तितक्याच. पण अशांच्याहि हातून हें काम नेहमीं तडीस जातें असें नाहीं. इतिहासदृष्ट्या जुनी माहिती कारणपरत्वें ज्यांना काढण्याचा प्रसंग येतो, त्यांना हा अनुभव पूर्णपणें अवगत आहे. वरील कारणामुळें केसरीच्या दरअंकांतील कांहीं निवडक मजकुराचा टाईप बाजूला काढून घेऊन केसरी छापखान्यांतच त्याच्या कांहीं वेगळ्या प्रती छापवाव्या व त्याचें पुस्तक बांधून वर्षाअखेर तें केवळ छपाईचा खर्च घेऊन फक्त केसरीच्या वाचकांना द्यावें अशी कल्पना घरच्याच एका केसरीच्या हितचिंतकानें गतवर्षीच्या जुलै महिन्यांत सुचविली. आणि प्रयोगादाखल ती तावडतोब अमलांतहि आणण्यांत आली.

वरील कल्पनेप्रमाणें, तारीख २ ऑगस्ट १९२७ च्या अंकापासून, केसरीच्या दरअंकापैकीं सुमारें ८ कॉलम, म्हणजे रॉयल साईझचीं सुमारें ८ पृष्ठें, इतका मजकूर निवडून बाजूला काढून तो वेगळा छापण्यास आम्हीं सुरवात केली. परंतु केव्हांहि डिसेंबर अखेर वर्षाचा मेळ पडावा म्हणून या सारसंग्रहाचें अथवा छोट्या फाइलाचें पहिलें वर्ष दिडकें धरून १९२८ च्या डिसेंबरच्या शेवटल्या अंकापर्यंत हा क्रम आम्ही चालू ठेवणार आहों आणि त्याप्रमाणें होणारें **सुमारें सहाशें पृष्ठांचें पुस्तक** छापून पुरें करून बांधून आम्ही विक्रीस काढणार आहों. सदर पुस्तकांत घेतलेले वेंचे अर्थात् केसरीच्या संपादक मंडळानेंच आपल्या निवडीप्रमाणें व पसंतीप्रमाणें काढले आहेत. यामुळें कोणाहि वाचकाला आवडेल तोच व हवा तितका मजकूर या पुस्तकांत मिळेलच असें नाहीं. परंतु सुमारें १७ महिन्यांतील केसरीच्या अंकांतून निवडून काढलेल्या मजकुराचें पुस्तक ६०० पानांचें झालें आहे, यावरून सामान्य वाचक प्रायः जितका मजकूर संग्रहीं ठेवूं इच्छील तितका तरी बहुधा यांत आला असेल असें म्हणण्यास हरकत नाहीं. कसेंहि असलें तरी केसरींतील मजकूर प्रत्येक वाचकानें स्वतः कातरून, चिकटवून ठेवून, त्याचें पुस्तक स्वतः बांधण्यापेक्षां या पुस्तकानें उपलब्ध केलेला सारसंग्रह त्याला अधिक सोईचा वाटेल यांत शंका नाहीं.

पुस्तक वेगळें काढण्यांत दुसरी एक सोय करतां आली ती अशी, केसरी वर्तमानपत्र ज्या यंत्रावर छापलें जातें त्यावर त्याच्या सोईकरितां कागदाचीं कांहीं एक प्रकारचीं वाटोळीं भेंडोळींच उपयोगांत आणावीं लागतात; व हा कागद

सामान्यतः पुस्तकाच्या कागदापेक्षां अधिक खरखरीत व मळकट असतो. परंतु प्रस्तुतच्या सारसंग्रह पुस्तकाच्या प्रती कांहीं थोड्या मर्यादित धरल्यामुळें आम्हाला हें पुस्तक वेगळ्या एका यंत्रावर छापून घेतां आलें; व त्यामुळें सामान्य रीमांचा चौरस कागद वापरतां आला. म्हणून तो केसरीच्या कागदापेक्षां स्वच्छ व सफाईदार घेतला आहे.

या ६०० पानांच्या पुस्तकाची किंमत फक्त छपाईचा खर्च भागण्यापुरती म्हणजे १। रुपया ठेवण्यांत आली आहे. शिवाय या पुस्तकाची सोय प्रथमतः तरी फक्त केसरीच्या वाचकांपैकीं एक हजारापुरतीच योजलेली असल्यामुळें, या खेपेस आम्हीं पुस्तकाच्या प्रती अवघ्या एक हजारच काढल्या आहेत. तरी केसरीच्या वर्गणीदारांच्या यादींत नोंदलेल्या लोकांपैकीं, ज्यांच्याकडून या पुस्तकाची किंमत केसरीच्या ऑफिसकडे **तारीख १ जानेवारी १९२९** पर्यंत रोख जमा होईल त्यांचीं नांवें वेगळीं नोंदवून, हा सारसंग्रह अनुक्रमानें त्यांना देण्यांत येईल. पुस्तक मोठें झाल्यामुळें टपाल व पॅकिंग याचाच खर्च कमींत कमी १२ आणे येतो तरी ज्या ग्राहकांना पुस्तक टपालांतून मागवावयाचें असेल त्यांनीं दोन रुपये केसरी कचेरीकडे रोख भरल्यास त्यांना पुस्तकें टपालमार्गें पाठविण्यांत येतील. अर्थात् पुण्यास केसरी कचेरींतून हीं पुस्तकें कोणां स्नेह्याकडून येतां जातां नेल्यास हा मोठा खर्च वांचण्यासारखा आहे. पुण्यास केसरी कचेरींतून हीं पुस्तकें नेणारांस फक्त १। रुपया एवढीच किंमत पडेल.

असलें पुस्तक काढण्याचा हा पहिलाच प्रयोग म्हणून पुस्तकाची आवृत्ति आम्हीं फक्त एक हजार प्रतींचीच धरली आहे. यामुळें अनेकांची निराशा होण्याचा संभव आहे, तथापि या प्रयोगाचा अनुभव तारीख ३१ जानेवारी १९२९ पर्यंत जसा येईल, त्याप्रमाणें दुसऱ्या वर्षाच्या पुस्तकाच्या प्रती किती काढाव्या याचा अंदाज करतां येईल. या पुस्तकानें केसरीच्या वाचकांना एका नव्या दिशेनें थोडाबहुत तरी उपयोग होईल अशी आम्हांस आशा आहे.

**न. चिं केळकर**
**धों. वा. विद्वांस**
ट्रस्टी, केसरी व मराठा.

---

## १० आत्मनिवेदनाचे दोन शब्द

( केसरी, ता. ३ ऑगष्ट १९२९ )

लो. टिळकांची नववी पुण्यतिथि परवां झाली. आज द्विसाप्ताहिक केसरीचा पहिला अंक निघत आहे. ही गोष्ट टिळकांच्या हयातींतच घडली असती तर त्यांना किती तरी आनंद झाला असता. कारण त्यांचें सर्वच आयुष्य केसरीचें संगोपन व संवर्धन करण्याकडे गेलें. स्वराज्यसंपादन हें टिळकांचें साध्य होतें. आणि जसें ज्यांचें साध्य त्या मानानें त्यांचें साधनहि असावें लागतें. म्हणूनच टिळकांनीं केसरी पत्र हातीं घेऊन त्याची कार्यक्षमता निरनिराळ्या रीतीनें वाढविली. त्यांनीं त्याचा आकार वाढविला, पानें वाढविलीं, थोडया वेळांत पुष्कळ प्रती निघाव्या म्हणून अवश्य ती यंत्रासामुग्री जुळविली, सोयीच्या इमारती बांधल्या, नवीन माणसें हाताशीं घेतलीं. तात्पर्य, केसरीचा वाचक वर्ग व त्या द्वारें पत्राचा लोकोपयोग वाढावा म्हणून जो जो प्रयत्न अवश्य तो तो सर्व त्यांनीं केला.

कारागिरीसंबंधानें इंग्रजींत ज्या दोन अर्थपूर्ण म्हणी प्रसिद्ध आहेत त्या टिळकांनीं स्वतःसंबंधानें खऱ्या करून दाखविल्या होत्या. Only a bad workman quarrels with his tools याला मराठींतील "नाचायला येईना तर म्हणे अंगण वांकडें" ही म्हण बरीच जवळ येते. नाचणारा कुशल असेल तर तो अंगणाचा वांकडेपणा किंवा कोस आपल्या कौशल्यानें काढून टाकतो. त्याप्रमाणें टिळकांनीं कोणत्याहि स्थितींत साधनांच्या कमतरतेबद्दल रडगाणें गाइलें नाहीं, तर आपल्या गुणांनीं त्यांजकडून त्यांच्या मगदुराबाहेर काम करून घेतलें. स्पार्टन इतिहासांत अशी गोष्ट आहे कीं, एकदां रणांगणावर निघतांना सेनापतीनें सैनिकांना जवळ बोलावून त्यांना आपल्या हातानें तलवारींची वांटणी करून दिली. पैकीं एकाच्या हातीं तलवार गेली ती दोन अंगुळें आखूड होती. हें पाहून "मला तलवार आखूड दिली" अशी तक्रार त्यानें केली. तेव्हां सेनापति हंसून म्हणाला, "गड्या, तलवार दोन अंगुळें आंखूड असली म्हणून काय बिघडलें ? तूं इतरांपेक्षां केवळ एकच पाऊल पुढें अधिक उचलून टाक म्हणजे पहा तुझी हीच तलवार इतरांच्या बरोबरीची किंबहुना त्यांच्याहून थोडी लांबच होईल !"

### टिळक व त्यांचीं साधनें

अशाच रीतीनें टिळकांनीं साधनांचा उणेपणा आपल्या कौशल्यानें भरून काढला. कारकिर्दीच्या प्रारंभीं टिळकांची गरिबी होती. तेव्हां 'एडिटरी'चा

थाट तर कोठला ? पण स्वतंत्र टेबलखुर्चीहि नव्हती ? अशा वेळीं अंथरुणाच्या वळकटीचेंच टेबल करून त्यांनीं केसरीकरितां लेख लिहिले. पण पुढें टेबलावर लिहिलेल्या लेखांपेक्षां ते खचित कमी प्रतीचे नव्हते. पदरीं कारकून नव्हता तेव्हां टिळकांनीं, कंटाळा करीत करीत कां होईना, स्वतः हातानें लेख लिहिले. पण पुढें कारकुनाकडून, किंवा एखादे वेळीं तावडींत सांपडल्यास एम. ए. किंवा एलएल. बी. अशा श्रेष्ठ पदवीधराकडून स्वतः तोंडानें सांगून लिहून घेतलेल्या लेखांपेक्षां ते पूर्वीचे लेख खचित कमी सरस नव्हते. कारकिर्दीच्या सुरुवातीला केसरी चार पानांचा होता म्हणून कांहीं तेव्हांचे लेख, पुढें तो ८ किंवा १२ पानांचा झाला तेव्हांच्या लेखांपेक्षां, कमी परिणामकारक होते असें नाहीं. केसरी किंवा तदनुषंगिक इतर साधनें आपल्या कार्याला अपुरीं पडतात असें मनांत वाटत असलें तरी त्यांना टिळकांनीं केव्हांहि उघडपणें नांवें ठेविलीं नाहींत. त्यांची सेवा घ्यावी, त्यांचा उपयोग करून घ्यावा, व वरतीं त्यांची निंदा करावी असला कृतघ्नपणा टिळकांनीं केव्हांहि केला नाहीं.

हें सर्व एका म्हणीसंबंधानें झालें. पण दुसरी जी एक इंग्रजी म्हण आहे, तीहि टिळकांना लागू पडते. ती अशी A Good workman makes his own tools–"तोच खरा चांगला कारागीर कीं जो आपलीं हत्यारें आपणच तयार करतो." आतां एकेकट्या धंद्याला दहावीस यंत्रें लागावीं, आणि एकेकट्या यंत्राचे पांचपन्नास भाग वेगवेगळे तयार करावे लागावे, अशा हल्लींच्या काळीं वरील म्हण अर्थातच अक्षरशः लागू होणार नाहीं. कारण हेन्री फोर्डसारख्या स्वावलंबी व सर्वसंपन्न कारखानदारालाहि अजून कांहीं वस्तूंकरितां परक्यावर अवलंबून राहावें लागतें. श्रमविभाग आणि विशेषीकरण हा आधुनिक अर्थशास्त्रांतला एक नियमच होऊन राहिला आहे. तथापि हल्लींच्या काळांतसुद्धां कांहीं मर्यादेपर्यंत प्रत्येक धंदेवाला आपलीं हत्यारें व साधनें आपणच तयार करतो. आपण सुताराचेंच उदाहरण घेऊं. त्याच्या धंद्याला लागणारीं लोखंडी हत्यारें हीं कांहीं तो स्वतः बनवीत नाहीं. पण ह्या हत्यारांच्या मुठी, रंध्याची चौकट, फूटपट्टी असले जिन्नस तो स्वतःचे स्वतः बनवितो. आपलीं हत्यारें सोईप्रमाणें शक्य तितकीं ज्याचीं त्यानेंच बनवावीं लागतात, व सुतारापासून घड्याळजीपर्यंत पुष्कळसे देशी धंदेवाले तीं आज तयार करतातहि. टिळकानीं आपल्या चळवळीचीं साधनें पुष्कळशीं आपणच निर्माण केलीं व त्यांत केसरी वर्तमानपत्र हें मुख्य होय.

## साधनांची जुळवाजुळव

साध्य किंवा ध्येय हें मात्र आपलें, आणि तें साधण्याला लागणारीं साधनें मात्र दुसऱ्याचीं, अशा स्थितींत कोणाचाहि उद्योग यशस्वी होऊं शकत नाहीं. आणि ह्या अनुभव टिळकांना प्रारंभापासूनच आला. डे. ए. सोसायटी कायमची सोडून देऊन सार्वजनिक चळवळींत पडावयाचें व स्वमतप्रसार करावयाचा हें टिळकांनीं निश्चित केल्याबरोबर, त्यांनीं पहिली गोष्ट केली ती ही कीं, छापखाना व वर्तमानपत्रें यांच्या वांटणींत कर्जासकट वर्तमानपत्रें आपल्या वांटणीला घेतलीं, छापखाना दुसऱ्या भागीदाराला दिला, व स्वतः जबाबदार संपादक होऊन अखत्यारीनें मतप्रसार सुरू केला. यानंतर १८९७ सालीं आर्यभूषण छापखान्यानें टिळक तुरुंगांत असतां, केसरी छापीत नाहीं असें म्हणून दगा दिला तेव्हां टिळकांना स्वतःचा छापखाना काढण्याची सहजच इच्छा झाली.

प्रथम केसरीच्या बटवड्याची व जमाखर्चाची व्यवस्थाहि आर्यभूषणाकडेच होती. पण उभयतांतील हितविरोधाचा परिणाम केसरीच्या उपयुक्ततेवर होतो असें दिसून येतांच त्यांनीं आपली स्वतंत्र कचेरी स्थापिली. केसरीच्या पुष्कळ प्रती काढाव्या लागूं लागल्या, तेव्हां छपाईचें मोठें यंत्र त्यांनीं आणिलें. व असलें धूड चालावयाचें म्हणून त्याला ऑईल इंजिनाची जोड द्यावी लागली. पुष्कळ प्रती निघावयाच्या म्हणजे अर्थात् टाईप वरचेवर झिजावयाचा म्हणून टिळकांनीं स्वतःची टाईप फाउंडरी काढली. आणि पुढें त्यांनीं अखंड टाईपाची योजना केली तेव्हां तर घरची स्वतंत्र फाउंडरी असणें आवश्यकच झालें. महायुद्धानंतर स्वराज्याच्या चळवळींत केसरीची लोकप्रियता इतकी वाढली कीं, त्यांना पूर्वीचे ' डबल फीडर ' यंत्रहि पुरेना. म्हणून तासाला सात आठ हजार प्रती छापून घड्या घालून देईल असलें मोठें यंत्र आणावें लागलें. व या नव्या यंत्रावर चौकोनी रिमाचे कागद निरुपयोगी म्हणून वाटोळे रीळचे कागद आणावे लागले. आणि छपाईचें यंत्र ' रोटरी ' पद्धतीचें म्हणून ' स्टीरिओ ' करण्याचें यंत्र जोडावें लागलें.

## साधनांचें गौणत्व

पण याबरोबर सांगण्याची मुद्याची गोष्ट ही कीं, अशा रीतीनें टिळक छापखान्याच्या उपद्व्यापांत क्रमानें पायरीपायरीनें गुंतत गेले तरी, अखेरपर्यंत ते छापखानेवाले असे केव्हांहि बनले नाहींत. आणि केवळ चळवळीकरितां

वर्तमानपत्र व केवळ वर्तमानपत्रांकरितां छापखाना, ही विचारसरणी त्यांची केव्हांहि नाहींशी झाली नाहीं. एका संन्याशाची गोष्ट सांगतात कीं, उंदीर आपली वाळत घातलेली लंगोटी खातो म्हणून त्यानें मांजर पाळलें, मांजराला दूध पाहिजे म्हणून गाय ठेवली, गाईला चारा पाहिजे म्हणून शेत घेतलें, शेताला रखवाली पाहिजे म्हणून एक मुलगी नोकरीला ठेवली, आणि शेवटीं त्या मुलीच्या गुणांवर मोहून त्यानें तिच्याशीं लग्न केलें व आश्रमधर्म दूषित केला. पण याच्या उलट टिळकांनीं घरचा छापखाना मोठा व समृद्ध केला तरी वर्तमानपत्राव्यतिरिक्त त्याचा कांहीं उपयोग कधींच केला नाहीं, व केसरी फाउंडरीचा टाईप त्यांनीं कधींच विकावयास ठेवला नाहीं. त्यांच्या घरच्या लग्नमुंजीच्या चिठ्याहि ते दुसऱ्या छापखान्यांतून छापवून आणीत. कारण या खाजगी उपयोगाला लागणारें सामान, वास्तविक अगदीं थोडी किंमत पडणारें होतें तरी, त्यानीं छापखान्यांत ठेवलेंच नाहीं. वर्तमानपत्रा-बरोबरच ते चार माणसें अधिक ठेवून छापखान्याचा धंदा करते तर सहज होण्यासारखा होता. पण चळवळ हें ध्येय व वर्तमानपत्र हें जसें त्याचें साधन, त्याचप्रमाणें या साधनरूपी वर्तमानपत्राचें उपसाधन छापखाना इतकीच त्यांची दृष्टि होती. एरवीं छापखान्याचा दुय्यम धंदा करण्याला त्यांना काय कमी होतें!

असो. या नव्या मनूंत मतप्रसाराच्या दृष्टीनें पाहातां, स्वतंत्र वर्तमानपत्रासारखें दुसरें परिणामकारक साधन नाहीं ही गोष्ट सामान्य माणसालाहि जर कळते, तर ती टिळकांना उमगली नाहीं हें कसें होईल ? ती त्यांना तेव्हांच उमगली. आणि म्हणूनच पूर्वी सांगितल्याप्रमाणें त्यानीं केसरीपत्र घेऊन सार्वजनिक कार्यांत प्रवेश केला. केसरीची लोकप्रियता यापूर्वींच सिद्ध झाली होती. पण त्यांनींच पत्र हातीं घेतल्यापासून ती श्रेढीनें एकसारखी वाढतच गेली. केसरीच्या या लोकप्रियतेंत टिळकांच्या चळवळीची लोकप्रियता व उपयुक्तता पूर्णपणें प्रति-बिंबित झाली होती.

इतर देशांची गोष्ट कशाला ? पण हिंदुस्थानांतहि नांव घेण्यासारख्या चळवळ्या म्हणजे मतप्रसाराची आस्था बाळगणाऱ्या, प्रसिद्ध पुढाऱ्यानें आजवर या दृष्टीनें वर्तमानपत्राचा अभिलाष केला होता. मतप्रसार धावावयाचा तर त्याला स्वार होण्याला हा कागदी घोडा अवश्य असतो. व ज्यांना हा घोडा पदरीं बाळगतां येत नाहीं तेहि मधून मधून तो दुसऱ्याचा मागून घेतात. म्हणजे दुसऱ्याच्या

वर्तमानपत्राचा आश्रय करून मतप्रसार करतात. मनुष्य कितीहि उद्योगी, चपळ, बोलतांना न दमणारा व मोठ्या आवाजाचा असला, तरी व्याख्यानें, प्रवचनें देऊन किंवा शाळा काढून शिष्य पढवून तो किती लोकांना शिकविणार ? तेंच केसरीसारखें वर्तमानपत्र हातीं असल्यास, दर आठवड्यास हजारों लाखों लोकांशीं मनमुराद अनेक विषयांवर बोलतां येतें. या गोष्टीचें स्वारस्य टिळकानीं ओळखलें असल्यामुळें सर्व चळवळी करतांना त्यांनीं केसरीच्या संगोपनाकडचें व संवर्धनाकडचें लक्ष कधींहि ढळूं दिलें नाहीं.

## दैनिक कीं अर्ध साप्ताहिक

साप्ताहिक वर्तमानपत्राचा जर इतका उपयोग तर तें पत्र द्विसाप्ताहिक केल्यास त्याचा उपयोग त्या प्रमाणानें वाढणारा आहे ही गोष्टहि टिळकांना अवगत होती. म्हणूनच केसरी अर्धसाप्ताहिक करण्याची कल्पना त्यांच्या विचारकक्षेंत घोळत असे. पण हें उपयुक्ततेचें प्रमाण त्यांनीं मनानें केसरी दैनिक करण्यापर्यंत वाढविलें नव्हतें हें आम्हांस निश्चित माहीत आहे. व ती गोष्ट सकारण होती. अर्थशास्त्रांतील एका प्रसिद्ध सिद्धांतांत सांगितल्याप्रमाणें कोणत्याहि गोष्टीची उपयुक्तता केवळ त्रैराशिकाच्या हिशेबानें वाटेल तेथपर्यंत वाढत नसते. या सिद्धांताला The Law of diminishing returns असें म्हणतात. कोणत्याहि धंद्यांत अशी एक मर्यादा कोठें तरी येऊन पोंचते कीं त्यापलीकडे त्रैराशिकाचा हिशेब उपयोगी पडत नाहीं. तो हटकून चुकतो. ही मर्यादा केसरीच्या बाबतींत टिळकांनीं आपल्या आवडत्या ग्राहकांना पडणाऱ्या टपालखर्चावरून व वर्गणीवरून निश्चित केली होती. कारण दैनिक पत्र एक पैशाच्या तिकिटानें वांटलें जात असलें तरी, वर्षभर दैनिक पत्र घेणारास नुसता टपालखर्चच साडेचार रुपये पडणार. आणि वर्गणी कितीहि कमी म्हणजे दर अंकाला अर्धा आणा ठेविली तरी तिचा वार्षिक खर्च नऊदहा रुपये पडणार. मिळून वर्गणीदाराला दैनिक पत्राकरितां ते साडेचार व हे साडेनऊ मिळून चौदा रुपये दरसाल खर्चावे लागणार. पण खेडेगांवच्या किंवा शहराच्याहि लोकांपैकीं येवढी रक्कम खर्चण्याची ऐपत असणारे लोक किती ? अर्थात् केसरी दैनिक करणें म्हणजे त्याचा प्रसार पुष्कळच कमी होणार, व वाचकवर्ग कमी झाला म्हणजे केसरीची नियोजित उपयुक्तताहि कमी होणार, ही गोष्ट टिळकांना दिसत होती. आणि त्यांचें तर

ध्येय असें कीं, आपला केसरी खेड्यापाड्यांतल्या गरीब लोकांनींहि वाचावा ! म्हणून केसरीच्या प्रगतीची टिळकांची कल्पना अर्धसाप्ताहिकापलीकडे दैनिकापर्यंत गेली नाहीं. असें असतां त्यानीं 'राष्ट्रमता' सारखें पत्र कां काढविलें ? याचें उत्तर हेंच कीं त्याचा खरा उपयोग त्यांनीं शहरापुरताच मानला. शिवाय दैनिक पत्र काढावयाचें तरी तें दुसरें एकादें काढावयाचें, पण केसरी दैनिक करावयाचा नाहीं असें धोरण त्यांनीं मनाशीं पक्कें केलें होतें.

असो. अशा रीतीनें टिळकांची केसरीच्या प्रगतीची कल्पना आवृत्तीच्या दृष्टीनें काय होती याचें विवेचन येथवर केलें. आतां आज आम्ही केसरी अर्धसाप्ताहिक करीत आहों याचें खरें श्रेय कोणाला आहे एवढेंच सांगावयाचें उरलें. व तें श्रेय आम्ही केवळ टिळकांच्या पुण्याईला आणि वाचकवर्गाच्या उदार आश्रयाला देतों. तें प्रस्तुत चालकवर्गाला आपणाकडे घ्यावयाचें नाहीं. त्याला आज आनंद व अभिमान वाटण्यासारखा असला तर तो इतक्यापुरताच कीं, लोकमान्यांच्या मनांत असलेल्या केसरीसंबंधीं निदान एका कल्पनेला त्यांना मूर्त स्वरूप देतां आलें आहे. तथापि १९०२ सालीं टिळकांनीं केसरीच्या दोन पानांचीं चार केलीं त्यावेळीं त्यांनींच म्हटल्याप्रमाणें 'आनंदापेक्षां किंवा अभिमानापेक्षां आम्हाला जबाबदारीची जाणीव अधिक होत आहे.'

## हितशत्रूंचा समाचार

आम्हीं केसरी आठवड्यांतून दोन वेळां काढण्याचें ठरविल्यामुळें ज्यांना विषाद वाटला असे कित्येक लोक आहेत हें आम्ही जाणून आहों. कारण टिळक निवर्तल्यापासून त्यांची एकच अपेक्षा होती. ती ही कीं आतां तरी केसरी बुडावा. टिळकांच्या हयातींत केळकर दहा वर्षें केसरीचे संपादक होते, तथापि त्याला तेव्हां टिळकांचा आधार होता म्हणून तो चालला व उत्कर्ष पावला हें सरळच आहे. ते निवर्तल्यावरहि कांहीं दिवस लोकांनीं केवळ टिळकांच्या स्मरणार्थ आपला उदार आश्रय चालू ठेवला असेंहि कोणास म्हणतां येण्यासारखें होतें. कारण आकाशांतून तारका मूळ स्थानापासून भ्रष्ट व नष्ट झाल्या तरी त्यांचा पृथ्वीवरील प्रकाश कांहीं काळ टिकतोच. पण पुढें असहकारितेच्या धकाधकीचा मामला सुरू झाला तेव्हां टिळकांचा आधार तुटलेल्या केसरीच्या शत्रूंना सोन्याचीच संधि प्राप्त झाली असें वाटलें, व स्वतः त्यांनींही त्याचा पाडाव करण्याला शक्य तितका हातभार लाविला. कोणी राजकारणांत केसरी मवाळ

बनला असें म्हणून, कोणी त्याला म. गांधींचें शत्रुपद देऊन, कोणी तो खादीचा विरोधी असें म्हणून, कोणी प्रांतवार किंवा भाषावार विरोधी अभिमान जागृत करून, कोणी तो ब्राह्मणपक्षाचा असें ठरवून, तर कोणी उलट पक्षीं तो सामाजिक सुधारणांचा पुरस्कार करतो म्हणून. तात्पर्य, ज्याला जें कारण सुचलें तें त्यानें पुढें करून केसरीचा पाडाव करण्याचा प्रयत्न शिकस्तीनें केला. पण या खुळ्यांना हें कळेना कीं, एक अकालीं मेला तरी त्याचें उरलें आयुष्य दुसऱ्याला मिळत नाहीं! मग केसरी जाग्यावर जिवंत आहे तोंपर्यंत त्याचें आयुष्य इतर कोणाच्या भरतींत कसें पडणार? ज्याला त्याला आपल्या स्वतःच्या गुणाप्रमाणेंच या जगांत स्थान मिळतें. यामुळें केसरीची निंदा कर-करून शिणून भागून ही मंडळी आतां हताश होऊन बसली आहेत!

## केसरीचा खप

केसरीचा खप कमी झाला, वर्गणीदार कमी झाले, अशा विविध-वार्ता कोणी व्यवसायबंधु उठवितो. केसरी अर्धसाप्ताहिक झाला तेव्हां तो मरणार, कारण दिवा मालवतांना मोठा होतो, असें अशुभ भविष्य वर्तवून कित्येक काशीकर पंडितांनीं आपल्या द्वेषाच्या लहरींचा उपशम केला. कोणी 'केसरी' या नांवानें सहज सुचणाऱ्या बिचाऱ्या शब्दावर 'ग्राम्य' कोट्या करून स्वतःलाच लोकांकडून ग्राम्य ठरवून घेतलें. स्वतःच्या शीलाला व संस्कृतीला शोभण्यासारखीं कुरूप व बेढव चित्रें काढून कित्येक कुडबुड्या जोशांनीं राज-कारणांत नसती लुडबुड केली. या सर्वांच्या दाताओठांची किंबहुना ओंठा-मनगटांची आम्हाला कींव येते. पण आम्ही तरी काय करणार? त्यांच्या इच्छेप्रमाणें टिळकांच्या मृत्यूनंतर केसरी हा एक दोन वर्षांत मृत्यु-पंथाला लागावयाचा तो न लागतां, अजून जिवंत आहे; नव्हे आपल्यापरी उत्कर्ष पावत आहे, शत्रूंच्या कंबरेंत लाथा घालीत आहे, व इतक्यानेंच न थांबतां अर्धसाप्ताहिक बनून पुढें पाऊल टाकीत आहे. याचें कारण, केसरीच्या शत्रूंचा द्वेष व मित्रांची सहानुभूति याच नुसत्या दोन शक्ति घेतल्या तरी, त्यांत ही दुसरी शक्तिच अधिक प्रभावी ठरली. व या सर्वांना फिरून टिळकांच्या पुण्याईचा पाठिंबा मागें आधार देतच आहे हें होय. आपले वर्गणीदार किंवा वाचक किती आहेत हें आंकडेबंद जाहीर करण्याचा शिरस्ता नाहीं म्हणून तो संभाळून आम्ही इतकेंच सांगतों कीं, कित्येक चिल्लर निंदक वर्तमानपत्रांच्या

दसपट वीसपटीपर्यंत, आणि त्यांतल्या त्यांत ज्यांना आपण फार पुढारलों असें वाटत आहे त्यांच्या तिप्पट चौपट केसरीचा खप आज होत आहे. प्रसंग पडल्यास हें सहज सिद्ध करून देतां येण्यासारखें आहे. सगळ्या हिंदुस्थानांत खपाच्या दृष्टीनें आजहि केसरीचा नंबर पहिल्या दोहोंतिहींत येईल.

## टिळकांची पुण्याई

पण प्रत्यंतरानेंच कित्येक वेळां यथार्थ ज्ञान होत असतें म्हणून दुसऱ्याहि एका रीतीनें हेंच सांगणें प्राप्त आहे. गेल्या नऊ वर्षांत घडलेल्या गोष्टी पाहिल्या म्हणजे टिळकांची पुण्याईच अलौकिक खरी असें म्हटल्यावांचून राहवत नाहीं. द्वेष, विरोध व अडचणी यांना लोकमान्यांनीं जिवंतपणीं सतत तोंड दिलें, विरोधाला पचनीं पाडलें. द्वेषाची धार बोथट केली, व अडचणींना त्यांनीं बाजूस सारलें. मरणोत्तरहि त्यांच्या यशाला अशाच प्रकारें कमीपणा आणण्याचे प्रयत्न झाले. पण त्यांची पुण्याई अखेर याला पुरून उरली असेंच गेल्या नऊ वर्षांचा अनुभव सांगतो. पुणें, नागपूर, अहमदाबाद, कराची, येथें स्वपर–विरोधाला बाजूस सारून त्यांचे पुतळे उभारले गेले. त्यांनीं शिक्षण घेतलेल्या संस्थेंत, व त्यांनीं काढलेल्या शिक्षण–संस्थेंतहि, त्यांचीं स्मारकें उभारलीं गेलीं. त्यांचीं लहान इंग्रजी मराठी चरित्रें प्रसिद्ध झालींच. पण विस्तृत असें त्यांचें चरित्र, आठवणीसारखे अपूर्व असे तीन ग्रंथ, त्यांचे अनेक लेखसंग्रह, सूक्तिसंग्रह, त्यांच्या धर्मविषयक मतावरील निबंध, इंग्रजी व हिंदी विस्तृत चरित्रग्रंथाचा पहिला भाग हीं प्रसिद्ध झालीं. याशिवाय त्यानीं आपल्या ह्यातींत प्रसिद्ध केलेल्या ग्रंथांच्या व त्यांच्या भाषांतरांच्याहि आवृत्त्या निघाल्या. पुण्यास त्यांचें स्मारकमंदिर स्थापन झालें, आणि मुंबईच्या चौपाटीवरील पुतळाहि लवकरच उभारला जाईल. धार्मिक दृष्ट्या त्यांच्या पुण्यतिथीच्या उत्सवाची स्थिरनिधीनें चिरकालिक व्यवस्थाहि जमत आली आहे. त्यांच्या गांवोगांवच्या लहानसहान स्मारकांची यादी तर फारच मोठी होईल. त्यांची रायगड स्मारकाची योजना पूर्ण झाली. त्यांनीं योजलेला ' करणग्रंथ ' पुरा होऊन त्यांच्या योजनेनुसार पंचांगें काढण्याची व्यवस्था झाली. कर्मयोगाच्या तत्त्वज्ञानाच्या प्रसाराची व्यवस्था झाली. त्यांच्या सामाजिक व हिंदुसमाजविषयक मतांची परिणति आज हिंदुसंघटनेच्या रूपानें महाराष्ट्रांत दृग्गोचर झाली आहे. आणि राजकारणांतहि त्यांच्या अनेक धोरणांची उपयुक्तता लोकांना अनुभवानें पटली आहे. असें अलौकिक यश किंवा पुण्याई फारच थोड्या पुरुषांना लाभते.

याच न्यायानें गेल्या नऊ वर्षांत अनेक अडचणींना, विरोधांना व उच्छेदक प्रयत्नांनाहि न जुमानतां केसरीची उन्नतिच होत गेली आणि लो. टिळकांच्या संकल्पाप्रमाणें आज आठवड्यांतून दोनदां वाचकांच्या भेटीला जाण्याचा योग त्याला आला ही आम्हीं टिळकांची पुण्याईच कां मानूं नये ? महात्मा गांधींसारखा पुरुष अगदीं तावून सुलाखून योग्यता पाहून माणसांचा संग्रह करणारा; पण तो तुरुंगांत गेला असतां तेवढ्या अवधींत त्यांच्या वर्तमानपत्राचे तीन संपादक झाले, व त्याचा खप पंचवीस हजारांच्याहि वर होता तो तीन हजारांवर आला हें स्वतः म. गांधींनींच एकदां जाहिर केलें होतें ! हा तुलनात्मक विचार मांडण्याचें कारण हेंच कीं टिळकांची पुण्याई आम्ही कां व कोणत्या दृष्टीनें म्हणतों हें ध्यानांत यावें. आणि टिळकांचें स्मरण ठेवून, प्रामाणिक तत्त्वनिष्ठेनें, आपल्यांत असेल ती शक्ति व कर्तृत्व या कामांत वेंचून, टिळकांनीं निर्माण केलेल्या या 'केसरी' पत्राला व 'केसरी' संस्थेला चिरस्थायी, उपयुक्त व संग्राहक स्वरूप देण्याचा जसा गेलीं नऊ वर्षें आमचेकडून प्रयत्न होत आला आहे, तसाच तो पुढेंहि चालू राहील व केसरी आठवड्यांतून दोनदां निघण्यानें त्यांत भरच पडेल. यामुळें वाटणाऱ्या समाधानांत आमच्याप्रमाणें आमचे हजारों हितचिंतक व टिळकांचे भक्त, अनुयायी, चहाते हेहि सहभागी असल्यामुळें, आमच्या मनांत या प्रसंगीं आलेल्या विचारासारखेच विचार त्यांच्याहि मनांत उद्भूत होत असतील यांत शंकाच नाहीं. कित्येकांनीं ते आम्हांस मित्रभावानें लिहूनहि कळविले आहेत, अर्थात् "बोधयंतः परस्परम्" याच न्यायानें आम्हीं ते आजच्या प्रसंगास उचित व अनुरूप म्हणून व्यक्त केले आहेत.

---

## ११ केसरीची दुप्पट दौड

अथवा

## अर्धसाप्ताहिक केसरी

( केसरी, जुलै १९२९ )

केसरी हल्लीं आठवड्यांतून एक वेळ वाचकांची भेट घेतो. त्याऐवजीं ती दोनदां घेण्याची व्यवस्था करावी असें चालकांच्या मनांत पुष्कळ दिवसांपासून आहे. स्वतः लो. टिळकांच्या मनांत ही कल्पना होती. आणि १९१९ सालीं विलायतेहून परत आल्यानंतर, आधीं छपाईचें नवीन यंत्र

उभें करूं व मग ही कल्पना हळूहळू रुतींत आणूं असा त्यांचा विचार होता. परंतु दुर्दैवानें त्यानंतर टिळकांच्या आयुष्याचे दिवस थोडे उरले, व उरले ते इतर कार्यांच्या गर्दीमुळें या कार्याच्या वांटणीला आले नाहींत. त्यांच्या मृत्यू-नंतर त्यांनीं विलायतेहून आणिलेलें छपाईचें नवीन यंत्र आम्हीं चालू करून जरूरीप्रमाणें केसरीचा आकार किंचित् बदलला व केसरीच्या पानांची संख्या वाढविली हें वाचकांना विदितच आहे. मात्र केसरी अर्धसाप्ताहिक करण्याला जीं साधनें विशेषतः जी सवड व स्वस्थता अवश्य, तीं मध्यंतरीं अनेक कारणांनीं मिळालीं नाहींत. पण कोणतीहि गोष्ट करण्याला अगदीं मनाला हवी तशी तंतोतंत परिस्थिति मिळेल तेव्हांच ती करूं असें म्हणत गेल्यास ती परिस्थिति बहुधा मिळतच नाहीं व त्यामुळें कार्य होत नाहीं, असा मनुष्यमात्राचा अनुभव असल्यामुळें, केसरी आठवड्यांतून दोन वेळां काढण्याचा प्रयोग आतां अधिक लांबणीवर टाकावयाचा नाहीं, व लोकमान्य टिळकांच्या या नवव्या पुण्यतिथीपासून केसरी आठवड्यांतून दोन वेळां काढावा असें ठरविलें आहे. त्याप्रमाणें शनिवार तारीख ३ ऑगस्ट १९२९ रोजीं अर्धसाप्ताहिक केसरीचा पहिला अंक निघेल.

ही नवी योजना खालीं लिहिल्याप्रमाणें आहे. आठवड्याच्या दिवसांची संख्या सात म्हणजे विषम असल्याकारणानें बरोबर सारख्या अंतरानें दोन अंक निघणें शक्य नाहीं. ता. ३० जुलै रोजीं नेहमींप्रमाणें मंगळवारचा केसरी १६ पानांचा अंक निघाल्यानंतर पुढें तीन दिवस टाकून शनिवार ता. ३ ऑगस्ट रोजीं अर्धसाप्ताहिक केसरीचा पहिला बारा पानांचा अंक व त्यानंतर दोन दिवस टाकून पुनः मंगळवार ता. ६ ऑगस्ट रोजीं अर्धसाप्ताहिकाचा दुसरा बारा पानांचा अंक काढण्यांत येईल, आणि नंतर तेथपासून मंगळवार-शनिवारचा हा क्रम तसाच सतत पाळला जाईल.

हल्लीं केसरीची ऐन वर्गणी तीन रुपये आहे. केसरी आठवड्यांतून दोन हप्त्यांनीं निघूं लागल्यावरहि ती तितकीच राहील. परंतु टपालहंशील मात्र वर्गणीदारांना हल्लींइतकेंच पुनः एक वेळ भरावें लागणार. फक्त टपालहंशिलापुरतें आठवड्यास एक पैसा या हिशेबानें, वर्षाचे तेरा आणे केसरीच्या वर्गणीदारांना अधिक द्यावे लागतील. पूर्वीचे तीन रुपयांवरील तेरा आणे हे जसे ग्राहकांपासून घेतले तरी परस्पर खर्च होत होते, तसेच यापुढें घेतले जाणारे दुसरे तेरा

आणेहि पोस्टखर्चाकडेच जातील. तात्पर्य, केसरी आठवड्यांतून दोन वेळां काढण्याकरितां व ग्राहकांकडे पाठविण्याकरितां एक पैसाहि अधिक वर्गणी आकारली जाणार नाहीं.

केसरीची हल्लींची तीन रुपये वर्गणी ही ता. १ जानेवारी १९१८ पासून प्रथम आकारण्यांत येऊं लागली व ती आजहि कायमच आहे. तथापि ती प्रथम आकारण्यांत येऊं लागली तेव्हां केसरीचीं पानें केव्हां आठ तर मधून मधून केव्हां बारा अशीं मजकुराच्या सोयीप्रमाणें सवडीनुसार घालण्यांत येत असत. पुढें कांहीं दिवसांनीं बारा पानांचा केसरी नियमानें काढण्यांत येऊं लागला. नंतर मधून मधून चार पानांची पुरवणी घालण्यांत येई. व १९२५ पासून तर आम्ही सोळा पानांचाच केसरी नियमानें काढूं लागलों. या गोष्टीला केव्हां अपवाद घडलाच तर तो उलट पृष्ठसंख्या वाढविण्याच्या दिशेनेंच घडला आहे. म्हणजे ग्राहकांशीं मूळ संकेत तीन रुपयांत आठ पानें देण्याचा असतां आम्ही नियमानें सोळा पानें तर देऊं लागलोंच. पण प्रसंगविशेषीं वीस, केव्हां चोवीस, व केव्हां केव्हां तर बत्तीस पृष्ठें देत असतों ही गोष्ट वाचकांच्या लक्षांत आलेलीच आहे.

असो; अर्धसाप्ताहिकाची ही नवी व्यवस्था वर्ष संपण्यापूर्वी मध्येंच म्हणजे ता. १ ऑगस्टपासून करण्यांत येणार असल्यानें, ऑगस्टपासून डिसेंबर १९२९ अखेर पांच महिन्यांचें जादा टपालहंशिल पांच आणे होतें. तें ग्राहकांनीं केसरीकडे आपल्या सवडीप्रमाणें भरून पावती घ्यावी. जे कोणी न भरतील त्यांच्या पांच आण्याची ही रक्कम त्यांजकडून पुढील सालच्या वर्गणीबरोबर वसूल केली जाईल.

शेवटीं एकच व्यवस्था सांगण्याची उरली. ती कायम वर्गणीदारांनीं टपालमार्फत केसरी न घेतां एजंटामार्फत घेण्याची. ही व्यवस्थाहि पूर्वीप्रमाणेंच चालू राहील. म्हणजे वर्गणीदारांनीं केसरी कचेरीकडे ४ रु. १० आणे भरावे, आणि एजंटकडून अंक घेण्याची स्वतःची कबुली एजंटमार्फत केसरी कचेरीकडे पाठवावी म्हणजे त्यांना एजंटमार्फत आठवड्यांतून केसरी दोन वेळां घरपोंच मिळेल.

## सारांश

१ यापुढें केसरी आठवड्यांतून दोन वेळां निघत जाईल.

२ एक अंक दरमंगळवारीं बारा पानांचा निघेल.

३ दुसरा अंक दरशनिवारीं बारा पानांचा निघेल.

४ वार्षिक वर्गणीदार हा दोन्ही अंकांचा मिळूनच वर्गणीदार समजला जाईल. एकट्या मंगळवारच्या किंवा एकट्या शनिवारच्या अंकाकरितां कोणासहि वर्गणीदार म्हणून नोंदलें जाणार नाहीं. वार्षिक वर्गणीदारांस दोनही अंकांची मिळून तीन रुपये वर्गणी एकदमच आकारली जाईल व एकदमच वसूल केली जाईल.

५ वार्षिक वर्गणीदारांनीं पूर्वींचे तेरा आणि व नवे तेरा आणे मिळून रु. १आ. १० टपालहंशील भरल्यास त्यांना टपालमार्गें घरपोंच दोनहि अंक दिले जातील.

६ कायम वर्गणीदारांना एजंटमार्फत अंक घ्यावयाचे असल्यास ज्या गांवीं एजंट आहेत त्या गांवच्या एजंटामार्फतहि अंक घेतां येतील.

७ मंगळवारच्या किंवा शनिवारच्या कोणत्याहि किरकोळ अंकाची किंमत एक आणा घेतली जाईल.

**न. चिं. केळकर,**
**धों. वा. विद्वांस,**
ट्रस्टी केसरी–मराठा.

---

## १२ केसरीकडून आणखी एक हजाराचा जामीन मागितला

( केसरी, ता. ३० आगस्ट १९३० )

मंगळवार ता. २६ रोजीं मुंबईसरकारची एक नवी नोटीस पुणें डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट यांचे मार्फत केसरीचे संपादकांवर बजावण्यांत आली. या नोटिशींत केसरीचे प्रकाशक या नात्यानें श्री. न. चिं. केळकर यांजकडून नव्या प्रेस ऑर्डिनन्सअन्वयें जामिनीदाखल एक हजार रुपयांची रक्कम मागण्यांत आली व ती गल्या गुरुवारीं भरण्यांतहि आली.

केसरी–मराठा संस्थेकडून या नव्या प्रेस ऑर्डिनन्सखालीं जामिनकीची रक्कम मागण्याचा हा तिसरा प्रसंग किंवा हप्ता होय. पहिली रक्कम दोन हजारांची मराठा पत्राचे नवीन संपादक व प्रकाशक रा. दि. वा. दिवेकर यांचेकडून ता. २४ मे रोजीं घेण्यांत आली. वास्तविक ही रक्कम मागण्याचें तेव्हां कांहींच कारण नव्हतें. रा. दिवेकर यांच्यापूर्वींचे संपादक रा. दा. वि. गोखले हे

कायदेभंगाच्या चळवळींत तुरुंगांत गेले! म्हणून त्यांच्या जागीं रा. दिवेकर यांच्या नांवाचें डिक्लेरेशन करणें प्राप्त होतें. परंतु केवळ या अदलाबदलीचा प्रसंग साधून ती पहिली जामिनकी मागण्यांत आली. यानंतर ता. ७ जून रोजीं केसरी छापखान्याचे मॅनेजर रा. धोंडोपंत विद्वांस यांजकडून पंचवीसशें रुपयांची जामिनकी घेण्यांत आली. पण ही घेण्यांत आल्यावर निदान मराठा पत्राकरितां पूर्वीं घेतलेली दोन हजारांच्या जामिनकीची रक्कम परत द्यावयास पाहिजे होती किंवा या पंचवीसशेंत ती जमा धरावयास पाहिजे होती. केसरी 'छापखान्या' ची जामिनकी घेण्यांत उघडच कल्पकता दिसून येते. कारण त्या एकाच छापखान्यांतील यंत्रांवर केसरी व मराठा हीं दोनहि पत्रें निघत असल्यानें छापखान्याकडून घेतलेल्या जामिनकीनें आपोआप एकदम नाकेबंदी होणारी होती. मग लिहिलेला आक्षेपार्ह मजकूर मराठ्यांत असो कीं केसरींत असो! व त्याप्रमाणें रा. दिवेकर यांनीं डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट यांस पत्र लिहून "मराठ्याची जामिनकी परत द्यावी" असें सुचविलेंहि. परंतु उलट जबाब असा मिळाला कीं, "झालें हें कायदेशीर तर आहेच. परंतु केसरी–मराठा पत्रांसारख्या द्वाड पत्रासंबंधानें तें तसें केलें जावें असाच ऑर्डिनन्सचा उद्देश आहे!" व बहुधा त्यालाच अनुसरून हल्लींची ही तिसरी जामिनकी एक हजाराची फिरून मागण्यांत आली असावी.

अशा रीतीनें येथें जास्तींत जास्त पांच हजार रुपयांची जामिनकी घेतां आली असती व अडीच हजारांच्या जामिनकीनेंहि काम भागलें असतें तेथें आतां साडेपांच हजारांची जामिनकी घेण्यांत आली आहे! अर्थात् यानंतरची पायरी कोणती याची कल्पना जाणत्या लोकांना करतां येईलच! स्पष्ट करून सांगण्याचें कारण नाहीं. मौजेनें असें म्हणावेसें वाटतें कीं, या ऑर्डिनन्सखालीं जामिनकी मागणाराचा व ती देणाराचा संबंध कांहींसा रोगी व वैद्य यांच्यासारखा आहे! रोग्याची नाडी पाहण्याकरितां वैद्यानें रोग्याचा हात धरावा आणि रोग्यानेंहि वैद्याच्या नाडीवर हात ठेवून बसावें!

---

## १३ केसरीचें अर्धशतकाचें सिंहावलोकन

( केसरी, ता. ३० डिसेंबर १९३० )

केसरीचा जन्म ता. ४ जानेवारी १८८१ रोजीं झाला. अर्थात् वर्षगणनेनें

उद्यां म्हणजे ता. ३१ डिसेंबर १९३० रोजीं केसरीच्या आयुष्याचीं पहिलीं पन्नास वर्षें पुरीं होतात. पूर्वी लो. टिळक हे केसरीचे संपादक असतां त्यांचा एक संप्रदाय असा असे कीं, नव्या वर्षाच्या पहिल्या अंकांत गतवर्षीच्या हकीकतीचा आढावा थोडक्यांत सिंहावलोकन पद्धतीनें द्यावयाचा. प्रथम कांहीं वर्षें हा परिपाठ अखंड चालला. पण पुढें पुढें तो बंद पडला. याचें एक कारण असें दिसतें कीं, वर्षाच्या बारा महिन्यांत घडणाऱ्या हकीकती व उलाढाली या लवकरच इतक्या वाढल्या कीं, त्यांचा आढावा एखाद्या अग्रलेखाच्या जागेंत घेऊन मांडणें अशक्य झालें. वार्षिक सिंहावलोकन हें देखील जरी अवघड होऊन बसलें असलें तरी आम्हाला आज जें सिंहावलोकन करावयाचें आहे तें अखिल हिंदुस्थानच्या सर्व प्रांतांचें नाहीं, किंबहुना एकंदर मुंबई इलाख्याचेंहि नाहीं, तर महाराष्ट्राशीं संबंध आलेल्या केसरीपत्रासंबंधाचें असल्यामुळें ती गोष्ट आम्हास शक्य वाटतें, निदान ती तशी केली पाहिजे. म्हणून आजच्या अग्रलेखाला वाचकांकडून नेहमींहून थोडी अधिक जागा मागून घेऊन आमचे विचार थोडक्यांत संकलित रीतीनें मांडण्याचें योजिलें आहे.

१८८० ते १९३० या ५० वर्षांच्या कालावधीला एका विशेष दृष्टीनें हिंदुस्थानचें 'चमत्कार युग' असें नांव देतां येईल. या अवधींत इतर देशांतूनहि कांहीं चमत्कार घडले नसतील असें नाहीं. पण हिंदुस्थानांत जो चमत्कार घडला तसला मात्र तिकडे कोठें या काळीं घडला नसेल. याचें कारण अशा प्रकारचा चमत्कार तिकडे पूर्वीच होऊन गेला होता. या गेल्या पन्नाशींतील मुख्य चमत्कार म्हणजे हिंदी राष्ट्राच्या मनांतील राष्ट्रीय जागृति ! या दृष्टीनें या कालावधींत पश्चिमेकडे तुर्कांचें राष्ट्र व पूर्वेकडे जपान विशेषतः चीन यांचींहि नांवें घ्यावीं लागतील. पण युरोप अमेरिका वगैरे देशांत ही जागृति १८८० च्या पूर्वी शंभर वर्षें होऊन गेली होती. फ्रान्समधील राज्यक्रांति, इंग्लंडमधील लोकशाहीचा विजय आणि अमेरिकेचें स्वातंत्र्य या गोष्टी अठराव्या शतकाच्या अखेरीसच घडून आल्या होत्या. या राष्ट्रजागृतीच्या नंतर लाभलेल्या शांततेच्या, महत्त्वाकांक्षेच्या भरभराटीच्या अशा पुढच्या म्हणजे एकोणिसाव्या शतकांत. या पाश्चात्य राष्ट्रांनीं आपलें सर्व लक्ष भौतिक शास्त्रांच्या संशोधनाकडे लावलें. व त्या संशोधनांत लाभलेल्या अचाट अद्भुत कल्पनांना प्रत्यक्ष व्यावहारिक स्वरूप देऊन, अखिल जगावर सत्ता व वर्चस्व स्थापण्याचीं साधनें त्यांनीं निर्माण केलीं. या शोधांचें

व साधनांचें महत्त्व आमच्याहि इकडे जाणत्या लोकांनीं अलीकडे ओळखलें आहे. कांहीं नीरस लोकांच्या दृष्टीनें गतकालीन इतिहासाचीं थडगीं व कबर-स्थानें उकरीत बसणारे इतिहासाचार्य राजवाडे यांनाहि एकदां अशी घोषणा करण्याची लहर आली होती म्हणतात कीं, " हें सर्व इतिहाससंशोधन लोकांनीं टाकून द्यावें, भाषाशास्त्र चुलींत घालावें आणि भौतिक म्हणजे पदार्थ विज्ञान शास्त्राचें संशोधनच हिंदुस्थानांतील बुद्धिमान् तरुण पिढीनें या पुढें हातीं घ्यावें " आणि " याकरितां बाकीचे उद्योग टाकून एक प्रयोग शाळा काढतों पहा " असें म्हणून उठून ते डोक्याला रुमाल घालून निघाले सुद्धां. या दंतकथेंतील तात्पर्य इतकेंच कीं, बुद्धिमान् हिंदी पुढाऱ्यांना भौतिक पदार्थविज्ञान शास्त्राचें महत्त्व कळतें, त्याची जाणीव नाहीं असें नाहीं. पण एक तर आपल्या भौतिक संस्कृतीची जुनी परंपरा खंड पडून भंग पावलेली. तिचे धागेदोरे आतां पुनः जुळवून, नवा पट निर्माण करण्याला जी स्वस्थता, जी सांपत्तिक अनुकूलता व विशेषतः जी राष्ट्रसत्ता अवश्य असते ती नसल्यामुळें, भौतिकशास्त्रसंशोधन, शिक्षण व त्यांच्या अनुषंगानें जोमदार होऊन वाढणारी देशी कामगिरी सहज मागें पडली आहे. त्याहि स्थितींत एखादा जगदीशचंद्र बोस, एखादा प्रफुल्लचंद्र रॉय, एखादा रमण, एखादा मेघनाद सहा निर्माण होतो. परंतु त्याचें हातून हिंदुस्थानाला होणारा उपयोग मर्यादित; व त्यांचा उपयोग पुरा करून घेण्याला लागणारी सरकारी सत्ता अद्याप मिळालेली नाहीं. ती मिळविल्या-शिवाय सर्व व्यर्थ आहे. कारण तिच्यांतच विविध उत्कर्षांचीं बीजें रुजून फोफावूं शकतात. म्हणून हरप्रयत्नानें ती सत्ता प्रथम हस्तगत केली पाहिजे. अशी हिंदुस्थानांतील जाणत्या पुढाऱ्यांची खात्री होऊन चुकली आहे. स्वतः शास्त्रसंशोधक लोकहि ही गोष्ट कबूल करतात. असो. यामुळें भौतिक शास्त्रा-विषयीं या देशाची गुणग्राहकता कमी आहे असा भास होतो इतकेंच.

वर सांगितल्याप्रमाणें पाश्चात्य राष्ट्रांनीं १९ व्या शतकांतील शांततेचा व समृद्धतेचा फायदा घेऊन, भौतिक शास्त्रांत इतके शोध लावले कीं, या शत-काला चमत्कार शतक ( Wonderful century ) हें नांवच ऑल्फ्रेड वॉलेस यानें प्रथम दिलें, व तेंच सर्वांनीं मान्य केलें आहे. पण गेल्या ५० वर्षांच्या अवधीला ' हिंदुस्थानचें चमत्कार-( अर्ध ) शतक ' म्हणण्याचें आमचें कारण असें कीं, ते शोध म्हणजे शास्त्रीय पराक्रम हे जसे त्या देशांना अपूर्व

ठरले त्याचप्रमाणें हिंदुस्थानांत झालेली या अर्धशतकांतील राष्ट्रीय चळवळ ही देखील या देशाला अपूर्वच होय! कल्पनेनें म्हणजे रूपकादिकांनीं या दोन प्रकारच्या गोष्टींचें साम्य प्रस्थापित करूं पाहणें हा एक प्रकारचा 'खेळ' असें कोणी वाटेल तर म्हणो. परंतु आम्हांला तर खरोखरच असें वाटतें कीं, समग्र हिंदुस्थानांत या पन्नास वर्षांत एकंदर वर्तमानपत्र संस्थेनें ज्या अद्भुत गोष्टी आपल्या शिकवणीनें, उत्तेजनानें स्फूर्तीनें घडवून आणल्या त्या खरोखरच रूपकाहे होत. कांहीं थोडीं उदाहरणें द्यावयाचीं तर आम्ही असें म्हणूं कीं, तिकडील 'खलाशाच्या होकायंत्रा' प्रमाणें हिंदी वृत्तपत्रांनीं राष्ट्रीय प्रगतीची दिशा व तिचा ध्रुव तारा हा नेहमीं बरोबर दाखविला. तिकडील 'दीपगृहां' (लाइट हाउसेस) प्रमाणें हिंदी वर्तमानपत्रांनीं राष्ट्रहिताची नौका कोणत्या खडकावर फुटण्याचा संभव आहे याविषयीं सावधगिरीची सूचना कायम प्रदीप्त ठेवली. 'बॅरोमीटर' प्रमाणें त्यांनीं लोकमत केव्हां किती सरदलें, व 'थर्मामीटर' प्रमाणें लोकमत केव्हां किती ऊष्णांशानें वर चढलें हें बिनचूक दर्शविलें. तिकडील संशोधनानें निघालेल्या 'छापखान्या'चा तर हिंदी वर्तमानपत्रांनीं स्वतःच पुरा उपयोग करून लोकशिक्षण फैलावलें. 'सूक्ष्मदर्शक यंत्रा' प्रमाणें सरकारी रुपेच्या छायेंत व लांचलुचपतीच्या कर्दमांत राष्ट्रहितघातक असे पूर्ण विषारी अर्धविषारी कृमिकीटक कशा विविध प्रकारचे जन्मून पोसले जातात हें जसें लोकांना दाखविलें, तसेंच तिकडील 'दुर्बिणी' प्रमाणें इकडील वृत्तपत्रांनीं दूर आभाळांत अदृश्य असणारे ध्येयांचे तारे नुसत्या डोळ्यांत दिसणाऱ्या सूर्यचंद्राप्रमाणें लोकांना दाखविले. लहानमोठ्या 'घड्याळा' प्रमाणें त्यांनीं स्वतः वक्तशीरपणा ठेवून, पद्धतशीर काम करण्याची थोडीबहुत संवय लोकांना लावून दिली. निरर्थक वाटणाऱ्या चर्चेंतून व बडबडींतूनहि 'गॅसलाइट' प्रमाणें ज्ञान-प्रकाश उत्पन्न केला. 'बंदुकी दारू' व 'गन-कॉटन' यांच्याप्रमाणें, राष्ट्रीय भावनेवर लोकमताचा दाब पाडून किंवा स्फूर्तीची ठिणगी लावून, लहानमोठ्या चळवळींच्या रूपानें स्फोटक द्रव्यें निर्माण केलीं. 'आर्टिशियन वेल्स' प्रमाणें कवडीचुंबक धनिकांच्या गुप्त विवरांना भोंकें पाडून हिंदी वर्तमानपत्रांनीं शंभर मजल्यांवरील उच्च सार्वजनिक कार्यांना द्रव्यसाहाय्याच्या अखंड धारा (अर्जुनाच्या बाणानें भीष्माला गंगोदक दिलें त्याप्रमाणें) मिळवून दिल्या. तिकडील 'स्टीम इंजिनां'नीं डब्यांची गाडी बनवून, वाहतुकीचें अद्भुत काम सुरू केलें, त्याप्रमाणें हिंदी वर्तमानपत्रा-

नींहि अनुयायांच्या डब्यांच्या सांखळ्या बनवून, त्यांतून ज्याच्या त्याच्या योग्यते-प्रमाणें भरलेला सुगंधी, स्फोटक व घाणेरा खंडोगणपती माल एकट्यादुकट्या पुढाऱ्याच्या हातून वाहविण्याला शिकविलें. आणि तिकडील 'तारायंत्रा' प्रमाणें किंवा 'बिनतारी विद्युत्' संदेशाच्या शोधाप्रमाणें इकडील वर्तमानपत्रांनीं देशाच्या या टोंकाची बातमी व भावना त्या टोंकाला यथाशक्ति पण सत्वर कळ-विण्याचें काम चालविलें आहे.

विलायतेंतील वर्तमानपत्रांना १७७४ सालीं सुविख्यात एडमंड बर्क यानें राज्यघटनेच्या इमारतीचा चौथा चोक असें नांव प्रथम दिलें. यापूर्वी दोन वर्षांपर्यंत पार्लमेंटांतील भाषणें प्रसिद्ध करण्याला मनाई होती. तोंपर्यंत वर्तमानपत्रांचे बातमीदार ( रामायणाच्या पोथीला मारुति पाटावर येऊन बसतो त्याप्रमाणें ) अदृश्य रूपानें पार्लमेंटगृहांत येऊन बसत. याचा अर्थ रिपोर्ट छापीत ते केवळ मनपसंत किंवा कपोलकल्पित असत. किंवा हक्कानें हजर असणारे पार्लमेंटचे सभासद खासगी रीतीनें माहिती देत किंवा टिपणें पुरवीत त्यावरून ते लिहिले जात. पण १७७४ सालीं ही मनाई जाऊन खुद्द सभागृहाच्या गॅल-रींत वर्तमानपत्रांचे रिपोर्टर प्रथम येऊन बसले तेव्हां सांगतात कीं, बर्कनें गॅल-रीकडे हात दाखवून म्हटलें, "पाहा हे स्वराज्यांतले आपले चौथे भागिदार! एव-ढेंच नव्हे तर, इतर तिघांहून त्यांना मी अधिक मानतों!" कॅक्सटननें वेस्ट-मिन्स्टरमध्यें पार्लमेंट सभागृहाजवळ प्रथम छापखाना काढला तेव्हांच हा चौथा भागीदार निर्माण झाला. तेव्हांपासून पहिले दोन भागिदार म्हणजे राजा व उमराव सभा. यांचे हक्क व मानमरातब कमी होऊं लागून दुसरे दोन भागीदार म्हणजे कॉमन्स सभा, वर्तमानपत्रकार छापखानेवाले यांना वाढतें महत्त्व प्राप्त झालें. मध्ययुगांतील शतकांत इंग्लंडाच्या राजांनीं मस्तवाल अमीर उमराव यांची रग जिरवली; व ते हतबल होतां होतां मिस्टर आस्किथ यांच्या पार्लमेंटरी ॲक्टामुळें १०-२० वर्षांपूर्वी ते जिवंत उरले असले तरी ते मेल्यासारखेच झाले आहेत. उलट कॉमन्स सभेनें प्रथम कांहीं दिवस जरी वर्तमानपत्रांची बाधा आपणाला होतीसें वाटून त्यांना बहिष्कृत ठेवलें होतें, तरी त्यांचा उपयोग लव-करच तिला कळून आल्यानें, व राजाशीं उभ्या राहिलेल्या युद्धांत वर्तमानपत्रांच्या दोस्तीचें महत्त्व पटल्यामुळें वर्तमानपत्रांवरील बंधनें हळूहळू पार्लमेंटानेंच मोडून काढलीं म्हणजे उदाहरणार्थ, स्टँपचा कायदा रद्द केला व राज्यद्रोहाच्या खट-

ल्यांत ज्यूरीला न्यायाधिशांपेक्षां जास्त महत्त्व देऊन वर्तमानपत्रांना स्वातंत्र्य मिळवून दिलें. आणि आज, पहावें तों त्या स्वातंत्र्याचा उपयोग करून विलायतें-तील पत्रें शिरजोर होऊन पार्लमेंटालाहि वचक बसवितात. किंबहुना प्रधान-मंडळाच्याहि संघटना विघटना करूं शकतात.

अशीच कांहींशी गोष्ट आपल्या इकडेहि अलीकडे घडून आलेली आहे. पार्लमेंटाच्या गॅलरीत विलायती वर्तमानपत्रकाराला जें स्वरूपतः उच्च स्थान किंवा अर्थतः महत्त्व तेंच आज इकडील कायदेकौन्सिलांच्या दुमजल्याच्या गॅलरींत बसणाऱ्या हिंदी पत्रकारांनाहि जवळ जवळ प्राप्त झालें आहे. विलायतेंत जसा एखादा नाणावलेला वृत्तपत्रकार पार्लमेंटामध्यें शिरतो व क्वचित प्रधानपदादि पावतो त्याप्रमाणें, सी. वाय. चिंतामणी सारख्या एखाद्या संपादकानें आज संपादक उद्यां प्रधान, परवां फिरून संपादक असें उदाहरण घडविलें आहे. पण एकंदरींनें प्रधानमंडळांत न शिरतां राज्य-कारभारावर दुरूनच जी छाप किंवा जें वजन वृत्तपत्रकारांना पाडतां येतें तिेंचेच महत्व व उपयोग अधिक समजला जातो. लंडन टाइम्सचा मालक लॉर्ड नॉर्थक्लीफ याच्या मनांत प्रधानमंडळांत शिरावयाचें असतें तर त्याला ती गोष्ट असाध्य नव्हती. पण स्वतः मंत्री होण्यापेक्षां मंत्री खेळविणें व भिव-विणें हीच अधिक बहुमानाची गोष्ट समजून तो त्या फंदांत पडला नाहीं. वर्त-मानपत्रांचें राजकारणांतील महत्त्व समजण्याला दुसरा एक पुरावा असा देतां येईल कीं, विलायतेंत १५ व्या शतकापासून २० व्या शतकापर्यंत राजकर्त्यांनीं वर्तमानपत्राचेंच भय बाळगिलें आहे. आठव्या हेन्रीच्या वेळीं त्याचा नर्म-सचिव कार्डिनल वुल्से यानें असे उद्गार काढले कीं “ आम्ही जर वर्तमान-पत्रांचा नाश न करूं तर उद्यां वर्तमानपत्रें आमचाच नाश केल्याशिवाय रहाणार नाहींत ” आणि महायुद्ध सुरू असतां, विलायती वर्तमानपत्रांवर सेन्सॉरशिप प्रस्थापित झाली तेव्हांहि ॲस्क्विथसाहेबांच्या प्रधानमंडळांत हेच शब्द उच्चारले गेले असें म्हणतात.

चित्ताकर्षक बातम्या पुरविणें, मतें बनविण्याला मदत करणें, राजकीय शिक्षण फैलावणें, प्रसिद्धीनें कोणत्याहि सत्कार्याला, उद्योगाला, चळवळीला, संघटनेला मदत करणें, किंबहुना लोकाश्रयानेंच जी संपन्नता आपल्याला लाभली तिचा यथोचित अंशानें परत लोकांना उपयोग करून देणें, इत्यादि गोष्टींनीं

वर्तमानपत्रें व लोकसमाज यांचा ऋणानुबंध जडला व दृढ होत गेला. व उपकाराची नसली तरी उपयोगाची जाणीव ठेवून, या ऋणानुबंधाच्या पाशांत गुरफटून गेल्यानें, नकळत किंचित् पारतंत्र्य आलें तरी तें समाजानें मानलें नाहीं.

आतां ही गोष्ट खरी कीं, वर्तमानपत्र यशस्वी होण्याला केवळ सुविचारपरिप्लुत लेख लिहिणारे गाढ विद्वानच उपयोगी पडतील असें नाहीं. तर एकानें थट्टेनें असेंच म्हटलें आहे कीं, " ग्रीकांचा सॉक्रेटीस, इंग्रजांचा बर्क व फ्रेंचांचा सेंट बूव्ह असलेच लोक केवळ वर्तमानपत्रांचे संपादक नेमले तर त्या पत्रांचा प्रसार एक वीतभरहि वाढणार नाहीं. " पण वर्तमानपत्रें हीं केवळ विद्वानांनीं बनविलेलीं तयार मतें प्रतिपादन करण्याकरितांच असतात असें नाहीं; तर मतप्रसाराचा स्वरूपतः किंवा तत्त्वतः ज्याच्याशीं अर्थाअर्थी संबंध नाहीं अशी जी बातमी किंवा वृत्त तें पुरविणें हेंच खरीं वर्तमानपत्रें आपलें एक मुख्य काम समजतात. व तें चटकदार किंवा चित्ताकर्षक रीतीनें पुरविण्याची तजवीज करतात. आणि अशा बातमीनें आकर्षण केले गेलेले लोक सहजच पत्रांतील मतेंहि वाचतात. यामुळें मूल जसें मध चाटण्याच्या गोडीमुळें औषध घेतें, त्याप्रमाणें चटकदार बातम्यांच्या अनुपानांतून सुविचार किंवा पक्षाभिमानाचीं मतें वाचकांच्या गळीं उतरवितां येतात. अशा मेळानें घेतलें असतां कवि, नाटककार, निबंधकार, किंबहुना वक्ते या सर्वांचा उपयोग वर्तमानपत्रांना होतो. आणि विलायतेप्रमाणें हिंदुस्थानांत देखील असे पुष्कळ संपादक दाखवून देतां येतील कीं, संपादक म्हणून त्यांचें महत्त्व तात्पुरतें मानलें गेलें किंवा पुढील पिढीच्या स्मरणांतून संपादक म्हणून ते नाहींसे झाले तरी, ग्रंथकार या नात्यानें ते उरतीलच उरतील. पण विलायतेपेक्षां आज हिंदुस्थानांतील वर्तमानपत्रांत कांहीं कांहीं दोष कमी आढळतात. यामुळें विलायतेंतील वर्तमानपत्राच्या धंद्याइतका इकडील वर्तमानपत्रांचा धंदा द्रव्यदृष्ट्या कमी फायदेशीर असला तरी, उलट कमी अपवादास्पद आणि अधिक भूषणास्पद आहे.

तपश्चर्येच्या दृष्टीनें पाहतांहि हिंदी वर्तमानपत्रें विलायती वर्तमानपत्रांपेक्षां कमी नाहींत. कारण गेल्या ५० वर्षांत सरकारच्या हातून त्यांनीं पुष्कळच छळ सोसलेला आहे. जुन्या काळच्या विलायतेंतील संपादकांच्या छळांच्या कांहीं हकीकती वाचल्या असतां, त्यांना इकडे तंतोतंत जोड अशी कदाचित् मिळणार नाहीं. पण छळाच्या प्रकाराच्या बाबतींत सगळें जगच सुधारत चाललें आहे

त्याला काय करणार ? एरवीं राजद्रोहाचे खटले, जप्त्या, बहिष्कार या प्रकारांनीं होणाऱ्या छळाला कसल्याहि हिंदी संपादकांनीं भिऊन केव्हांहि पाठ फिरविली नाहीं. केसरी जन्माला आला तेव्हां लॉर्ड लिटन यांच्या व्हरनॅक्युलर प्रेस ॲक्टाची आठवण बुजलेली नव्हती. १८९७ नंतर प्रेस कमिट्यांचा चिमटे घेण्याचा जाच सुरू होता. १९१० सालीं प्रत्यक्ष प्रेस ॲक्ट होऊन पुष्कळ पत्रें बंद पडलीं किंवा नुकसानींत आलीं. असहकारितेच्या चळवळींत प्रेस ॲक्ट असा झाला नाहीं, पण खटल्यांनीं त्याची जागा भरून निघाली. १९३० सालीं प्रेस ॲक्टच्या दोन आवृत्त्या ऑर्डिनन्सच्या रूपानें निघाल्या व आतां १९३१ सालीं तर या कायद्याला असेंब्लीच्या द्वारें कायमचें स्वरूप देण्याचा सरकारचा संकल्प आहे! अर्थात् छळ सोसणें याचा समावेश तपश्चर्येंत होत असेल तर हिंदी वर्तमानपत्रांची तपश्चर्या कांहीं कमी नाहीं असेंच म्हणावें लागेल.

सामान्यतः असें विधान करतां येईल कीं, वर्तमानपत्रांतील लेखांबद्दल राजद्रोहाची शिक्षा होऊन तुरुंगांत गेलेल्या लोकांची गणती कदाचित् हजारांनीं करितां येईल. पण राजद्रोहाकरितां खटला होणें वेगळें. आणि वर्तमानपत्रांचाच समूळ नाश होणें वेगळें. आपल्या इकडील कित्येक वर्तमानपत्रें अशीं सांगतां येतील कीं, बकासुराला पाळीनें बळी द्यावा त्याप्रमाणें त्यांचे अनेक संपादक एकामागून एक खटला होऊन तुरुंगांत गेले. परंतु ऐनजिनसीं वर्तमानपत्र बंद पडणें ही गोष्ट त्यांना मान्य झाली नसती. जाणूनबुजून आत्महत्या करणें याला रणांगणीं देह ठेवण्याइतकेंच धैर्य लागतें, किंबहुना अधिक ! पण आत्महत्येचा विचार धैर्याच्या किंवा पराक्रमाच्या दृष्टीनें करण्याचा नसून युक्तायुक्ततेच्या दृष्टीनेंच करावा लागतो. चालू चळवळींत आम्हांला असेंहि म्हणणारे भेटले कीं, "सरकारनें प्रेस ॲक्टाप्रमाणें जामिनकी मागितली तर ती पहिल्याहि खेपेस न भरतां, पत्रेंच बेलाशक बंद ठेवावीं." पण या 'बेलाशक' शब्दांत पराक्रम किंवा युक्तता यांपैकीं एकहि आहे असें आम्हांला वाटलें नाहीं. दुसरा एक प्रकाराचा उपदेश 'इस्से बी जादा' अशा लोकांचा ! अशा लोकांना वर्तमानपत्रांनीं कितीहि कडक लिहिलें तरी त्याची जामिनकी जोंपर्यंत बुडाली नाहीं तोंपर्यंत त्यांनीं योग्य तितकें कडक लिहिलें असें त्यांना वाटतच नाहीं ! पत्र सहजासहजीं किंबहुना जाणूनबुजून बंद पाडणें हाच पराक्रमाचा एक मोठा प्रकार असें समजून, ते म्हणतात कीं, " मुहूर्तं ज्वलितं श्रेयो न च धूमायितं

चिरम् " जन्मभर तापून धुमसत राहिल्यापेक्षां एक वेळ जाळ करून विझलेलें काय वाईट ? त्यांना बायबलांतील सुप्रसिद्ध वाक्यः—

"And behold ! the bush was burning bright but was not consumed" त्यांना पटूं शकत नाहीं. त्यांची कसोटी हीच कीं, ज्याची जळून राख झाली नाहीं तें तापलेंच नाहीं !

कदाचित् याहि तत्त्वज्ञानांत सत्यांश असेल. नाहीं कोणीं म्हणावें ? पण आम्हांला तरी तो पटत नाहीं. म्हणून त्या प्रकारचें धोरण ठेवावें असें आम्हांस वाटत नाहीं. लोकमान्य टिळकांनीं केसरीच्या बाबतींत व इतर संपादकबंधूंना उपदेश करतांनाहि हें धोरण अंगिकारलें नव्हतें. 'इस्सेबी जादा' या म्हणीप्रमाणें 'ततः किम्' हें वेदान्ती वचन त्यांना माहीत होतें. तथापि व्यवहारांत एखाद्या संस्थेच्या दृष्टीनें, या दोनहि प्रश्नांनीं सूचित होणाऱ्या स्थितीला त्यांनीं कांहीं मर्यादा म्हणून मानली होती. आणि याचमुळें त्यांनीं वर्तमानपत्रांत लिहिणें याला तारेवरील नाचाची उपमा दिली होती. तिचा त्यांचा अभिप्रेत अर्थ हाच कीं, कायदा वेळोवेळीं जी मर्यादा घालून देईल ती मर्यादा यथामति यथाशक्ति पाळून वर्तमानपत्रानें आपलें कार्य करीत राहिलें पाहिजे. क्रम व आक्रम यांना मर्यादा नाहीं. पण पराक्रमाला 'प्रेस लॉ' सारख्या कायद्याची मर्यादा संभाळली पाहिजे. कारण वर्तमानपत्रानें स्वाभिमान संभाळून 'जगलें' पाहिजे. " A river makes its own bed " ही म्हण तत्त्वतः टिळकांना वर्तमानपत्राच्या बाबतींत पटली होती. नदीला वाहतांना केव्हां कोठें खडक भेटेल तर केव्हां कोठें मऊ मातीचें मैदान लागेल. अर्थात् ज्या त्या परिस्थिती-प्रमाणें तिनें आपलें कार्य केलें पाहिजे. खडक भेटला म्हणून ती मनांतून रुष्ट होवो, पण ती वाहण्याचें बंद करीत नाहीं. पण निरुंद का होईना, पाणी वाहात राहाण्याइतका तरी खडक ती आपल्या कौशल्यानें व जोरानें फोडीलच. व या मर्यादित जागेंत तिचा प्रवाह संकुचित झाला, या रागाची जाणीव ती गंभीर शब्द करून पटवून देईल. दुसऱ्या पक्षीं मऊ मातीचें मैदान तिला लाभलें तर ती गंगा किंवा सिंधु यासारखें आपलें पात्र विस्तृत करील. किंवा पात्राची दिशा वेळोवेळीं बदलून आपली वैचित्र्याची हौस फेडूनहि घेईल. वर्तमानपत्रानें नदीचें अनुकरण केलें पाहिजे असें टिळक म्हणत. तोच त्यांचा विचार ते कित्येक वेळां ' A newspaper must bs sensitive and

stable at the same time ' या शब्दांनीं व्यक्त करीत. याचा अर्थ ताजवा हा वजनाचा सूक्ष्महि कमीजास्तपणा ओळखतो. पण ही जाणीव दाखवितांना त्याची जरी थोडीबहुत चलबिचल झाली व त्यानें हेलकावे खाल्ले तरी त्यानें ताजव्याच्या दांडीशीं काटकोन करूनच राहिलें पाहिजे. म्हणजे हीच त्याची स्थितिस्थापकत्वाची जाणीव. अर्थात् नदीची काय किंवा ताजव्याची उपमा काय, तारतम्यानेंच घेतली पाहिजे हें खरें. तथापि त्यावरून तत्त्वबोध होण्यास अडचण पडत नाहीं.

असो. हिंदुस्थानांतील वर्तमानपत्रसंस्थेसंबंधानें अनेक अवांतर गोष्टी आम्हीं ज्युबिली अंकांत दिल्या आहेत, त्या वाचक वाचतीलच. पण केसरीपुरतें बोलावयाचें तर आज आम्ही इतकेंच म्हणतों कीं, जो उद्देश डोळ्यांपुढें ठेवून मूळ संस्थापकांनीं केसरी काढला तो आज पन्नास वर्षें अखंड चालून; बऱ्याच अंशानें पार पडला आहे इतकें आम्हींहि म्हटलें तरी त्यांत फाजील आत्मस्तुति झाली किंवा अहंकार उमटला असें कोणीहि विचारी मनुष्य म्हणणार नाहीं असें आम्हाला वाटतें. राजकारणाशिवाय इतर अनेक अंगेंहि वर्तमानपत्रांना असतात. आणि त्या दृष्टीनें पाहिलें असतांहि केसरीनें आपलें कर्तव्य थोडेंबहुत केलें असें समाधान त्याच्या चालकांना मानतां येईल असें वाटतें. वाङ्मय, इतिहास, अर्थशास्त्र, सामाजिक प्रगति, औद्योगिक प्रगति इत्यादि अनेक गोष्टींत कोणाहि एकाच पत्राला सर्वच कांहीं करावें तें करतां येत नाहीं. तथापि त्या त्या देशहिताच्या गोष्टींना, उद्योगांना, चळवळींना, हस्तें परहस्तें द्रव्यसहाय्य देऊन, जाहिराती देऊन, लेख लिहवून, समालोचन करवून, माहिती पुरवून, सरकारला सूचना देऊन व त्यांजवर टीका करून, जितकी मदत करतां आली तितकी करण्याचा प्रयत्न केसरीनें केला आहे. आणि उपकार-प्रत्युपकार यांच्या परस्परानुबंधित्वानें जनतेनेंहि केसरीला अनेक रीतींनें साहाय्य केलें आहे. टिळकांनीं ज्या स्वार्थत्यागबुद्धीनें इतर सहकारी लोकांबरोबर केसरी स्थापला तिची पूर्ण सफलता, तो वाढवून, सवरून, सुदृढ करून, त्यांनीं आपल्या मृत्युपत्रानें त्यावरील स्वत्वनिवृत्ति केली त्याच दिवशीं झाली. तेथपासून पुढें केसरीविषयीं त्यांनीं कवीच्या खालीं दिलेल्या शब्दांत वर्णन केल्याप्रमाणें वैराग्यपूर्ण ममत्वाची भावना ठेविली होती. कवि म्हणतोः—

" What if another sit beneath the shade
Of the broad elm I planted by the way
What if another heed the beacon-light
I set upon the rock that wrecked my keel
Have I not done my task and served my kind ? "

कवि म्हणतोः--

" हौस मनाला वाटो मार्गी वृक्षादिक लावाया ।
तच्छाया जरि मीं न सेविली जाई न ती लव वाया ॥
पथिक अन्य जरि तरुतालें बसुनी शांत सुखी होतील ।
तेंच आत्मसुख मानिल मन मम अन्य न फल वांछील ॥
नौका माझी खडकावरि ज्या फुटली कुदैवयोगें ।
ठेविन लावुनि रात्रदीप मी त्या मार्गी त्या जागें ॥

केसरी वर्तमानपत्ररूप जो आक्रोडाचा वृक्ष टिळकांनीं लावला त्याचीं स्वराज्य-रूपी फलें स्वतःला खावयाला मिळतील असें त्यांना कधींच वाटलें नाहीं. " माझ्या हयातींत स्वराज्य स्थापलेले पाहावयास मिळणार नाहीं " असें ते खेद-युक्त मनानें म्हणत. तथापि मनुष्यव्यक्तीपेक्षां संस्थेचा व संस्थेपेक्षां राष्ट्राचा आयुर्दाय अधिक असतो हें त्यांच्या विवेचक बुद्धीला माहीत होतें, व यामुळें त्यांचें समाधान कधींहि भंग पावलें नाहीं. त्यांच्या पुण्याईवरच केसरी-संस्था आजवर टिकून आहे व पुढें केव्हांहि हीच आठवण व भावना बाळगून तिचे चालक आपलें कर्तव्य करीत राहतील तर त्यांना ईश्वर कांहीं कमी पडूं देणार नाहीं असा आमचा दृढ भरंवसा आहे.

---

## १४ केसरीचा एक्कावन्नावा वाढदिवस

( केसरी ज्युबिली अंक जानेवारी १९३१ )

ईश्वरकृपेनें आज केसरीच्या आयुष्यचीं पहिलीं पन्नास वर्षें पूर्ण होऊन त्याच्या एकावन्नाव्या वर्षाला प्रारंभ होत आहे. याबद्दल आम्ही स्वतःचें व केसरीचा वाचकवर्ग यांचें अभिनंदन करितों.

कोणाचा कोणताहि 'वाढदिवस' म्हटला म्हणजे तो एक आनंदाचाच प्रसंग. अभ्युदय किंवा निःश्रेयस् यांची एक सामान्य खूण म्हटली म्हणजे वाढ व क्रमिक परिणति होय. पण मनुष्यानें आपल्या अनुभवानें आयुष्याच्या मार्गावरच्या कांहीं कांहीं मुक्कामांना विशेष महत्त्व देऊन ठेवलें आहे. उदाहरणार्थ, बाळपणाचा पहिला वाढदिवसच समारंभानें पाळला जातो. पुढील वाढदिवस मामुली समजले जातात व त्यांचे समारंभ फारसे होत नाहींत. यानंतर दुसऱ्या टोंकाला हिंदुधर्मशास्त्रानें महत्त्वाचा मानलेला वाढदिवस एकसष्टावा होय. या दिवशीं उदकशांत, दानें इत्यादि धार्मिक विधि होतात, व ज्याच्या त्याच्या महत्त्वाप्रमाणें किंवा परिवाराप्रमाणें इतर लौकिक समारंभहि साजरे करण्यांत येतात.

मुलाचा पहिला वाढदिवस अर्थातच अपत्यवत्सलतेच्या कौतुकानें व प्रेमानें करण्यांत येत असला तरी, पहिल्या बारा महिन्यांत लहान मुलांच्या प्रकृतीला अपाय फार, यामुळें 'ती मुदत निभावली म्हणजे एक पहिलेंच गंडांतर निभावलें' अशी गुप्त जाणीवहि त्या प्रथम वाढदिवसाच्या समारंभांत असतेच. आयुर्दायाचें एक आधुनिक शास्त्रच बनलेलें आहे. त्याच्या अभ्यासकांनीं मृत्यु व अपमृत्यु यांच्या अंदाजाचे कांहीं नियम, हजारों उदाहरणांच्या अवलोकनानें, बनविले आहेत. यावरून पाहतां मनुष्याला पहिल्या बारा महिन्यांत व पुढें साठ ते पासष्ट या वयांत मृत्यूचें जितकें भय तितकें इतर वयांत नसतें. विमा कंपन्या देखील मनुष्य लहानपणीं कांहीं वयाचा होईपर्यंत त्याच्या आयुष्याचा विमा उतरीत नाहींत, तसाच कांहीं एका वयानंतरहि तो उतरीत नाहींत. या दोन मर्यादेंतल्या मनुष्याचेंच जीवित हिशेबांत धरलें जातें.

"शतायुर्वै पुरुषः' या वचनावरून असें दिसतें कीं वैदिक पद्धतीनें मनुष्याचा पूर्ण आयुर्दाय शंभर वर्षांचा मानला गेला आहे. आशीर्वाद मागणारा 'जीवेऽहं शरदः शतं' या शब्दांनीं तो मागेल; व देणाराहि 'जीव शरदः शतं' या शब्दांनीं तो देईल. अर्थात् मनुष्य साठ वर्षांचा झाला म्हणजे त्यानें निम्याहून अधिक एक दशक इतकी मजल मारली असा अर्थ असतो. म्हणून तो अभिनंदनाला पात्र होतो. षष्ट्यब्दि विधीमध्यें उदकशांत, होमहवन हीं केलीं जातात त्यांचा अर्थ एका दृष्टीनें, गंडांतर–परिहार असा घेतला, तर वानप्रस्थ नामक तृतीय आश्रमांत प्रवेश असाहि दुसऱ्या दृष्टीनें घेतां येईल.

असो. अशा रीतीनें धर्मविधीच्या दृष्टीनें एकसष्टाव्या वाढदिवसाचें महत्त्व असतां, आम्हीं केसरीच्या एकावन्नाव्या वाढदिवसाचा आनंदोत्सव करीत आहों हें अर्थात् लौकिकच काय पण त्यांतूनहि परकीय आंग्लपद्धतीलाहि अनुसरून होय ही

गोष्ट अगदीं उघड आहे, आणि ती आम्ही प्रांजलपणें कबूल करतों. कितीहि नाहीं म्हटलें तरी 'राजा कालस्य कारणम्' ही म्हण खोटी कशी ठरेल? इंग्रज लोकांमध्यें कोणत्याहि जीवाच्या आयुष्याच्या सव्विसाव्या, त्यानंतर एक्कावन्नाव्या, व त्यानंतर एकसष्टाव्या वाढदिवसाला क्रमानें अधिकाधिक महत्त्व दिलें जातें. त्यांच्यांत या वाढदिवसांकरितां कोणताहि धार्मिक विधि सांगितलेला नाहीं. परंतु या तीन वाढदिवसांच्या समारंभाला त्यांच्यामध्यें ज्युबिली (आनंदमहोत्सव) असें म्हणतात. आणि या तीन समारंभांचें क्रमानें वाढतें महत्त्व दर्शविण्याकरितां सव्विसाव्या वाढदिवसाच्या ज्युबिलीला 'रौप्य,' एक्कावन्नाव्या वाढदिवसाच्या ज्युबिलीला 'सुवर्ण' व एकसष्टाव्या वाढदिवसाच्या ज्युबिलीला 'हीरक' अशीं वाढतीं उज्ज्वल नांवें त्यांनीं दिलेलीं आहेत. या पद्धतीप्रमाणें आज आम्ही हा केसरीचा विशिष्ट अंक काढून त्याची 'सुवर्ण–ज्युबिली' साजरी करीत आहों. आणि त्याबरोबरच अशी प्रार्थना करीत आहों कीं, आणखी दहा वर्षांनीं याच विदेशी पद्धतीप्रमाणें केसरीचा 'हीरक' ज्युबिलीचा उत्सव, आणि हिंदुधर्मशास्त्रपद्धतीप्रमाणें षष्ट्यब्दिसमारंभ, यथाविधि व आनंदपूर्ण रीतीनें करण्याचा सुदिन उगवेल तेव्हां, त्यांत सामील होण्याकरितां, आज हयात असलेल्या केसरीच्या सर्व ऋणानुबंधी लोकांना अवश्य तें आयुष्य ईश्वरानें द्यावें.

पुढें दहा वर्षांनीं होणाऱ्या केसरीच्या समारंभाला आजच्यापैकीं कोण कोण आप्त प्रत्यक्ष हजर राहतील ते दैववान् खरेच. पण केसरीच्या आजच्या समारंभाला जे हजर नाहींत त्यांचें स्मरण अवश्य केलें पाहिजे. या दृष्टीनें पाहतां प्रथमच एक ठळक गोष्ट दुर्दैवानें नमूद करावी लागते. ती ही कीं, 'केसरी' व 'मराठा' पत्रांच्या मूळच्या संस्थापकांपैकीं एकहि कोणी आज विद्यमान नाहीं. त्यांतले कोणी आज असते तर त्यांना किती आनंद वाटला असता हें सांगण्याचें कारणच नाहीं! पण ते आज हयात राहावयाचे तर त्यांतल्या कोणाचीं वयें किती असतीं हेंहि पाहिलें पाहिजे. या संस्थापकांच्या जन्ममृत्यूचीं वर्षें खालीं दिलीं आहेत.

| | जन्म | मृत्यु | आयुर्दाय |
|---|---|---|---|
| १ विष्णुशास्त्री चिपळूणकर | १८५० | १८८२ | ३२ |
| २ महादेव बल्लाळ नामजोशी | १८५३ | १८९६ | ४३ |
| ३ बाळ गंगाधर टिळक | १८५६ | १९२० | ६४ |
| ४ गोपाळ गणेश आगरकर | १८५६ | १८९५ | ३९ |
| ५ वामन शिवराम आपटे | १८५८ | १८९२ | ३४ |
| ६ गणेश कृष्ण गर्दे | १८५५ | १९१६ | ६१ |

यावरून हें दिसून येईल कीं, या संस्थापक मंडळींपैकीं सर्वांत जो लहान तो आज ७२ वर्षांचा व सर्वांत जो वडील तो ८० वर्षांचा असावयाचा. अर्थात् हे लोक केसरीच्या या ज्युबिलीच्या प्रसंगीं विद्यमान हवे होते असें म्हणणें हें ठीक आहे, पण या समारंभाच्या प्रसंगीं तें मनचे मांडे करून खाण्यासारखेंच होय. केसरीचे संस्थापकच काय पण केसरीच्या अगदीं पहिल्या वर्षांचे वर्गणीदार किंवा वाचक तरी आजमितीला किती हजर असतील याची शंकाच आहे. या संबंधानें आम्ही आजचा प्रसंग मनांत धरून कांहीं दिवसांपूर्वीं केसरींत मुद्दाम एक जाहीर विनंति प्रसिद्ध केली होती. पण तिजवरून आमच्याकडे फारच थोडीं नांवें आलीं. १८८१ सालीं केसरीचा वर्गणीदार होणारा मनुष्य कर्तासवरता, शिकलेला, मिळविता असाच असणार. म्हणजे त्यावेळीं त्याचें वय जर सुमारें पंचवीस वर्षांचें असलें तर आज तो पाऊणशें वर्षांचा असला पाहिजे. इतकीं वृद्ध माणसें आज कितीशीं हयात असणार! त्यांतून कोणी असले तरी तेव्हां केसरीचे वाचक नसतील. वाचक असले तरी वर्गणीदार नसतील. नाहीं म्हणावयाला सुमारें पांच सहा गृहस्थांनीं आपण केसरीच्या पहिल्या वर्षाचे वर्गणीदार असल्याचें कळविलें आहे. अशा ऋणानुबंधी लोकांना आजचा वाढदिवसाचा अंक वाचून फार आनंद होईल यांत शंका नाहीं. सत्तराहून अधिक वयाचीं माणसें हिंडतीं, फिरतीं, वावरतीं आढळतच नाहींत असें नाहीं. मि. ग्लॅडस्टन, मिसेस बेझंट या इंग्रजांप्रमाणें म. दादाभाई नवरोजी, डॉ. भांडारकर; व आज ८३ वर्षांचे असतां एखाद्या तरुण मनुष्याप्रमाणें सार्वजनिक कामें दक्षतेनें करणारे दि. ब. गोडबोले यांच्यासारखे गृहस्थ आम्हा हिंदी लोकांतहि झाले. पण या व्यक्ती अपवादादाखलच समजल्या पाहिजेत. हिंदी लोकांचा आयुर्दाय पाश्चात्यांपेक्षां कमीच. त्यांतूनहि महाराष्ट्रीय लोकांत तो आणखी कमी.

आधुनिक सुशिक्षित महाराष्ट्रीयांत तर तो इतका कमी वाटतो कीं, पस्तीस-चाळीस वर्षांपूर्वीं एके काळीं आमच्यांतील विचारवंत पुढाऱ्यांना तो मोठ्या काळजीचा म्हणून मोठ्या चर्चेचाहि विषय होऊन राहिला होता. या विषयावर १८९४ सालीं मुंबई विद्यापीठाचे दोन धुरीण, म्हणजे डॉ. भांडारकर व न्या. रानडे, यांचीं उत्तरें-प्रत्युत्तरें मोठ्या जोराचीं झालीं होतीं. मात्र या वर्गाच्या अल्पायुषित्वाची मीमांसा दोघांची दोन प्रकारची असली तरी, तें अल्पायुषित्व त्यावेळीं तरी इतकें सिद्धप्राय होतें कीं दोघांनींहि तो नियमच मानिला होता. त्याला बाध आणणारीं

उदाहरणें खुशाल अपवाद म्हणून ते समजत. वास्तविक त्यानंतर अलीकडे हा वाद पुनः कधीं उमटला नाहीं. याचें एक कारण खरोखरच असें कीं, त्यानंतर महाराष्ट्रीय सुशिक्षितांत अल्पायुषित्व अनुभवास येण्याचें कमी होऊन ते मध्यम वयापर्यंत सामान्यतः जगतात असें दिसून आलें; व पूर्वीं गृहीत धरलेली मृत्यु-काळची ३५ वर्षांची मर्यादा जवळ जवळ पन्नास–पंचावन्नापर्यंत वाढलेली दिसून येऊं लागली. अर्थात् त्या जुन्या वादांत आतां फारसा अर्थ नाहीं, व पूर्वीं केलेली मीमांसा डळमळली असेंच सर्वांना वाटूं लागलें. कारण जुनी कोणतीहि स्थिति न बदलतां परिणामांत मात्र फरक दिसूं लागला. परंतु त्या जुन्या काळीं अल्पायुषि-त्वाच्या मीमांसेचा वाद निघण्याला कारण झालें तरी, न्यू. इं. स्कूल व केसरी–मराठा यांचे संस्थापक मंडळींपैकीं अनेक व्यक्ती अल्पवयांत मृत्यु पावल्या ही मनाला चटका लावणारी गोष्टच कारणीभूत झाली यांत शंका नाहीं. या वादांत टिळकांना रानड्यांची विचारसरणी भांडारकरांच्या विचारसरणीपेक्षां अधिक ग्राह्य वाटली होती. तें असो. पण महाराष्ट्रीय सुशिक्षित हे अल्पायुषी असतात खरे ही गोष्ट त्यांनींहि मान्य केली होती. आणि आपल्याबरोबरीचे व आपल्याच संस्थेंतले सहकारी चिपळूणकर, आपटे, वासुदेवराव केळकर, आगरकर हे अल्पवयी मेले हें पाहिल्यावर ते त्याहून वेगळें काय मानणार ?

शिशिर ऋतु एकाएकीं उपस्थित होऊन, वृक्षाचीं पानें अकालीं पिकावीं व तीं आपल्याभोंवतीं पटापट गळून पडलेलीं दिसावीं, असें झालें असतां यदृच्छेनें उर-लेल्या, पण बंधुविरहानें व्यथित झालेल्या, एकाद्या वृक्षपर्णाला आपण स्वतः जगलों कसें याचेंच आश्चर्य वाटतें ! आणि त्याच्या प्राणाचा देठ अजून हिरवा व रसाळ असला, तरी त्याला मनानें वाटूंच लागतें कीं, "वाऱ्याची यापुढची झुळूक येईल ती मलाहि पतन न पाववील कशावरून "? लो. टिळकांची मनःस्थिति पस्तीस वर्षांपूर्वीं एकदां अशीच झाली होती. स. १८९६ सालीं, म्हणजे केसरीला नुकतें सोळावें वर्ष लागलें असतां, केसरी स्वतः टिळकांच्या खास मालकीचा होऊन अवघीं पांचच वर्षें झालीं असतां, व टिळकांच्या वयाला पुरीं चाळीस वर्षेंहि झालीं नव्हतीं तेव्हां, "आपला आतां काय भरंवसा ? आपल्या वर्तमानपत्रांचे कामीं मदतनीस घेऊन त्यांची कायमची कांहीं व्यवस्था करावी" असें टिळकांना वाटूं लागलें होतें. या सालीं मार्च महिन्यांत त्यांनीं रा. न. चिं. केळकरांना मदतनीस म्हणून घेतलें त्या वेळीं त्यांना लिहिलेल्या पहिल्याच पत्रांत टिळक लिहितातः——
'तुम्हाला मी बोलावीत आहें ते केवळ नोकर म्हणून नव्हे. तर मित्र, स्नेही,

सहकार्यकर्ता म्हणून. कारण न जाणो माझेंहि आयुष्य लवकरच संपणार नाहीं व माझे हे दिवस शेवटचेच न ठरतील कशावरून?" (I want a friend for, as it may be, the last days of my life) टिळकांची प्रकृति सुदृढ व निकोप असतां, त्यांच्या दैदीप्यमान मनावर अशा प्रकारची उदास छाया पाडणारा ढग कोणता असावा? तर आपल्याच वयाचे इतर अनेक समव्यवसायी लोक मरण पावले हा विचार होय. असो. परंतु टिळकांचा या एका बाबतींत तरी अदमास सपशेल चुकला. कारण ते यापुढें आणखी पंचवीस वर्षें जगले. पूर्वी कधीं केले नाहींत असे श्रम सायास या अवधींत त्यांनीं केले. पूर्वी कधीं कोणीं मिळविली नाहीं अशी कीर्ति त्यांनीं मिळविली. आणि प्रस्तुत विषयाला धरून बोलावयाचें तर, केसरी पूर्वी होता त्याच्या दुसपट अधिक लोकप्रिय व परिणामकारक असा त्यांनीं याच अवधींत केला. टिळकांना स्वतःच्या देहाप्रमाणें पुढें पुढें केसरीचीहि अशाश्वतता वाटूं लागली होती. कारण खटले, दंड, शिक्षा होऊं लागल्या. राजकीय वातावरण प्रदीप्त होऊन सर्वांनाच चटके बसूं लागले. शेवटीं प्रेसॲक्ट होऊन जामिनक्या मागण्यांत व जप्त करण्यात येऊं लागल्या. तेव्हां 'केसरी' आज आहे उद्यां नाहीं असें एक दिवस व्हावयाचें असें टिळकांना वाटे! परंतु त्यांचें व केसरीचें नशीब थोर. म्हणून स्वतः त्यांना पासष्टवर्षांइतकें भरपूर आयुष्य लाभलें,* व त्यांच्या मृत्यूपर्यंतच काय

*टीप—या प्रसंगानें थोडेंसें विषयांतर करून मराठ्यांच्या इतिहासांतील अठराव्या शतकांतील कांहीं स्त्री–पुरुषांची आयुर्मर्यादा काय ठरली हें येथें सहज सांगावेंसें वाटतें. या काळांत ७० ते ८० मर्यादेपर्यंत जीं माणसें जगलीं तीं:–(१) दुसरा बाजीराव (२) मालोजी घोरपडे (३) मानाजी फाकडे (४) मल्हारराव होळकर (५) ताराबाई भोसली.

| | |
|---|---|
| ६० ते ७० | (१) महादजी शिंदे (२) हरिपंत फडके (३) सखाराम बापू (४) अहिल्याबाई होळकर (५) मोरोबा दादा फडणीस |
| ५० ते ६० | (१) दादासाहेब पेशवे (२) नाना फडणीस (३) गोपाळराव पटवर्धन (४) जिऊबाईदादा बक्षी. |
| ४० ते ५० | (१) पहिला बाजीराव (२) नानासाहेब पेशवे (३) परशुरामभाऊ पटवर्धन. |
| ३० ते ४० | (१) चिमणाजीअप्पा (२) भाऊसाहेब पेशवे |
| २० ते ३० | (१) सवाई माधवराव (२) पहिले माधवराव |

अमरसिंग जाधवराव माळेगांवकर हा एकच पुरुष शंभर वर्षेंपर्यंत जगल्याचा मराठ्यांच्या इतिहासांत दाखला मिळतो. दुसऱ्या बाजीरावाखेरीज इतर सर्व पेशवे, स्वाऱ्या–शिकाऱ्या मुलुखगिऱ्या इत्यादि प्रकारें उघड्या हवेंतील व्यायाम करीत असतांहि पन्नाशीच्या आंतच निवर्तले. फक्त दुसऱ्या रावबाजींनीं सगळ्या पूर्वजांचें राज्य घालविलें आणि त्यांचें आयुष्य मात्र स्वतःला घेतलें!

पण त्यानंतर आज दहा वर्षें तरी, केसरी राहिला आहे. म्हणूनच त्याची 'सुवर्ण ज्युबिली' करण्याचा सुप्रसंग लाभत आहे.

पण संस्था म्हटली म्हणजे ती व्यक्तिनिरपेक्ष असावयाची. आणि वर्तमानपत्र हीं एक संस्था असल्यामुळें, वर्गणीदारच काय पण संपादकहि आले गेले किंवा जुन्याचे नवे झाले, तरी टिकून चालू राहणें हा तिचा धर्म आहे. आणि हा धर्म अबाधितपणें जितके दिवस अधिक पाळला जाईल तितका त्या संस्थेचा गुण अधिक असें समजतात. नदीचा प्रवाह कवीला म्हणतो--

कोणी येवो कोणी जावो मी वाहत राहीन ।
प्रवाह माझा अखंड मजला ना खेद न वा शीण ॥

वर्तमानपत्रासारखी व्यक्तिनिरपेक्ष संस्थाहि आपल्या वाचकांना हेंच सांगते. केसरी जन्मल्यापासून आजपर्यंत त्याचे सुमारें २५०० अंक निघाले. यांत केव्हां फक्त कांहीं तास अंक आगेंमागें निघाला असेल. पण ठराविक दिवस कधींच चुकला नाहीं. मंगळवारीं सकाळीं टेबलावर केसरीचा ताजा अंक येऊन पडला व तो उचलून उघडून कोणी स्नेही वाचूं लागला तर, एखादे वेळीं टिळक त्याला विनोदानें म्हणत "See my weekly miracle is performed!" (कां ! आमचा साप्ताहिक चमत्कार घडून आला कीं नाहीं !) आणि एका अर्थानें वर्तमानपत्राचा अंक वेळेवर निघणें हें एखाद्या चमत्काराप्रमाणें कौतुकास्पद वाटावें अशीहि कित्येक वेळां स्थिति वर्तमानपत्रांच्या कारखान्याची होऊन जाते. विद्यार्थ्यांच्या अनुभवाचा दाखला द्यावयाचा तर असें म्हणतां येईल कीं, वर्तमानपत्र छापून बाहेर पडलें म्हणजे, परीक्षा पास झाल्याचा नव्हे पण परीक्षेंतील उत्तरांचा कागद लिहून होऊन तो परीक्षकाच्या हातांत दिल्याचा, जो आनंद किंवा सुटकेची जी भावना विद्यार्थ्याला प्रतीत होते तीच, आपल्या वर्तमानपत्राचा अंक छापून बाहेर पडला म्हणजे संपादकालाहि प्रतीत होते. पुढें परीक्षक तो कागद वाचून काय पास नापास म्हणावयाचें तें म्हणो, पण आज आपण तर आपलें काम करून टाकलें असें विद्यार्थ्याला वाटतें. तसेंच संपादकालाहि वाटतें कीं पुढें वाचक तो अंक वाचून काय शाबासकी किंवा शिव्या देणार असेल त्या देवो, पण आपण तर आज आपलें काम करून टाकलें खरें ! मग एका आठवड्याचा एक अंक पार पडला असतां जर इतकें व्हायसें वाटतें, तर आपल्या संस्थेचीं पन्नास वर्षें अबाधित पार पडलीं, व तिच्या

कार्यात एक वेळहि खळ पडला नाहीं, हें पाहून कोणत्याहि संस्थेच्या चालकाला किती धन्यता वाटावी हें कोणींहि सांगेल. असो.

आजच्या या अंकांत केसरी-मराठा संस्थेसंबंधीं शक्य तितकी माहिती एकत्र करून वाचकांच्या हातीं देण्याचें योजिलें आहे. हेतु हा कीं, ती त्यांच्या संग्रहीं सुलभ रीतीनें राहावी. वास्तविक यापूर्वी ही किंवा यांतील बरीचशी माहिती इतक्या निरनिराळ्या रूपांनीं प्रसिद्ध झाली आहे कीं, पुनरुक्ति केल्याशिवाय कांहींहि लिहिणें आतां कठीणच. लो० टिळक व केसरी यांची व्याप्ति इतकी व्यापक व सर्वांगपूर्ण आहे कीं, टिळकांवेगळें केसरीसंबंधानें व केसरीवेगळें टिळकांसंबंधानें लिहितां येणें फारसें शक्यच नाहीं. लोकमान्यांचीं छोटीं मोठीं चरित्रें सन १८९७ पासून प्रसिद्ध होत आहेत. त्यांच्यावर १८९७ व १९०८, सालीं झालेले राजद्रोहाचे खटले केसरीसंबंधानेंच असल्यामुळें त्या त्या खटल्यांच्या हकीकतींतून व त्यांचीं समग्र पुस्तकें प्रसिद्ध झालीं त्यांतून टिळकांनीं केसरीची अभिवृद्धि कशी केली व लोकमत बनविण्याकडे त्याचा उपयोग कसा केला हें प्रसिद्ध झालेंच आहे. १९०८ सालीं रा. आप्पा कुळकर्णी यांचें 'टिळकांचीं गेलीं आठ वर्षें' हें पुस्तक प्रसिद्ध झालें. १९१६ सालीं टिळकांचा व्यक्तिशः एकसष्टावा वाढदिवस झाला त्याच्या समारंभप्रसंगीं एक पुस्तक [टिळक अंक] प्रसिद्ध झाला. त्यांत केसरीसंबंधीं तोंपर्यंतची हकीकत निरनिराळ्या लेखकांनीं व्यवस्थित लिहिली होती. पुढें प्रस्तुत लेखकानें लिहिलेले टिळकचरित्राचे तीन खंड, केसरी संस्थेनें प्रसिद्ध केलेल्या टिळकांच्या केसरींतील निवडक लेखांचे चार खंड, व रा. सदाशिव विनायक बापट यांनीं प्रसिद्ध केलेले टिळकांच्या आठवणींचे तीन खंड व टिळक सूक्तिसंग्रहाचा एक खंड, इतकीं पुस्तकें मिळून पांच सात हजार पानांइतका मजकूर टिळकांच्या मृत्यूनंतर त्यांच्यासंबंधाचा गेल्या दहा वर्षांत प्रसिद्ध झाला आहे. टिळकांनीं केसरी सोडून दुसऱ्या कोणत्याहि पत्रांत मासिकांत कधीं कांहीं लिहिलें नाहीं. व त्यांनीं लेखनाशिवाय आणखी जे उद्योग व ज्या चळवळी केल्या त्यांचें खरें व उत्कृष्ट प्रतिबिंब त्या त्या उद्योगांविषयीं व चळवळींविषयीं स्वतः टिळकांनींच केसरींत वेळोवेळीं लिहिलेल्या लेखांतून, किंवा त्यांच्या व्याख्यानांचे सारांश व सभांचीं वर्णनें इत्यादि दुसऱ्यांनीं लिहिलीं त्यांतून प्रगट झालेलेंच आहे. म्हणजे टिळकांच्या तीस वर्षांच्या ऐन उमेदीच्या, ऐन बहराच्या, ऐन यशस्वितेच्या, ऐन प्रगतिपर वैभवाच्या सार्वजनिक चरित्राचा जो इतिहास तोच केसरीचा इतिहास असें स्थूलपणें म्हणतां येण्यासारखें आहे. यामुळें आतां

तात्त्विक विवेचनापेक्षां किंवा विचारतरंग उठविण्यापेक्षां अधिक कांहीं करणें कोणासहि शिल्लक उरलें नाहीं. हा विषय इतका मोहक व व्यापक आहे कीं, पुढेंमागें अशीं विवेचनात्मक किंवा विचारतरंगात्मक पुस्तकें लिहिणारे उद्योगी किंवा प्रतिभासंपन्न लेखक निघतीलहि अशी आमची खात्री आहे. पण आजचा ज्युबिली अंक हें असलें विवेचन करण्याचें किंवा विचारतरंग खेळवित बसण्याचें स्थळ नव्हे. बरें जागाहि अगदीं मर्यादित. म्हणून शक्य तितकी केसरी–मराठा संस्थेसंबंधाची माहिती 'नवी व जुनीहि' एकत्र व सुसंगत करून देण्याकडेच त्या मर्यादित जागेचा उपयोग करणें आम्हाला इष्ट वाटतें.

दुसरीहि एक गोष्ट आहे ती सांगण्याला संकोच करण्याचें कारण नाहीं. ती ही. कोणत्याहि संस्थेचा ज्युबिली समारंभ होण्याचा सुप्रसंग येण्याला, म्हणजे तिचें कार्य पन्नास वर्षें अखंड चालू राहण्याला किंवा त्याची सर्वांगीण प्रगति होण्याला, अनेक व्यक्तींची सेवा, श्रम, बुद्धि, चातुर्य इत्यादि अनेक उपजत किंवा कर्मार्जित गुण उपयोगी पडलेले असतात. तथापि अशा प्रसंगीं अशा व्यक्तींपैकीं मृतांचा, व तोहि त्यांच्या गुणांचाच, उल्लेख कृतज्ञतापूर्वक करणें हें अधिक उचित ठरतें. जित्यांचा उल्लेख होऊंच नये असें नाहीं! पण त्यांची ती वेळ येण्याला स्वाभाविक अवधि असते. निदान असें खरें कीं, त्यांनाहि आपण संस्थेला उपयोगी पडलों असें थोडेंबहुत वाटण्याला किंबहुना थोडाबहुत तसा अभिमान बाळगण्यालाहि योग्य कारण असलें तरी, त्यांनीं स्वतःविषयीं एक शब्द उच्चारणेंहि अनुचित किंबहुना हास्यास्पद ठरेल. त्यांनीं खरोखरच जर संस्थेची कांहीं सेवा केली असेल व लोकांना ती पटली असेल तर पुढची पिढी त्यांची आठवण का न ठेवील? किंवा यथाप्रसंग त्यांच्या संबंधीं योग्य ते दोन शब्द कां न लिहील किंवा कां न बोलेल! कृतज्ञता बुद्धीचा असा मक्ता कोणीहि आपणा एकट्याकडेच आहे असें मानूं नये. ती सर्व पिढ्यांना सारखीच वांटलेली असते. तसेंच एक पिढी जाऊन दुसरी तिच्या जागीं आली म्हणजेच, डोळे दिपविणारा संकुचित करणारा किंवा दृष्टि भ्रम उत्पन्न करणारा, फालतुक आडव्या तिडव्या ज्ञान किरणांचा व विकार किरणांचा, दोषी प्रकाश लुप्त होऊन, दुर्बिणींतून तेजोमय तारा किंवा शबाल रूप ढग पाहावा व त्याचें यथार्थ वर्णन बिनचुक करतां यावें त्याप्रमाणें पुढच्या पिढीच्या विवेचक बुद्धींना व न्यायी मनांना गत पिढींतील मृत व्यक्तींच्या गुणदोषांची चर्चा बिनचूक निदान निर्भयतेनें करितां येते. आम्ही तर असेंच समजतों कीं, हा ज्युबि-

लीचा अंक म्हणजे केसरीच्या हल्लींच्या सेवकांनीं कृतज्ञता बुद्धीच्या खांद्यावरून पूर्वींच्या सेवकांना वाहण्याची पालखी आहे. अर्थात् पालखी वाहावयाची ती वाहतांना पालखी वाहणारा स्वतःच पालखींत बसूं शकत नाहीं हें अगदीं उघड आहे.

ही दृष्टि चालवून आम्ही या अंकांत स्मृति-शेषभूत झालेल्या अशाच केसरी-कार्यकर्त्यांचे विशेष उल्लेख केले आहेत. यामुळें वाचकांनीं हे उल्लेख अपूर्ण वाटल्यास, त्याबद्दल सहृदयतेनें क्षमा करावी. विद्यमान सेवकांच्या यथार्थ असेल अशाही स्तुतीला जर ही मर्यादा तर पूर्वीं त्यांच्याबरोबर केसरीची सेवा केलेल्या पण पुढें त्यांच्याशीं मतभेद झालेल्या किंवा फुटून निघालेल्या किंवा त्याचे प्रतिपक्षी होऊन त्याच्याशीं झगडणाऱ्या इतर गृहस्थांची निंदात्मक किंवा दोषात्मक चर्चा करून वाद उकरून वाढण्याचें तर ज्युबिली अंक हें स्थळ नव्हेच नव्हे. तात्पर्य, हा विशेष आनंदाचा प्रसंग समजून, त्या आनंदाच्या दुधांत मिठाचा खडा पडेल असले कोणतेही उल्लेख किंवा विधानें करणें योग्य नव्हे अशा बुद्धीनें, आम्हीं त्यापासून अलिप्त राहण्याचा प्रयत्न केला आहे. केसरीसारख्या संस्थेचें चालकत्व टिळकांच्या पसंतीनें त्यांच्याच हयातींत आमच्या हातीं येणें व तें त्यांच्या नंतर दहा वर्षें टिकविणें या एका गोष्टीनेंच आमच्या टीकाकारांच्या सर्व टीकांचा सहज परिहार होणार आहे. मग जीभ व्यर्थ विटाळण्याचें काय कारण?

सन १९२० सालापर्यंत म्हणजे लो. टिळक हयात असेपर्यंत, त्यांचे मदतनीस किंवा सहकारी म्हणून ज्या इतर व्यक्तींनीं केसरी-मराठा संस्थेचें कांहीं कार्य केलें त्यांना त्याबद्दल स्वतंत्र श्रेय अर्थातच नाहीं. त्यांची स्फूर्ति स्वतंत्र नव्हती पण त्यांच्या मृत्यूनंतर दहा वर्षांनीं अजूनहि लो. टिळकांचीच स्मृति लोकांच्या मनांत असल्यामुळें, या दहा वर्षांतील चालकांकडून केसरीचें जें कांहीं कार्य झालें असेल त्याबद्दलहि त्यांना फारसें श्रेय देतां येत नाहीं. सूर्य अस्ताला गेला व क्षितिजावर दिसतनासा झाला तरी, जो संध्याप्रकाश उरतो व ज्यांत माणसांना तोंडास तोंड दिसतें तो परिवर्तित असला तरी प्रकाश सूर्याचाच! त्याप्रमाणें लोकांना टिळकांच्या केसरीची अद्यापि तोंडओळख उरली असली तरी ती टिळकांच्या स्मरणानें परिवर्तित केलेल्या त्याच तेजामुळें होय. ही गोष्ट निश्चित असल्यामुळें गेल्या दहा वर्षांतील केसरीसंबंधानें स्वतः आम्ही जसें कांहीं बोलूं शकत नाहीं, त्याप्रमाणेंच इतरांनीं त्याविषयीं कांहीं बोलण्याही ती एक मर्यादाच आहे.

---

## १५ केसरीची वाढ

ता. २५ ऑक्टोबर १८८७ रोजीं टिळक हे आगरकरांऐवजीं केसरीचे प्रकाशक म्हणून जाहीर झाले. आगरकरांनीं केसरीचें प्रकाशकत्व सोडून दिलें तरी स्वतंत्र वर्तमानपत्र काढण्याचा त्यांचा विचार एकदम ठरला नाहीं. पुढें कांहीं दिवस आगरकर हे लिहून आलेला मजकूर या सोईच्या सदरांत केसरींत लेख लिहीत. अशा प्रकारचीं स्वतंत्रता लाभल्यावर त्यांच्या लेखांत निर्भीडपणा पूर्वींहूनहि अधिक विनटला यांत आश्चर्य नाहीं. पुढच्याच म्हणजे त्रेचाळिसाव्या अंकांत 'लिहून आलेला मजकूर' म्हणून "फीमेल हायस्कुलांतील शिक्षणक्रम" या मथळ्याखालीं केसरीच्या अग्रलेखाहूनहि मोठा असा आगरकरांचा एक लेख प्रसिद्ध झाला आहे. त्यांत सदर हायस्कुलांतील शिक्षणक्रमावर पूर्वीं केसरींत ओळीनें जे चार टीकात्मक अग्रलेख आले होते, त्याला मोठें वक्तृत्वपूर्ण असें उत्तर दिलें आहे. या लेखांतील चारदोन वाक्यें कोठेंहि पाहिलीं कीं, 'अरे, नांव नसलें तरी ही आगरकरांची लेखणी' असें कोणीहि एकदम उद्गारल्यावांचून रहाणार नाहीं. पुढील वर्षांत आगरकर यांनीं स्वतंत्रपणें 'सुधारक' हें वर्तमानपत्र काढलें. यापुढील त्यांचे वाद सुधारक व केसरी यांतून सुरू झाले. त्या वेळच्या छापखान्यांच्या कायद्याच्या उदासीन वृत्तीमुळें हल्लींप्रमाणें वर्तमानपत्रांवर प्रकाशकाचें किंवा संपादकाचें नांव स्पष्टपणें लिहिण्याचें कारण नव्हतें. टिळक केसरीचे प्रकाशक झाले तरी पत्राच्या चौथ्या पानाच्या शेवटीं नेहमींप्रमाणें "आर्यभूषण छापखान्यांत मालकाकरितां छापून प्रसिद्ध केलें" एवढेच शब्द येत असत. ज्यानें ता. २५ चा अंक वाचला नाहीं त्याला टिळक हे केसरीचे प्रकाशक झाल्याची बातमी कर्णोपकर्णीं किंवा खुद्द केसरींतलि अंतर्गत पुराव्यावरून मिळेपर्यंत अर्थांतच थांबावें लागणार होतें. तथापि याच अंकापासून केसरीच्या दृश्य व जड स्वरूपांत एक फेरफार घडून आला. तो हा कीं यापूर्वीं अग्रलेख व स्फुट सूचना यांपुरता ग्रेट-प्रायमर म्हणजे किंचित् ठळक टाईप घालण्यांत येत होता; परंतु लिहावयाचें पुष्कळ व जागा थोडी असें भासूं लागल्यामुळें, वरील मजकुरालाहि पायका म्हणजे बारीक टाईप वापरण्यांत येऊं लागला. आर्यभूषण छापखान्याची स्वतःची टाईप फौंडरी होती; पण बारीक चांगल्या वळणाच्या टाइपाला लागणाऱ्या मेट्रिसा नव्हत्या. परंतु मुंबईच्या गणपत कृष्णाजी प्रेसच्या मालकांनीं आपल्या जवळील पायक्याच्या ठशांनीं, म्हणजे पंचांनीं नवीन मेट्रिसा तयार करून त्या आर्यभूषणला विकत

दिल्या, व अशा रितीनें आर्यभूषण छापखान्यांत लागेल तेव्हां हवा तितका पायका टाइप पाडण्याची व्यवस्था झाली. केसरीच्या वाचकांना ग्रेटप्रायमर टाईप वाचावयास अधिक सोयीचा असला तरी, बारीक टाइप घातल्यानें तेवढ्याच जागेंत थोडा अधिक मजकूर मावतो ही हौशी वाचक व हौशी लेखक या दोघां-च्याहि दृष्टीनें सोयच झाली म्हणावयाची.

१८८७ सालीं, टिळक हे केसरीचे कायदेशिर संपादक झाले तरी १८९१ पर्यंत केसरी त्यांच्या मालकीचा पूर्णपणें झाला नव्हता. आगरकर केसरींतून निघाल्यानंतर आर्यभूषण छापखाना आणि केसरी व मराठा हीं वर्तमानपत्रें मिळून संयुक्त कारखाना मानला जात असून वासुदेराव केळकर, हरि नारायण गोखले, व स्वतः टिळक असे तीन संयुक्त भागीदार त्यांत होते. १८८८ च्या सुमारास केसरीचे वर्गणीदार सुमारें पांच हजारांपर्यंत वाढले होते; व नुसत्या केसरची प्राप्ति बरी होती. पण इंग्रजी पत्र मराठा हें प्रथमपासूनच आंतबट्ट्याचें मूळ होतें. शिवाय, छापखान्याचे टाईप व इतर सामान वरचेवर बाहेरून विकत आणण्यास खर्च पडे. याकरितां केसरीला स्वतःचें एक मशीन असावें, व स्वतः मालकीची टाईप फाउण्डरीहि असावी असें वाटूं लागलें. अर्थात् अधिक भांडवल म्हणजे अधिक कर्जाचा बोजा. शिवाय पूर्वी टिळक व वासुदेवराव केळकर यांचीं मतें जरी एक होतीं तरी १८९१ मध्यें 'रमाबाई' प्रकरणानें व इतर अनेक गोष्टींनीं उभय-तांचीं मतें तंतोतंत जुळेनाशीं झालीं. आणि केसरींत मुख्यत्वेंकरून लिहिणार टिळक व मराठ्यांत मुख्यत्वेंकरून लिहिणार वासुदेवराव केळकर असें असल्यामुळें एकाच विषयावर केसरी व मराठा पत्रांत परस्पर विरुद्ध असेहि लेख मधून मधून येत असत. यामुळें हीं दोन पत्रें कोणाच्या तरी एकाच्याच मालकीचीं केलीं पाहिजेत हें उघड दिसून येऊं लागलें. इकडे हरिपंत गोखले हे निवळ छापखान्याच्या दृष्टीनें कार-खान्याकडे पाहणारे. त्यांना मराठ्याच्या बुडेत खात्याचें वैषम्य वाटूं लागलें. मिळून दोन्हीं वर्तमानपत्रें कोणी तरी एकानें घ्यावीं व छापखाना एकानें किंवा इतर दोघांनीं मिळून घ्यावा असें ठरलें. गोखले वर्तमानपत्रें घेऊं शकतच नव्हते; व तो त्यांना छापखान्यावर बोजाच वाटे. तेव्हां ते छापखाना घेणार हें ठरलेंच. पण त्यांच्या जोडीला टिळक येणार किंवा प्रोफेसर केळकर येणार ही गोष्ट अद्यापि ठरावयाची होती. टिळकांप्रमाणेंच प्रो. केळकर हेहि सव्यसाची म्हणजे इंग्रजी व मराठी दोन्ही भाषा लिहिण्यांत वाकबगार आणि संपादकीय कामांत दर्दी व हौशी, या-

मुळें दोन्हीं पत्रें घ्यावयाचीं तर टिळक व प्रो. केळकर हे दोघेहि तीं घेण्याला आपापल्या परीनें पुरे लायक ! पण हाहि लढा सुटण्यास दोन कारणें होतीं. एक असें कीं, केळकर हे अद्यापि कॉलेजांत प्रोफेसरीचें काम करीत असून त्यांच्या संसारापुरता त्यांना पगार तिकडून मिळत होता. शिवाय कारखान्याचें धडेवांटप करण्यांत आलें तेव्हां, फायदेशीर, पण भांडवल वरचेवर थोडथोडें नवें घालावें लागणारा, छापखाना एका बाजूस, व आढाव्यांत निघालेलें एकंदर तिसऱ्या हिश्शाचें सात हजार कर्ज व दोनहि पत्रें मिळून दुसऱ्या बाजूस, अशी वांटणी झाली. शिवाय स्वमतप्रसाराची ही जर स्वतंत्र गोष्ट म्हणून विचारांत घेतली तर वासुदेवराव केळकर यांच्यापेक्षां टिळकांच्या अंगीं ती अधिक होती ही गोष्ट निर्विवाद होय. तात्पर्य, वांटणी उचलतांना कर्जासह वर्तमानपत्रें उचलण्यास टिळकच पुढें आले व १८९१ पासून तीं त्यांनीं आपल्या मालकीचीं केलीं. तथापि टिळकांना यापुढें कॉलेजचा पगार चालू राहिला नाहीं; व कर्जफेडीकरितां व मराठ्याचा खर्च चालविण्याकरितां केसरींतील नफाहि कांहीं वर्षें परस्पर तोडून देणें भाग होतें. याकरितां दोन्ही वर्तमानपत्रांचा छपाईचा खर्च, मराठ्याच्या संपादकाचा पगार, केसरीच्या चटवड्याचा वगैरे सर्व खर्च, या गोष्टी या नफ्यांतून वजा करून कर्जफेड व्हावी म्हणून हें सर्व काम आर्यभूषण छापखान्याकडे म्हणजे गोखले यांजकडेच ठेवावें लागलें. कारण कर्ज फिटेपर्यंत टिळकांना स्वतंत्र छापखाना काढणें शक्य नव्हतें. उरला छापखाना, तो गोखले व केळकर यांनीं कर्जाच्या वांट्यासह समायिक मालकी हक्कानें घेतला, व टिळकांना आपल्या वर्तमानपत्रांचें कर्ज फेडण्यास पांच-सहा वर्षें तरी लागणारीं असल्यामुळें केसरीव्यतिरिक्त स्वतंत्र अशीं उपजीविकेचीं साधनें त्यांना अर्थातच पहावीं लागलीं.

डेक्कन एज्युकेशन सोसायटीशीं वर्तमानपत्रांचा संबंध राहावा किंवा नाहीं हा वाद सुरू झाला तेव्हां आपटे हे हा संबंध तोडण्यास प्रथमच तयार झाले. व हा संबंध तोडूं नये असें म्हणणारांत टिळक, केळकर व नामजोशी हे प्रमुख होते. आगरकर हे वर्तमानपत्रांत लिहिण्याला हौशी, तथापि कारणपरत्वें सोसायटींतून वर्तमानपत्रांस पैसे देण्याला ते प्रतिकूल असत. तसेंच छापखाना व वर्तमानपत्रें चाललीं पाहिजेत खरीं पण तीं निदान निष्कर्जी तरी चाललीं पाहिजेत अशी त्यांची अपेक्षा असल्यामुळें छापखान्यांत मंडळी बसून कर्जाच्या भानगडी निघाल्या म्हणजे त्यांचें पित्त खवळे. यामुळें, कांहींही होवो पण वर्तमानपत्रें व छापखाना

हीं जिवंत ठेवावींच अशा मताचे टिळक, केळकर व नामजोशी एवढेच उरले. आगरकरांनीं केसरींतून आपलें अंग काढून घेतल्यानंतर टिळक व वासुदेवराव केळकर यांची गट्टी वर्तमानपत्रांचे बाबतींत तरी पुढें तीनचार वर्षे कायम टिकली. सोसायटी व छापखाना-वर्तमानपत्रें यांची फारकत झाली तेव्हां छापखान्याला कर्ज होतें, व हें कर्ज टिळक व केळकर या दोघांनींही पत्करून वर्तमानपत्रें चालू ठेवण्याचा निश्चय केला. ही फारकत होण्यापूर्वीं सोसायटीतर्फे छापखान्यावर देखरेख ठेवण्याकरितां टिळकांचीच नेमणूक झाली व हें घडून आल्यावर अर्थात् टिळकांची जबाबदारी अधिकच वाढली. केळकरांनीं पत्रें सांभाळावीं व टिळकांनीं छापखाना सांभाळावा असा एक प्रकारें आपसांतील समजुतीनें श्रमविभागच ठरल्यासारखा झाला होता; व ही वाढलेली जबाबदारी सांभाळण्याकरितां टिळकांना जुना व्यवस्थापक काढून नवा नेमावा लागला. जुने व्यवस्थापक गणपतराव सोहोनी यांचा कारभार थोडा ढिला असे. त्यांनीं जमाखर्चाचीं नोंदें मिळनीं ठेवण्याची खबरदारी घ्यावयाची नाहीं, उधार वसुलीची हयगय करावयाची, खर्च मात्र हवा तसा चालू ठेवावयाचा, आणि कारखान्यांतील पगाराची तारीख आली म्हणजे टिळकांकडे जाऊन पैशाची कांहीं तरी सोय लावा म्हणून तगादा करावयाचा. अर्थात्‌च ही जिकीर कोणासहि सोसण्यासारखी नव्हती. "आम्ही कोणी पैसा न घेतां वर्तमानपत्रांत लिहितों, व फुकट चालविलेल्या वर्तमानपत्रांसह एवढा छापखाना तुमच्या स्वाधीन केला असतां, फिरून पगाराकरितां लागणारें कर्ज उभारण्याची चिंता आम्हींच वहावी, ही कारभाराची रीत कोणती?" असें टिळक नेहमीं म्हणत. अखेर सोहोनी यांनीं व्यवस्थापकाचें काम सोडून दिलें व त्यांचे जागीं हरि नारायण गोखले यांची नेमणूक करण्यांत आली.

हरिपंत गोखले हे मूळ मुरुडगांवचे रहिवासी. त्यांनीं लहानपणापासून मुंबईस येऊन गणपत कृष्णाजी, नेटिव ओपिनियन वगैरे छापखान्यांत कारकुनीचीं व इतर कामें केलेलीं होतीं. त्यांचा व टिळकांचा जुना स्नेहसंबंध, यामुळें टिळकांची त्यांना मदत असे. न्यू स्कुलांत आल्यावर वामनराव आपट्यांनीं आपलें संस्कृत गाइडचें पुस्तक बाहेर काढलें. तें मुंबईस हरिपंत गोखले यांनीं नेऊन आपल्या जबाबदारीवर छापलें. त्यावेळीं टिळकांनींच त्यांना सात आठशें रुपये कर्ज दिलें होतें व त्यांत गोखल्यांना फायदाहि झाला होता. गोखल्यांनीं इतर कांहीं पुस्तकेंहि अशींच छापविलीं होतीं. या माहितीमुळें आर्यभूषण छापखान्याची व्यवस्था गोखले यांचे

स्वाधीन केली असतां, आपल्या देखरेखीखालीं ती चांगली चालेल अशा समजु-तीनें टिळकांनीं गोखल्यांना पुण्यास आणून छापखाना त्यांचे स्वाधीन केला. गोखले यांचेजवळ घालण्यास भांडवल नव्हतें. तथापि कर्जाचा हिस्सा पत्करण्यास ते तयार झाल्यामुळें त्यांना भागीदारींत घेण्यांत आलें; व टिळक, केळकर, गोखले असे तिघेमिळून छापखाना व दोन्हीं वर्तमानपत्रें यांचे मालक व त्यांजवरील कर्जाला जबाबदार असें ठरून, छापखाना व वर्तमानपत्रें ही निवळ खाजगी इस्टेट बनली. मात्र न्यू इंग्लिश स्कूलचा त्यांच्याशीं असलेला जुना परस्पर संबंध अगदींच तुटूं नये म्हणून तो वासुदेवराव केळकर यांच्या द्वारें शिल्लक ठेवण्यांत आला. तो असा कीं, केळकर हे मोबदल्याची अपेक्षा न ठेवतां दोन्हीं वर्तमानपत्रें चालविणार त्याअर्थी कॉलेजांतील इतर प्रोफेसरांइतकाच त्यांनाहि पगार द्यावा, पण कॉलेजांत शिकविण्याचें काम त्यांना इतरांहून कमी ठेवावें. या व्यवस्थेस सोसायटीच्या सभासदांनीं संमति दिली. अशा रितीनें टिळक व वासुदेवराव केळकर यांची जूट सन १८९० पर्यंत टिकली. पण टिळकांनीं सोसायटीचा राजिनामा देऊन सार्वजनिक कार्यांत अधिक लक्ष घालण्याचें ठरविलें तेव्हांपासून, छापखान्याप्रमाणें वर्तमानपत्राच्या अंतरंगाच्या व्यवस्थेंतहि आधिक लक्ष घालणें त्यांना प्राप्त झालें; व यामुळें या उभयतांच्या मतांमध्यें जी भेदरेषा लहानशी होती ती दिवसेंदिवस मोठी होऊं लागली किंवा निदान ती उभयतांना अधिकाधिक दृष्टोत्पत्तीस येऊं लागली.

त्याचा परिणाम असा झाला कीं, तीव्र मतभेदाचा पहिलाच प्रसंग आला त्याबरोबर उभयतांना व्यवहारांतील फारकत करून टाकावी असें वाटलें. हरिपंत गोखले आल्यानें छापखान्याची प्रगति झाली ही गोष्ट कांहीं खोटी नाहीं; तथापि, छापखाना व पत्रें निष्कर्जी झालीं नाहींत, जुन्या फरफटीनें ओढत आलेलें कर्ज कांहीं शिल्लकच होतें. शिवाय हरिपंत गोखले यांना वर्तमाननपत्रें हीं सावत्र मुलांप्रमाणें वाटत. आणि आढावा काढतां एकवीस हजार रुपयांचें कर्ज निघालें तें कोणीं घ्यावें असा प्रश्न उपस्थित झाला; छापखाना व केसरी हीं दोन्हीं नफ्याचीं खातीं असल्यामुळें कर्ज दोघांवरहि वांटून जाण्यास हरकत नव्हती. त्याप्रमाणें छापखान्यावर चौदा हजार व वर्तमानपत्रांवर सात हजार याप्रमाणें कर्जाची वांटणी झाली. छापखाना व वर्तमानपत्रें यांची अशी वांटणी होण्याचें ठरल्यावर, एकानें वांटण्या केल्या म्हणजे हवी ती वांटणी उचलण्याचा हक्क दुसऱ्यास येतच असतो म्हणून प्रथम टिळक कर्जासह छापखाना घेण्यास तयार झाले. " वर्तमानपत्रें हींच जर निवळ नफ्याची बाजू असें

तुम्ही म्हणतां तर ती तुम्हीच घ्या व सातहजार रुपये कर्ज द्या, मी छापखाना घेतों" असें टिळक म्हणूं लागले. पण गोखले व वासुदेवराव केळकर यांना पक्कें माहीत होतें कीं, टिळकांना निवळ छापखान्याचीं आवड नसून त्यांना खरी गोडी वर्तमानपत्रांची व या साध्याचें अवश्य साधन म्हणूनच त्यांना छापखाना हवा होता. तात्पर्य, टिळकांनीं छापखाना घेतला कीं ते स्वतःचीं वेगळीं वर्तमानपत्रें काढतील व ते तीं लोकप्रिय करतील याविषयीं शंका नसल्यामुळें, आपल्या हातचीं केसरी–मराठा वर्तमानपत्रें निस्तेज होतील व त्यामुळें त्यांचें उत्पन्नहि घटेल, असें पाहून गोखले व केळकर यांनीं एक नवीनच शर्त घातली कीं, छापखाना घेईल त्यानें स्वतःचीं वर्तमानपत्रें काढूं नयेत. या नव्या अटीनें पारडें एकदम फिरलें व टिळकांना सात हजार रुपयांच्या कर्जासह वर्तमानपत्रें स्वतःला घेऊन चौदा हजार कर्जासह छापखाना इतर भागीदारांस सोडून देणें प्राप्त झालें.

---

## १६ केसरी छापण्याची व्यवस्था

१८९१ पासून १८९७ पर्यंत केसरी ऑफीस आर्यभूषण छापखान्यांतच असल्यामुळें टिळकांचे घरीं कारखाना असा कांहीं नव्हता. खटल्यानंतर केसरीचें ऑफीस स्वतंत्रपणें धोंडोपंत विद्वांस यांनीं प्रथम राहत्या घरीं म्हणजे विंचूरकरांच्या वाड्यांत सुरू केलें. पण बिन्हाडांतील जागा या कामास अपुरी असल्यामुळें पुढें गायकवाडवाडा खरेदी होईपर्यंत सदाशिव पेठच्या हौदानजिक कोपऱ्यावरील राहत्या घरीं केसरीचें ऑफीस ठेवण्यांत आलें होतें. पण खुद्द केसरी छापण्याचें काम हातानेंच होत असल्यामुळें केसरीची कचेरी लहानच होती. संपादकमंडळापैकीं केळकर, खाडिलकर, मुख्य व्यवस्थापक धोंडोपंत विद्वांस व दोनतीन कारकून अशी लहानशीच ही कचेरी होती. कारणपरत्वें टिळक येथेंच येऊन केसरीचा मजकूर वगैरे सांगून लिहीत. पैशाअडक्याची व्यवस्था या वेळीं करण्यासारखी अशी फारशी नव्हती. यापूर्वीं चित्रशाळा हीच टिळकांच्या बँकेचें म्हणजे बहुतेक सर्व देवघेवीचें काम करी. पण स्वतंत्र कचेरी व स्वतंत्र ऑफीस केल्यापासून हा व्यवहार इकडे सुरू झाला.

खटल्याचे वेळीं केसरीचे वर्गणीदार सुमारें सात हजार होते, ते खटल्यापासून वाढण्यास सुरुवात झाली, व १८९९ अखेर हा आंकडा दहाअकरा हजारांपर्यंत गेला होता. मराठ्याचे वर्गणीदार एक हजाराच्या आंतबाहेर प्रथमपासूनच

असत. ते कधीं फार वाढले नाहींत व कधीं फार कमीहि झाले नाहींत. केसरीची वर्गणी एक रुपया होती. मराठ्याची वर्गणी टपालहंशिलासह बाहेरगांवीं सवासात, शहरांत सहा रुपये सहा आणे व फुटकळ अंकास चार आणे अशी असल्यामुळें, आणि पत्र इंग्रजी असल्यामुळें, त्याचा प्रसार अर्थातच पुष्कळ कमी होता. पण केसरीचीं मतें परप्रांतांतून फैलावण्याकरितां केसरीचेंच एक पुडितखातें म्हणून टिळकांनीं केसरीला कर्ज असतांहि हें पत्र चालू ठेविलें होतें, हें पूर्वी एका ठिकाणीं सांगितलेंच आहे. टिळकांच्या गैरहजेरींत केळकर यांनीं मराठा, व केळकर आणि खाडिलकर यांनीं केसरी चालविला, टिकविला, व त्यांच्या लोकप्रियतेंत कमीपणा येऊं दिला नाहीं. यामुळें हे दोघेहि कायमचे मदतनीस म्हणून टिळकांनीं यापुढेंहि योजले. स्वतः टिळक व हे दोन मदतनीस एवढ्यांत मिळून हीं दोन्हीं पत्रें चालण्यासारखीं होतीं. १८९६ पासून १८९९ पर्यंत टिळकांना लॉ क्लासांत केळकर हे जोडीदार असत. पण १८९९ पासून पुढें लॉ क्लास प्लेगामुळें बंद झाला. तो फिरून उघडावयाचा नाहीं असें टिळकांनीं ठरविलें. नित्य नियमानें केसरीचें एखादें आर्टिकल लिहिणें व जरूरीप्रमाणें मराठ्यांतहि एखादें आर्टिकल लिहिणें या गोष्टीला टिळकांना विशेष वेळ लागत नसे. त्यांचा अवांतर कामांतच यापेक्षां अधिक वेळ पुढें जाऊं लागला.

ता. ४ जुलै १८९९ पासून टिळकांनीं केसरी पुन्हां हातीं घेतला. १८९७च्या सदतिसाव्या अंकापर्यंत केसरी टिळकांच्या नांवानें निघत होता. अडतिसाव्या अंकापासून टिळक यांचें नांव त्यांच्या शिक्षेमुळें केसरीवरून निघालें होतें, तें १८९९ च्या सत्ताविसाव्या अंकावर फिरून केसरीवर दिसूं लागलें. दरम्यानचे केसरीचे ९१ अंक टिळकांच्या नांवाला अंतरले होते.

त्या वेळचा केसरी अवघ्या दहा कॉलमांचा असल्यामुळें व त्यांतच पत्रव्यवहार, लिहून आलेला मजकूर, एखाद्या कारकुनानें काढून दिलेलें वर्तमानसार वगैरे मजकूर, व नव्या पुस्तकांच्या वगैरे महत्त्वाच्या जाहिराती समाविष्ट होत असल्यामुळें केसरी लिहिण्याचें काम टिळकांना एक दिवस पुरे. रविवारीं आठ दिवसांच्या वर्तमानपत्रांचा भारा घरीं येऊन पडला म्हणजे ते गरुड पक्षाच्या नजरेनें त्यांतील उपयुक्त मुद्दे तेवढे तव्हांच निवडून काढीत, व काय चार कॉलम मजकूर लिहावयाचा असेल तो हाताशीं लेखक घेऊन एकदम लिहून टाकीत.

प्रुफें वाचण्याचें कामहि रात्रीं अपरात्रीं उरकून जाई. अशा रीतीनें आठव-ड्यांतून कमींत कमी पांच दिवस त्यांना आपल्या इतर व्यवसायाला मोकळे मिळत. कधीं गांवीं जावयाचें असल्यास एखाद्या स्नेह्यावर किंवा वेळीं कारकुना-वरहि केसरी सोंपवून जात. मग टेबलांत पडलेलें एखादें कोणाचें शिलकी आर्टिकल तो घालो, किंवा ठराविक स्नेह्यांपैकीं एखाद्याच्या खणपटीस बसून तें त्याजकडून लिहून घेववो. त्या काळीं बदली संपादकाचें काम बरेंच सोपें असे. आधीं वादग्रस्त काय तो एकच म्हणजे सामाजिक विषय. त्यावरहि कांहीं विशेष वाद चालू नसल्यास केसरींत सहसा लेख येत नसत, व तेवढा विषय वगळला म्हणजे राजकीय बाबतींत लिहिण्याला सगळें रान मोकळें. राजद्रोहाचें कलम तेव्हां बहुधा योगनिद्रेंत पडलेलें होतें व आजकाल राजकीय चळवळींतील मतभेद सुईच्या अग्रासारखे तीक्ष्ण झालेले आहेत ते तेव्हां तसे झालेले नसल्यामुळें, कोणीहि कांहीं विषयावर लिहिलें तरी चाले. वाचक-वर्गाची दृष्टि स्तिमित असल्यामुळें संपादकालाहि आपल्या अग्रलेखाची विशेष खाडाखुडी करण्याचें कारण नव्हतें. हेमंतव्याख्यानमालेचे रिपोर्ट, स्पेन्सरमत-प्रकाशन, विलायतचा किंवा उत्तर-हिंदुस्थानचा प्रवास, तंड्या भिल्ल किंवा शहाजहान बेगम यांचें चरित्र, असल्या अवांतर लेखांनीं केसरीच्या दहा कॉल-मांतील निम्मी-अधिक जागा अडविली गेली तरी कोणास त्याचा विषाद वाटत नसे. तसेंच आजचा अग्रलेख आणि उद्यांचा अग्रलेख यांच्या भाषेंत महदंतर दिसून आलें तरी हल्लींप्रमाणें वाचकांत चिकित्साबुद्धि जागृत होत नसे. त्या वेळचा केसरी चालविणें हें टिळकांखेरीज इतरांनाहि थोड्या मेहनतीचें काम असे; व एकाच वर्षांत आळीपाळीनें केसरीचे अनेक 'संपादक' होऊं शकत. तात्पर्य, टिळकांना तर हें काम फारच थोड्या वेळांत होण्यासारखें असून पूर्ण स्वतंत्रपणानेंहि करितां येण्यासारखें होतें. टिळक नेहमीं म्हणत कीं, मी केसरी आठव-ड्यांतून एक दिवस लिहितों खरा, पण त्या एका दिवशीं काय लिहावयाचें याचे विचार माझ्या डोक्यांत आठवडाभर घोळत असतात. अनेक उद्योग एकदम चाल-विण्याची पात्रता जरी त्यांच्या अंगीं असे, तरी त्यांचें बहुधा सगळें चित्त व्यग्र करून टाकणारा असा कांहीं तरी एखादा विशिष्ट उद्योग कोणत्याहि वेळीं त्यांच्या हातीं असे. यामुळें त्या वेळचा केसरी पाहिला असतां तो टिळकांनीं लिहि-ल्याची खूण म्हणजे एखादें चटकदार आर्टिकल किंवा एकाच विषयावर लिहि-

लेलीं दोन तीन चरचरीत स्फुटें येवढाच. पण तो भाग त्यांत वाचनीय असावयाचा. लेख लिहिणें हें काम त्यांना न आवडणारें, असें ते प्रायः म्हणत. पण कोणत्याहि विषयावर त्यांचे विचार मनांत इतकी खळबळ करून सोडीत कीं, त्यांवर लेख लिहिणें हें श्रमाला कारणभूत न होतां त्यापासून त्यांना उलट विरामच वाटत असे.

तारीख ७ जानेवारी १९०२ च्या केसरींत केसरीपत्राच्या स्वरूपांत घडणाऱ्या क्रांतीची सूचना टिळकांनीं दिली होती. ही क्रांति म्हणजे केसरीचा आकार तोच ठेवावयाचा पण पानें दुप्पट करावयाचीं ही होय. या सालच्या पहिल्याच अंकापासून केसरी नव्या स्वरूपांत निघणार होता. परंतु छापखान्याच्या अडचणीमुळें ती गोष्ट घडूं शकली नाहीं. नवा केसरी प्रथम ता. ४ फेब्रुवारी रोजीं निघाला. आणि ११ फेब्रुवारीच्या अंकांत या क्रांतीला उद्देशून टिळकांनीं एक मोठा अग्रलेख लिहिला. त्यांत ते म्हणतातः—" एकवीस वर्षांपूर्वी आम्हीं दहा पांच मंडळी मिळून केसरीपत्र काढण्याचें ठरविलें. त्यावेळच्या व आतांच्या स्थितींत पुष्कळ फरक पडला आहे. एकविसाव्या वाढदिवसाच्या प्रसंगीं आनंदापेक्षांहि जबाबदारीची जाणीवच अधिक होते. केसरी सुरू करण्याच्या वेळची सर्व सहकारी मंडळी नामशेष झाली. निवळ मराठी पत्र यशस्वी होईल कीं नाहीं याची १८८० च्या सुमारास लोकांना शंका वाटत असे. आणि दोन भाषेंत काढलेल्या पत्रांतील इंग्रजी मजकुराला लोक अधिक मान देत. वर्तमानपत्राची वर्गणीहि तेव्हां जास्त होती. केवळ मराठींतून पत्र चालविण्याचा प्रयत्नच तेव्हां व्हावा तितका झाला नव्हता. विष्णुशास्त्री यांनीं भाषेला विलक्षण तेज आणलें होतें. परंतु तें अद्याप मासिक पुस्तकच होतें. गेल्या तीस वर्षांत शिक्षण सर्वच बाजूंनीं वाढलें आहे. केसरीला प्रारंभीं ७०० पासून हजार वर्गणीदार होते. पुढच्या सालीं टपाल हंशील कमी झाल्यामुळें ती संख्या एकदम दुप्पट झाली. व १८८४ सालीं ही संख्या बेचाळीसशेंवर येऊन ठेपली. यापुढें झालेल्या चळवळीमुळें १९०२ सालीं वर्गणीदारांची संख्या तेरा हजार झाली व वाचकांची संख्या सुमारें पाऊण लाखापर्यंत गेली. या काळांत केसरीबरोबर इतर कांहीं वर्तमानपत्रेंहि उदयाला आलीं. यावरून केसरीनें स्वतःची अभिवृद्धि केली इतकेंच नव्हे तर एकंदरीनें मराठी वर्तमानपत्रांच्या अभिवृद्धीला तो कारणभूत झाला. वाचनाच्या अभिरुचीचा जो वृक्ष

केसरीनें लावला त्याला अनेक फळें यावीं हें स्वाभाविक होतें. एकाच बागेंत निरनिराळीं फळझाडें व फुलझाडें होतात त्याप्रमाणें ही गोष्ट आहे.

" केसरीची भूक वाढली त्याप्रमाणें त्याचे भक्ष्य पदार्थहि वाढले. १८८१ सालीं केसरींत मजकूर येत होता तो हल्लींच्या केसरीच्या पांच कॉलमाइतका असे. १८८४ सालीं आकार वाढला तेव्हांपासून त्यांतील मजकूर दुप्पट झाला. १८९१ सालीं केसरीची वर्गणी वाढवून आकार आणखी वाढवावा किंवा कसें हा प्रश्न उपस्थित झाला. पण वर्गणी तीच ठेवून टाईप लहान घालावा म्हणजे मजकूर अधिक वाढेल असें ठरलें. केसरीचें हें असें स्वरूप पुढें सुमारें अकरा वर्षे टिकलें. केसरीच्या स्वरूपांत क्रांति करण्याची जाहिरात दिली तेव्हां अनेकांनीं अनेक सूचना केल्या. त्यांत केसरी दररोजचा काढावा अशाहि सूचना होत्या. पण तो तसा केला असतां त्याची वर्गणी कमींत कमी बारा रुपयांपासून पंधरा रुपयांपर्यंत ठेवावी लागेल म्हणून ती सूचना केवळ अग्राह्य ठरली. किंमत वाढवून वर्गणीदार कमी झाले तरी नफा एकंदरीनें जास्ती होईल. पण खेडेगांवांतल्या लोकांनींहि केसरी घ्यावा व वाचावा अशी इच्छा व उद्देश असल्यामुळें वर्गणी वाढवून वाचकांची संख्या कमी करणें इष्ट नाहीं. वाचक तर कमी न व्हावे आणि केसरीची उपयुक्तता तर वाढावी या हेतूनेंच पूर्वींच्या सुधारणा झाल्या. केसरीची वर्गणी दीड रुपयाहि न ठेवतां एक रुपया ठेवावी, अशाहि लोकांनीं सूचना केल्या. पण केसरी दुप्पट केल्यास नुसत्या कागदाचाच खर्च नऊ आणे येतो. बाकीचा खर्च सात आण्यांत झेंपणें शक्य नाहीं. परदेशी गवताचा कागद केसरीला घालण्याचें कारण हेंच कीं त्याची किंमत कमी ठेवतां यावी. बारीक टाईप ही गैरसोय देखील त्यांतल्यात्यांत वाचकाला अधिक मजकूर देण्याकरितां पत्करावी लागली. केसरीचा आकार मोठा करावा अशा कांहींनीं सूचना केल्या. पण तसें करण्यांत छापखान्याची फार गैरसोय म्हणून मध्यम आकारच पसंत केला. केसरी छापखान्याला यंत्र आणलें तें चार हजारांवर वर्गणीदार झाले तेव्हां, पण वर्गणीदारांची संख्या हल्लीं वाढल्यामुळें त्या यंत्रानें भागत नाहीं. याकरितां एका दिवसांत वीसपासून चाळीस हजारापर्यंत प्रती ज्यावर निघतील असें एक नवीन यंत्र सध्यां आणविलें आहे व तें चालविण्याला तेलाचें एंजिन घेतलें आहे. याचे सहाय्यानें केसरीची एक बाजू दर ताशीं तीन हजाराप्रमाणें छापतां येते. ही व्यवस्था अपुरी पडेल तेव्हां

आणखी नवें यंत्र आणूं. आंतील मजकुरासंबंधानें पाहतां जागेच्या अभावामुळें बातमी वर्तमान वगैरेसंबंधानें केसरीचें दुर्लक्ष झालें. पण यापुढें आकार दुप्पट वाढविल्यामुळें संपादकीय लेख यत्किंचितहि कमी न करतां अवांतर पुष्कळशी माहिती केसरींत देतां येईल. लायब्रऱ्यांतून वर्तमानपत्रें व मासिक पुस्तकें वगैरे वाचून जी माहिती मिळते ती वाढलेल्या दहा कॉलमांत देण्याचा विचार आहे. कांहीं ठिकाणीं बातमीदारहि ठेवण्याचा विचार आहे. केसरी हें कांहीं एका जिल्ह्याचें वर्तमानपत्र नव्हे. तरी सर्वसाधारण कोठेंहि गोष्टी घडतात त्या केसरींत देतां याव्यात अशी योजना आहे. केसरींत मुळींच जाहिराती घालूं नयेत अशा कांहींच्या सूचना होत्या. पण जाहिरात छापण्याचा खर्च भागून जी कसर उरते तिची मदत खर्चाला बरीच होते. जाहिरातीचे दर फार कमी नसले तरी जाहिरातवाल्यांना खर्चाचा मोबदला भरपूर मिळतो. कारण केसरीच्या प्रती खपतात इतक्या जाहिराती दर आठवड्याला काढून त्यांना इतक्या खर्चांत वाटतां येणार नाहींत. जाहिरातीच्या उत्पन्नाच्या मदतीशिवाय केसरीचा आकार वाढविणें शक्य नव्हतें. ”

१८९८ सालीं तुरुंगांतून सुटून आल्यावर थोडी विश्रांति घेऊन ता. ३ जुलै १८९९ रोजीं टिळकांनीं केसरी आपल्या नांवानें हातीं घेतला तो १९०८ सालीं त्यांना शिक्षा होईपर्यंत, म्हणजे ता. २२ जुलै १९०८ पर्यंत त्यांचेच नांवावर सतत होता. ता. २८ जुलै १९०८ पासून केसरीवर संपादक कृष्णाजी प्रभाकर खाडिलकर यांचें नांव दाखल झालें, तें ता. ४ जानेवारी १९१० पर्यंत होतें. पुढील अंकापासून श्री. न. चिं. केळकर हे केसरीचे संपादक झाले. ते ता. १२ मार्च १९१८ पर्यंत संपादक होते. या सुमारास स्वराज्य संघातर्फे शिष्टमंडळ विलायतेस जाण्याकरितां कोलंबोस निघालें तेव्हां ता. १९ मार्च १९१८ रोजीं फिरून केसरीचे संपादक म्हणून खाडिलकर यांचें नांव दाखल करण्यांत आलें. विलायतेची ही सफर पासपोर्ट न मिळाल्यामुळें कोलंबोहून परत फिरली व त्यानंतर केळकर १९१९ च्या एप्रिलअखेर विलायतेस जाईपर्यंत पुण्यासच होते; तथापि ते पुन्हा विलायतेस जाण्याकरितां निघण्याचा संभव होता, यामुळें खाडिलकर यांचेच हातीं केसरीचें संपादकत्व ठेवण्यांत आलें होतें. पण टिळक व केळकर हे विलायतेहून परत आल्यावर फिरून पूर्वीप्रमाणें तारीख २२ जून १९२० पासून केसरीचें संपादकत्व केळकरांकडे देण्यांत आलें. तात्पर्य, १९०८ सालीं

टिळकांचें नांव केसरीवरून संपादक या नात्यानें निघालें तें कायमचेंच निघालें. तथापि पुढें अखेरपर्यंत टिळक केसरीवर देखरेख ठेवीत, इतकेंच नव्हे तर एखादेवेळीं केसरीकरितां लिहिलेले लेख तपासून देत, व त्यांनीं स्वतःहि वेळोवेळीं अनेक लेख केसरींत लिहिले आहेत. सन १९२० पासून १९२८ पर्यंत केळकर हे केसरीचे जबाबदार संपादक होते. या वर्षीं केळकरांनीं कांहीं दिवस प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें व विश्रांतीच्या जरूरीमुळें रजा घेतली. तेव्हां त्यांचे जागीं रा. गजानन विश्वनाथ केतकर, बी. ए., एलएल. बी. यांचे नांवें केसरीचें डिक्लेरेशन करण्यांत आलें. पण फिरून १९२९ च्या पहिल्या आठवडयांत केळकर यांनीं आपल्या नांवाचें डिक्लेरेशन केलें तें आज तारखेपर्यंत त्यांच्याच नांवचें आहे.

१८९१ च्या पूर्वी कांहीं वर्षें केसरीवर टिळकांचें नांव असलें तरी प्रत्यक्ष त्या पत्राची मालकी किंवा देखरेखहि त्यांच्याकडे नसे. पण १८९१ पासून १९२० पर्यंत, म्हणजे सुमारें २९ वर्षें टिळकांचा केसरीशीं प्रत्यक्ष किंवा जिव्हाळ्याचा किंवा कूर्मदृष्टीचा संबंध होता. या मुदतींत केसरीच्या स्वरूपांत अनेक स्थित्यंतरें झालीं. तशींच वर्गणी वगैरे इतर बाबतींतहि झालीं. १९०२ सालापासून टिळकांनीं केसरीचा आकार तोच ठेवून पानें दुप्पट केलीं. ही क्रांति पूर्वीच्या क्रांतीनंतर ११ वर्षांनीं घडून आली. १८९१ सालीं क्रांति झाली होती ती इतकीच कीं ( वर्गणी तीच म्हणजे १ रु. १३ आ. ठेवून व पृष्ठसंख्या तीच म्हणजे बाहेरील दोन व आंतील दोन मिळून चार पानें इतकीच ठेवून ) मोठ्या ऐवजीं लहान टाइप घातला, म्हणजे मजकूर वाढविला. पण १९०२ सालीं ही सुधारणाहि अपुरी ठरल्यानें, आकार व टाईप तोच ठेवून पानें दुप्पट वाढविलीं. त्यामुळें संपादकीय लेखाप्रमाणेंच लिहून आलेले लेख, पत्रव्यवहार, बातम्या, बिनसंपादकीय ‘ लेख ’, जाहिराती वगैरेंची पुष्कळच अधिक सोय झाली. पण इतका मजकूर वाढविल्यावर छपाईच्या व इतर खर्चाच्या दृष्टीनें वर्गणी वाढविणेंहि अवश्य होतें; म्हणून पूर्वीची वर्गणी १ रु. १३ आणे होती ती २ रु. ५ आ. करण्यांत आली. १९०२ सालीं जो आकार व मजकुराची जी बांधणी टिळकांनीं निश्चित केली ती १९१२ पर्यंत तशीच चालू होती. या सुमारास प्रथम केळकर यांनीं केसरींत वाढत्या मजकुराच्या सोयीकरितां पुरवणी घालण्याला सुरवात केली; व कर्मधर्मसंयोगानें ज्या वर्षीं प्रेस ॲक्ट अमलांत आला त्याच वर्षीं या पुरवणीलाहि सुरवात झाली.

मात्र ही पुरवणी कायमची किंवा वर्गणीदारांच्या हक्काची अशी समजली जात नसे. संपादकाच्या इच्छेप्रमाणें, म्हणजे मजकूर अधिक नसेल त्याप्रमाणें, पुरवणी घालावी न घालावी असा क्रम सुरू होता. पण त्यांतल्यात्यांत पुरवणी न घालणें हा अपवाद होऊन बसला ! महायुद्ध सुरू झाल्यानंतर बाजारकिंमती सर्वच बेसुमार वाढल्या. त्यांत कागदाची किंमतहि भडकली. त्यामुळें टिळकांना केसरीची वर्गणी पुन्हां वाढवावी लागली. ती ता. १ ऑक्टोबर १९१६ पासून २ रुपये १३ आणे करण्यांत आली. त्यानंतर तारीख १ जानेवारी १९१८ पासून ३ रुपये १३ आणे करण्यांत आली. आणि ती टिळकांच्या मृत्यूपर्यंत व त्यानंतरहि तशीच कायम राहिली. १३ आणे टपालहंशील हें केसरीच्या पहिल्या दिवसापासून आजवर तसेंच कायम राहिलें आहे; पण वर्गणीच्या रकमेंत प्रथम एक रुपया, नंतर दीड रुपया, नंतर दोन रुपये, व नंतर तीन रुपये याप्रमाणें वाढ झाली. पण केसरींत मजकुराचीहि वाढ त्याच मानानें झाली म्हणून वाचकांनीं या तीनहि वाढींचें प्रमाण योग्य मानलें. याचें प्रत्यंतर हेंच कीं, वर्गणी वाढली असतांहि वर्गणीदारांची संख्या देखील वाढती राहिली. तारीख १ जानेवारी १९१८ पासून केसरीची वर्गणी ३ रुपये १३ आणे असतां, मध्यंतरीं प्रथम दोन पानांची, नंतर कांहीं दिवस चार पानांची पुरवणी घालण्यांत येऊन वाढत्या वर्गणीचा मोबदला वर्गणीदारांना देण्यांत आला. आणि त्यापुढें नुसती पुरवणीच नव्हे तर केसरीचीं पानेंहि बरोबर दुप्पट वाढवून, म्हणजे ८ चीं १६ करून, केसरी त्याच वर्गणींत ता. १ जानेवारी १९२५ पासून ग्राहकांना देण्यांत येऊं लागला. ही वाढ व सुधारणा टिळकांनाहि हवी होती, परंतु कागदाची भारी किंमत वगैरे अनेक कारणांनीं आपल्या हयातींत त्यांना ती करतां आली नाहीं.

१९०२ सालीं केसरीचा आकार वाढविला त्यापूर्वींच टिळकांनीं मोरोबा फडणिसांच्या वाड्यांत, आर्यभूषण प्रेसला लागून स्वतंत्र इमारत बांधून, नवें मोठें छापण्याचें यंत्र बसविलें होतें. पुढें १९०४ सालीं टिळकांनीं गायकवाड-सरकारकडून त्यांचा पुण्यांतील वाडा विकत घेतला. व १९०६ पासून छापखान्याचें काम, टाईप जुळविण्याचें काम, आणि केसरी-मराठ्याचे संपादक व व्यवस्थापक यांच्या कचेरीचें काम, तेथें सर्व एकत्र चालूं लागलें. टिळकांच्या हयातींत महायुद्धापासून केसरीच्या वर्गणीदारांची संख्या विशेष वाढूं लागली, तेव्हां हें नवें यंत्रहि अपुरें पडूं लागलें. टिळक मंडालेहून परत आल्यापासून छाप-

खान्याची अंतर्बाह्य सुधारणा करण्याचा विचार त्यांचे डोक्यांत एकसारखा घोळत होता. १९१४ च्या पत्रव्यवहारावरून असें दिसतें कीं, या सालीं विलायतेंतील वॉकर कंपनीशीं पत्रव्यवहार करून टिळकांनीं आपल्या नव्या छापखान्याकरितां विजेचे दिवे लावण्याची योजना केली होती व त्याकरितां मोटार डायनेमो बॅटरी, ॲक्युम्युलेटर दिवे, तारा, लहानसे पंखे वगैरे सर्व आणविण्याचा बेत केला होता. फक्त इंजिन मात्र न घेतां जुन्यावरच भागविण्याचा त्यांचा विचार होता. या सर्वाला सुमारें १५०० रुपये खर्च येणार होता. परंतु जुन्या इंजिननें काम पुरें पडणार नाहीं, आणि याकारणाकरितां जुनें काढून टाकून नवें मोठें घ्यावयाचें तर आवांक्याबाहेर खर्च जाणार, असा एकंदर अंदाज झाल्यामुळें त्यावेळीं गायकवाडवाड्यांत व कारखान्यांत विजेचे दिवे लावण्याचा बेत रहित करण्यांत आला. यानंतर चिरोल केसचा खर्च व वेळ खाणारे अनेक इतर उद्योग निघाल्यामुळें नवीन छपाईचें यंत्र घेऊन बसविण्याची टिळकांची कल्पना तशीच राहिली. पण टिळक विलायतेस गेल्यावर अनायासेंच ती त्यांना फलद्रूप करतां आली. त्याप्रमाणें तेथें समक्ष पाहून त्यांनीं नव्या प्रकारचें एक छपाईचें यंत्र सुमारें २०००० रु. किंमतीचें विकत घेतलें. या यंत्राचें वर्णन टिळकांनीं स्वदस्तुरचें पत्र धोंडोपंत विद्वांस यांना लिहून त्यांत दिलें आहे तें खालीलप्रमाणें:—

"आतां जें मशीन घेणार तें सुटे कागद छापण्याचें नाहीं. कागदाचीं वाटोळीं जुडकीं ( रीळ ) लावून दर तासांत ६००० कॉपी ( ८ पानें एकदम ) छापून व घड्या पाडून तयार होतील असें मशीन आहे. तसेंच सुट्या टाइपाचा उपयोग न करतां स्टिरिओ दर पेजास एक याप्रमाणें तयार करून, आठ स्टिरिओ करून छापावे लागेल. स्टिरिओची मशीनरी मशीनबरोबरच विकत घेतलेली आहे. मशीन रवाना झालें म्हणजे कागदाचे रोलरना ऑर्डर देतों. मशीन सेकंडहँड आहे. पण अगदीं नव्यासारखें असून ज्या कंपनीनें मशीन तयार केलें त्याच कंपनीनें तें सर्व तपासून नीट केलें आहे, करितां काळजी नाहीं.

"हल्लीं केसरीचा आकार ४५-३० आहे. पण या मशीनवर ४०-३० पासून ४०-६० पर्यंत ( म्हणजे क्रॉड सब रॉयल किंवा क्रॉड रॉयल) कागद छापला जाईल.

"मशीन सुमारें १२ फूट लांब, ९ फूट रुंद व फक्त ६ फूट उंच आहे म्हणजे आटोपशीर आहे. खालीं खड्डा खणण्याची जरूर नाहीं.

" हें मशीन चालविण्यास ऑईल इंजिन दहा हॉर्स पॉवरचें लागेल. सध्यांचें चालणार नाहीं. नवें घेतलें पाहिजे. रा. पारधी यांस विचारून तिकडे दहा हॉर्स पॉवरचें इंजिन मिळेल कां नाहीं व केवढ्यास मिळेल तें उत्तरीं कळवावें. नसल्यास येथें विकत घेऊं.

" आतां फक्त एक लहान मशीन मराठ्याकरितां व लिनो अगर मोनो टाइप घेणें आहे. चौकशींत आहे.

" १९०१ सालीं टूफीडर घेऊन त्याप्रमाणें आज १८-१९ वर्षे काम चाललें तद्वतच यापुढें वीस पंचवीस वर्षे पूर्ण उपयोगाला येईल असें हल्लींचें मशीन आहे. आठी पेज एकदम छापून व घड्या पाडून तासास ६ हजार प्रती डझनावर मोजून बाहेर पडतील. पुढें केसरी आठवड्यांतून दोनदां किंवा तीनदां निघाला तरी दुसरें मशीन घ्यावयास नको. हल्लींचा केसरी म्हणजे ३२००० प्रती ६ तासांत सर्व छापून होतील. रात्रीं बारा वाजतां सुरू केलें कीं, दोन्ही फर्मे एकदम छापून व घड्या पडून सकाळला तयार ! "

या पत्रांत उल्लेखिल्याप्रमाणें मराठ्याकरितां स्वतंत्र लहानसें छपाईचें यंत्र १९१९ सालीं घेण्यांत आलें व हल्लीं मराठा त्यावरच छापण्यांत येतो. १९१४ च्या संकल्पाप्रमाणें केसरी छापखाना व केसरी यांच्याकरतां ऑईल इंजिनला डायनेमो जोडून विजेचे दिवे लावण्याची व्यवस्था १९२२ पासून करण्यांत आलेली आहे. लायनो टाइपवर केसरीचे टाइप जुळविण्याची व्यवस्था ही मात्र परतंत्र असल्यामुळें ती टिळकांना आपल्या हयातींत अमलांत आणतां आली नाहीं. व त्यापुढेंहि ती आजवर अमलांत आलेली नाहीं. तथापि लायनो टाइप-वर केसरी निघावयाचा तर त्याला आधीं त्या यंत्रांवर बसवितां येतील असे अखंड टाइप बनवावे लागणार; व असे टाइप आपण करून दिले तरच विलायतचे कारखानदार ते स्वीकारून लायनो टाइप बनवून देणार, म्हणून टिळकांनींच आपल्या कारखान्यांत हे अखंड टाइप तयार केले. ही योजना टिळकांच्या मनांत १९०६ सालापासून घोळत होती व त्यांच्या अखंड टाइपांचा एक संपूर्ण संच त्याच सालीं तयार झाला. फिरून त्याची सुधारणा १९१४ सालीं त्यांच्याच देखरेखीखालीं झाली. आणि त्यानंतर त्यांत आणखी सुधारणा १९२६ पासून सुरू आहे. या अखंड टाइपांत कंपोज केलेला मजकूर केसरींत वेळोवेळीं देण्यांत येत असतो ही गोष्ट त्या टाइपांचें वळण व इतर टाइपांचें वळण

यांतील फरकावरून वाचकांच्या लक्षांत आलीच आहे. या टाइपांतील सुधारणा पूर्ण झाली म्हणजे पुढेंमागें कदाचित् तोच टाइप संबंध केसरीकरतां वापरण्याचा विचार आहे आणि वाचकांच्या दृष्टीनें तो रूढ झाला म्हणजे तोच लायनो टाइप यंत्रावर बसवून घेण्याची योजना होईल. वर दिलेल्या टिळकांच्या पत्रांत असें लिहिलें होतें कीं, "पुढें केसरी आठवड्यांतून दोनदां किंवा तीनदां निघाला तरी दुसरें मशीन घ्यावयास नको." वरील शब्दांत जी सुधारणा सुचविली आहे तिजपैकीं केसरी आठवड्यांतून दोनदां काढण्याची योजना फलद्रूप झालीच आहे.

---

## १७ केसरी-मराठ्यावरील आपत्तींचे प्रसंग

मनुष्य व्यक्तीचें काय किंवा संस्थेचें काय पन्नास वर्षांचें आयुष्य बिलकूल अपघाताशिवाय पार पडण्याची अपेक्षा करणें हें गैरच होय. मनुष्याला आजार अपघात होतो तसें संस्थेलाहि घडतें. त्याप्रमाणें केसरी-मराठ्यावर पन्नास वर्षांत आपत्ति आल्या त्या कांहीं अस्मानी व कांहीं सुलतानी होत्या. पैकीं अस्मानी आपत्ति आल्या त्या अशा. प्रथम केसरीशीं संबंध ठेवणें धोक्याचें असें वाटून आर्यभूषण छापखान्याचे मालक व मॅनेजर कै. हरि नारायण गोखले यांनीं आपल्या छापखान्यांत केसरी छापण्यास हरकत सांगितली त्यामुळें केसरी तेथून बाहेर काढून न्यावा लागला तो कांहीं दिवस विठ्ठल प्रेसमध्यें छापला जात असे. सदरहू छापखाना रविवार पेठेंतील फडके यांचे वाड्यांत होता. त्याला ता. १४ मार्च १८९८ रोजीं अकस्मात् आग लागली. त्यामुळें केसरीचें थोडें नुकसान झालें. आगींतून निम्या केसरीचा कंपोज झालेला टाइप बचावला; परंतु दुसरेच दिवशीं मंगळवार असल्यामुळें तो निमा केसरीच कसा तरी छापून घेऊन वांटावा लागला. केसरीच्या या पन्नास वर्षांत असला अपघात हा एकच घडला म्हणजे निम्मा केसरी वांटला गेला हा पन्नास वर्षांत एकच प्रसंग. तथापि सांगण्यासारखी अभिमानाची गोष्ट अशी कीं, त्याहि अपघातांत मंगळवारीं केसरी प्रसिद्ध होण्याचा राहिला नाहीं.

दुसरी अशा प्रकारची अस्मानी आपत्ति म्हणजे केसरीच्या कागदांच्या गोदामाला लागलेली किंवा कोणीं लावलेली आग. ही ता. १० मे १९२१ रोजीं रात्रीं अकस्मात् लागली. तींत केसरीच्या नव्या इमारतीचा कांहीं भाग व बहुतेक सर्व शिलकी कागद जळून गेला. कागदाचा विमा उतरलेला होता, तथापि विमा कंपनीकडून मिळालेल्या रकमेनें सर्व नुकसान भरून आलें नाहीं.

व्यक्तिशः अपघात असा एकच झाला. तो असा कीं एकदां छापण्याचें यंत्र चालू असतां एका कामगाराचा पाय पट्ट्यांत सांपडून तो मरावयाचाच पण थोडक्यावर निभावून पायमोडीवर मरण गेलें. त्याची सर्व प्रकारची निगा केसरीनें केली व सुदैवानें हा कामगार बरा होऊन हल्लीं तो मुख्य प्रिंटरचें काम करीत आहे.

तसेंच एका गणपतिउत्सवांत एके रात्रीं मेळे आले असतां पुष्कळ लोक केसरीच्या आवारांतील एका इमारतीच्या पत्र्याच्या छपरावर मेळ्यांचीं गाणीं ऐकत व रोषनाई पहात असतां तें छप्पर एकदम कोसळून पडलें. त्यांत लहान मोठीं बरींच माणसें खालीं पडून दुखावलीं. पण सुदैवानें कोणीहि दगावलें नाहीं.

अशा रीतीच्या अस्मानी आपत्ती केसरीवर फार थोड्या आल्या. पण सुलतानी आपत्तीमात्र बऱ्याच आल्या. पैकीं पहिली म्हटली म्हणजे सन १८८२ सालीं झालेला अब्रुनुकसानीचा खटला. त्या खटल्याची सविस्तर हकीकत लो. टिळक चरित्राच्या पहिल्या खंडाच्या ६ व्या भागांत वाचकांना वाचावयास मिळेल. त्याची थोडक्यांत हकीकत अशी कीं, "कोल्हापूरचे कै. शिवाजी महाराज यांना संस्थानचे दिवाण कै. माधवराव बरवे यांनीं निष्ठुरपणानें वागविलें व त्यांत त्यांना महाराजांच्या सावत्र आईची फूस होती," अशा अर्थाचे लेख केसरींत व मराठ्यांत प्रसिद्ध झाले. त्यावरून कै. बरवे यांनीं मुंबईस प्रेसिडेन्सी मॅजिस्ट्रेटपुढें दोन्ही पत्रांच्या संपादकांवर फौजदारी फिर्याद केली. केसरीचें डिक्लेरशन आगरकर यांचें होतें म्हणून त्यांच्यावर व मराठ्याचें डिक्लेरेशन टिळकांचें होतें म्हणून त्यांच्यावर फिर्यादी झाल्या. मॅजिस्ट्रेटकडून खटला हायकोर्टात सेशन कमिट झाला व अखेर उभयतांना चार महिन्यांची साधी कैद झाली. हे कैदेचे दिवस त्यांनीं मुंबई येथील डोंगरीच्या तुरुंगांत काढले. एकंदर शिक्षा १२० दिवसांची तथापि चांगल्या वर्तणुकीमुळें १९ दिवसांची सूट मिळून त्यांची बंधमुक्तता १०१ दिवसांनींच झाली. या मुदतींत टिळकांचें २४ पौंड व आगरकरांचें १६ पौंड वजन कमी झालें.

यानंतरचा दुसरा सुलतानी आघात म्हणजे १८९७ च्या केसरीवरील खटल्याचा. या खटल्याचा निकाल लो. टिळकांच्याविरुद्ध होऊन त्यांना १८ महिन्यांची सक्तमजुरीची शिक्षा झाली. त्या निकालावर प्रिव्ही कौन्सिलकडे

अपील करण्यांत आलें होतें. पण त्यांत यश आलें नाहीं. तथापि विलायतेंतील प्रो. मॅक्समुलर वगैरेंनीं खुद्द राणीसरकाराकडे अर्ज केल्यामुळें टिळकांची ५१ आठवड्यांनंतर सुटका झाली.

यानंतर ताईमहाराज प्रकरणांत टिळकांना पुन्हां दीड वर्ष सक्तमजुरीची शिक्षा व दंड झाला. परंतु हायकोर्टानें अखेर त्यांना दोषमुक्त करून सोडून दिलें. हा खटला व्यक्तिशः टिळकांवर होता. केसरी पत्रावर नव्हता. केसरी पत्राचे संपादक या नात्यानें टिळकांचें धोरण सरकारला अप्रिय होतें व त्यांच्या सार्वजनिक चारित्र्याला कमीपणा यावा अशा हेतूनें या खटल्यांत कांहीं कारवाई झाली. तथापि प्रत्यक्ष केसरीशीं त्याचा कांहीं संबंध नव्हता. मात्र इतर रीतीनें व अप्रत्यक्ष रीतीनें हा फौजदारी खटला, व एकंदरीनें हें ताईमहाराज प्रकरण, केसरीला अनेक रीतीनें भोंवलेंच. त्याचा एक प्रकार असा कीं, या खटल्यांतील कामकाज चालू असतांना टिळकांना तितक्यापुरतें केसरीकडे दुर्लक्ष करावें लागलें; व दुसरा प्रकार असा कीं, केसरीच्या उत्पन्नांतून हजारों रुपये जे केसरीच्या सुधारणेकडे, अभिवृद्धीकडे किंवा सार्वजनिक चळवळीकडे टिळकांना तेव्हांच खर्च करितां आले असते ते फौजदारी खटल्यांतील स्वतःचा बचाव व दिवाणी मुकदम्याचें अखेर प्रिव्ही कौन्सिलपर्यंतचें काम चालविण्याकडे त्यांना खर्च करावे लागले. सुदैवानें हे पैसे पुढें परत मिळाले ही गोष्ट वेगळी. परंतु केसरीला ते पैसे पुष्कळ वर्षे खर्चीं घालून बसावें लागलें.

यानंतरचा केसरीवरील सुलतानी आघात सन १९०८ सालच्या खटल्याचा. या खटल्याची हकिकतहि लोकांना चांगली माहीत आहे. यामुळें ती विस्तारानें सांगण्याचें कारण नाहीं. या खटल्यांत तर लो. टिळकांना ६ वर्षे काळेपाण्याची म्हणजे हद्दपारीची शिक्षा व एक हजार रुपये दंड झाला. पैकीं दंड मात्र बेकायदेशीर ठरल्यामुळें परत मिळाला. परंतु टिळकांना सहा वर्षांची हद्दपारीची शिक्षा बहुतेक सर्व भरून द्यावी लागली. ही शिक्षा टिळकांनीं व्यक्तिशः भोगली असली तरी ती एक प्रकारें प्रत्यक्ष केसरीलाच शिक्षा झाली. कारण टिळकांसारख्या संपादकाचा संबंध सहा वर्षे तुटणें ही केसरीसारख्या वर्तमानपत्राला किती मोठी आपत्ति होय, याचें वर्णन करून सांगण्याचें कारण नाहीं. यानंतर १९१७ सालीं टिळकांवर राजद्रोहाच्या कलमाखालीं पुनः खटला झाला. मात्र तो फक्त जामीन घेण्यापुरता होता. याही खटल्याचा ताईमहा-

राज खटल्याप्रमाणें केसरीशीं प्रत्यक्ष संबंध नव्हता. म्हणजे खटला केसरींतील लेखामुळें झाला नव्हता. परंतु होमरूल लीगच्या चळवळीकरितां लो. टिळकांना केसरीद्वारें मिळणारा पाठिंबा हें एक कारण होतेंच. शिवाय या खटल्यांतील बचावाकरितां खर्च झाला तो केसरीच्या उत्पन्नांतून करावा लागला. त्याकरतां वेगळी तजवीज झालेली नव्हती. यानंतर फिरून १९२४ सालीं केसरीवर हायकोर्टाची बेअदबी करण्याचा खटला झाला. तो प्रत्यक्ष केसरींतील लेखाकरितांच होता व त्यांत संपादक श्री. न. चिं. केळकर यांना पांच हजार रुपये दंड व बाराशें रुपये कोर्टखर्च मिळून ६२०० रुपये दंड झाला. तो अर्थातच केसरीला झाला. तसेंच १९०८ सालींहि टिळकांच्या खटल्यानंतर मराठा पत्रांत आलेल्या मजकुरावरून श्री. न. चिं. केळकर यांजवर असाच हायकोर्टाच्या बेअदबीचा खटला झाला होता. व त्यांत त्यांना १४ दिवस साधी कैद व १२०० रुपये दंड झाला होता. हा दंड अर्थात् केसरी संस्थेनेंच भरला. याशिवाय सुलतानी आपत्ति म्हटली म्हणजे १९१० च्या प्रेसॲक्टानंतर केसरीकडून सरकारनें घेतलेली ५००० व मराठ्याकडून घेतलेली १००० रुपयांची जामिनकी ही होय. पण सुदैवानें ही जामिनकीची रक्कम सरकारजमा होण्याचा प्रसंग आला नाहीं. १९२२ सालच्या कमिटीच्या शिफारशीनंतर प्रेस ॲक्ट रद्द झाल्यावर दोनहि पत्रांच्या जामिनकीची रक्कम संस्थेला परत मिळाली. त्याचप्रमाणें १९३० सालीं प्रेस ऑर्डिनन्स निघाल्यावर केसरीकडून पत्र व छापखाना मिळून ३५०० रुपयांची व मराठ्याकडून २००० रुपयांची जामिनकी घेण्यांत आली. तीहि हल्लीं परत मिळाली आहे.

अशा निरनिराळ्या प्रकारच्या आपत्तींतून पार पडून केसरी—मराठा हे आजचा आनंदाचा दिवस पाहत आहेत. केसरीचा आजचा हा एक्कावन्नावा वाढदिवस टिळकांच्या हयातींत पडता तर त्याबद्दल त्यांनाच काय, पण केसरीशीं संबंध असलेल्या सर्वांना किती तरी आनंद झाला असता. कारण टिळकांचें सर्वच आयुष्य केसरीचें संगोपन व संवर्धन करण्याकडे गेलें. स्वराज्य—संपादन हें टिळकांचें साध्य होतें. आणि जसें ज्यांचें साध्य त्या मानानें त्यांचें साधनहि असावें लागतें. म्हणून टिळकांनीं केसरी पत्र हातीं घेऊन त्याची कार्यक्षमता निरनिराळ्या रीतींनें वाढविली. त्यांनीं त्याचा आकार वाढविला, पानें वाढविलीं, थोड्या वेळांत पुष्कळ प्रती निघाव्या म्हणून अवश्य ती यंत्रसामुग्री

जुळविली, सोयीच्या इमारती बांधल्या, नवीन माणसें हाताशीं घेतलीं. तात्पर्य, केसरीचा वाचकवर्ग व त्याद्वारें पत्राचा लोकोपयोग वाढावा म्हणून जो जो प्रयत्न अवश्य तो तो सर्व त्यांनीं केला.

कोणत्याहि कारागिरीसंबंधानें इंग्रजींत ज्या दोन अर्थपूर्ण म्हणी प्रसिद्ध आहेत त्या टिळकांनीं स्वतःसंबंधानें खऱ्या करून दाखविल्या होत्या. Only a bad workman quarrels with his tools याला मराठींतील "नाचायला येईना तर म्हणे अंगण वांकडें" ही म्हण बरीच जवळ येते. नाचणारा कुशल असेल तर तो अंगणाचा वांकडेपणा किंवा कोस आपल्या कौशल्यानें काढून टाकतो. त्याप्रमाणें टिळकांनीं कोणत्याहि स्थितींत साधनांच्या कमतरतेबद्दल रडगाणें गाइलें नाहीं, तर आपल्या गुणांनीं त्यांजकडून त्यांच्या मगदुराबाहेर काम करून घेतलें. स्पार्टन इतिहासांत अशी गोष्ट आहे कीं, एकदां रणांगणावर निघतांना सेनापतीनें सैनिकांना जवळ बोलावून त्यांना आपल्या हातानें तलवारींची वांटणी करून दिली. पैकीं एकाच्या हातीं तलवार गेली ती दोन अंगुळें आंखूड होती. हें पाहून "मला तलवार आंखूड मिळाली" अशी तक्रार त्यानें केली. तेव्हां सेनापति हंसून म्हणाला, 'गड्या तलवार दोन अंगुळें आंखूड असली म्हणून काय बिघडेल? तूं इतरांपेक्षां केवळ एकच पाऊल पुढें अधिक उचलून टाक, म्हणजे पहा तुझी हीच तलवार इतरांच्या बरोबरीची किंबहुना त्यांच्याहून थोडी लांबच होईल!"

अशाच रीतीनें टिळकांनीं साधनांचा उणेपणा आपल्या कौशल्यानें भरून काढला. कारकीर्दीच्या प्रारंभीं टिळकांची गरिबी होती. तेव्हां 'एडिटरी'चा थाट तर कोठला! पण स्वतंत्र टेबलखुर्चीहि नव्हती! अशा वेळीं अंथरुणाच्या वळकटीचेंच टेबल करून त्यांनीं केसरीकरितां लेख लिहिले. पण पुढें टेबलावर लिहिलेल्या लेखांपेक्षां ते खचित कमी प्रतीचे नव्हते. पदरीं कारकून नव्हता तेव्हां टिळकांनीं, कंटाळा करीत करीत कां होईना, स्वतः हातानें लेख लिहिले. पण पुढें कारकुनाकडून, किंवा एखादे वेळीं तावडींत सांपडल्यास एम. ए. किंवा एलएल. बी. अशा श्रेष्ठ पदवीधरांकडून, स्वतः तोंडानें सांगून लिहवून घेतलेल्या लेखांपेक्षां ते पूर्वींचे लेख खचित कमी सरस नव्हते. कारकीर्दीच्या सुरुवातीला केसरी अवघ्या चार पानांचा होता म्हणून कांहीं तेव्हांचे लेख, पुढें तो ८ किंवा १२ पानांचा झाला तेव्हांच्या लेखांपेक्षां, कमी परिणामकारक होते असें नाहीं.

केसरी किंवा तदनुषंगिक इतर साधनें आपल्या कार्याला केव्हां केव्हां अपुरीं पडतात असें मनांत वाटत असलें तरी त्यांना टिळकांनीं केव्हांहि उघडपणें नांवें ठेविलीं नाहींत. त्यांची सेवा घ्यावी, त्यांचा उपयोग करून घ्यावा, व वरती त्यांची निंदा करावी असला कृतघ्नपणा टिळकांनीं केव्हांहि केला नाहीं.

हें सर्व एका म्हणीसंबंधानें झालें. पण दुसरी जी एक इंग्रजी म्हण आहे तीहि टिळकांना लागू पडते. ती अशी A Good workman makes his own tools–"तोच खरा चांगला कारागीर कीं जो आपलीं हत्यारें आपणच तयार करतो" आतां एकेकट्या धंद्याला दहावीस यंत्रें लागावीं, आणि एकेकट्या यंत्राचे पांचपन्नास भाग वेगवेगळे तयार करावे लागावे, अशा हल्लींच्या काळीं वरील म्हण अर्थातच अक्षरशः लागू होणार नाहीं. कारण हेनरी फोर्ड-सारख्या स्वावलंबी व सर्वसंपन्न कारखानदारालाहि अजून कांहीं कांहीं वस्तूं-करितां परक्यावर अवलंबून राहावें लागतें. श्रमविभाग आणि विशेषीकरण हा आधुनिक अर्थशास्त्रांतला एक नियमच होऊन राहिला आहे. तथापि हल्लींच्या काळांतसुद्धां कांहीं मर्यादेपर्यंत प्रत्येक धंदेवाला आपलीं हत्यारें व साधनें आपणच तयार करतो. आपण सुताराचेंच उदाहरण घेऊं. त्याच्या धंद्याला लागणारीं लोखंडी हत्यारें हीं कांहीं तो स्वतः बनवीत नाहीं. पण या हत्यारांच्या मुठी, रंध्याची चौकट, फूटपट्टी असले जिन्नस तो स्वतःचे स्वतः बनवितो. आपलीं हत्यारें सोयीप्रमाणें शक्य तितकीं ज्याचीं त्यानेंच बनवावीं लागतात, व सुतारा-पासून घड्याळजीपर्यंत पुष्कळसे देशी धंदेवाले तीं आज तयार करतातहि. टिळकांनीं आपल्या चळवळीचीं साधनें पुष्कळशीं आपणच निर्माण केलीं व त्यांत केसरी वर्तमानपत्र हें मुख्य होय.

साध्य किंवा ध्येय हें मात्र आपलें, आणि तें साधण्याला लागणारीं साधनें मात्र दुसऱ्याचीं, अशा स्थितींत कोणाचाहि उद्योग यशस्वी होऊं शकत नाहीं. आणि हा अनुभव टिळकांना प्रारंभापासूनच आला. डे. एज्यु. सोसायटीची काय-मची सोडून देऊन सार्वजनिक चळवळींत पडावयाचें व स्वमतप्रसार करावयाचा, हें टिळकांनीं निश्चित केल्याबरोबर, त्यांनीं पहिली गोष्ट केली ती ही कीं, छाप-खाना व वर्तमानपत्रें यांच्या वांटणींत कर्जासकट वर्तमानपत्रें आपल्या वांटणीला घेतलीं, छापखाना दुसऱ्या भागीदाराला दिला, व स्वतः जबाबदार संपादक होऊन अखत्यारीनें मतप्रसार सुरू केला. यानंतर १८९७ सालीं आर्यभूषण छापखा-

त्यानें, टिळक तुरुंगांत असतां, केसरी छापीत नाहीं असें म्हणून दगा दिला, तेव्हां टिळकांना स्वतःचा छापखाना काढण्याची सहजच इच्छा झाली.

प्रथम केसरीच्या बटवड्याची व जमाखर्चांची व्यवस्थाहि आर्यभूषणकडेच होती. पण उभयतांतील हितविरोधाचा परिणाम केसरीच्या उपयुक्ततेवर होतो असें दिसून येतांच त्यांनीं आपली स्वतंत्र कचेरी स्थापिली. केसरीच्या पुष्कळ प्रती काढाव्या लागूं लागल्या, तेव्हां छपाईचें मोठें यंत्र त्यांनीं आणिलें. आणि असलें धूड चालावयाचें म्हणून त्याला ऑईल इंजिनची जोड द्यावी लागली. पुष्कळ प्रती निघावयाच्या म्हणजे अर्थात् टाईप वरचेवर झिजावयाचा, म्हणून टिळकांनीं स्वतःची टाईप फाउंडरी काढली. आणि पुढें त्यांनीं अखंड टाईपाची योजना केली तेव्हां तर घरची स्वतंत्र फाउंडरी असणें अवश्यकच झालें. महा-युद्धानंतर स्वराज्याच्या चळवळींत केसरीची लोकप्रियता इतकी वाढली कीं, त्यांना पूर्वीचें 'डबल' फीडर यंत्रहि पुरेना. म्हणून तासाला सात–आठ हजार प्रती छापून घड्या घालून देईल असलें मोठें यंत्र आणावें लागलें. व या नव्या यंत्रावर चौकोनी रिमाचे कागद निरुपयोगी म्हणून वाटोळे रीळचे कागद आणावे लागले. आणि छपाईचें यंत्र 'रोटरी' पद्धतीचें म्हणून "स्टीरिओ" करण्याचें यंत्र जोडावें लागलें.

पण याबरोबर सांगण्याची मुद्याची गोष्ट ही कीं, अशा रीतीनें टिळक छाप-खान्याच्या उपद्व्यापांत क्रमानें पायरीपायरीनें गुंतत गेले तरी, अखेरपर्यंत ते छापखानेवाले असे केव्हांहि बनले नाहींत. आणि केवळ चळवळीकरितां वर्त-मानपत्र व केवळ वर्तमानपत्राकरितां छापखाना, ही विचारसरणी त्यांची केव्हांहि नाहींशी झाली नाहीं. एका संन्याशाची गोष्ट सांगतात कीं, उंदीर आपली वाळत घातलेली लंगोटी खातो म्हणून त्यानें मांजर पाळलें, मांजराला दूध पाहिजे म्हणून गाय ठेवली, गाईला चारा पाहिजे म्हणून शेत घेतलें, शेताला रखवाली पाहिजे म्हणून एक मुलगी नोकरीला ठेवली, आणि शेवटीं त्या मुलीच्या गुणावर मोहून त्यानें तिच्याशीं लग्न केलें व आश्रमधर्म दूषित केला. पण याच्या उलट टिळकांनीं घरचा छापखाना मोठा व समृद्ध केला तरी वर्तमानपत्राव्यतिरिक्त त्याचा कांहीं उपयोग कधींच केला नाहीं, व केसरी फाउंडरीचा साधा टाईप त्यांनीं कधींच विकावयास ठेवला नाहीं. त्यांच्या घरच्या लग्न--मुंजीच्या चिठ्याहि ते दुसऱ्या छापखान्यांतून छापवून आणीत. कारण या खासगी

उपयोगाला लागणारें सामान, वास्तविक अगदीं थोडी किंमत पाडणारें होतें तरी, त्यांनीं छापखान्यांत कधीं ठेवलेंच नाहीं. वर्तमानपत्राबरोबरच ते चार माणसें अधिक ठेवून छापखान्याचा धंदा करते तर तो अगदीं सहज होण्यासारखा होता. पण चळवळ हें ध्येय व वर्तमानपत्र हें जसें त्याचें साधन, त्याचप्रमाणें या साधनरूपी वर्तमानपत्राचें उपसाधन छापखाना इतकीच त्यांची दृष्टि होती. एरवीं छापखान्याचा दुय्यम धंदा करण्याला त्यांना काय कमी होतें ?

असो. या नव्या मनूंत मतप्रसाराच्या दृष्टीनें पाहातां, स्वतंत्र वर्तमानपत्रासारखें दुसरें परिणामकारक साधन नाहीं ही गोष्ट सामान्य माणसालाहि जर कळतें, तर ती टिळकांना उमगली नाहीं हें कसें होईल ? ती त्यांना तेव्हांच उमगली. आणि म्हणून पूर्वी सांगितल्याप्रमाणें त्यांनीं केसरी पत्र घेऊनच सार्वजनिक कार्यांत प्रवेश केला. केसरीची लोकप्रियता यापूर्वीच सिद्ध झाली होती. पण त्यांनीं तें पत्र हातीं घेतल्यापासून ती श्रेढीनें एकसारखी वाढतच गेली. केसरीच्या या लोकप्रियतेंत टिळकांच्या चळवळीची लोकप्रियता व उपयुक्तता पूर्णपणें प्रतिबिंबित झाली होती.

इतर देशांची गोष्ट कशाला ? पण हिंदुस्थानांतहि नांव घेण्यासारख्या चळवळ्या म्हणजे मतप्रसाराची आस्था बाळगणाऱ्या, प्रत्येक प्रसिद्ध पुढाऱ्यानें आजवर या दृष्टीनेंच वर्तमानपत्राचा अभिलाष केला होता. मतप्रसार धावावयाचा तर त्याला स्वार होण्याला हा कागदी घोडा अवश्य असतो. व ज्यांना हा घोडा पदरीं बाळगतां येत नाहीं ते निदान मधून मधून तो दुसऱ्याचा मागून घेतात. म्हणजे दुसऱ्याच्या वर्तमानपत्राचा आश्रय करून मतप्रचार करतात. मनुष्य कितीहि उद्योगी, चपळ, बोलतांना न दमणारा व मोठ्या आवाजाचा असला तरी व्याख्यानें, प्रवचनें देऊन किंवा शाळा काढून शिष्य पढवून तो किती लोकांना शिकविणार ? तेंच केसरीसारखें वर्तमानपत्र हातीं असल्यास दर आठवड्यास हजारों लाखों लोकांशीं मनमुराद अनेक विषयांवर बोलतां येतें. या गोष्टीचें स्वारस्य टिळकांनीं ओळखलें असल्यामुळें सर्व चळवळी करतांना त्यांनीं केसरीच्या संगोपनाकडचें व संवर्धनाकडचें लक्ष कधींहि ढळूं दिलें नाहीं.

आम्हीं केसरी आठवड्यांतून दोन वेळां काढण्याचें ठरविल्यामुळें व केसरीचा आजचा हा एकावन्नावा वाढदिवस उजाडलेला पाहून ज्यांना विषाद वाटेल असे कित्येक लोक आहेत हें आम्ही जाणून आहों. कारण टिळक निवर्तल्यापासून

त्यांची एकच अपेक्षा होती. ती ही कीं, आतां तरी केसरी बुडावा. टिळकांच्या ह्यातींत केळकर दहा वर्षे केसरीचे संपादक होते, तथापि त्याला तेव्हां टिळकांचाच आधार होता म्हणून तो चालला व उत्कर्ष पावला हें सरळच आहे. ते निवर्तल्यावरहि कांहीं दिवस लोकांनीं केवळ टिळकांच्या स्मरणार्थ आपला उदार आश्रय चालू ठेवला असेंहि कोणास म्हणतां येण्यासारखें होतें. कारण आकाशांतून तारका मूळ स्थानापासून भ्रष्ट व नष्ट झाल्या तरी त्यांचा पृथ्वीवरील प्रकाश कांहीं काळ टिकतोच. पण पुढें असहकारितेच्या धकाधकीचा मामला सुरू झाला तेव्हां टिळकांचा आधार तुटलेल्या केसरीच्या शत्रूंना सोन्याचीच संधि प्राप्त झाली असें वाटलें, व स्वतः त्यांनींहि त्याचा पाडाव करण्याला शक्य तितका हातभार लाविला. कोणी राजकारणांत केसरी मवाळ बनला असें म्हणून, कोणी त्याला म. गांधींचें शत्रुपद देऊन, कोणी तो खादीचा विरोधी असें म्हणून, कोणी प्रांतवार किंवा भाषावार विरोधी अभिमान जागृत करून, कोणी तो ब्राह्मणपक्षाचा असें ठरवून, तर कोणी उलटपक्षीं तो सामाजिक सुधारणांचा पुरस्कार करतो म्हणून—तात्पर्य, ज्याला जें कारण सुचलें तें त्यानें पुढें करून केसरीचा पाडाव करण्याचा प्रयत्न शिकस्तीनें केला. पण या खुळ्यांना हें कळेना कीं, एक अकालीं मेला तरी त्याचें उरलें आयुष्य दुसऱ्याला मिळत नाहीं! मग केसरी जाग्यावर जिवंत आहे तोंपर्यंत त्याचें आयुष्य इतर कोणाच्या भरतींत कसें पडणार? ज्याला त्याला आपल्या स्वतःच्या गुणाप्रमाणेंच या जगांत स्थान मिळतें. यामुळें केसरीची निंदा करकरून शिणून भागून ही मंडळी आतां हताश होऊन बसली आहेत!

केसरीचा खप कमी झाला, वर्गणीदार कमी झाले, अशा विविध—वार्ता कोणी व्यवसायबंधू उठवितो. केसरी अर्धसाप्ताहिक झाला तेव्हां तो मरणार, कारण दिवा मालवतांना मोठा होतो, असें अशुभ भविष्य वर्तवून कित्येक काशीकर पंडितांनीं आपल्या द्वेषाच्या लहरींचा उपशम केला. कोणी ‘केसरी’ या नांवानें सहज सुचणाऱ्या बिचाऱ्या शब्दावर ‘ग्राम्य’ कोट्या करून स्वतःलाच लोकांकडून ग्राम्य ठरवून घेतलें. स्वतःच्या शीलाला व संस्कृतीला शोभण्यासारखीं कुरूप व बेढब चित्रें काढून कित्येक कुडबुड्या जोशांनीं राजकारणांत नसती लुडबुड केली. या सर्वांच्या दाताओठांची किंबहुना ओठा—मनगटांची आम्हांला कीव येते. पण आम्ही तरी काय करणार? त्यांच्या इच्छेप्रमाणें टिळकांच्या

मृत्यूनंतर केसरी हा एक दोन वर्षांत मृत्युपंथाला लागावयाचा तो न लागतां, अजून जिवंत आहे, नव्हे आपल्यापरी उत्कर्ष पावत आहे, शत्रूंच्या कंबरेंत लाथा घालीत आहे, व इतक्यानेंच न थांबतां अर्धसाप्ताहिक बनून एक्कावन्नाव्या वर्षांत पुढें पाऊल टाकीत आहे. याचें कारण, केसरीच्या शत्रूंचा द्वेष व मित्रांची सहानुभूति याच नुसत्या दोन शक्ती घेतल्या तरी, त्यांत ही दुसरी शक्तीच अधिक प्रभावी ठरली. व या सर्वांना फिरून टिळकांच्या पुण्याईचा पाठिंबा मार्गे आधार देतच आहे हें होय. आपले वर्गणीदार किंवा वाचक किती आहेत हें आंकडेबंद जाहिर करण्याचा शिरस्ता नाहीं म्हणून तो संभाळून आम्ही इतकेंच सांगतों कीं, कित्येक चिल्लर निंदक वर्तमानपत्रांच्या दसपट वीसपटपर्यंत, आणि त्यांतल्यात्यांत ज्यांना आपण फार पुढारलों असें वाटत आहे त्यांच्या तिप्पट चौपट केसरीचा खप आज होत आहे. प्रसंग पडल्यास हें सहज सिद्ध करून देतां येण्यासारखें आहे. सगळ्या हिंदुस्थानांत खपाच्या दृष्टीनें आजहि केसरीचा नंबर पहिल्या दोहींतिहींत येईल.

पण प्रत्यंतरानेंच कित्येक वेळां यथार्थ ज्ञान होत असतें म्हणून दुसऱ्याहि एका रीतीनें हेंच सांगणें प्राप्त आहे. गेल्या दहा वर्षांत घडलेल्या गोष्टी पाहिल्या म्हणजे टिळकांची पुण्याईच अलौकिक खरी असें म्हटल्यावांचून राहावत नाहीं. द्वेष, विरोध व अडचणी यांना लोकमान्यांनीं जिवंतपणीं सतत तोंड दिलें, विरोधाला पचनीं पाडलें, द्वेषाची धार बोथट केली, व अडचणींना त्यांनीं बाजूस सारलें. मरणोत्तरहि त्यांच्या यशाला अशाच प्रकारें कमीपणा आणण्याचे प्रयत्न कित्येकांचे झाले. पण टिळकांची पुण्याई अखेर त्यांना पुरून उरली असेंच गेल्या दहा वर्षांचा अनुभव सांगतो. पुणें, नागपूर, अहमदाबाद, कराची येथें स्वपर-विरोधाला बाजूस सारून त्यांचे पुतळे उभारले गेले. त्यांनीं शिक्षण घेतलेल्या संस्थेंत व त्यांनीं काढलेल्या शिक्षण-संस्थेंत त्यांचीं स्मारकें उभारलीं गेलीं. त्यांचीं लहान इंग्रजी मराठी चरित्रें प्रसिद्ध झालींच. पण विस्तृत असें त्यांचें चरित्र, आठवणीसारखे अपूर्व असे तीन ग्रंथ, त्यांचे अनेक लेखसंग्रह, सूक्तिसंग्रह, त्यांच्या धर्मविषयक मतावरील निबंध, प्रस्तुत चरित्रग्रंथाचा इंग्रजी व हिंदी पहिला भाग, हीं प्रसिद्ध झालीं. याशिवाय त्यांनीं आपल्या हयातींत प्रसिद्ध केलेल्या ग्रंथांच्या व त्यांच्या भाषांतराच्याहि आवृत्त्या निघाल्या. पुण्यास त्यांचें स्मारक मंदिर स्थापन झालें, आणि मुंबईच्या चौपाटीवरील पुतळाहि लव-

करच उभारला जाईल. धार्मिकदृष्ट्या त्यांच्या पुण्यतिथीच्या उत्सवाची स्थिर-निधीनें चिरकालिक व्यवस्थाहि जमत आली आहे. त्यांच्या गांवोगांवच्या लहानसहान स्मारकाची यादी तर फारच मोठी होईल. त्यांची रायगड स्मारकाची योजना पूर्ण झाली. त्यांनीं योजलेला 'करणग्रंथ' पुरा होऊन त्यांच्या योजनेनुसार पंचांगें काढण्याची व्यवस्था झाली. कर्मयोगाच्या तत्त्वज्ञानाच्या प्रसाराची व्यवस्था झाली. त्यांच्या सामाजिक व हिंदुसमाजविषयक मतांची परिणति आज हिंदुसंघटनेच्या रूपानें महाराष्ट्रांत दृग्गोचर झाली आहे. आणि राजकारणांतहि त्यांच्या अनेक धोरणांची उपयुक्तता लोकांना अनुभवानें पटली आहे. असें अलौकिक यश किंवा पुण्याई फारच थोड्या पुरुषांना लाभते.

याच न्यायानें गेल्या दहा वर्षांत अनेक अडचणींना, विरोधांना व उच्छेदक प्रयत्नांनाहि न जुमानतां केसरीची उन्नतीच होत गेली. आणि लो. टिळकांच्या संकल्पाप्रमाणें केसरी आठवड्यांतून दोनदां वाचकांच्या भेटीला जाण्याचा योग आला ही आम्हीं टिळकांची पुण्याईच का मानूं नये ! महात्मा गांधींसारखा पुरुष अगदीं तावून सुलाखून योग्यता पाहून माणसांचा संग्रह करणारा; पण तो तुरुंगांत गेला असतां तेवढ्या अवधींत त्यांच्या वर्तमानपत्राचे तीन संपादक झाले, व त्याचा खप पंचवीस हजारांच्याहि वर होता तो तीन हजारांवर आला हें स्वतः म. गांधींनींच एकदां जाहीर केलें होतें ! हा तुलनात्मक विचार मांडण्याचें कारण हेंच कीं, टिळकांची पुण्याई आम्ही कां व कोणत्या दृष्टीनें म्हणतों हें ध्यानांत यावें. आणि टिळकांचें स्मरण ठेवून, प्रामाणिक तत्त्वनिष्ठेनें, आपल्यांत असेल ती शक्ति व कर्तृत्व या कामांत वेंचून, टिळकांनीं निर्माण केलेल्या या ' केसरी ' पत्राला व ' केसरी ' संस्थेला चिरस्थायी, उपयुक्त व संग्राहक स्वरूप देण्याचा जसा गेलीं दहा वर्षें आमचेकडून प्रयत्न होत आला आहे, तसाच तो पुढेंहि चालू राहील. केसरीच्या ज्युबिलीच्या आनंदांत आमच्याप्रमाणें आमचे हजारों हितचिंतक व टिळकांचे भक्त, अनुयायी, चहाते हेहि सहभागी असल्यामुळें, आमच्या मनांत या प्रसंगीं आलेल्या विचारासारखेच विचार त्यांच्याहि मनांत उद्भूत होत असतील यांत शंकाच नाहीं. कित्येकांनीं ते आम्हांस मित्रभावानें लिहूनहि कळविले आहेत. अर्थात् " बोधयंतः परस्परम् " याच न्यायानें आम्हीं ते आजच्या प्रसंगास उचित व अनुरूप म्हणून व्यक्त केले आहेत.

## १८ केसरी टाईप फाउण्डरी

सन १८८८ च्या सुमारास केसरीचे वर्गणीदार सुमारें पांच हजारांपर्यंत वाढले होते. छापखान्यास लागणारें टाईप व इतर सामान वरचेवर बाहेरून विकत आणण्यास खर्च पडे. याकरितां केसरीला छापखान्याबरोबर स्वतःचे मालकीची टाईप फाउण्डरीहि असावी असें वाटूं लागलें. म्हणून आर्यभूषण छापखान्यांत कै. सहदेवराव पिंपळे, टाईप पंचमेकर, या अनुभवशीर व इमानी कामगारास ठेवून, त्यांस वेळोवेळीं टाईपसंबंधीं व फाउण्डरीसंबंधीं माहिती देऊन, लो. टिळकांनीं छापखान्याची फाउण्डरी सुरू करून चांगली नांवारूपास आणली. १८९१ सालीं केसरीच्या स्वरूपांत एक क्रांति झाली. ती म्हणजे पृष्ठसंख्या तितकीच कायम राहिली परंतु मोठ्या टाइपाऐवजीं लहान टाईप घातला. हाच लहान टाईप ( म्हणजे गणपत कृष्णाजीचा पायका टाईप ) केसरीकरितां प्रथम पाडला; व अजूनहि आर्यभूषण फौउंडरीमध्यें 'केसरी पायका' या म्हटल्यास हाच गणपत कृष्णाजीचा टाईप पुढें करतील. पुढें कांहीं काळानें कारखान्याचें धडे-वांटप होऊन आर्यभूषण छापखान्याची मालकी कै. वासुदेवराव केळकर व कै. हरिपंत गोखले यांचेकडे गेली; व केसरी–मराठा वर्तमानपत्रें व त्यांवरील ७॥ हजार रुपयांचें कर्ज लो. टिळकांचे वांटणीस आले; अशा रीतिनें टाईप फाउंडरी वांटपांत दुसऱ्याच्या मालकीची झाल्यामुळें, सन १९०५ सालीं, केसरी कचेरी गायकवाडवाड्यांत आल्यावर, टिळकांनीं खास केसरीकरतां फाउंडरीची पुन्हां जुळवाजुळव करण्यास घेतली, व विलायतेस टाईप कास्टिंग मशीन व तदंगभूत लागणाऱ्या सामानाची ऑर्डर दिली. केसरी ज्या टाइपांत अगोदर छापत होता तोच पायका टाईप आपल्याला गणपत कृष्णाजी यांचेकडून आणावा असें ठरलें; व त्यांचेच हातचा ग्रेटप्रायमर, ग्रेटप्रायमर जब्रा, वन्निक, थ्रीलाईन पायका अशा हेडिंग टाइपांकरितां मेट्रिसा ठोकून आणल्या. विलायतेहून टाईप कास्टिंग मशीन येईपर्यंत टिळकांनीं दुसरी एक गोष्ट केली. ती अशी; मुंबई येथील निर्णय-सागर प्रेसमधील कै. राणोजी रावजी आरू, टाईप फाउंडर, यांचेसारखा वळण-दार टाईप करणारा या हिंदुस्थानांत कोणी नव्हता असें म्हणतात. निर्णयसाग-रचा सर्व टाईप त्यांचेच हातचा आहे. तेव्हां निर्णयसागर छापखान्याचे मालक तुकाराम जावजी यांस 'आमचे फाउंडरींत पाडण्याकरितां आपलेसारखा टाईप द्याल का' म्हणून विचारण्यास लोकमान्य मुंबईस गेले. वास्तविक निर्णयसाग-

रचे मालक अशा मेट्रिसा दुसऱ्या कोणासच देत नाहींत. परंतु त्यांनीं केसरी-करितां म्हणून केसरी फाउंडरींत टाईप पाडण्यासाठीं त्यांचेच हातून मेट्रिसा ठोकून उदार मनानें दिल्या हे त्यांचे केसरीवर फार उपकार होत. सहा महिन्यांनीं कास्टिंग मशीन आल्यावर, आर्यभूषण टाईप फौंडरीचे मुख्य कामगार कै. सह-देव दाजी पिंपळे यांस टिळकांनीं मागवून घेतलें. पहिल्या प्रथम त्यांनीं निर्णय-सागरच्या पायका टाइपाच्या मेट्रिसा 'फीट' करून केसरीकरितां १००० पौंड टाईप १९०७ च्या जुलै महिन्यांत दिला. त्यामुळें विक्रीचा पायका टाईप बाहे-रून घेण्याचा त्यापुढें बंद करतां आला. नंतर हेडिंग टाईपांकरितां मोल्डही येथेंच तयार केले, व पहिल्याचप्रमाणें मेट्रिसा फिट् करून एकेक बाहेरचा इतरहि टाईप घेण्याचें बंद केलें. पुढें पायका जब्रा याची अतिशय उणीव भासूं लागली तेव्हां, पंचाच्या मेट्रिसा ठोकून घेणें खर्चाच्या दृष्टीनें अधिक म्हणून टिळकांनीं बॅटरी व त्यास लागणारे इतर सामानाची तयारी केली व आर्यभूषणचा पायका जब्रा नं. १ बॅटरीवर लावून केसरीकरितां पाडून घेतला.

मराठ्याकरितां इंग्रजी लॉंग प्रायमर हाही, बॅटरीवर मेट्रिसा काढून, १९११ ला टाईप पाडून घेतला. केसरीकरितां १९०१ सालीं आणलेल्या टूफीडर मशिनवर सहा सहा महिन्यांनीं टाईप बदलावा लागत असे. तेव्हां आलटून पालटून एकदां गणपत कृष्णाजीचा पायका दिला तर दुसरे सहामाहीस निर्णयसागरचा टाईप दिला जाई. बाकी हेडिंग टाईप तोच नवीन पुनः पाडण्यांत येई. कै. सहदे-वराव पिंपळे यांचेकडून केसरीकरितां त्यांचे घरगुती पंच लॉंग प्रायमर साधा नं. २ व बर्जेस साधा असे विकत घेऊन मेट्रिसा ठोकून टाईप तयार केले. विलाय-तेहून आणलेल्या एका मशीनवर २ पॉइंटपासून २४ पॉइंटपर्यंत बरींच वर्षें टाइ-पाचें काम झालें. थ्रीलाईन व फोरलाईन हे हॅन्डमोल्डवर पाडून घेतले. फक्त पांच व सहालाईन तेवढे अजून बाहेरचा विक्रीचा घेतला जाई. परंतु १९२६ ला मोठी कास्टिंग मशीन विकत घेतली व हल्लीं त्यावर मोठे हेडिंग टाईप पाडले जातात. सध्यां केसरीकरितां मराठी बर्जेस, बर्जेस जब्रा, लॉंगप्रायमर नं. १ व नं. २, लॉंगप्रायमर जब्रा नं. १, पायका निर्णयसागरचा, गणपत कृष्णाजीचा पायका, पायका जब्रा नं. १ व नं. २ चा, इंग्लिश बॉडी, ग्रेटप्रायमर, ग्रेटप्रायमर जब्रा, वन्निक नं. १ व नं. २ चा, टूलाइन, थ्रीलाईन, फोरलाईन, पांचलाईन व सहालाईन म्हणजे एकंदर १९ निरनिराळे जातींचे फौंड तयार

आहेत. मराठ्याकरितां इंग्रजी बर्जेस, लाँगप्रायमर, लाँगप्रायमर ब्लॉक, पायका, पायका ब्लॉक, टूलाईन वगैरे फौंड तयार आहेत. ह्याशिवाय जाहिरातीकरितां थोड्याफार बॉर्डरी व पंचांगाकरितां पंच करवून मेट्रिसा ठोकून टाईप तयार केला आहे. टाईप फाउंडरींत तयार होणारें इतर सामान म्हणजे लेडा, कोटेशन्स, फर्नीचर वगैरे वगैरे सर्व येथेंच तयार करतों. सध्यां फाउंडरीमध्यें दोन लहान कास्टिंग मशीन्स म्हणजे २ पॉइंटपासून ते १८ पाइंटपर्यंत पाडणारीं, व एक मोठी २४ ते ७२ पॉइंटपर्यंत कोटेशनसह पाडणारी, अशा तीन कास्टिंग मशिन्स चालू आहेत. आतां अजून मध्यम मशीनची म्हणजे १८ पॉइंटपासून थ्रीलाईन पडेल अशा मशीनची जरूरी भासूं लागली आहे. आज केसरीकरितां बाहेरील विक्रीचा टाईप आणण्याची गरज उरली नाहीं असें म्हणण्यास कांहींएक हरकत वाटत नाहीं.

लो. टिळकांचें ह्या टाईप फाउंडरीवर किती ममत्व होतें याचें एकच प्रत्यंतर म्हणून श्री. बाबासाहेब विद्वांस यांना मंडालेहून १९०९ चे जानेवारींत लिहिलेल्या टिळकांच्या पत्रांतील उतारा देतों:–'आपली टाईप फाउंडरी वाड्याबाहेर कोठें तरी दुसऱ्या एखाद्या घरीं ठेवावी, तिचे हिशेब स्वतंत्र ठेवावे, प्रेस ॲक्टामुळें असें करणें अगदीं अवश्य आहे'! म्हणजे टाईप फाउंडरीकरितां केलेले परिश्रम, व गणपत कृष्णाजी व निर्णयसागरचे मालकांस आपण टाकलेले शब्द, हे फुकट जाऊं नयेत याविषयीं टिळकांना पराकाष्ठेची चिंता वाटे.

केसरी वर्तमानपत्राचा मजकूर थोड्या वेळांत लाइनो अगर मोनो टाइपाप्रमाणें कसा कंपोज करतां येईल व या यंत्राचा मराठी टाइपाकडे उपयोग करण्यास टाइपांत काय फेरबदल करावा लागेल ह्या गोष्टींकडे लो. टिळकांचें लक्ष सन १९०४ मध्यें लागलें होतें. त्या वेळचे आर्यभूषण फाउंडरीचे मुख्य कै. सहदेवराव पिंपळे यांचेकडून अर्ध्या अक्षरांचे पंच करवून बरींच अक्षरें कान्यावर घेतलीं, व त्याचा टाईप पाडून तो केसरींत १९०४ डिसेंबरमध्यें घालूनहि पाहिला. मुंबईस निर्णयसागरचे मालकांस सांगून कै. राणोजी आरू यांचेकडून हाच वळणदार टाईप तयार करविला. फिरून त्याची सुधारणा १९१४ सालीं लोकमान्यांच्याच देखरेखीखालीं झाली. मोनो मशीनवर केसरीचे टाईप जुळविण्याची व्यवस्था परतंत्र असल्यामुळें ती लोकमान्यांना आपल्या हयातींत अंमलांत आणतां आली नाहीं! पण त्यानंतर आणखी त्यांत सुधारणा १९२६ पासून सुरू आहे. या अखंड टाइपाची १९२६ मध्यें सुधारणा केली त्याचे पंच कै. सहदेवराव पिंपळे

यांचे चिरंजीव रा. नारायणराव पिंपळे यांनींच तयार करून दिले. तसेंच इंग्लिश बॉडी हा सर्व फाउंड यांचेच हातचा आहे; व केव्हांहि किरकोळ लागणारे इतर पंच ते आपला जुना वडिलांचा संबंध लक्षांत ठेवून केसरीला उदार मनानें तयार करून देतात हें त्यांस भूषणावह आहे. सध्यां ते आपल्या वडिलांचे जागेवर म्हणजे आर्यभूषण टाईप फाउंडरीमध्यें पंचमेकर म्हणूनच आहेत. असो; हल्लींच्या या प्रसंगीं, ज्यांनीं ज्यांनीं केसरी फाउंडरीला हस्तेंपरहस्तें मदत केली त्यांना कृतज्ञताबुद्धीनें प्रणाम करून ही माहिती संपवितों.

---

## १९ केसरीट्रस्टच्या दाव्याचा निकाल

( न्यायाधीशांच्या निकालाचीं कारणें )

प्रथम वादींची फिर्याद, प्रतिवादींची कैफीयत व त्यावरून निघणारे मुद्दे यांचा रीतसर निर्देशकरून कोर्ट म्हणतें:—" चालू दावा खूप जोरानें लढविण्याचा प्रयत्न रामभाऊ व श्रीधरपंत यांनीं केला. पुढें श्रीधरपंत यांनीं ता. २५ मे १९२८ रोजीं आत्महत्या केली. यामुळें त्यांच्या अज्ञान मुलाचें नांव त्यांचे जागीं प्रतिवादी पक्षकार म्हणून दाखल करण्यांत आलें व रामभाऊ यांस सदर मुलांचा पालनकर्ता म्हणून नेमण्यांत आलें. रामभाऊ यांनीं श्रीधरपंत यांच्या मृत्यूनंतरहि उभय प्रतिवादींतर्फें अतिशय चुरशीनें दावा लढविला. गणपत्युत्सवासंबंधानें वादींचा वहिवाटीचा हक्क शाबीद धरून, त्यांना प्रतिवादींनीं हरकत करूं नये अशी कोर्टानें प्रतिवादींना ताकीद दिली. त्याविरुद्ध रामभाऊ यांनीं हायकोर्टाकडे अपीलहि केलें पण तें फुकट गेलें. नंतर समेटाचीं बोलणीं सुरू झालीं. परंतु अखेर समेट झालाच नाहीं. शेवटीं रामभाऊ यांनीं अकस्मात् कोर्टाला अर्ज देऊन कळविलें कीं, आपणाला प्रतिवादी म्हणून हा दावा चालवावयाचा नाहीं. वाटल्यास त्याचा एकतर्फी निकाल व्हावा. आपल्या बंधूच्या मृत्यूमुळें आपल्या मनःस्थितींत फरक पडला, असें कारण रामभाऊ यांनीं आपल्या अर्जांत लिहिलें खरें, पण तें कारण कितपत खरें आहे याविषयीं मला जबर दस्त शंका आहे. कसेंहि असो. प्रतिवादींनीं पुरावा दिला नाहीं ही दुर्दैवाची गोष्ट होय. कारण यांत अज्ञानाचा हितसंबंध येत होता, परंतु आहे त्या पुराव्यावरून निकाल देणें मला भाग आहे.

दाव्याची आकारणी बरोबर केलेली नाहीं या प्रतिवादींच्या प्राथमिक तक्रारींत अर्थ नाहीं. किंबहुना दाव्यांतील मूळ मिळकतीच्या किंमतीला अनुसरून

वकीलफीकरितां तरी, वादींना चढी आकारणी करतां आली असती; व ज्या अर्थी फिर्यादीचा निकाल त्यांना आपल्यासारखा होईल असें वाटत होतें व तसा तो झालाहि त्या अर्थी ही आकारणी कमी लावण्यांत त्यांना आपलें नुकसान आहे असें दिसत असतांहि, त्यांनीं ती उलट कमीच लावली, हें खरोखर लक्षांत घेण्यासारखें आहे. दाव्यांचीं कारणें वेगवेगळ्या स्वरूपाचीं असतां तीं फिर्यादींत एकत्र मांडलीं या प्रतिवादींच्या तक्रारींतहि अर्थ नाहीं. ट्रस्टडीड, भाडेचिठ्ठी व कै. टिळकांचें मृत्युपत्र या दस्तऐवजांवरच वादींचे विवादित हक्क व त्यांनीं मागितलेल्या ताकिदी अवलंबून होत्या, व हे कागद शाबीत झाले आहेत.

प्रतिवादींची मुख्य तक्रार अशी कीं, ट्रस्टडीड, भाडेचिठ्ठी वगैरे कागद वादींनीं प्रतिवादींपासून, त्यांची भलती समजूत करून देऊन व त्यांच्यावर गैरशिस्त वजन पाडून, करून घेतले. परंतु स्वतः टिळकांचेच जांवई नाशिकचे वकील विश्वनाथपंत केतकर यांच्यासमक्ष हे सर्व कागदपत्र झाले; व त्यांत गैरसमजुतीचा किंवा गैरशिस्त वजनाचा कांहींही भाग नव्हता असें त्यांच्या साक्षीवरून व वादी नं. २ विद्वांस यांच्या साक्षीवरून दिसून येतें. टिळकांच्या मृत्यूनंतर सोळाव्या दिवशीं कांहीं कागद झाले ही गोष्ट खरी. परंतु ट्रस्टडीड व भाडेचिठ्ठी हे दोनही कागद प्रतिवादींनीं स्वतः रजिस्ट्रारपुढें जाऊन कबूल करून नोंदवून दिले ! भाडेचिठ्ठी तर टिळकांच्या मृत्यूनंतर पुष्कळ महिन्यांनीं झाली व रामभाऊ टिळक यांनींच स्वतः ती रजिस्ट्रारपुढें नोंदण्याकरितां दाखल केली. शिवाय अनेक वर्षेपर्यंत वादी हे भाडेकरी या नात्यानें त्यांजकडे असलेल्या वाड्याचें भाडें रीतसर देत असून, प्रतिवादी तें भाडें आजवर बिनतक्रार घेत आले आहेत. तसेंच प्रतिवादींनीं करून दिलेल्या ट्रस्टडीडनंतर, बऱ्याच काळपर्यंत व बऱ्याच काळानंतरहि ट्रस्टडीड अन्वयें प्रतिवादींना मिळणाऱ्या रकमा प्रतिवादी खुशाल घेत आले आहेत. म्हणून या मुद्याचा निकाल प्रतिवादींविरुद्धच केला पाहिजे. ही भाडेचिठ्ठी अनियमित मुदतीची आहे. आणि आजचे वादी व त्यांचे जागीं पुढें येणारे इतर ट्रस्टी यांना भाडेचिठ्ठींत नमूद केलेला वाड्याचा भाग सर्वस्वीं आपल्या ताब्यांत ठेवण्याचा हक्क आहे. त्यांनीं फक्त प्रतिवादींना महिना शंभर रु. भाडें दिलें म्हणजे संपलें ट्रस्टींनीं आपल्या ताब्यांतील इमारतींत नवें जुनें केलें किंवा त्याचें स्वरूप बदललें किंवा त्या वाढविल्या तरी भाड्याची रक्कम वाढवावयाची नाहीं. घरपट्टी वगैरे सर्व देणें, दुरुस्ती ठवणें हीं सर्व कामें ट्रस्टींच्या जबाबदारीचींच आहेत. वादी यांनीं गाय-

कवाडवाड्याच्या मुख्य दरवाजांतून आपल्या घरांत सरळ वाटेनें जावें. ट्रॅन्स्फर ऑफ प्रॉपर्टी ॲक्टाच्या १०८ व्या कलमाप्रमाणें ट्रस्टींकडे भाड्यानें असलेल्या जागेंत मालक या नात्यानें प्रतिवादींना कांहीं ठराविक पद्धतीनें व योग्य वेळींच जातां येईल, परंतु वादी ट्रस्टी यांच्या ताब्याला, वहिवाटीला, भोगवट्याला प्रतिवादींना हरकत करतां येणार नाहीं, अडथळा करतां येणार नाहीं, किंवा ट्रस्टी आपल्या जागेंत करीत असलेल्या कामाला किंवा त्यांच्या नोकरांना कोणत्याहि प्रकारें व्यत्यय करण्याचा अधिकार प्रतिवादींना नाहीं. या जागेंत काम करणारे नोकर हे वादी ट्रस्टी यांचे नोकर आहेत, प्रतिवादींचे नाहींत. प्रतिवादींना वादींकडून भाडें घेण्यापलीकडे दुसरा कोणताहि हक्क नाहीं.

वादी ट्रस्टी यांच्या वहिवाटीला प्रतिवादी टिळकबंधु यांनीं ज्या हरकती व आगळिकी केल्या असें फिर्यादीअर्जांत लिहिलें आहे त्या सर्व पुराव्यानें रीतसर शाबीत झाल्या आहेत. " नवीन इमारत बांधण्याचें काम ट्रस्टींनीं काढलें त्याला आपण हरकत केली त्याचें कारण वादी यांना इमारत बांधण्याचा हक्क नव्हता, अशी तक्रार प्रतिवादींनीं सांगितली आहे. परंतु तींत कांहीं अर्थ नाहीं. कारण विद्यमान इमारतींना जोडून नव्या इमारती बांधण्याचा अधिकार भाडेचिठ्ठीनें वादी ट्रस्टी यांना दिलेला आहे. आतां वाड्यांतील मोकळी जागा नवीन इमारतींनें किती अडवावी, हा काय तो प्रश्न असूं शकेल. म्हणजे सगळी मोकळी जागा इमारतींनीं अडवितां येणार नाहीं, तर कांहीं वाजवी मोकळी जागा वादींनीं सोडली पाहिजे. इतकेंच फार तर प्रतिवादींना म्हणतां येईल, याहून अधिक म्हणतां येणार नाहीं. मोकळ्या जागेंत वादी यांनीं पूर्वीं कागद ठेवण्याकरितां एक पत्र्याची इमारत बांधली ती काढून टाकण्याविषयीं प्रतिवादींनीं वादींवर उलट फिर्याद केली होती, पण ती फिर्याद त्यांची त्यांनींच काढून घेतली.

वादी ट्रस्टी यांच्या आवारांतील पायखान्यासंबंधानें प्रतिवादी यांस कोणत्याहि प्रकारचे हक्क नाहींत. ट्रस्टींकडील मोकळ्या जागेंत आपलें कोणतेंहि सामान टाकण्याचा किंवा ठेवण्याचा अधिकार प्रतिवादींना नाहीं. म्हणून हल्लीं त्यांनीं सदर जागेंत जें आपलें सामान ठेवलें असेल तें त्यांचें त्यांनीं काढून न्यावें, किंवा तसें न झाल्यास वादी यांनीं कोर्टामार्फत तें काढवून त्याचा खर्च प्रतिवादींकडून घ्यावा. वादी-ट्रस्टींच्या भरयाच्या हातून रामभाऊ टिळक यांनीं किल्ल्या काढून घेतल्या, वाटेंतील फरशी काढली, वगैरे गोष्टी त्यांनीं स्वतःच

कबूल केल्या आहेत. पण तसें करण्याचा त्यांना अधिकार नव्हता. वाड्याचा मुख्य दरवाजा ट्रस्टींकडे असलेल्या भागांत आहे. यामुळें तो दरवाजा लावणें, कुलूप घालणें, वगैरे गोष्टी ट्रस्टींना करणें अवश्य आहे. दारावरील भय्या हाहि त्यांचाच नोकर आहे. म्हणून प्रतिवादींना या दरवाजांतून स्वतःच्या हक्कानें असें सकाळीं ६ वाजण्यापासून रात्रीं ९ वाजेपर्यंत वावरतां येईल. त्यानंतर जरूर पडल्यास क्वचित् प्रसंगीं भय्याला हाक मारून त्यानें दरवाजा उघडल्यास प्रतिवादींनीं आंत जावें. तात्पर्य, ट्रस्टींचे हक्क व अधिकार वर दर्शविल्याप्रमाणें असल्यामुळें त्यांना कोणत्याही तऱ्हेनें बाध करूं नये अशी निरंतरची ताकीद कोर्ट प्रतिवादींना देत आहे. प्रतिवादी रामभाऊ टिळक यांना तर ती ताकीद सहजच देतां येते. परंतु हल्लीं प्रतिवादी नं. २ श्रीधरपंत यांचे जागीं त्यांचा अज्ञान मुलगा आहे तरी अज्ञानाविरुद्धहि अशी ताकीद देतां येते. शिवाय अशी ताकीद देऊन हें प्रकरण निकालांत न काढलें, तर अज्ञानाचे पालनकर्ते म्हणून उद्यां स्वतः रामभाऊ टिळक हेच किंवा दुसरे कोणी पुढें येऊन वादींना हरकत करूं लागतील व मग ट्रस्टींना फिरून पहिल्यापासून हें भांडण कोर्टांत भांडावें लागेल. परंतु तसें होऊं देणें योग्य नाहीं. त्यांतल्या त्यांतच हें कायमचें ठरवून घेतलें पाहिजे. म्हणून रामभाऊ टिळक व श्रीधरपंतांचा अज्ञान मुलगा या दोघांच्या विरुद्ध ही ताकीद समजावी. गणपत्युत्सवासंबंधानें या कोर्टानें रामभाऊ टिळक यांना गतवर्षी ताकीद दिली होती. ती हायकोर्टापर्यंत जाऊनहि कायम झाली आहे. शिवाय हा उत्सव-प्रसंग दरवर्षी येणारा आहे म्हणून आतां ताकीद कायम स्वरूपांत देण्यांत येत आहे. तसेंच वाड्याच्या दरवाज्याला लावलेला कडी-कोयंडा काढणें, दिंडी उघडणें वगैरे कोणत्याहि गोष्टी प्रतिवादींनीं करूं नयेत."

---

## २० टिळक पर्स-फंडाची परतफेड

### ( केसरीची तीन लक्ष रुपयांची देणगी )

ट्रस्टडीड शके १८५५ प्रमोदनाम संवत्सरे मिति श्रावण शुद्ध अष्टमी रोज शुक्रवार तारीख १ माहे ऑगस्ट सन १९३० इसवी ते दिवशीं ट्रस्टडीड लिहून ठेवणार खालीं सही करणारः—

**( १ ) नरसिंह चिंतामण केळकर, जात ब्राह्मण, वय ५८, ट्रस्टी केसरी मराठा संस्था, राहणार पुणें, पेठ सदाशिव**

आणि

**( २ ) धोंडो वासुदेव विद्वांस, जात ब्राह्मण, वय ६३, ट्रस्टी केसरी मराठा संस्था, राहणार पुणें, पेठ नारायण**

कारणें ट्रस्टडीड लिहून ठेवतों ऐसाजेः—

१ आम्ही उभयतां केसरी–मराठा संस्थेचें पहिले व विद्यमान ट्रस्टी आहों. सदर संस्थेचें ट्रस्टडीड मूळ तारीख १६ माहे ऑगस्ट सन १९२० रोजीं झालें आहे. त्यांत लिहिल्याप्रमाणें आजतागायत आम्ही सदर संस्थेची व्यवस्था व वहिवाट ट्रस्टी या नात्यानें करीत आलों आहों. आणि त्या ट्रस्टच्या एका उद्देशाला अनुसरूनच हल्लीं हें प्रस्तुतचें स्ट्रस्टडीड आम्ही करून ठेवीत आहों. मूळ ट्रस्टला हल्लींचा ट्रस्ट आनुषंगिक आहे.

२ आम्ही करून ठेवीत आहों त्या प्रस्तुतच्या ट्रस्टडिचें कारण खालीं लिहिल्याप्रमाणेः—

सन १९१४ सालीं लोकमान्य टिळक मंडाले येथील तुरुंगांतून परत आले. त्यांच्या गैरहजेरींत सर व्हॅलेंटाईन चिरोल यांनीं लोकमान्यांना बदनामीकारक असा मजकूर घातलेले लेख प्रसिद्ध केले. त्यावरून सन १९१६ सालीं त्यांनीं विलायतेंतील न्यायकोर्टांत सदर सर व्हॅलेंटाईन चिरोल यांजवर बेअब्रूकरितां नुकसानभरपाईचा दिवाणी दावा केला. त्याचा निकाल अखेर ता. २१ फेब्रुवारी १९१९ रोजीं लोकमान्य टिळकांच्या विरुद्ध झाला. या दाव्याचे कामीं लोकमान्य टिळकांना एकंदर सुमारें तीन लक्ष रुपये इतका खर्च आला. यांपैकीं कांहीं थोड्या रकमेची तजवीज लोकमान्य टिळकांनीं स्वतः खाजगी म्हणजे केसरीच्या पैशांतून प्रथम केली होती. परंतु हा दावा वस्तुतः सार्वजनिक स्वरूपाचा असल्यामुळें त्याचा कोणताहि खर्च व्यक्तिशः लो. टिळकांना सोसावा लागूं नये असें लोकमान्य टिळकांच्या मित्रांनीं व अनुयायांनीं ठरविलें व जाहीर रीतीनें फंडवर्गणी जमा केली. या फंडाला शेवटीं ‘ पर्स–फंड ’ असें नांव देण्यांत आलें. त्या फंडाची रक्कम रुपये २,८६,३५७०७०२ ही तारीख २२माहे मे सन १९२० रोजीं जाहीर समारंभ करून, ‘ लोकमान्य टिळकांना अर्पण करण्यांत आली. हा फंड जमविण्याची कल्पना लोकमान्य टिळक हे विलायतेस असतांना तारीख ४

माहे मार्च सन १९१९ रोजीं, म्हणजे चिरोल खटल्याचा निकाल लोकमान्य टिळकांविरुद्ध जाहीर झाल्यानंतर ताबडतोब निघाली.

परंतु तत्पूर्वी म्हणजे विलायतेस जाण्याचे आधीं कोलंबो येथें लोकमान्य टिळकांनीं ता. ५ एप्रिल १९१८रोजीं मृत्युपत्र केलें त्यांत या खटल्याच्या खर्चा-संबंधानें खालील कलमें लिहून ठेविलीं होतीं. ( उतारा ).

" चिरोल केस जिंकल्यास यापेक्षां अधिक पैसे शिल्लक राहतील, त्यांचा विनियोग कसा करावयाचा तो मागाहून मी ठरवीन. परंतु केस हरल्यास त्याचें कर्ज फेडणें आहे तें खालीं लिहिण्याप्रमाणें फेडावें.

( १ ) सगळा ज्युबिली फंड या कर्जास देणें.

( २ ) कै. रा. दाजीसाहेब खरे यांचेकडील रक्कम रुपये अडीच हजार व रा. एल. सी. बापट यवतमाळ यांचेकडील रक्कम व रा. सेटलूर यांचेकडील माझी असलेली रक्कम सदर कर्जाचे भरतीस देणें.

बाकी खर्च जाहलेला आहेच. करितां निराळी तजवीज करणें नको.

पण अखेर खर्च झाला तो एकंदरीनें यावरील अदमासापलीकडे बराच गेला.

वरील कलमांवरून स्पष्टच होत आहे कीं, चिरोल खटल्याचा निकाल प्रतिकूल झाल्यास त्यामुळें येणाऱ्या खर्चाची तजवीज करणें त्यांत प्रथम ज्युबिली फंडाची रक्कम सर्व खर्चीं घालून उरेल ती लो. टिळकांच्या खाजगी मिळकतींतून, म्हणजे केसरीच्या शिलकेंतून व उत्पन्नांतून भागवावी असा लो. टिळकांचा हेतु होता. आणि त्याप्रमाणेंच घडतें तर १९१६ सालीं टिळकांना अर्पण केलेला सर्वच्या सर्व ज्युबिली फंड खर्चीं पडून, शिवाय उरलेली रक्कम म्हणजे सुमारें दीड दोन लक्ष रुपयांची रक्कम आणखी उभारावयास पाहिजे होती. परंतु लो. टिळकांच्या मृत्युपत्राच्या वेळची, किंबहुना त्यांच्या मृत्यूच्या वेळचीहि, केसरीची सांपत्तिक स्थिति लक्षांत घेतली असतां असें दिसून येईल कीं, बहुतेकच सर्व रक्कम केसरीला कर्जाऊच उभारावी लागली असती. एवढें कर्ज लो. टिळकांच्या मृत्यूनंतर मिळणें केसरीला केव्हांहि शक्य नव्हतें. फार काय स्वतः लोकमान्यांच्या हयातींतच या चिरोल प्रकरणीं जें एक लक्ष रुपये कर्ज त्यांनीं काढलें त्याकरितां त्यांना प्रॉमिसरी नोट लिहून देऊन, त्याशिवाय इतर मिळकतीवर त्यांना बोजा उत्पन्न करावा लागला. तात्पर्य, पर्स—फंडाची रक्कम परस्पर व अभावितपणें सार्वजनिक वर्गणीनें जमा झाली नसती तर, न जाणों,

कदाचित् आजमितीलाहि केसरी—मराठा संस्थेला न फिटण्याइतक्या कर्जांत रहावें लागलें असतें; व व्याजमुद्दलाच्या फेडींत दरसाल बहुतेक उत्पन्न घालवावें लागल्यानें, केसरी–मराठा संस्थेची सांपत्तिक उपयुक्तता अगदींच कमी होऊन, सांपत्तिकदृष्ट्या ती जगते किंवा मरते अशी स्थिति आली असती.

लोकमान्य टिळकांच्या डोळ्यांपुढें ही स्थिति ढळढळीत दिसत असल्यानें, 'पर्स–फंड' त्यांना नजर करण्यांत आला त्या वेळीं त्यांना गहिंवर आला; व त्यांच्या तोंडून असे शब्द निघाले ( उतारा ) "या खटल्याच्या निमित्तानें माझ्या खिशांत तीन लाख रुपये पडले अशी आपली समजूत करून घेऊन Mr. Tilak willl chuckle over the three lacs असें एकानें म्हटलें आहे. पण Chuckle over करण्यासारखी ही आनंदाची गोष्ट नाहीं. दुसऱ्या जवळून पैसे घेणें ही खरोखर दुःखाची गोष्ट आहे. या खटल्यांत मी बुडालों तर माझ्या आयुष्यांतलीं जीं काय दोन–चार वर्षें राहिलीं असतील त्यांत थोडी जास्त खटपट करून मी पैसे फेडीन, अशा हिंमतीनें हा खटला केला होता. पण खर्चाचे पैसे मला देऊन तो वेळ, तें काम व ती हिम्मत आपण विकत घेतली आहे. आतां हें सारें आयुष्य मला तुमच्याकडे लावलें पाहिजे. त्यांत मला 'चकल' होण्यासारखें कांहींच नाहीं. तुम्हाला आयतें गिऱ्हाईक सांपडलें आणि मींहि मला विकून घेतलें. हा व्यवहार माझ्या स्मरणांतून जाणें शक्य नाहीं. चिरोल केसमध्यें जय मिळून जरी माझा खर्च मला मिळाला असता तरीहि ते पैसे मीं तुम्हांलाच दिले असते." याचा अर्थ आम्हीं ट्रस्टी असा समजतों, व लोकहि तेव्हां असाच समजले कीं, टिळकांनीं पर्सफंडाची रक्कम स्वतःला व केसरीलाहि कर्जासारखी मानली, तें कर्ज फेडण्याची इच्छा त्यांच्या मनांत होती, व ते हयात असते तर त्यांनीं हरप्रयत्नानें फेडलेंहि असतें. परंतु पुढें दोन सव्वादोन महिन्यांतच त्यांना मृत्यु आला व ती त्यांची इच्छा तशीच राहून गेली. म्हणून त्यांची ही इच्छा शक्य तर आपण पूर्ण करावी हा हेतु, आम्हां उभयतांकडे केसरी–मराठा संस्थेच्या ट्रस्टीचें काम आलें तेव्हांपासून, आम्ही नेहमीं उराशीं बाळगून ठेवला होता. रक्कम लहान नव्हती. आम्ही संस्थेच्या जबाबदारीला नवीन होतों. आणि देशांतील परिस्थिति दिवसेंदिवस अधिकाधिक बिकट होत चालली होती. यामुळें आम्हांला या गोष्टीचा आजपर्यंत उघडपणें उच्चार करतां आला नाहीं. पण ती मनांत दृढ ठेवून,

संस्थेचा खर्च होईल तितका कमी ठेवून, काटकसर करून आम्हीं पर्स-फंडाची ही रक्कम हळुहळू जुळवून संग्रहीं ठेवण्याचा प्रयत्न चालविला होता. आणि या दहा वर्षांच्या अखेर आज तो हेतु सिद्धीस नेण्यासारखी स्थिति ईश्वरकृपेनें व लो. टिळकांच्या आशीर्वादानें आम्हांस प्राप्त झाली याबद्दल आनंद वाटतो. लोकमान्य टिळकांच्या आशीर्वादानेंच केसरी-मराठा ही संस्था अनेक संकटें आलीं असतां आजपर्यंत जिवंत राहून तिची आर्थिक स्थिति बरी टिकली. आणि येत्या जानेवारींत केसरी व मराठा या पत्रांना पन्नास वर्षें पुरीं होऊन त्यांची 'ज्युबिली' करण्याचा प्रसंग येत आहे, अशा वेळेपूर्वी लो. टिळकांना वर सांगितल्याप्रमाणें, आम्हांस ऋणमुक्त करतां आलें तर त्यांच्या आत्म्याला बरें वाटेल अशी आमची प्रामाणिक समजूत असल्यानें तसें करणें हें आम्ही ट्रस्टी या नात्यानें आमचें पवित्र कर्तव्य समजतों.

या रकमेसंबंधानें लो. टिळकांना ऋणमुक्त करणें म्हणजे पर्सफंडाकरितां ज्या ज्या लोकांनीं वर्गणी दिली त्याच सर्वांना किंवा त्यांच्या वारसांना व्यक्तिशः ती परत देणें असा मात्र अर्थ आम्ही समजत नाहीं. कारण ज्यांनीं ती वर्गणी दिली त्यांनीं ती सार्वजनिक हितबुद्धि मनांत ठेवूनच दिली. स्वतःला परत घेण्याच्या आशेनें दिली नाहीं. शिवाय परत द्यावयाची म्हटली तरी, ती देणारांची नांवनिशी-वार यादी कांहीं मिळाली तरी, पुष्कळ लोकांनीं आपलें नांव प्रगट न करतां गुप्त रूपानेंच वर्गणी देऊन पावतीतिकीटें घेतलीं आहेत. अर्थात् ही रक्कम परत देणें म्हणजे ती बाजूला काढून ठेवून तिचा सर्वस्वीं सार्वजनिक हितबुद्धीनें उपयोग करणें हेंच होय. आणि या रकमेचा अशा रीतीनें कायमचा निश्चितपणें उपयोग आम्हीं केला असें जाहीर झाल्यास, पर्सफंडाच्या सर्व वर्गणीदारांना लो. टिळक हे आपल्या ऋणांतून मुक्त झाले असेंच वाटेल यांत शंका नाहीं. पर्सफंडाची वर्गणी जमली इतकी मोठी जमली नसती, तर केसरी-मराठा संस्था आजपावेतों ऋणांत बुडून राहिली असती. ज्युबिली फंड सर्व खर्चून गेला असता. आज त्याच्या व्याजांतून जो लोकोपयोग होतो तो झाला नसता. आणि लोकमान्यांच्या चिरंजिवांना जी खाजगी म्हणून मिळकत राहिली तीहि मुळींच राहिली नसती. अशा रीतीनें तीन मार्गांनीं तिघांवर येणारीं संकटें पर्सफंडाच्या द्वारें लोकांनीं उदारपणानें वांचविलीं. यामुळें आम्हीं योजल्याप्रमाणें, लो. टिळकांना ऋणमुक्त करून पर्सफंडाची रक्कम सर्व आज ट्रस्ट करून, वेगळी लोकोपयोगाकरितां काढून ठेवल्यास,

व तिच्या व्याजांतून लो. टिळकांच्या इच्छेनुरूप किंवा धोरणानुसार, आणि मूळच्या ट्रस्टडीडमध्येंहि सांगितल्याप्रमाणें, सालोसाल सत्कारणीं व सार्वजनिक कार्यांत तिचा खर्च करीत गेल्यास, तें लोकमान्य टिळकांचें एक मोठें कायमचें स्मारक होईल, व ज्यांनीं पर्सफंडाची वर्गणी दिली ते व इतर लोकहि अत्यंत संतुष्ट होतील असा आम्हांस दृढ भरंवसा वाटतो. मूळ ट्रस्टडीडमध्यें कलम ( १ ) यांत खालील शब्द आहेत. " कै. लोकमान्य बाळ गंगाधर टिळक यांनीं केसरी व मराठा वर्तमान-पत्रें हातांत घेतल्यापासून त्या पत्रांचे द्वारें राजकीय शिक्षणाचा प्रसार करून,— लोकांत राजकीय हक्कांची जाणीव उत्पन्न करणें व राष्ट्रीय ध्येयास पोषक अशा इतर अनेक अंगांच्या सार्वजनिक चळवळी करणें वगैरे सर्व कामें ज्या हेतूनें केलीं तोच त्यांचा हेतु त्यांचे पश्चात् निरंतर व अबाधित अमलांत येण्याचें साधन म्हणून हें ट्रस्टडीड करण्यांत आलें आहे. " ही गोष्ट लक्षांत घेऊन, वरील कलमांतील उद्देश तडीस नेण्याकरितां, प्रस्तुतच्या या नव्या ट्रस्टडीडमधील योजना आम्हीं केली आहे. आणि एवढ्याचकरितां ही सर्व विस्तृत हकीकत देऊन आमचा या ट्रस्टचा हेतुनिर्देश मुद्दाम केला आहे. तो मूळचा म्हणजे ता. १६ ऑगस्ट १९२० चा ट्रस्ट दस्त जॉ. सबरजिस्ट्रार हवेली नं. २ चे कचेरींत पहिले नंबराचे बुकाचे ११३६ व्हॉल्युमाचे ३३२ ते ३३४ पानावर ३०३७ नंबरीं तारीख १९।८।१९२० रोजीं नोंदला आहे.

३ वरील हेतूप्रमाणें आम्ही आज रोजीं केसरी—मराठा संस्थेच्या शिलकेंतून इष्टांकी रक्कम रुपये तीन लक्ष (पर्स-फंडाच्या रकमेइतकी रक्कम व त्यांत संस्थेच्या पदरचे १३६४२०८०१० रुपये घालून निर्देश होण्याकरितां सोयीची म्हणजे तीन लक्ष करून) वेगळी काढून त्या रकमेचा ट्रस्ट निर्माण करीत आहों व ती रक्कम स्वतंत्र अशी ठेवीत आहों. म्हणजे मूळचे ट्रस्ट मिळकतीपैकीं कांहींची Appointment of property या ट्रस्टनें करीत आहों.

४ सदरहु रक्कम, या ट्रस्टडीडच्या पोटीं, ट्रस्ट-फंड व कायमनिधि या स्वरूपानेंच राहावयाची असून, त्यांतील मुद्दल न खर्चतां फक्त व्याजांतून खालीं लिहिल्याप्रमाणें वेळोवेळीं खर्च होण्याचा आहे.

५ या ट्रस्ट फंडाची रक्कम राहणें ती केसरी-मराठा संस्थेचे जे विद्यमान ट्रस्टी वेळोवेळीं असतील त्या सर्वांच्या मिळून नांवें राहावी. म्हणजे त्या सर्वांनीं मिळून संयुक्त रीतीनें ती धारण करून आपल्या ताब्यांत ठेवावी. तिजवरील

व्याज वगैरे वसूल करणें तें त्यांपैकीं कोणाहि एकास अधिकारपत्र देऊन वसूल करण्यास हरकत नाहीं. परंतु ऐनजिनसी नोटांची देवघेव, विक्री, अगर इतर कोणताहि व्यवहार विद्यमान सर्व ट्रस्टींच्या मिळून सह्यांनिशींच झाला पाहिजे.

६ सदरहु ट्रस्ट-फंडाचे पहिले ट्रस्टी केसरी-मराठा संस्थेचे विद्यमान ट्रस्टी म्हणून आम्ही खालीं सही करणार हेच राहतील. आमच्या मागून आमच्या या जागीं मूळ ट्रस्टडीडमधील नियमानुसार, वेळोवेळीं जे दुसरे कोणी ट्रस्टी येतील, किंवा त्यांचे जागीं फिरून जे कोणी येतील ते आपोआप, म्हणजे नवीन मुद्दाम नेमणूक न करतांहि (Ex-officio) या ट्रस्ट मिळकतीचे ट्रस्टी नेमले गेले असें समजण्यांत येईल.

७ या ट्रस्ट–फंडाच्या मुद्दलावर दर सालांत जें व्याज प्रत्यक्ष वसूल होईल त्यांतील शेंकडा पांच इतकी रक्कम त्या खात्यांतील कामगिरी (कचेरी) खर्चांकरितां बाजूस ठेवून कामगिरीखातीं जमा करावी. व कामगिरीसंबंधानें नेमण्यांत येणाऱ्या ऑफिस एस्टॅब्लिशमेंटवर व कामगिरीसंबंधानें जरूर त्या इतर साधनांवर खर्च करावी. आणि उरलेली पंचाण्णव टक्के रक्कम ही कार्योपयोगी समजून तींतून खर्च करावा.

८ लो. टिळकांना पर्सफंडाची जी रक्कम अर्पण करण्यांत आली, तींत निरनिराळ्या प्रांतांतील अनेक लोकांच्या देणग्या समाविष्ट होत्या. म्हणून हल्लीं ती रक्कम जर ऋणविमोचनाकरितां सार्वजनिक खर्चासाठीं परत द्यावयाची तर त्या त्या प्रांतांतील कोणाहि व्यक्तीला नव्हे पण जनतेला किंवा समाजाला, या परत दिलेल्या रकमांचा कांहीं तरी सामुदायिक रीतीनें व राष्ट्रीय कार्याकरितां उपयोग होईल अशी व्यवस्था होणें इष्ट आहे. पूर्वीच्या हिशेबावरून पाहातां पर्सफंडाच्या वर्गणीच्या रकमेपैकीं उत्तर महाराष्ट्र, म्हणजे वऱ्हाड व नागपूर प्रांत, यांनीं मिळून सुमारें नव्वद हजार रुपये वर्गणी दिली. तशीच कर्नाटक प्रांतानें सुमारें बावीस हजार रुपये वर्गणी दिली. अर्थात पर्स–फंडाच्या परतफेडीचा जो उपयोग व्हावयाचा तो या प्रांतांना त्यांच्या मूळच्या देणगीच्या रकमेच्या प्रमाणानें करून देणें योग्य होय म्हणून आम्हीं असें ठरविलें आहे कीं, परत कर्जफेडीच्या रकमेवरील वार्षिक व्याजांतून सुमारें एक लक्षावरील व्याज म्हणजे हल्लींच्या दरानें रु. पांच हजार इतकी रक्कम नागपूर–वऱ्हाड प्रांतांच्या उपयोगाकरितां दरसाल मिळावी. तसेंच कर्नाटक प्रांताच्या उपयोगाकरितां

सुमारें पंचवीस हजारावरील व्याज म्हणजे दरसाल साडेबाराशें रुपयांची रक्कम दिली जावी. या रकमा आम्हा ट्रस्टींकडून घेऊन त्या आपल्या प्रांतांना योग्य कामीं खर्च करण्याकारितां नागपूर-वऱ्हाडकरितां एक, व कर्नाटक प्रांताकरितां एक, अशीं कायमचीं अधिकारी मंडळें स्थापण्यांत आलीं पाहिजेत मग तीं ट्रस्टडीडनें निर्माण व्होवोत किंवा रजिस्ट्रेशन ऑफ सोसायटीजच्या कायद्याच्या आधारें निर्माण व्होवोत. परंतु हीं मंडळें अशा रीतीनें स्थापण्याच्या कामीं पुढें होऊन अधिकारयुक्त रीतीनें उपक्रम करण्यास निश्चित नामनिर्देश पाहिजे म्हणून, आम्ही तीं नांवें खालीलप्रमाणें ठरवितों--

९ नागपूर-वऱ्हाड प्रांताकरितां वरील योजना करून ती अमलांत आणण्याचा अधिकार आम्हीं खालील गृहस्थांस विनंतिपूर्वक दिला आहे—

**१ रा. माधव श्रीहरी अणे, यवतमाळ**
**२ डॉ. बाळकृष्ण शिवराम मुंजे, नागपूर**
**३ रा. चिंतामण विश्वनाथ गर्दे, बुलढाणा**
**४ रा. रामराव देशमुख ( मिनिस्टर ), उमरावती**
**५ रा. गोपाळ अनंत ओगले, संपादक-महाराष्ट्र, नागपूर**

वरील गृहस्थांनीं ट्रस्टडीड करून किंवा सोसायटी रजिस्टर करून कार्यकारी मंडळ नेमावें; व तसें झाल्यावर प्रस्तुत ट्रस्टच्या ट्रस्टींनीं या कार्यकारी मंडळाला दरसाल पांच हजार रुपयांची रक्कम ( खर्चाचे पांच टक्के वजा करून ) देत जावी. त्याचप्रमाणें कर्नाटक प्रांताकरितां अशाच प्रकारची व्यवस्था करण्यासाठीं आम्ही खालील गृहस्थांना विनंतिपूर्वक अधिकार देत आहों:--

**१ रा. गंगाधरराव बाळकृष्ण देशपांडे, बेळगांव**
**२ रा. दत्तात्रय व्यंकटेश बेळवी वकील, बेळगांव**
**३ रा. श्रीनिवास व्यंकटेश कौजलगी वकील, विजापूर**
**४ रा. विठ्ठल व्यंकटेश जोशी वकील, धारवाड**
**५ रा. विश्वनाथ नारायण जोग वकील, धारवाड**

वरील गृहस्थांनीं ट्रस्टडीड करून किंवा सोसायटी रजिस्टर करून कार्यकारी मंडळ नेमावें; व तसें झाल्यावर प्रस्तुत ट्रस्टच्या ट्रस्टींनीं या कार्यकारी मंडळाला दरसाल साडेबाराशें रुपयांची रक्कम ( खर्चाचे पांच टक्के वजा करून ) देत जावी.

वर लिहिलेल्या रकमा नागपूर–वऱ्हाडप्रांत व कर्नाटक प्रांत यांतील जनतेच्या उपयोगाकरितां खर्चण्यासंबंधीं तपशिलाची निश्चित योजना करण्याचा सर्व अधिकार वरील गृहस्थांस राहील.

तथापि नागपूर–वऱ्हाड प्रांत व कर्नाटक या प्रांतांत वरील रकमांचा खर्च खालील तीन हेतूंना अनुसरूनच व्हावा.

( १ ) वरील क्षेत्रांतील संघटनात्मक राजकारण.

( २ ) वरील क्षेत्रांतील प्रत्यक्ष राजकारणाशिवाय राष्ट्रोपयोगी अशा इतर चळवळी.

( ३ ) परराष्ट्रीय राजकारण.

१० नागपूर–वऱ्हाडप्रांत व कर्नाटकप्रांत यांजकरितां वरीलप्रमाणें खर्च होणारी रक्कम वगळून उरणारी, ट्रस्ट–फंडाच्या वार्षिक व्याजाची रक्कम मध्य व दक्षिण महाराष्ट्र मिळून दहा मराठी जिल्हे व त्यांतील संस्थानें येवढ्या क्षेत्रांत दरसाल खर्चण्याची आहे. ती खर्चण्याचा अधिकार या प्रस्तुत ट्रस्टच्या ट्रस्टींना राहील. या रकमेंतूनहि खालील गोष्टींवरच खर्च करावा.

( १ वरील क्षेत्रांतील संघटनात्मक राजकारण.

( २ ) वरील क्षेत्रांतील प्रत्यक्ष राजकारणाशिवाय राष्ट्रोपयोगी अशा इतर चळवळी.

( ३ ) परराष्ट्रीय राजकारण.

वरील रक्कम खर्चण्यासंबंधीं खालील योजना निश्चित केली आहे. ही रक्कम सालोसाल खर्चण्याची ती वार्षिक अंदाजपत्रक करून,–होतांहोईतों त्या पत्रकाप्रमाणें खर्च करण्यांत यावी. हें पत्रक एका अधिकृत मंडळानें दरसाल ता. १ ऑगस्ट रोजीं प्रसिद्ध करावें. या मंडळाचे पांच सभासद असावे. पैकीं दोन प्रस्तुत ट्रस्टचे ट्रस्टी हे असावे. व या दोघांनीं दरवर्षी निरनिराळ्या जिल्ह्यांतील कोणी तरी तीन पुढारी आपल्या मदतीला विनंतिपूर्वक नेमून घेऊन पांच सभासदांचें त्या वर्षापुरतें मंडळ बनवावें, व या मंडळानें वर सांगितलेलें अंदाजपत्रक तयार करावें.

११ लो. टिळकांच्या स्मरणार्थ पर्सफंडाचें ऋण कृतज्ञतापूर्वक फेडून ती रक्कम राष्ट्रकार्याकडे लावून देण्यापूर्वी आम्हीं ही खबरदारी घेतली आहे कीं, ट्रस्टरूपानें केसरी व मराठा आमच्या हातीं येतांना त्याची मालमत्ता गुड वुइल इत्यादींची

जी किंमत इष्टांक रूपानें संकल्पिली किंवा अदमासें धरली गेली होती ती सर्व तशीच्या तशी अबाधित राहिली आहे. तिला कोणत्याहि रीतीनें कमीपणा आलेला नाहीं. किंबहुना कांहीं अंशीं त्या ट्रस्ट मिळकतीची किंमत व तिचें उत्पन्न हें पूर्वींहून अधिकच झालें आहे. ही खबरदारी घेऊनच ही कर्ज-फेडीची व्यवस्था, व उपयोगाच्या दृष्टीनें ती कायम बांधली जाण्याकरितां, मूळ ट्रस्टला अनुषंगिक असा हा ट्रस्ट आम्हीं केला आहे. त्याचा सर्व व्यवहार ' लोकमान्य पर्सफंड ट्रस्ट ' या नांवानें होण्याचा आहे.

येणेंप्रमाणें ट्रस्ट डीड लिहून ठेवलें आहे. तारीख १ माहे आगस्ट सन १९३० इ.

साक्ष

१ **जनार्दन सखाराम करंदीकर** (सही) **नरसिंह चिंतामण केळकर**
२ **यशवंत गणेश कुळकर्णी** (सही) **धोंडो वासुदेव विद्वांस**

ट्रस्टी केसरी-मराठा संस्था, पुणें.

---

## २१ केसरी संस्थेची सांपत्तिक स्थिति.

गेल्या दहा वर्षांत केसरी-मराठा संस्थेचा जमाखर्च काय झाला हें तपशीलवार प्रसिद्ध करणें अतिविस्ताराचें काम असून शिवाय तसें करण्याचें कारणहि नाहीं. टिळकांनीं संस्थेचा ' पब्लिक ट्रस्ट ' केला असला तरी पब्लिक ट्रस्टांचे जमाखर्च व हिशेब, आणि खासगी ट्रस्टांचे जमाखर्च व हिशेब यांच्या स्वरूपांत वस्तुतः कांहींच फरक नसतो. दोहों ट्रस्टांतील ट्रस्टींना सर्वाधिकार बहुधा सारखेच दिलेले असतात व त्यांच्यावरील जबाबदारीहि बहुधा सारखीच असते. कोणत्याहि प्रकारच्या ट्रस्टीला ट्रस्ट मिळकत आपल्या खासगी कामाकरितां वापरतां येत नाहीं. पण ट्रस्टच्या या दोन प्रकारांत मुख्य फरक असा आहे कीं, खासगी ट्रस्टची मिळकत किंवा उत्पन्न हें खासगी व्यक्तींच्या उपयोगाकडे म्हणजे त्यांची उपजीविका, सांभाळ, संरक्षण, अभ्युदय इत्यादिकांकडे लावून दिलेलें असतें, आणि सार्वजनिक ट्रस्ट करण्याचा हेतु ट्रस्टची मिळकत व उत्पन्न यांचा उपयोग मुख्यतः खाजगी व्यक्तींच्या हितसंवर्धनाकडे करण्याचा नसून, सार्वजनिक, निम-सार्वजनिक अशा संस्था व कार्यें यांच्याकडे करण्याचाच असतो. मात्र सार्वजनिक ट्रस्ट करतांनाहि त्यावर खाजगी स्वरूपाचे असलेले किंवा निर्माण केलेले बोजे व खर्च आधीं

भागवावे, व मग उरलेल्या निवळ उत्पन्नांतून किंवा मिळकतींतून सार्वजनिक खर्च करावा, असा निर्बंध मूळ मालकाला घालतां येतो. म्हणजे फिरून याहि दृष्टीनें खाजगी व सार्वजनिक ट्रस्ट यांचें मिश्र स्वरूप सिद्ध होतें. ‘ सार्वजनिक ट्रस्ट ’ या शब्दाची व्याख्या करणें कठीण आहे, परंतु तशी व्याख्या नसली तरी ट्रस्ट निर्माण करणारे, ट्रस्टांची वहिवाट करणारे व न्यायाधिकारी यांना तारतम्यानें त्या शब्दाची व्याप्ति निश्चित करतां येते. त्यांत अवघड असें कांहीं नाहीं.

असो. या अंकांत केसरी–मराठा संस्थेचें मूळचें ट्रस्ट–डीड आम्हीं समग्र छापलें आहे. त्यावरून हा ट्रस्टहि मिश्र स्वरूपाचा कसा आहे, म्हणजे त्याचा उपयोग खाजगी व्यक्तींच्या हिताकडे कोणत्या बाबतींत किती व्हावा व सार्वजनिक कार्यांकडे किती व कसा व्हावा, हें वाचकांना सहज समजण्यासारखें आहे. हा ट्रस्ट लोकमान्यांच्या चिरंजीवांनींच प्रथम तपशीलवार लिहून निर्माण केला असला तरी, तो लो. टिळकांच्या कोलंबो येथील मृत्युपत्रावर अधिष्ठित किंवा रचना केलेला आहे ही गोष्ट या अंकांत दिलेलें टिळकांचें शेवटचें मृत्युपत्र वाचणारांच्या लक्षांत येईल; व लेखी ट्रस्ट निर्माण करणारांनीं ती गोष्ट स्पष्टच लिहिलेलीहि आहे. लो. टिळकांच्या मृत्यूपर्यंत त्यांची केसरी-मराठा ही मिळकत सर्वस्वीं खासगी स्वरूपाची होती; तथापि तिलाहि एक प्रकारें निम-सार्वजनिक स्वरूप आहे असेंच ते मनानें मानीत व तें त्यांच्या कृतीवरूनहि दिसून येई. १९०८ च्या खटल्यापासून, किंवा १९०९ सालीं ब्रह्मदेशांत केलेल्या मृत्युपत्रापासून, आपल्या या विशिष्ट मिळकतींचें स्वरूप टिळकांनीं एखाद्या ट्रस्टप्रमाणें मानलें होतें. म्हणजे त्या मिळकतीच्या उत्पन्नाच्या कांहीं भागावर मनानें त्यांनीं स्वत्वनिवृत्ति केल्यासारखी होती. अर्थात् ते मालक असल्यामुळें जो कांहीं सार्वजनिक खर्च करणें तो ते आपल्या एकट्याच्या इच्छेनें व अखत्यारीनेंच करीत. पण प्रवास, देणगी, धर्मादाय, मतप्रसार, सत्कार्योत्तेजन व राजकीय चळवळी इत्यादिकांवर जो खर्च ते करीत त्यावरून त्यांनीं आपल्या मिळकतीच्या साधनाचें, म्हणजे केसरी पत्राचें, उत्पन्न हें कसें व किती सार्वजनिक स्वरूपाचें मानलें होतें हें दिसून येतें. वरील बाबींवर टिळक खर्च कसकसा करीत हें त्यांच्या चिरंजिवांना, इष्टमित्रांना व निकट परिचितांना नेहमीं माहीत असे. म्हणूनच वरील

अनेक बाबींसंबंधानें कोणतेहि खर्च ट्रस्टडीडमध्यें निश्चित रकमांनीं किंवा हिस्से-रशीनें बांधून दिलेले नसून, त्यांचें तारतम्य ट्रस्टींवरच सोंपविण्यांत आलेलें आहे. आणि म्हणूनच ट्रस्टडीडमध्यें त्या अर्थाचे शब्द योजण्यांत आलेले आहेत.

असो. केसरी–मराठा संस्थेला वर दर्शविल्याप्रमाणें मिश्र ट्रस्टचें स्वरूप आहे, व म्हणून ट्रस्ट ॲक्टाप्रमाणें या संस्थेचे हिशेब पद्धतशीर ठेवण्यांत आलेले असून योग्य अधिकृत हिशेबनिसांकडून त्यांची कायदेशीर तपासणी करून त्यांचें सर्टिफिकेट घेण्यात आलेलें आहे. हे हिशेब पहाण्याचा ज्यांना 'कायदेशीर अधिकार' आहे त्यांना ते केव्हांहि पाहावयास मिळतीलच.

केसरी संस्थेच्या सांपत्तिक स्थितीसंबंधानें प्रारंभींच एक दोन गोष्टी समजुतीकरितां स्पष्ट केल्या पाहिजेत. १९१६ सालाचा 'ज्युबिली फंड' केसरी ट्रस्टपासून अगदीं स्वतंत्र आहे व तो सर्वच्या सर्व शिल्लकहि आहे. होमरूललीग फंडापैकीं खर्च झाला तो कांहीं दहा वर्षांपूर्वीं सर्वस्वीं त्याच कार्याला झाला, व उरलेल्या शिलकेचा ट्रस्ट करण्यांत आला असून तोहि स्वतंत्र आहे. केसरी संस्थेशीं त्याचाहि संबंध कांहीं नाहीं. कांहीं नैमित्तिक प्रसंगीं, म्हणजे टिळकांवरील खटले वगैरे झाले त्यावेळीं वर्गण्या झाल्या त्यांचा खर्च त्याच विशिष्ट कामांवर झाला. आणि १९१९ सालीं चिरोल केसकरितां सुमारें तीन लक्षांचा जो फंड लोकांनीं टिळकांसाठीं उभारला त्याची परतफेड गेल्या ता. १ ऑगस्ट सन १९३० रोजीं स्वतंत्र ट्रस्टडीडनें करण्यांत आलेलीच आहे. म्हणजे त्या ट्रस्ट फंडाच्या रकमेचाहि आतां केसरी संस्थेशीं कांहीं संबंध उरलेला नाहीं. अशा रीतीनें टिळकांच्या हयातींत त्यांना उद्देशून किंवा त्यांच्या मदतीनें उत्तेजनानें उभारलेल्या फंडांचा परस्पर विनियोग झालेला असून, त्यांतील एक पै देखील स्वतः टिळकांच्या किंवा केसरी–मराठा पत्रांच्या खास उपयोगाकडे केव्हांहि खर्च झालेली नाहीं. याहि दृष्टीनें पाहतां केसरी–मराठा संस्थेचे हिशेब छापून प्रसिद्ध करण्याचें कारण नाहीं.

केसरी–मराठा मिळून एकच संस्था असली तरी तिच्या खऱ्या उत्पन्नाची बाब म्हटली म्हणजे केसरीपत्र हीच होय. 'मराठा' पत्र हें उत्पन्नाचें म्हणजे 'फायद्याचें' कलम आज पन्नास वर्षांत कधींहि नव्हतें. मग वेळोवेळीं संपादक कोणीहि असोत. निरनिराळे लेखक व कालमान यांना अनुसरून मराठ्याच्या वर्गणीच्या

उत्पन्नांत वटघट कांहीं प्रमाणांत होत आली आहे; परंतु एकंदरीनें कोणत्याहि सालीं मराठा पत्राच्या जमाखर्चाचा वाजवी हिशेब केला असतां त्याजवर दर-साल कांहींतरी रक्कम उलट केसरीच्या उत्पन्नांतूनच घालावी लागते. मात्र ती घालण्यांत हेतु हाच असतो कीं, मराठा पत्राची भाषा इंग्रजी असल्यामुळें त्याच्या-द्वारें केसरीच्या धोरणाचा व मतांचा प्रसार सर्व हिंदुस्थानभर व्हावा; व तसा तो यथाशक्ति गेल्या पन्नास वर्षांत होत आलेला आहे. म्हणून संस्थेच्या जमाखर्चांतून, निदान जमेच्या बाजूला तरी, मराठा वर्तमानपत्र ही बाब वाचकांनीं मनानें प्रथमपासूनच वगळून चालावें.

उरला केसरी. त्याच्या उत्पन्नाच्या मुख्य दोन बाबी. किंबहुना अवघ्या दोनच बाबी म्हटलें तरी चालेल. म्हणजे वर्गणीदारांची वर्गणी व जाहिरातींचें उत्पन्न. केसरीला कोणी कधीं देणगी उचलून देत नाहीं, व केसरी घेतहि नाहीं. केसरी स्वतःच्या छापखान्यांत बाहेरचें छपाईचें कामहि करीत नाहीं. आपल्या फौंडरींतील टाईपहि बाहेर विकीत नाहीं. मग अर्थात् कोणाची एजन्सी दलाली करीत नाहींच नाहीं. वर्गणीदार व जाहिरातदार हेच काय ते केसरीच्या उत्पन्नाचे मुख्य आधारस्तंभ. वर्गणीदार पोस्टेज देतात तें परस्पर पोस्टालाच जातें. यामुळें केसरीच्या वार्षिक ' निवळ ' म्हणजे तीन रुपये वर्गणीची रक्कम जमा धरून, त्यासमोर वर्गणीदारांस मिळणाऱ्या पूर्वीच्या ५१ व हल्लींच्या १०२ अंकांवर होणारा खर्च हिसेरशीनें मांडला तर असें दिसून येईल कीं, निवळ वर्गणीच्या पैशांतून केसरीला बचत अशी फारच थोडी होते.

हल्लीं वर्षांतून केसरीचे १०२ अंक आम्ही केसरीच्या वर्गणीदारांना देतों. या प्रत्येक अंकाचीं पानें कमींत कमी १२ असतातच. पण केव्हां १६ हि अस-तात. नेहमींच्या एका अंकाचीं १२ पानें घेतलीं तरी त्यांच्या नुसत्या काग-दाचें वजन ७ तोळे होतें. या मानानें १०२ अंकांच्या कागदाचें वजन ७१४ तोळे म्हणजे १८ पौंड भरतें. आणि दर पौंडास सुमारें २ आणे किंमत धरली तर १८ पौंडाला ३६ आणे म्हणजे २। रुपये तरी पडतात. अशा रीतीनें वर्गणीच्या ३ रुपयांपैकीं, २। रुपये आम्ही वर्गणीदाराला कागदा-च्याच रूपानें परत देतों. या १०२ अंकांचें फाईल कोणी नीट बांधून ठेवल्यास पुढें कालांतरानें वर्गणीदाराला व त्याच्या पुढच्या पिढीला राजकारण व वाङ्मय यांच्या दृष्टीनें किती मौल्यवान माहिती ठेवीदाखल लाभेल हें सांगण्याचें कारण

नाहीं, परंतु १०२ अंकांची नुसती रद्दी विकली तरी वर्गणीदाराला ८-१२ आणे येण्याला हरकत पडणार नाहीं. असो. वर्गणीदार आपल्या १०२ अंकांचें काय वाटेल तें करो. पण वरील हिशेबानें एवढी गोष्ट निश्चित ठरते कीं, वर्गणीच्या तीन रुपयांतून उरलेल्या १२ आण्यांत केसरी लिहून, छापून, तयार होण्याच्या अनेक खात्यांचा सर्व खर्च करावा लागतो. हा हिशेब अशाप्रकारें स्पष्ट करून लिहिण्याचा हेतु इतकाच कीं, केसरी काढतांना उत्पादकाचा जो मूळ हेतु होता व पुढें जो लोकमान्य टिळकांनीं चालविला तो हेतु म्हणजे केसरी वर्तमानपत्र शक्य तितक्या कमी किंमतींत वाचकांना मिळावें हा हेतु, ट्रस्टच्या रूपानें केसरीची व्यवस्था आमचे हातीं आल्यापासून, आम्हींहि अबाधित ठेवला आहे. इतकेंच नव्हे तर यथाशक्ति अधिक सफळहि केला आहे. कारण ता. १ ऑगस्ट १९२९ पर्यंत जेवढ्या म्हणजे ३ रुपये वर्गणींत वाचकांना आम्ही दर आठवड्यांत फार तर १६ पानें मजकूर देत होतों, तेथें सदर तारखेपासून आम्ही दर आठवड्याला कमींत २४ पानें इतका, व मधून मधून जास्तीहि पानें मजकूर वाचकांस देऊं लागलों आहों. १८८१ सालीं केसरीची वर्गणी १ रुपया होती व आज ३ रुपये आहे ही गोष्ट खरी असली तरी, वाचकांना एकंदरीनें तेव्हांपेक्षां तिपटीहून पुष्कळच अधिक मोबदला, व तोहि आठवड्यांतून एका ऐवजीं दोन हप्त्यांनीं म्हणजे सात दिवसांऐवजीं ३-३॥ दिवसांच्या अंतरानें, देत आहों. वाचकांना केसरी स्वस्त करण्याचा दुसराहि एक प्रकार संभवेल तो असा कीं, 'केसरी साप्ताहिकच ठेवावा, पण केसरीची वर्गणी १॥ रुपया करावी म्हणजे मूळचें ध्येय अधिक गांठल्यासारखें होईल !' पण ही विचारसरणी विपरीत असून, ती आम्हांलाच काय पण शेंकडा ९९ वाचकांनाहि पटणार नाहीं. वर्तमानपत्राच्या प्रगतीचें सामान्य धोरण लक्ष्यांत घेतलें असतां, आठवड्यांतून दोन वेळां मिळणारा केसरी एक वेळ मिळाला तरी चालेल असें तर कोणी म्हणतच नाहीं. पण केसरी दैनिक करावा अशा सूचनाच आमचेकडे पुष्कळ येतात. परंतु केसरी दैनिक केल्यास वाचकाला वार्षिक खर्च कमींत कमी किती येईल ह्याचा हिशेब करितां, हा खर्च सर्व खेडेगांवांतील गरीब लोकांना झेपणार नाहीं. म्हणून केसरी दैनिक करण्याची कल्पना आम्हीं अजून स्वीकारली नाहीं. याविषयीं केसरी अर्धसाप्ताहिक करितांना आम्हीं जें म्हटलें होतें तेंच म्हणणें आमचें आजहि कायम आहे. केसरी दैनिक करावयाचा झाल्यास त्याला

लागणारीं सर्व साधनें आमचे जवळ आहेत. एकहि कमी नाहीं. तथापि वरील विचारसरणीमुळेंच आम्हीं अद्यापि ती मजल मारलेली नाहीं.

केसरीच्या मुख्य उत्पन्नाचा भाग जाहिरातींचा असतो. आतां जाहिरातींना लागणारा कागद, छपाई, टपाल या नात्यानें होणारा खर्च जाहिरातींच्या उत्पन्नाच्या मानानें थोडा कमी असतो हें खरें, तथापि वर्गणीदारांप्रमाणें जाहिरातदारांनाहि मोबदला भरपूर मिळतोच. मात्र तो वेगळ्या स्वरूपानें मिळतो इतकेंच. वर्गणीदारांना मोबदला मिळतो तो बातमी व इतर वाचनीय मजकूर हा होय. आणि जाहिरातदारांना जो मोबदला मिळतो तो व्यापारी मालाची प्रसिद्धि हा होय. केसरीचा कोणताहि अंक सुमारें एक लक्ष वाचक तरी वाचतात असें मानण्यास हरकत नाहीं. या दृष्टीनें पाहिल्यास जाहिरातींच्या आकाराचींच, व त्या छपाईचींच कां होईना, पण एक लक्ष हँडबिलें किंवा निदान पाऊण लक्ष हँडबिलें छापून तीं महाराष्ट्रभर गांवगन्ना वांटण्यास इतर कोणत्याही रीतीनें किंवा एजन्सीनें काय खर्च लागेल, याचा स्वतः जाहिरातदारच जर कागदावर हिशेब मांडून पाहतील तर त्यांचें त्यांनाच असें आढळून येईल कीं, जाहिरातींचें उत्पन्न एकंदरीनें वर्गणीपेक्षां अधिक असलें तरी, केवळ आपल्याच बळावर केसरी चालतो अथवा आपल्याच जिवावर वाचकवर्ग जगतो व त्याचा मोबदला मात्र आपणास कांहीं मिळत नाहीं असें सुज्ञ जाहिरातदारांना मुळींच वाटावयाचें नाहीं. केसरींतील जाहिरातींच्या पैशाचा मोबदला किती मिळतो हें दुकानाच्या वहींतील मालविक्रीचें खातेंच त्यांचें त्यांना सांगू शकेल.

---

## २२ केसरी–मराठा संस्थेचा निर्लोभीपणा

केसरीच्या गुणदोषांची चर्चा अर्थातच तिऱ्हाइताकडून होणें योग्य. तथापि एक गोष्ट अशी आहे कीं, तिची माहिती बाहेरच्या लोकांना फारशी असण्याचा संभव नसतो. आणि तिच्याविषयीं काढलेल्या यथार्थ उद्गारांत जर आत्मस्तुति किंवा प्रौढी यांची थोडीशी झांक उमटली तर ती क्षम्य मानतां येईल. ही गोष्ट म्हटली म्हणजे केसरी–मराठा संस्थेची निरपेक्षता.

सर व्हॅलेंटाईन चिरोल यांनीं आपल्या सुप्रसिद्ध पुस्तकांत टिळक व केसरी यांच्यासंबंधानें पुष्कळ खोटीं विधानें केलीं आहेत. पण त्यांतल्या त्यांत खोटेपणांत व खोडसाळपणांत पहिला नंबर पटकावणारें जर एखादें विधान असेल तर तें

लोकांकडून धाक दाखवून पैसे व वर्गण्या काढण्यासंबंधाचें होय. चिरोलसाहेबांना आपल्या देशांतील पुष्कळ वर्तमानपत्रांचा व हिंदुस्थानांतील कांहीं वर्तमानपत्रांचा अनुभव असेल. त्यावरून त्यांनीं हें विधान अनुमान-धपक्यानें केलें असलें पाहिजे हें उघड आहे. केसरी-मराठा संस्थेचा निकट परिचय असणारा कोणताहि मनुष्य वरील आरोप खोटा असल्याचें कबूल करीलच करील.

हिंदुस्थानांतील वर्तमानपत्रें सामान्यतः द्रव्यवश नसतात ही गोष्ट प्रसिद्ध व मान्य आहे. तथापि विलायतेप्रमाणें इकडेहि थोडथोडे अनुभव येतात, नाहीं असें नाहीं. कित्येक वर्तमानपत्रकार प्रत्यक्ष पैसा घेत नसतील. परंतु त्या पत्राच्या प्रती पुष्कळशा विनाकारण विकत घेणें व आपल्या कचेऱ्यांतून लोकांना फुकट वाचावयास देणें, त्यांच्याशीं संलग्न असलेल्या छापखान्याचीं बेसुमार चिलें भरून आपले रिपोर्ट वगैरे छापवून घेणें, व रिपोर्टांचें समालोचन वगैरे लिहविण्याकरितां दरबारखर्च करणें अशा निरनिराळ्या प्रकारांनीं कांहीं दरबारांतून कांहीं अँग्लो-इंडियन पत्रांना मदत होत असते असें लोक बोलतात. शिवाय हॉर्निमनसाहेबांचा डेली हेरल्ड व नाभाचे पदच्युत महाराज यांच्यांतील पैशाच्या देवघेवीचा व मतप्रसाराचा संबंध काय होता हें सुप्रसिद्धच आहे.

याच्या उलट १८८२ च्या कोल्हापूर खटल्यांत करवीरकर छत्रपतींचा पक्ष उचलून धरून त्यांच्याशीं सहानुभूति दाखविली याबद्दल केसरी-मराठा पत्रांच्या संपादकांना तुरुंगवासाची शिक्षा भोगावी लागली, माफी मागावी लागली, व खर्चहि सोसावा लागला. या खर्चाला थोडीशी मदत त्या वेळीं लोकांनीं उभारलेल्या डिफेन्स फंडांतून झाली पण ज्या दरबारी लोकांनीं टिळक-आगरकरांना या प्रकरणाविषयीं वर्तमानपत्रांतून लिहिण्याच्या भरीस घातलें त्यांनीं व्यक्तिशः टिळक-आगरकरांची नुकसानभरपाई कांहीं केली नाहींच, पण त्यांच्या वर्तमानपत्रांना कांहीं थोडेंफार द्रव्यसाहाय्य केलें असेल अशी कोणाची समजूत असल्यास तीहि चुकीची आहे. कोणीं फार तर इतकें म्हणावें कीं, "या खटल्यामुळें, केसरी-मराठ्याची प्रसिद्धि झाली, अब्रू वाढली यामुळें वर्गणीदार वाढले असतील!" तर तेवढीमात्र गोष्ट थोडीशी खरी म्हणतां येईल. पण वाढत्या 'वर्गणीदारां' कडून परस्पर मिळणारा आश्रय हा सर्वस्वीं रीतसर न्याय्य असाच आहे.

संस्थानांपैकीं इंदूरसंबंधानें केसरी-मराठा पत्रांचें धोरण संस्थानिकांना अनुकूल म्हणजे होईल तितकें त्यांच्या हक्कांचें समर्थन करणारें व त्याकरितां सरकार-

वर टीका करणारें असेंच नेहमीं होतें. कै. सर शिवाजीराव होळकर व विद्यमान सर तुकोजीराव होळकर या दोघांवर पदच्युतीचे प्रसंग आले, त्या वेळीं केसरी मराठा पत्रांनीं त्यांची बाजू कोणाहि अत्यंत राजनिष्ठ प्रजाजनांइतकी उचलून धरली. परंतु या दरबारापासून या पत्रांनी कधीं एक पैचाहि अभिलाष केला नाहीं. एवढेंच नव्हे तर हस्तें किंवा परहस्तेंहि एक पैचाहि फायदा या दरबाराकडून केसरी–मराठा पत्रांना झालेला नाहीं. जेथें महाराष्ट्रांतील हरदास, कथेकरी, पुराणिक, ग्रंथप्रकाशक इत्यादिकांना या दरबारांतून हजारों रुपये आपापल्या कामाकरितां मिळवितां आले, तेथें केसरी–मराठा पत्रांच्या चालकांनीं आपल्या संस्थेला कांहीं मदत मिळविण्याची इच्छा धरली असती तर ती निष्फळ झाली असती असें नाहीं, परंतु या संस्थेच्या कोणत्याहि चालकांची आजपर्यंत तशी दृष्टि केव्हांहि नव्हती. केसरी-मराठ्याच्या चालकांप्रमाणेंच या संस्थानिकांचाहि गुण घेतला पाहिजे. कारण सुदैवानें या संस्थानांच्या अधिपतींनींहि या चालकांना द्रव्याचें आमिष दाखवून आपलें काम करून घेण्याची बुद्धि कधीं ठेवली नाहीं. हा त्यांचाहि थोरपणाच होय!

केसरी–मराठा पत्रें व ग्वालेर दरबार यांचा कधींच कोणताही संबंध इंदूरइतकाहि आलेला नाहीं. या दोनहि संस्थानांत केसरी–मराठा पत्रांना एका काळीं बंदी होती. ती कालांतरानें निघाली इतकेंच काय तें! तशी बंदी इतर पुष्कळ पत्रांचीहि निघाली. त्यांत केसरी–मराठा पत्रांवर कांही विशेष कृपा झाली असें नाहीं. कारण देशी संस्थानें झालीं म्हणून त्यांत इकडील वर्तमानपत्रांना बंदी झालीच पाहिजे असा कांहीं नियम नव्हता. फाजील भित्रे किंवा तोंडपुजे अधिकारी संस्थानांत निघाले त्यांनीं बंदी केली व समंजस अधिकारी आले तेव्हां त्यांनीं बंदी खुली केली! मोंगलाईंत या पत्रांना १९०९ सालीं जी एकदां बंदी झाली ती अजूनहि निघत नाहीं. उलट कित्येक ब्राह्मणेतर पक्षाच्या संस्थानिकांचा या पत्राशीं पुरा बेबनाव असतांहि त्यांनीं या पत्रांना आपल्या राज्यांत कधींहि बंदी केली नाहीं.

लो. टिळकांकरितां १८९७, १९०८, १९१६, व १९१९ या सालीं जे कांहीं फंड उभारण्यांत आले त्यांची मूळ कल्पना, त्यांचा हेतु, त्यांच्या एकूण रकमा, त्यांचा विनियोग व त्यांची हल्लींची स्थिति व हिशेब या सर्व गोष्टी महाराष्ट्रांत लोकांना विदितच आहेत. यापैकीं कोणत्याही फंडाचा उपयोग लो.

टिळकांनीं व्यक्तिशः खाजगी रीतीनें किंवा केसरीकडेहि केला नाहीं. १८९७, सालचा फंड त्या वेळच्या खटल्यांत बहुतेक संपून गेला व जो थोडा उरला त्याचा उपयोग केसरी-मराठा संस्थेकडे करण्यांत आला नाहीं. फक्त पर्स-फंडाचा उपयोग मात्र लो. टिळकांना व्यक्तिशः व केसरी-मराठा संस्थेलाही झाला असें म्हणतां येईल. कारण चिरोल केसवर टिळकांचे म्हणजे केसरीचे जे रुपये खर्च झाले होते त्यांची फेड यांतून झाली, व हा फंड जमला नसता तर केसरीला जें कर्जात रहावें लागलें असतें तें रहावें लागलें नाहीं. अशा रीतीनें या फंडाचा उपयोग टिळकांच्या वारसांना काय-मचा झाला व केसरीला सुमारें दहा वर्षें झाला. पण केसरीच्या ट्रस्टींनीं दहा वर्षें आपल्या उपयोगीं पडलेली ही रक्कम थोडेबहुत व्याजहि देऊन सर्वच्या सर्व परत केली, ही गोष्ट ता. २ ऑगस्ट १९३० च्या केसरीच्या अंकांत वाचकांना सविस्तर कळून आलीच आहे. सांगण्याचें तात्पर्य इतकेंच कीं, केसरी-मराठा संस्था सर्वस्वीं स्वावलंबनाच्या तत्त्वावर आजपर्यंत उभी आहे व जगली आहे.

केसरी-मराठा व आर्यभूषण छापखाना यांचे उत्पत्तीचे वेळीं लागणारी रक्कम उत्पादकांपैकीं कांहींनीं खासगीच उभारली होती. त्याकरितां सार्वजनिक वर्गणी झाली नव्हती. पुढें १८९७ सालीं छापखाना व वर्तमानपत्रें यांची फारकत होऊन टिळकांनीं फक्त वर्तमानपत्रें आपल्या हिश्शादाखल उचललीं. पण तींही बरोबर सात हजार रुपये कर्ज घेऊन ! ( या संबंधाची हकीकत लो. टिळक चरित्रांत ( खंड १ मध्यें ) येथें कोणासही वाचावयास मिळेल. ) सन १८९७ नंतर टिळ-कांच्या हयातींत प्रथमप्रथम जें कर्ज काढावें लागलें तें सर्व त्यांचें त्यांनीं केस-रीच्या उत्पन्नांतून फेडलें, व आपल्या मृत्युपत्राच्या वेळीं केसरी-मराठा पत्रें मागें निष्काळजी करून ठेविलीं. देणगीच्या रूपानें केसरी-मराठा संस्थेकडे पन्नास वर्षांत एक पैहि कोणाची आलेली नाहीं असें आम्हांस स्वच्छ म्हणतां येईल. वर्गणीदार व जाहिरातदार व किरकोळ अंकाचे खरेदीदार यांच्याच आश्रयावर केसरी डोक्यावर कर्ज घेऊन निघाला व त्यानें कर्जफेड केली. कायदेशीर कर्जें तर फेडलींच पण नैतिक कर्जेंही फेडलें. व सुमारें एक लक्ष रुपये किंमतीची मिळकत स्वामित्व व गुडवुइल यासुद्धां मिळून आज या संस्थेची म्हणून केसरीला अबाधित राखतां आली आहे. तात्पर्य, वरील रीतसर उदाराश्रयाशिवाय केसरी कोणाच्या एक पैलाहि ओशाळा झालेला नाहीं. १९२१ सालीं केसरी-कचेरीं-

तील कागदांच्या गोदामाला आग लागली व कित्येक हजारांचें नुकसान झालें. तेव्हां कित्येक स्नेह्यांनीं मदतीदाखल फंड उभारण्याकरितां, आधीं न विचारतां, मनीऑर्डरी केसरीकडे पाठविल्या; परंतु त्या केसरी ट्रस्टनें साभार परत केल्या. तसेंच १९०८ सालीं व १९२४ सालीं असे केसरीवर कोर्टाचे बेअदबी केल्याचे दोन खटले होऊन दोनही मिळून दंड व खर्चरूपानें सुमारें पंधरावीस हजार रुपये खर्च झाले. ती रक्कमहि सर्व केसरीच्या पैशांतूनच खर्चली गेली, त्याकरितां बाहेरून कोणाची एक पैहि घेण्यांत आली नाहीं, व लोकांची मदत करण्याची इच्छा असतां तीहि यावेळीं आभारपूर्वक नाकारण्यांत आली. केसरीच्या चालकांची अशी मनःस्थिति असल्यामुळें, चिरोलसाहेबांनीं कितीहि म्हटलें तरी केसरींतून टीकेचे कोरडे ओढून टिळकांनीं पैसे मिळविले या गोष्टीवर या देशांतील एक पोरहि कधीं विश्वास ठेवणार नाहीं; मग जाणत्या लोकांची गोष्टच बोलावयास नको. रायगडस्मारक फंड, पैसाफंड, वगैरे सारख्या अनेक वर्गण्या जमविण्यास केसरीच्या द्वारें पुष्कळच मदत झाली. या वर्गण्यांची पोंच देण्यांत येई व मधूनमधून उत्तेजनपर शब्द वर्गणी देणार व गोळा करणार यांना उद्देशून लिहिण्यांत येत. हे लेख अर्थात् सहानुभूतिपर व सर्वस्वीं मित्रभावाचेच होते. पण विशेष सांगण्याची गोष्ट ही कीं, वर्गणी न देणाऱ्या विरोधी कुत्सित किंवा कंजुष लोकांवरहि टीकेचे कोरडे कधींहि ओढण्यांत आले नाहींत. म्हणून या दृष्टीनेंहि चिरोलसाहेबांच्या टीकेला कांहीं आधार नाहीं.

लो. टिळकांची वृत्ति किंवा केसरीचें धोरण लोभी असतें तर पूर्वीं सांगितल्याप्रमाणें इंग्लंडांतील किंवा इकडीलहि एखाद्दुसऱ्या वर्तमानपत्राप्रमाणें ब्लॅकमेलिंगनें किंवा कुचेष्टेनें किंवा साध्या स्नेहभावाच्या मदतीनेंहि केसरीला द्रव्यलाभ होणें अशक्य नव्हतें. पण केसरीनें कोणाचीहि बाजू कधीं उचलून धरली तर ती फक्त कर्तव्य म्हणून किंवा आपलेपणानें. अशा कार्यांत मतप्रसारार्थ झालें तर उलट केसरीचेच चार पैसे केव्हां केव्हां खर्च झाले असतील. आपल्या कामाला मदत झाली म्हणून पैशानें उपकाराची फेड करणारा सधन वर्ग तरी महाराष्ट्रांत कोणता ! संस्थानिक, अमीरउमराव, सरदार, जहागीरदार. हे १८९७ पासून लो. टिळकांच्या वाऱ्यालाही उभे राहात नसत. मग ते केसरीला द्रव्यसाहाय्य करणार ही गोष्ट दूरच! १८८२ सालीं कोल्हापूर महाराजांचा पक्ष उचलून धरून लो. टिळकांनीं व आगरकरांनीं स्वतः तुरुंगवास सोसला. पण

केसरी–मराठा पत्रांच्या डिफेन्सला कै. शिवाजी महाराजांच्या विषयीं सहानुभूति बाळगणाऱ्या संस्थानिकांनीं मदत केली नाहीं. त्या खटल्याला वर्गणी मिळाली ती इकडच्या सामान्य लोकांकडूनच. केसरींतून नेहमीं संस्थानिकांची तरफदारीच ब्रिटिश सरकार विरुद्ध केली जाई. पण त्याकामीं एक पैदेखील इकडे तिकडे झाली नाहीं हें आम्ही निश्चयात्मक जाहिर रीतीनें सांगतों. शिवाजीराव होळकरांनीं आपले ठिकाणीं लो. टिळकांच्या गुणांची पुष्कळ चहा केली असेल; कारण महाराजांच्यामध्येंहि एक प्रकारचा देशाभिमान होता हें प्रसिद्ध आहे. तथापि त्यांनीं केसरीला कधीं एक पैचाहि आश्रय दिला नाहीं. १८९३-९४ च्या बडोदें प्रकरणांत केसरीनें सयाजीराव महाराजांची बाजू चांगलीच उचलून धरली होती. पण त्याचा मोबदला फक्त परस्पर आदरबुद्धींतच होता. कदाचित् कोणाला एकाच गोष्टीचा यासंबंधांत उल्लेख करतां येईल. ती म्हटली म्हणजे महाराज सरकारांनीं लो. टिळकांना म्हणजे पर्यायानें केसरीला, हल्लींचा गायकवाडवाडा दिला. परंतु तोहि खरेदीच दिला ही गोष्ट कित्येकांना खरी वाटत नसली तरी अगदीं अक्षरशः खरी आहे. कारण केसरीच्या प्रस्तुत संपादकांनींच स्वतः बडोद्यास जाऊन या वाड्याच्या पावतीची किंमत वटविली होती. याविषयीं सरकारी पोलिटिकल खात्यालाहि प्रथम संशय होता. पण तो पूर्ण चवकशीं अंतीं फिटून गेला. वाडा विकण्यापूर्वी सरकारी इंजीनियरांनीं त्याची किंमत केली तींत सवलत म्हणून कदाचित् हजार पांचशें रुपये महाराजांनीं मनानें सोडले असले तर तें त्यांच्या मनालाच ठाऊक. पण त्यावेळीं पुण्यांत जागा व इमारती यांना फारशी किंमतच नव्हती. प्लेगमुळें शेंकडों घरें ओस किंवा बिनवारशी राहिलीं होतीं. तीं अशीं कीं, घरपट्टी वगैरे म्युनिसिपल कर भरण्यास कूळ जागेवर नाहीं म्हणून दिवाणी हुकूमनामे मिळवून म्युनिसिपालिटीला घरांचे लिलांव करावे लागले. आज गायकवाडवाड्याची किंमत अर्थात् त्या वेळेपेक्षां पुष्कळ अधिक आहे. परंतु तो घेतल्यापासून आजतारखेपर्यंत, पूर्वी टिळकांचे व त्यानंतर टिळकांच्या चिरंजीवांचे व केसरी–मराठा ट्रस्टचे मिळून कमींत कमी लाख—पन्नास हजार रुपये–त्यांतल्या नव्या इमारती किंवा रिपेरी वगैरेसाठीं खर्ची–पडले आहेत हेंहि लक्षांत घेतलें पाहिजे.

---

## २३ केसरी संस्थेचे अवांतर उद्योग

केसरी संस्थेनें आजवर वर्तमानपत्रें चालविण्यापेक्षां अवांतर उद्योग, कारखानदारीच्या स्वरूपाचे असे, विशेष केले नाहींत. तिनें स्वतःचेच असे ग्रंथ फारच थोडे प्रसिद्ध केले, व केलेल्यांपैकीं स्वतःच्या छापखान्यांत कंपोज करून छापले असे त्याहून थोडे. गेल्या दहा वर्षांत केसरी संस्थेनें टिळकांच्या केसरींतील लेखांचे चार खंड प्रसिद्ध केले. पण ते सर्व बाहेर छापून घेतले. केसरी-सारसंग्रह ( केसरीचें छोटें फाईल ) हें पुस्तक केसरींतीलच कांहीं निवडक लेखांचें पुनर्मुद्रणात्मक असल्यामुळें तेथेंच तें केसरीच्या छापखान्यांत छापणें अर्थातच सुलभ असतें. तें आज तीन वर्षें छापलें जात आहे. पुस्तकछपाईचा एक प्रयोग म्हणून रा. स. वि. बापट यांच्या 'टिळकांच्या आठवणी व आख्यायिका' या ग्रंथांचा एक खंड केसरी छापखान्यानें, रीतसर छपाईचा आकार घेऊन, छापून दिला. पण मतप्रसाराच्या दृष्टीनें केसरी छापखान्यांत शुद्ध पंचांग मात्र छापून दिलें जातें. त्याची हकीकत थोडक्यांत अशीः—

### शुद्ध पंचांग

सांप्रत बहुतेक सर्वच रूढ असलेल्या ग्रहलाघवीय पंचांगांतील गणित स्थूलमानाचें असतें. त्यामुळें अयनाशांत वाजवीहून सुमारें पावणेचार अंश अंतर अधिक पडलें आहे. आणि इतर बाबतींतहि पंचांगांचा दृक्प्रत्यय येत नाहीं. यास्तव पंचांग गणित सूक्ष्म व शुद्ध करावें असा विचार कै. केरूनाना छत्रे यांच्या वेळेपासून पुढें येऊं लागला. कै. शंकर बाळकृष्ण दीक्षित यांनीं त्यासंबंधीं कांहीं विचार आपल्या भारतीय ज्योतिःशास्त्राच्या इतिहासांत प्रकट केले; पण ते सायनवादी असल्यानें त्यांनीं ग्रहलाघवीय पंचांग-सुधारणेच्या बाबतींत विशेष लक्ष घातलें नाहीं. कै. व्यंकटेश बापूजी केतकर यांनीं शके १८०० च्या वेळच्या अयनांशाला जुळणारें चित्रारंभस्थान घेऊन तेथून पुढें सूक्ष्म गणित करण्यासाठीं केतकी ग्रहगणितादि केलें आणि केतकी पंचांग शके १८२२पासून चालू केलें. त्यानंतर मुंबईत १९०४ सालीं राष्ट्रीय सभेच्या वेळीं कै. डॉ. भा. कृ. भाटवडेकर यांनीं पंचांगपरिषद् भरविली; आणि त्या परिषदेंतून कांहींच निष्पन्न होणार नाहीं असें जेव्हां डॉ. भाटवडेकर यांना वाटूं लागलें त्या वेळीं त्यांनीं टिळकांना त्या परिषदेच्या कामांत लक्ष घालून पंचांगशुद्धीच्या कार्याला चालना देण्याविषयीं विनंति केली. त्या वेळेपासून लो. टिळकांचें लक्ष पंचांगशुद्धीच्या कार्याकडे वेधलें. परंतु त्यानंतरच्या

राजकीय चळवळीच्या दंगलींत त्यांना या कार्याकडे लक्ष देण्यास फुरसतच मिळाली नाहीं.

पुढें टिळक मंडालेहून आल्यावर पं. रघुनाथशास्त्री, बाबा पटवर्धन प्रभृति मंडळींनीं पुण्यास पंचांग परिषद् भरविण्याचा बेत केला, आणि शके १८३९ च्या आश्विनांत पंचांग प्रवर्तन कमिटी स्थापन झाली. त्या कमिटीच्या विद्यमानें पुण्यास दुसरी पंचांग परिषद भरली, आणि तींत अयनगती शुद्ध घ्यावयाची, पण अयनांश पूर्वींचेच चालूं ठेवावयाचे, असा ठराव झाला. त्या ठरावास अनुसरून शके १८४० पासून केसरी संस्थेमार्फत शुद्ध--निरयण पंचांगें छापवून प्रसिद्ध करण्यास सुरुवात झाली. शके १८४०, १८४१ व १८४२ या तीन सालचीं पंचांगें केसरी संस्थेच्या खर्चानें जगदीश्वर प्रेसमध्यें छापवून प्रसिद्ध करण्यांत आलीं. शके १८४१ च्या अखेरीस सांगलीस तिसरी पंचांग परिषद् होऊन त्या परिषदेंत, जशी अयनगति शुद्ध घ्यावयाची त्याप्रमाणेंच त्या अयनगतीवरून येणारे शुद्ध अयनांशहि स्वीकारावयाचे असा ठराव झाला, आणि कै. केरूनाना छत्रे यांच्या वेळेपासून जो शुद्ध पंचांग चालू करण्याचा विचार उद्भूत झाला होता त्याला परिषदेची संमति मिळाली. या करितांच सांगली परिषदेहून पुण्यास परत येतांच लो. टिळकांनीं केरूनाना छत्रे यांचे चिरंजीव कोंडोपंत छत्रे यांना स्वदस्तूरचें पत्र लिहून कै. केरूनाना यांनीं आरंभिलेलें कार्य आज तडीस गेलें असें कळविलें. सांगलीच्या परिषदेंत झालेल्या ठरावास अनुसरून शुद्ध पंचांग तयार करण्यास करणग्रंथ पाहिजे म्हणून लगेच टिळकांनीं एक हजार रु. बक्षीस देऊं करून करणग्रंथ मागविला. आणि नागपूरचे श्री. के. ल. दप्तरी यांनीं तो ग्रंथ करून देण्याचें कबूल केल्यावरून त्यांच्याकडे तें काम सोंपविलें. रा. दप्तरी यांचा ग्रंथ तयार झालेला पाहण्यास टिळक जगले नाहींत; तथापि त्यांच्या इच्छेस अनुसरून दप्तरी यांना त्यांच्या ग्रंथाबद्दलचें पारितोषिक केसरी संस्थेंतून देण्यांत आलें, आणि दप्तरी यांनीं तयार केलेला करणग्रंथ सुमारें तीन हजार रुपये खर्च करून केसरी संस्थेंतून छापून प्रसिद्ध केला. सांगली-परिषद् शके १८४१ मध्यें झाली तरी तत्पूर्वींच शके १८४२ चें पंचांग तयार होऊन गेलें होतें. यास्तव सांगलीच्या ठरावानुसार पंचांगें छापण्यास सुरुवात शके १८४३ पासून झाली. शके १८४३ ते १८४७ अखेर पांच वर्षें हीं पंचांगें जगद्धितेच्छु छापखान्यांतून छापवून घेतलीं जात. पण शके १८४८ पासूनचीं पंचांगें

केसरी छापखान्यांतूनच छापून घेण्याची व्यवस्था करण्यांत आली. पंचांगें कोठेंहि छापलीं तरी शके १८४० पासून पंचांग तयार करविण्याच्या व पंचांग छपाईच्या खर्चांची जबाबदारी केसरी संस्थेनें आपल्याकडेच घेतलेली आहे. हें पंचांग तयार करण्याला सुलभ साधन मिळावें म्हणून तिथिनक्षत्रादिकांच्या सुलभ सारण्या तयार करण्याचें काम सध्यां चालूं असून त्या सारण्या छापण्याचें कामहि केसरी संस्थेमार्फत होईल. अशा रीतीनें पंचांग प्रवर्तन कमिटीच्या स्थापनेपासून शुद्ध पंचांगप्रसाराच्या कामाच्या खर्चांची जबाबदारी केसरी संस्थेनें आपल्याकडे घेतली आहे, व त्या कामीं आतांपर्यंत हजारों रुपये खर्चं केले आहेत.

---

## सह्याद्रि–मासिक ( निवेदन )

### ( सह्याद्रि जानेवारी १९३५ )

मासिक पुस्तक काढण्याचा आजचा हा उपक्रम, केसरी संस्थेच्या दृष्टीनें अपूर्वं म्हणजे नवा असाच होय. लो. टिळकांच्या बोलण्यांत ‘ पुण्यास एखादें चांगलें मासिक नाहीं ’ याविषयीं खेदात्मक उद्गार केंव्हां केंव्हां ऐकूं येत. परंतु केसरी छापखाना हा साप्ताहिक केसरी वर्तमानपत्रापुरताच ठेवणें हें टिळकांना सोयीचें वाटत असल्यामुळें, स्वतः केसरी संस्थेचें असें मासिक काढण्याचें त्यांच्या मनांत अखेरपर्यंत आलें नाहीं. परंतु त्यांच्या मरणोत्तर केसरी ट्रस्टनें केसरी द्विसाप्ताहिक केला. शिवाय स्वतःच्या मालकीच्या छपाईचे असे कांहीं उद्योग केले. त्यामुळें केसरी छापखान्याची आपोआप थोडीशी वाढ झाली. उदाहरणार्थ, शुद्ध पंचांग हें टिळकांच्या स्मरणार्थ केसरी छापखान्यांत हल्लीं दरवर्षी छापलें जातें. टिळकांच्या लेखांचे कांहीं ग्रंथ केसरी छापखान्यांतच छापण्यांत आले आहेत. केसरी–सारसंग्रह हा कायमचाच होऊन बसला आहे. मध्यंतरीं केसरीचा ज्युबिली अंक व परवांचा औद्योगिक विषयाचा विशेष अंक हे काढल्यापासून, संस्थेच्या छापखान्याकडून केवळ केसरी पत्र छापण्यापेक्षां कांहीं अधिक काम घेण्याचें योजलें तर तें घेतां येतें हें अनुभवाला आलें. यामुळें यंदा केसरीच्या मालकीचें असें एखादें मासिकच काढावें असें मनांत आलें, आणि त्याप्रमाणें हल्लींचा हा नवा उपक्रम केला आहे.

हें करतांना फक्त आहेत त्या मासिकांत आणखी एकाची भर घालावी इतक्याच हेतु मनांत धरला आहे. म्हणजे कोणच्याहि जुन्या मासिकाची जागा भरून काढणें किंवा नव्याची जागा अडविणें असा आमच्या उपक्रमाचा हेतु नाहीं. महाराष्ट्रांतील वाचकवर्गाची गरज व अभिरुचि इतकी निरनिराळ्या प्रकारची आहे कीं, आणखीहि अनेक व विविध स्वरूपाचीं मासिकें निघालीं तरी तीं हवींच आहेत. याला मर्यादाच पाडावयाची तर ती वाचकवर्गाच्या आर्थिक परिस्थितीनेंच पडेल. कसेंहि असो, आम्हीं हें मासिक पुस्तक काढतांना फक्त इतकीच दृष्टि ठेवली आहे कीं, उच्च प्रतीचें ज्ञान–विज्ञान जें वाचकांना वर्तमानपत्रांतून देणें सामान्यतः शक्य होत नाहीं तें द्यावें, आणि ही गोष्ट मध्यम स्थितींतील लोकांना सहज देतां येईल एवढ्या वार्षिक वर्गणींत बसवावी.

प्रस्तुत मासिक पुस्तक काढतांना त्यांतून केसरी संस्थेला आर्थिक मदत व्हावी असा हेतु धरलेला नाहीं. यामुळें जमाखर्चाच्या हिशेबानें वर्षाअखेर कांहीं नफा उरतोसा वाटला तर, सह्याद्रि मासिक अधिक चित्ताकर्षक व अधिक उपयुक्त करण्याकडेच त्याचा व्यय करण्यांत येईल. उलट या उपक्रमांत तोटा येतो असें आढळल्यास, तो कांहीं मर्यादेपलकिडे सोसावयाचा नाहीं असाहि पण मनाशीं निश्चय आहे. तात्पर्य, वर्गणीदारांकडून मिळणारा आश्रय व मासिकाच्याद्वारें होणारी त्यांची सेवा यांचा होतां होईतों पूर्ण मेळ घालावा अशी इच्छा मनांत धरली आहे.

‘सह्याद्रि’ मासिकांत कशा प्रकारचे विषय येतील याचें नक्की आश्वासन आम्ही कोणत्याहि प्रकारें आगाऊ देऊं इच्छित नाहीं. याविषयीं वाचकवर्गाच्या अनुभवास शेवटीं जें येईल तेंच खरें. तथापि सामान्यतः आश्वासन द्यावयाचें तर तें असें कीं, व्यापक दृष्टीनें राष्ट्रीय, राजकीय व सामाजिक हिताच्या बहुतेक विषयांचा संग्रह काळजीपूर्वक करण्यांत येईल. केवळ अमुकच एक परंपरा असें समजून, वाङ्मयाला भूषणभूत व वाचकवर्गाला उपयुक्त अशा कोणत्याहि विषयाला ‘सह्याद्रीं’त मज्जाव होणार नाहीं. ललितवाङ्मयाच्या सर्व प्रकारांचा आदर करण्यांत येईल. पण औद्योगिक किंवा व्यापारी विषय रुक्ष म्हणून त्यांचा अव्हेर करण्यांत येणार नाहीं. किंबहुना अशा विषयांतील उच्च तात्त्विक भूमिका साधून, त्यांतील गहन तत्त्वें शक्य तितक्या सुगम व चित्ताकर्षक भाषेनें वाचकवर्गापुढें ठेवण्याचा प्रयत्न आस्थापूर्वक केला

जाईल. चित्रकलेचेंहि साहाय्य शक्य तितकें घेतलें जाईल; पण त्यावर सर्वस्वीं भिस्त ठेवण्यांत येणार नाहीं. महाराष्ट्रीय समाज डोळ्यापुढें ठेवून, त्याचा प्राचीन इतिहास, त्याची सद्यःस्थिति व त्याचा भविष्यकालीं होणारा उदय याविषयींच्या उज्ज्वल पण सयुक्तिक भावना अंतरंगांत ठेवून, त्यांना पोषक अशाच कोणत्याहि विषयाच्या चिकित्सेला पूर्णपणें वाव देण्यांत येईल. महाराष्ट्राला अभिमानभूत व आधारभूत असें 'सह्याद्रि' हें जें नांव आम्हीं या मासिक पुस्तकाकरितां पसंत केलें त्याचें मर्म लक्षांत घेणारांना, त्यांतील विषयांसंबंधीं आमच्या अंतरंगाची कल्पना याहून अधिक स्पष्ट करण्याचें कारण नाहीं.

तथापि स्पष्टच सांगावयाचें तर तें असें कीं, प्रस्तुत मासिकांत निबंध, चर्चा, परीक्षण, संशोधन, लघुकथा, विनोद, संभाषणें, कल्पित प्रसंग, कादंबरी, नाट्यरचनात्मक छोटेखानी प्रबंध, कविता, प्रवास व इतर हरएक प्रकारचें ज्ञान–विज्ञान यासंबंधाचे लेख घालण्यांत येतील. मात्र मासिकाचीं पृष्ठें थोडीं यामुळें, संपादकाकडे आलेल्या लेखांतून निवड करण्याकरितां चाळण बरीच चाळवावी लागेल. मासिक होतां होईतों पक्षभेदातीत ठेवण्यांत येईल, व उच्च विचारात्मक सदभिरुचि संभाळणाऱ्या कोणत्याहि मतमतांतराच्या लेखाला तो अमुक पक्षाचा किंवा परंपरेचा आहे एवढ्याकरितां मज्जाव होणार नाहीं. प्रचलित किंवा इतर विषयांवरहि कोणी विनोदी भावनाव्यंजक किंवा वर्णनात्मक चित्रें पाठविल्यास त्यांचाहि स्वीकार केला जाईल. वाङ्मयलेखन हें केवळ ललितवाङ्मयात्मक असतें किंवा असावें अशी आमची समजूत नाहीं. खरें वाङ्मय सर्वांगीण व सर्वस्पर्शी असतें व असलें पाहिजे. वाङ्मयोपासनेला आर्थिक अशीहि एक बाजू असते म्हणजे वाङ्मयलेखन हें आज कोणालाहि उपजीविकेचें अगदीं स्वतंत्र व स्वयंपूर्ण असें साधन होत नसलें तरी, हळूहळू, निदान वरच्या प्रतीच्या साहित्यिकांपुरतें तरी तें होण्याच्या मार्गाला लागेल असें वाटतें. या दृष्टीनें पाहतां मोबदला घेतल्याशिवाय हुकमी लेख द्यावयाचे नाहींत, असा जो कांहीं साहित्यिकांनीं संप्रदाय पडण्याचा उपक्रम केला आहे तो सर्वस्वीं योग्य आहे. स्वतः वाङ्मयावर जगणारांनीं वाङ्मयावर लिहिणाऱ्या इतरांनाहि जगविलेंच पाहिजे. तरच धंद्याच्या दृष्टीनें वाङ्मय हें सुप्रतिष्ठित होईल. हें लिहिण्याचें कारण इतकेंच कीं, प्रस्तुत मासिक पुस्तकांतील लेखांकरितां तारतम्य दृष्टीनें लेखकांना अवश्य मोबदला दिला जाईल. तरी वरील सर्व खुलासा लक्षांत घेऊन

आपले लेख वगैरे पाठवून साहित्यिक, कवि व चित्रकार यांनीं प्रस्तुत मासिकास उपकृत करावें अशी विनंति आहे.

हल्लीं महाराष्ट्रांतील छापखानेवाले व प्रकाशक यांजकडून ग्रंथप्रसिद्धीचें काम बरेंच होत असतें, त्याची ठळक माहिती महिन्याच्या महिन्याला वाचकांना मिळावी अशी योजना या मासिक पुस्तकांत करण्याचा आमचा विचार आहे. त्याला बाहेरून हींच मदत लागेल कीं, छापखानेवाले व प्रकाशक यांनीं चालू महिन्यांत कोणत्या तारखेस कोणतें पुस्तक आपण प्रसिद्ध केलें याची माहिती थोडक्यांत लिहून आमचेकडे पाठवावी. ती मासिकांत घालणें योग्य वाटल्यास, जाहिरात न समजतां मजकूर समजून जंत्रीदाखल तिचा उपयोग करण्यांत येईल.

आधुनिक कालांत आमच्या समाजानें नवीन कांहीं शिकावयाचें तर, नियमितपणा म्हणजे वक्तशीरपणा, व सयुक्तिक हिशेबी स्वभाव, या गोष्टींचा प्रथमच प्रामुख्यानें निर्देश करतां येईल. त्या दृष्टीनें आमचें मासिक पुस्तक वाचक-वर्गाच्या हातीं दर महिन्याच्या पहिल्या तारखेस बिनचूक पडेल अशी व्यवस्था काळजीपूर्वक करण्याचें योजिलें आहे. या बाबतींत मॉडर्न रिव्ह्यू, किर्लोस्कर मासिक, व चित्रमय जगत् यांचें यश वाखाणण्यासारखें आहे. उलट महाराष्ट्रांतील कांहीं चांगलीं व होतकरू मासिक पुस्तकें अकालीं नष्ट झालीं याचें कारण, त्यांच्या विशेष परिस्थितीनें त्यांच्यावर आणलेली, अवक्तशीरपणाची आपत्ति हें होय. केसरी व मराठा हीं दोनहि वृत्तपत्रें ठरल्या दिवशीं प्रसिद्ध झालीं नाहींत अशी गोष्ट गेल्या त्रेपन्न वर्षांत एकदांहि घडून आली नाहीं, ही गोष्ट अभिमानानें उल्लेखितां येण्याजोगी आहे. आणि तेंच धोरण या नव्या मासिक पुस्तकासंबंधानेंहि आम्ही ठेवूं इच्छितों.

याबरोबरच उलट वाचक–वर्गालाहि आम्हाला एक विनंति करावयाची आहे ती ही. आजवर केसरी–मराठा पत्रांनीं वर लिहिल्याप्रमाणें वक्तशीरपणा संभाळला, व कोणाच्या वर्गणीची एक पैहि अन्यायानें घेतली नाहीं, असें असतां कांहीं वर्गणीदारांनीं मात्र तीनतीन चारचार महिने, कांहींनीं तर कित्येक वर्षें, या वर्तमानपत्रांचे अंक घेऊन, अखेर आपण होऊन वर्गण्या भरल्या नाहींतच, पण व्ही. पी. च्या बंग्या मागवून त्या परत केल्या; व वर्गणी मागितली याबद्दलच राग मानून गहजब केला! अशीं उदाहरणें अनेक देतां येतील. हा वर लिहिलेल्या

बिनहिशेबी स्वभावाचा परिणाम होय. पण अशा स्वभावानें कोणता धंदा यशाला पोंचेल ? ही गोष्ट लक्षांत घेऊन आम्हीं असें ठरविलें आहे कीं, कोणाच्याहि नुसत्या मागणीनें, म्हणजे त्याजकडून वर्गणी (मग ती वार्षिक, सहामाही अगर तिमाही असो) रोख आल्याशिवाय कोणालाहि 'सह्याद्रि'चा अंक सुरू करण्यांत येणार नाहीं. तसेंच चालू वर्गणी संपून नव्या वर्गणीची पोंच न झाल्यास त्या वर्गणीदारांकडे पुढील अंक रवाना होणार नाहीं. मुदतीपूर्वी कोणालाहि वर्गणी मनी-ऑर्डरीनें किंवा इतर रीतीनें भरतां येईल. आणि व्ही. पी. नें कोणी मागणी करून मग ती नाकारल्यास, त्यांचीं नांवें मासिकांत प्रसिद्ध करण्यांत येतील. तरी या रास्त हिशेबीपणाबद्दल आम्हांस कोणीं नांवें ठेवूं नये.

शेवटीं वाचकवर्गास एवढीच प्रार्थना करावयाची कीं, त्यांची सहकारिता मिळाल्यास 'सह्याद्रि' हें मासिक पुस्तक केसरी-मराठ्याचें एक कायमचें भावंड होऊन राहील अशी आम्हाला उमेद वाटते. म्हणून त्यांनीं ही सहकारिता द्यावी अशी आम्ही प्रार्थना करतों.

## सह्याद्रीविषयीं कांहीं माहिती

### ( सह्याद्रि जानेवारी १९३५ )

कोणत्याहि नवीन वस्तूचें नामकरण करणें हें एखाद्या सट्ट्यासारखें किंवा सोडतीसारखें आहे. म्हणजे त्यांत यश हटकून येईल असें कोणीहि समजूं नये. नांव ठेवावयाचें तें एक ठेवणाराची केवळ मनाची आवड म्हणून, किंवा तें गुणदर्शक व्हावें म्हणून. पैकीं सह्याद्रि हें नांव या मासिकाला आम्हीं योजिलें तें दुसऱ्या दृष्टीनें. प्रस्तुत मासिक हें एकांगीं न होतां अनेकांगीं व्हावें असा हेतु. आणि पर्वताइतका अनेकांगीपणा दुसऱ्या कशांत आढळणार ? छाया व प्रकाश यांचीं सर्व प्रकारचीं मिश्रणें, उत्तुंग शिखरें व खोल दऱ्या, दाट झाडीनें वेष्टिलेले व अगदीं उघडे बोडके पार्श्वभाग, घातक व निरुपद्रवी अशा दोन्ही प्रकारच्या विविध प्राण्यांचा अधिवास, शिखरावरील थंडी व पायथ्याजवळील उष्णता, विषारी व गुणकारी अशा दोहों प्रकारच्या औषधींची समृद्धि, तीर्थासन्निध बसून आकंठ स्नानपान करणारे तपस्वी व वाटेल त्याला कंठस्नान घालणारे वाटमारे व दरोडेखोर यांचा गुप्तवास—तात्पर्य पर्वत म्हटला म्हणजे त्याचें अनेकांगित्व कोण किती वर्णन करूं शकणार ? वरील प्रमाणें वर्णन करूनहि आणखी कोणाची जितकी

म्हणून काव्यबुद्धि किंवा प्रतिभा असेल तितकी खर्ची घालण्याला पुरेल व शिवाय उरेल अशी कौतुकास्पदता पर्वतामध्यें असते. शिवाय काव्यकल्पना सोडून व्यवहाराच्या दृष्टीनें पाहिलें तरी धर्म, इतिहास, राजकारण या सर्वांसंबंधीं महाराष्ट्राचे मनांत मनोभावनांचे तरंग उठविण्याची पात्रता सह्याद्रि या नांवाखेरीज दुसऱ्या कोणत्या शब्दांत अधिक असणार ? महाराष्ट्राच्या गत इतिहासाला सह्याद्रि हा जसा आधारभूत झालेला आहे, तसाच भावी इतिहासालाहि तो परिचित किंवा अकल्पित रीतीनें आधारभूत होणार नाहीं म्हणून कशावरून ? हें आमचें सांगून झालें. पण वाचकांच्या कल्पनाशक्तीलाहि संचार करण्याला वाव रहावा म्हणून या नामकरणाचा खुलासा आम्ही येथेंच आवरतां घेतों. आम्हीं स्वीकारलेल्या या नांवाच्या सार्थकतेबद्दल कदाचित् मतभेद होईल. पण सह्याद्रि हें नांव ज्याला प्रिय नाहीं असा वाचक बहुधां महाराष्ट्रांत किंवा महाराष्ट्राबाहेरहि निघणार नाहीं, अशी आमची खात्री आहे; म्हणूनच तें प्रिय व उदात्त नांव आम्हीं या मासिकाला ठेविलें आहे.

हिंदुस्थानामध्यें ज्या पर्वतांच्या अनेक रांगा आहेत त्यांत सह्याद्रीची दुसरी प्रत लागते. या रांगेची लांबी तापीच्या उत्तरेपासून कोचीन त्रावणकोरपर्यंत हजार अकराशें मैल आहे. पैकीं तापी नदी ते पालघाट येथपर्यंत लांबी ८०० मैल. पुढें दहा कोस खिंड व त्यापलीकडे तीच रांग सुमारें २०० मैलांवर गेली आहे. उत्तरेचें टोंक, तापी नदीचें खोरें व दक्षिणेचें टोंक केपकन्याकुमारी हें आहे. उंचीच्या मानानें हा पर्वत मध्यम आहे, म्हणजे हिमालय किंवा नीलगिरि यांच्या इतका तो उंच नाहीं. परंतु त्याचीं कांहीं शिखरें ५००० फूट उंच भरतात. महाबळेश्वर ४००० फूट, पुरंदर ४४७२ फूट आणि सिंहगड ४१६२ फूट अशी मध्यसह्याद्रीच्या कांहीं टोंकांची उंची मोजण्यांत आली आहे. हा पर्वत पश्चिम समुद्राला बहुधा समांतर असा गेला आहे. क्वचित् एखादे ठिकाणीं त्यांच्यांतील अंतर १०० मैल भरण्याइतका तो पूर्वेकडे वळला आहे; तर क्वचित् हें अंतर १५–२० मैलच भरेल इतका तो पश्चिमेकडे वळला आहे. त्याच्या घाटमाथ्याची रुंदी सुमारें ३०–३५ मैल भरते; व तेथून देशविभागाचा उतार लागतो. या पर्वताच्या माथ्यावर विस्तीर्ण अशीं सपाट मैदानें नाहींत. उलट तुटलेले कडे, उंटाच्या पाठीवरील मदारीसारखे मध्येंच आलेले उंचवटे, आणि उच्चनीच विभागांचें पूर्ण मिश्रण झालेल्या अशा दऱ्या व खोरीं, अशी त्याची रचना आहे. या

८००–१००० मैलांपैकीं ३५०–४०० मैल एवढा भाग महाराष्ट्राचा असून, त्याच्या पश्चिम अंगें कोंकणांत व पूर्व अंगें देशविभागांत मराठी भाषाच बहुतांशीं चालते.

या पर्वताची घडण, भूगर्भशास्त्र जाणणारांच्या मतें, फार प्राचीन काळीं झालेली आहे. पर्वतालगत मध्यमहाराष्ट्राचा पूर्वेकडचा भाग, व घाटपायथ्यापासून खालीं समुद्रापर्यंत सर्वच भाग, एकवेळ अरण्यमय होता. देशभाग जुन्या दंडकारण्यांत मोडतो. पण आतां तेथें बरीच वस्ती आणि शेतीची लागवड झाल्यामुळें, घाटमाथ्यापर्यंत झाडी पुष्कळच तुटली. आणि सह्याद्रीच्या कांहीं पश्चिम उतारावरील झाडी देखील तशीच तुटली आहे. ही झाडी तुटली असली तरी सावित्री नदीच्या दक्षिणेपासून दक्षिण कोंकणापर्यंत तिच्याऐवजीं नारळी, पोफळी व आंब्यांचीं झाडें यांच्या लागवडीमुळें सृष्टिसौंदर्य थोडेसें उरलें आहे. पण खालीं कारवार, मलबार, कोचीन व त्रावणकोर या भागांत तर झाडी व जंगलें दाट असून शिवाय वर सांगितलेली लागणीची, लागवडीची झाडीहि पुष्कळच आहे. पर्वताच्या डोक्यावर आहे तेथें झाडी पुष्कळच आहे. पण नाहीं तेथें ती नसण्याचें कारण या पर्वतांतील खडकाची जात फार कठीण असून त्यावर पाणी टिकत नाहीं व आंत मुरत नाहीं. या अंतर्रचनेच्या दृष्टीनें सह्याद्रि हा हिमालयासारखा नाहीं.

हिमालय पर्वत फार मोठा व उंच खरा. पण बराचसा भुसभुशीत आहे. त्यांतील खडक सह्याद्रीच्या कातळासारखा टणक नसून मुरमाड म्हणजे खणावयाला फार सोपा असतो. सह्याद्रीचे कांहीं भाग टाकीवर घणाचे घाव घातल्याशिवाय, किंवा सुरुंग लावल्याशिवाय, दाद देणारे नाहींत. सह्याद्रीचा घाटमाथा अशा टणक शिळांची एक अखंड भिंतच बनल्यामुळें, घाटमाथ्यावर कृत्रिम तलाव पुष्कळ होण्यासारखे असले तरी नैसर्गिक तलाव नाहींत. किंचित् खालीं उतरणीवर गेल्यावर झरे निघतात. या लांबलचक पर्वतरांगेच्या माथ्यावर पडणारें पाणी बहुतेक पूर्वसमुद्राला जाऊन मिळतें. तें मिळण्याचे मुख्य तीन मार्ग म्हणजे गोदावरी, कृष्णा, कावेरी या नद्या होत. यांच्याद्वारें, आज हजारों वर्षें, मध्य महाराष्ट्र व कर्नाटकचा कांहीं भाग यांतील सुपीक माती व खनिज संपत्ति मद्रास इलाख्याकडे वाहून नेली जात आहे. कृष्णा व गोदावरी यांचीं मुखें समुद्राच्या एखाद्या फाट्यासारखीं विस्तृत आहेत. आणि पूर्वेकडील सपाट मुलुखांतून तीनहि नद्यांचे मोठमोठाले कालवे काढून त्यांच्या योगानें लाखों एकर शेती व बागायती तिकडे होते. उलट

सह्याद्रीच्या पश्चिम अंगानें वाहणाऱ्या नद्या अल्पप्रमाण. आणि त्यांचा कालवा काढतां येईल असा सपाट मुलूख तिकडे मुळींच नाहीं. या लहान नद्यांनीं किंवा प्रवाहांनीं घाटमाथ्याकडून पश्चिमेकडे ज्या वाटा काढल्या त्यांचेच घाट बनले. आणि मुंगीनें चुनेगच्ची भिंतीच्या किंवा लांकडाच्या केसाइतक्या फटींतून वाट काढावी त्याप्रमाणें, देशावरून कोंकणांत व कोंकणांतून देशावर संचार करणाऱ्या यात्रेकरूनीं, बेलदारांनीं, लमाणांनीं घाटांतील पायवाटा मळविल्या. अर्थात् त्याला अनुसरूनच प्रथम बैलगाड्या व आतां मोटारी जाण्याइतक्या मोठ्या रस्त्यांचे सोपे घाट झाले आहेत. पैकीं घाटाखालीं उतरून संचार करणाऱ्यांपेक्षां घाटांतून वर येऊन संचार करणाऱ्यांचीच संख्या केव्हांहि अधिक होती. याचें कारण कोंकण भागांतील दाट वस्ती व निर्वाहाच्या साधनांची कमतरता. तीर्थें क्षेत्रें घाटमाथ्यावर आहेत तशींच ती सह्याद्रीच्या डाव्याउजव्या अंगाला पसरलेलीं आहेत. यामुळें प्रवाशाच्या संचाराला तें एक कारण आहेच. पण कोंकणी लोकांचें दारिद्र्य हें कारण अधिक प्रबल. कोंकणांतून देशांत येऊन वसाहत करणाऱ्या एक हजार कुटुंबांगणिक, दोनतीन कुटुंबें तरी देशावरून खालीं कोंकणांत जाऊन वस्ती केलेलीं केव्हां आढळलीं असतील कीं नाहीं कोणास ठाऊक ! कोंकणांत सुंदर वनश्री, गोड पाणी व समुद्रकांठची शुद्ध हवा यांची संपत्ति विपुल आहे. पण तेवढ्यावर वाढत्या कुटुंबाचा कोणाचाही संचार चालत नाहीं. आणि महत्त्वाकांक्षी मनुष्याला तर कोंकणांत कोंडमारा झालासाच वाटतो. देशविभाग हें प्रशस्त नांदतें घर, व कोंकण हें परडें किंवा फुलबाग. मुख्य घर किंवा वाडा ज्याच्या ताब्यांत त्याच्याच ताब्यांत त्याखालचें परडें किंवा फुलबाग हीं असावयाचीं. परंतु संसार व सरकारदरबार यांचा ऐश्वर्यसंपन्न व्यवहार देशावरच चालावयास मुबलक क्षेत्र होतें. कोंकणांत राजांचा अंमल होता, उत्पन्नाच्या बाबी होत्या, पण राजधान्या नव्हत्या ! यामुळें सरदार, मुत्सद्दी, दरकदार, इनामदार यांच्या अधिकारसंपन्न अशा अखंड वंशावळी, किंवा त्या कारणानें लाभलेलीं मोठमोठीं वतनें, हीं शाहूमहाराजांच्या कारकीर्दीपर्यंत देशावरील समाजांतच आढळतात. ऐश्वर्याची ही खानदानी कोंकणी समाजाला लाभणें अशक्य होतें. म्हणून कोंकणस्थांना देशावर " उपरी लोक " मानतात तें एका अर्थानें खरेंच आहे. किंबहुना मनुष्यस्वभावाच्या दृष्टीनेंहि कोंकणांतील लोक व देशावरील लोक यांच्यामध्यें जे ठळक भेद आहेत, ते स्थानपरत्वेंच बनले आहेत असें सरकारण दाखवितां येईल.

सह्याद्रीच्या विशिष्ट घडणीचमुळें त्यावर प्रशस्त मैदाने व तलाव नाहींत, हें वर सांगितलें. पण त्या विशिष्ट घडणीचा एक गुण म्हणूनच घाटमाथ्यावर, व पर्वताच्या इतर भागावरहि, लहानमोठे गड बनलेले आहेत. आणि वेळोवेळच्या राज्यकर्त्यांनीं त्याच गडांचे लढाऊ किल्ले बनविले आहेत. जुन्याकाळीं युद्धाची साधनें हल्लींहून वेगळीं होतीं. एका किल्लेकोटाचा आश्रय असला म्हणजे तें एक लष्करी केंद्र बनून आसपास अनेक कोसपर्यंत मुलुखावर सत्ता चालवितां येत होती. सोंगट्यांच्या पटांत "कटींना" जें महत्त्व तेंच मुलुखांत किल्ल्यांना. आतां त्यांचा उपयोग राजसत्तेला होई त्याप्रमाणेंच स्वाभाविकपणें तो पुंड व बंडखोर यांनाहि होई. शिवाजीमहाराजांच्या पूर्वीं वर देशाकडून खालीं कोंकणाकडे मुसलमानी बादशाहांचा अंमल पसरला, तेव्हा डोंगरी किल्ले कांहीं बांधिले गेले. ते तर मराठ्यांनीं हस्तगत केलेच; पण स्वतः नवीनहि कांहीं बांधिले. शिवाजीमहाराजांची सर्व कारकीर्द 'रायगड' व 'राजगड' या दोन डोंगरी किल्ल्यांत स्थापिलेल्या राजधान्यांतूनच झाली. सातारकर महाराज अखेरपर्यंत डोंगरी किल्ल्यावरच राहात. अगदीं इंग्रजशाहीच्या सुमारास ते प्रथम गडाखालीं माचीला व मग मैदानांत उतरले; व मग त्यांनीं राजवाडे बांधिले.

सन १७१६ सालीं रामचंद्रपंत अमात्य यांनीं "राजनीति" हा प्रबंध लिहिला. त्यांत हे जे गड म्हणजे डोंगरी किल्ले यांचें महत्त्व खालीलप्रमाणें वर्णिलें आहे.

"संपूर्ण राज्याचें सार तें दुर्ग. दुर्ग नसतां मोकळा देश परचक्र येतांच निराश्रय होऊन—उध्वस्त होतो. थोरले स्वमींनीं ( शिवाजी ) हें राज्य तर गडांवरूनच निर्माण केलें. औरंगजेबासारखा महाशत्रू चालून येऊन विजापूर भागानगरासारखीं महा संस्थानें आक्रमिलीं. परंतु या राज्यांत किल्ले होते म्हणून अवशिष्ट राहिले, गडकोटविरहित जें राज्य त्याची स्थिति अभ्रपटलन्याय आहे. गडकोट हेंच राज्य. गडकोट म्हणजे राज्याचें मूळ, गडकोट म्हणजे खजिना, गडकोट म्हणजे सैन्याचें बल, गडकोट म्हणजे राज्यलक्ष्मी, गडकोट म्हणजे आपलीं वसतिस्थळें, गडकोट म्हणजे सुखनिद्रागार, किंबहुना गडकोट म्हणजे आपलें प्राणसंरक्षण !"

ज्वालामुखीच्या परिस्थितींत असलेल्या आपल्या या पृथ्वीवरील अगदीं प्राचीन घडामोडींत उफाळणाऱ्या तप्त रसांतून आपलें हें दख्खनचें पठार बनल्यावर, त्याच्या डाव्या उजव्या कडा धुवून जाऊन पूर्वघाट व पश्चिमघाट म्हणजे आपला सह्याद्रि

बनला, असें भूगर्भशास्त्रज्ञ सांगतात. हजारों वर्षांपूर्वींच्या या बनावानंतर कितीतरी शतकेंपर्यंत, आपण कांहींशा अस्पष्ट अशा प्राचीन इतिहासकालांत येतांना, सह्याद्रीच्या आसमंतांत जें निबिड दंडकारण्य पहातों, त्याचेंच साम्राज्य सर्वत्र असलें पाहिजे यांत शंका नाहीं. अगस्त्यऋषींचें दक्षिणपथाप्रत आगमन, श्रीरामचंद्राचें लंकेप्रत गमन, इत्यादि पुराणकालीन कथांत या प्रांतांत अगदीं प्राथमिक वसाहती करण्याच्या प्रयत्नांचें दिग्दर्शन केलेलें आहे ही गोष्ट आतां सर्वमान्य झालेली आहे. वसाहतीच्या या फुटकळ प्रयत्नांनीं पुढें सुधारलेला महाराष्ट्राचा प्रदेश इतिहासकालांत अनुक्रमें सम्राट अशोक, व त्यानंतर आंध्रवंशीय शालिवाहन, अभीर, राष्ट्रकूट, चालुक्य व यादव आदिकरून वंशांच्या आधिपत्याखालीं गेल्याचा शोध लागतो. तथापि अगदीं सह्याद्रीच्या लगत्याचा भाग या सर्व काळांत बहुतांशीं दुर्गम असला पाहिजे असेंच वाटतें. मात्र ' पेरिप्लुस ' सारख्या प्राचीन व्यापार व दळणवळण सिद्ध करणाऱ्या ग्रंथांवरून, या सर्व काळांत कोंकण किनारा व देश यांमधील माल ने आण करण्यापुरते कांहीं सह्याद्रींतील हमरस्ते सुरक्षित राखण्याचा प्रयत्न यशस्वी झालेला दिसतो.

अल्लाउद्दीन खिलजीनें यादवांच्या राजवटीचा नाश केल्यानंतर महाराष्ट्रांत बह्मनी, त्यानंतर त्यांतून फुटलेल्या पांच शाखा, त्यांच्यामागून जबरदस्त मोंगल, आणि अगदीं शेवटीं मराठे यांचीं राज्यें झालीं. हा सर्वांच्या परिचयाचा इतिहास, महाराष्ट्राच्या कण्याप्रमाणें राहिलेल्या, सह्याद्रीनें पाहिला आहे. परंतु बारकाईनें विचार केल्यास, महाराष्ट्रांतील अहिंदूंच्या सुमारें तीनशें वर्षांच्या कारकीर्दींत, सह्याद्री आणि त्याचा निकटचा प्रदेश यांवर, मुसलमानांची सत्ता फारशी स्थिर झालेली आढळत नाहीं, ही अभिमानाचीच गोष्ट आहे. त्यावेळीं सह्याद्रीचीं मावळें आणि मुऱ्हीं हे जंगली भाग रानवट लोकांनीं गजबजलेले असून त्यांवर आधिपत्य गाजविणारे छोटे छोटे राजे कडवे व बेदरकार असल्यामुळें, त्यांच्याशीं सलोख्यानें राहण्यांतच तत्कालीन अधिसत्तेचें हित आहे हें लक्षांत बाळगूनच मोठमोठे सुलतान रहात. कधीं काळीं या केवळ नांवाच्या ताबेदारींत असलेला मुलूख वांटणीमध्यें आपल्याकडे आल्यास तो घेण्याचेंहि मोगलांनीं टाळलेलें आहे असें आढळून येईल. आदिलशाही निजामशाहीच्या ऐन भरभराटीच्या काळांत महमद गवानसारख्या सरदारांची या मावळी बंडखोरांनीं रानांत फसवून लांडगेतोड केलेली आहे.

सह्याद्रीच्या लगत्यास खरी वसाहत आणि खरें स्वयंपूर्ण राज्य हें शिवाजीच्या वेळेपासून आणि मराठ्यांचेंच झालें. ह्या खास प्रदेशाशीं दुर्गादेवीच्या दुष्काळाचा जितका संबंध नसला तरी, त्यानंतरच्या काळांतील राज्य, संस्था, त्यांच्या राजधान्यांचें सह्याद्रीपासूनचें अंतर लक्षांत घेतां हळूहळू सह्याद्रीकडे झुकतांना दिसतात. राष्ट्रकूटांची राजधानी मालखेड, चालुक्यांची कल्याण, यादवांची देवगिरी ही अर्वाचीनांतील प्राचीन परंपरा नष्ट झाल्यानंतरची बहामनी शाहींतील गुलबर्गा, बेदर, गोवळकोंडा, गाविलगड, अहमदनगर, विजापूर ही कक्षा; आणि शेवटीं शिवशाहीची पुरंधर, रायगड, सातारा ही अगदीं पर्वतसंन्निकर्षांतलि श्रेणी; यांची परस्पर तुलना केल्यानें ही गोष्ट स्पष्ट होणार आहे. सह्याद्रींतील असंख्य किल्ले म्हणजे महाराष्ट्राच्या राजकीय इतिहासांत वज्रलेप होऊन बसलेले शिलालेखच होत. शिवशाहीच्या स्वराज्यस्थापनेंत तिच्या भक्तांनीं केलेले पराक्रम याच पर्वताच्या आश्रयानें झालेले आहेत. आणि मराठशाहीची दृष्टि अखिल भारतवर्षीय अधिसत्ता मिळविण्याकडे वळल्यानंतर, त्यांची राजधानी रायगडाहून साताऱ्यास व तेथून पुण्यास अशा अधिकाधिक उघड्या मुलखांत उतरली असली, तथापि मराठ्यांची खास युद्धपद्धति आणि खास शिबंदी अखेरपर्यंत सह्याद्रींतील मावळे व हेटकऱ्यांचीच होती. सह्याद्रीच्या ओबडधोबडपणाचें प्रतिबिंब अखेरपर्यंत मराठ्यांच्या संस्कृतींत पडल्यामुळेंच, त्यांच्या पदरीं वैभवशाली इमारती व मूल्यवान् प्रासाद बांधल्याचें श्रेय पडत नाहीं.

सह्याद्रि हा जसा महाराष्ट्राचा इतिहासादर्श आहे तसाच तो धर्मबंधहि आहे. महाबळेश्वर, भीमाशंकर अशांसारखीं अनेक धर्मक्षेत्रें, आणि गोदावरी, कृष्णा, भीमा आदिकरून पवित्र नद्यांचे उगम साहजिकच या पर्वतांत झालेले आहेत. महाराष्ट्रांतील मनोहर सृष्टिशोभा येथेंच पहावयास मिळत असल्यामुळें अलीकडे हवा खाण्याचीं नामांकित ठिकाणेंहि सह्याद्रींतच वसविण्यांत आलीं आहेत. तात्पर्य, अगदीं प्राचीन इतिहासकालापासून आजतागायत, महाराष्ट्रीय वैशिष्ट्याचें आणि महाराष्ट्राचा इतिहास, समाज, रचना, धर्मभावना, उत्पादनशक्ति आदिकरून जें जें महाराष्ट्राचा अभिमान बाळगण्यासारखें अगर नितान्त आपुलिकीच्या भावनेनें संभावना करण्यासारखें वाटत असेल, त्या सर्वांचा आश्रय आणि आधार म्हणून ‘ सह्याद्रि ’ हें या मासिकानें घेतलेलें नांव सर्वांच्या आदराला पात्र होईल अशी खात्री वाटते.

---

## २४ केसरीचा व तुरुंगाचा ऋणानुबंध

केसरी–मराठा पत्रांशीं निरनिराळ्या वेळीं कमी–अधिक संबंध आलेल्या लोकांपैकीं बहुतेकांस राजकीय गुन्हेगार म्हणून तुंरुगवास घडलेला आहे किंवा त्यांजवर खटले झालेले आहेत. ते कसे हें खालील यादीवरून दिसून येईल.

१ **लो. टिळक**–१८८२ चार महिने कैद, १८९७ दीड वर्ष सक्तमजुरी, १९०८ सहा वर्षें काळेपाणी.

२ **प्रो. आगकर**–१८८२ चार महिने कैद.

३ **न. चिं केळकर**–१९०८ चौदा दिवस कैद व १२०० रु. दंड. १९२५ बासष्टशें रुपये दंड.

४. **कृ. प्र खाडिलकर**–१९२८ तीन हजार रु. दंड. १९२९ एक वर्ष कैद.

५ **ज. स. करंदीकर**–१९२२ तीन महिने सक्तमजुरी.

६ **दा. वि. गोखले**–१९३० आठ महिने कैद.

७ **ग. वि. केतकर**–१९३० नऊ महिने कैद.

८ **वा. कृ. भावे**–१९०८ एकशेंपसतीस रु. दंड.

९ **वामन मल्हार जोशी**–१९०९ तीन वर्षें सक्तमजुरी.

१० **पांडुरंग महादेव बापट**–१९२३ सात वर्षें सक्तमजुरी.

११ **डॉ. वि. म. भट**–१९१० पांच वर्षें सक्तमजुरी.

या बाबतींत लो. टिळकांच्या मनाच्या मोठेपणाची म्हणून एक गोष्ट सांगण्याची ती अशी कीं, पूर्वी तुरुगांतून सुटका होऊन बाहेर आलेल्या मनुष्यांचा म्हणजे राजकीय गुन्हेगारांचा, छळ सरकार फार करीत असे. त्याचा प्रकार असा कीं, त्यांच्यामागें पोलिसांचा ससेमिरा लावून द्यावयाचा. यामुळें कोणास त्यांना मनांतून थारा द्यावासा वाटला तरी तसें करण्यास ते सहजच भीत. या कारणानें आधींच तुरुंगवासांतून यावें व नंतर बेकार व्हावें, अशी आपत्ति पुष्कळांवर तेव्हां येई. म्हणून टिळकांनीं साधारणपणें असा क्रम ठेवला होता कीं, राजकारणाच्या चळवळींत शिक्षा भोगून आलेला मनुष्य आपल्या साहायक उपसंपादक मंडळांत घेऊन, त्याला कांहीं तरी कायमचा असा इतर उद्योग लागेपर्यंत, त्याचा

चरितार्थ चालवावयाचा. डॉ. भट, पांडुरंग महादेव बापट, वामन मल्हार जोशी हे गृहस्थ वरील प्रकाराचीं उदाहरणें होत.

## २५ केसरी महोत्सव
### केळकरांचें भाषण

"श्रीशंकराचार्य, केसरी महोत्सव मंडळाचे अध्यक्ष, उपाध्यक्ष, संपादक-व्यवस्थापक व उपस्थित सर्व सज्जन बंधुभगिनी—

"आजचा हा समारंभ अनेक दृष्टींनीं अपूर्व व केसरी संस्थेला अभिमानास्पद असा आहे. म्हणून हा समारंभ योजिल्याबद्दल, घडवून आणल्याबद्दल, व प्रत्यक्ष उपस्थित होऊन तो साजरा करण्याबद्दल, मी व माझे सहकारी मित्र धोंडोपंत विद्वांस हे आपणा सर्वांचे यथाक्रम आभार मानितों.

"सभा, अभिनंदन व सत्कार या दृष्टीनें या समारंभाला महत्त्व आहेच; पण त्याला अपूर्वत्व आहे असें जें मीं वर म्हटलें त्याचें कारण हें कीं, आपण जो 'केसरी प्रबोध' नांवाचा ग्रंथ आम्हांला अर्पण केला तोच खरा अपूर्व असून, त्याच्या योगानें सत्काराला जें विशेष प्रकारचें औचित्य येत आहे तें इतर कोणत्याहि गोष्टीनें आलें नसतें.

"आजच्या समारंभाची कल्पना आपणाला सुचण्याचें कारण केसरीला पन्नास वर्षें पूर्ण होऊन एकावन्नावें वर्ष लागलें हें होय. या गोष्टीचा आनंद व महत्त्व हीं आपणाप्रमाणेंच आम्हां ट्रस्टींनाहि वाटलीं. म्हणून आम्हीं तन्निदर्शक अशा दोन गोष्टी यापूर्वीं केल्या. पहिली गोष्ट म्हणजे गेल्या ता. १ आगस्ट रोजीं आम्हीं, केसरीच्या शिलकेंतून तीन लक्ष रुपयांचा ट्रस्ट करून, पर्सफंडाच्या ऋणांतून कै. लो. टिळक यांना अनृणी केलें, व राष्ट्रीय स्वरूपाच्या सार्वजनिक कार्यांना दरवर्षीं एखादी मोठी रक्कम खर्चाला हमखास व निर्वेध मिळावी अशी योजना केली. या योजनेनें नागपूर, वऱ्हाड, कर्नाटक व मध्यमहाराष्ट्र या प्रांतांत मिळून दरसाल सुमारें चौदा पंधरा हजार रुपये सार्वजनिक कार्यांवरील खर्चाला मिळत जातील. स्वतः केसरीचा यापुढील सांपत्तिक उत्कर्ष किंवा अपकर्ष ईश्वरेच्छेप्रमाणें कसाहि होणार असला तरी, ही तीन लक्षांची रक्कम अबाधित राहूं शकेल, शक्य तर वाढेल पण कमी होणार नाहीं, असा विश्वास सहजच वाटतो. म्हणून इतर सर्व गोष्टी बाजूस ठेवल्या तरी, पन्नास वर्षांच्या केसरीच्या वाढत्या जीवनवृक्षाचें हें एक फळ म्हणून तें केसरीच्या आश्रयदात्या अखिल जनतेला आमच्याकडून अर्पण

करितां आलें याबद्दल आनंद वाटणें साहजिक आहे. या तीन लक्ष रुपयांच्या ट्रस्टची प्रथम प्रसिद्धि एकावन्नाव्या वाढदिवशींच करण्यांत आली असती तर त्यांत औचित्य व स्वारस्य अधिक आलें असतें असें कांहीं सहृदय मित्रांना वाटतें. ती गोष्ट आधीं पांच महिने करण्याला बलिष्ठ अशीं आमचीं अनेक कारणें होतीं. परंतु तीं सर्व जाहीर रीतीनें येथें सांगण्याचें कारण नाहीं. एक दोनच सांगावयाचीं तर तीं अशीं कीं, प्रेसऑर्डिनन्स, राजकीय परिस्थिति व उतारवयांत स्वतःच्या जीविताविषयीं व्यक्तिशः आम्हां ट्रस्टींना वाटणारा बेभरवंसा.

असो. ता. १ आगस्ट १९३० रोजीं केलेलें हें ट्रस्टडीड ता. १ जानेवारी १९३१ रोजीं केसरीला लागणाऱ्या ५१ व्या वर्षाच्या वाढदिवसाला अनुलक्षूनच होतें. पण वाढदिवस हा मात्र आधीं ओढतां येत नसल्यामुळें आम्हीं तो योग्य दिवशींच पाळला; व ता. ३ जानेवारी रोजीं केसरीचा ज्युबिली अंक प्रसिद्ध केला. हा अंक नेहमींहून वेगळ्या प्रकारचा काढून त्यांत केसरीचा पन्नास वर्षांतील स्थित्यंतराचा इतिहास, जुने नवे संपादक उपसंपादक, कारखान्यांतील कामगार, इतर मदतगार, प्रेमी व ऋणानुबंधी लोक यांचें चित्रदर्शन, केसरीचें धोरण व तत्त्वें यांचें दिग्दर्शन, व कारखाना या नात्यानें केसरीच्या अंतर्व्यवस्थेची माहिती, इत्यादि गोष्टी यथावकाश यथाशक्ति त्या ज्युबिली अंकांत आम्हीं दिल्या. हा एक अपूर्व प्रसंग असें समजून आम्हीं केसरीच्या वाचकांची जिज्ञासा अनेक अंगांनीं सफळ करण्याचा प्रयत्न केला, आणि या अंकाला आलेल्या मागणीवरून तो अंक लोकांना बरा वाटला असें दिसतें.

या ज्युबिली अंकाची रूपरेखा ठरवितांना आम्ही कांहीं प्रमुख हितचिंतकांचे अभिप्राय विचारले होते. त्यांत एक अभिप्राय असा मिळाला कीं, या अंकांत आम्हीं केसरीच्या पन्नास वर्षांच्या समग्र लिखाणाचें समालोचन करावें. सूचना सर्वस्वीं योग्यच होती. तथापि तो अंक केसरीच्या वर्गणीदारांना फुकट द्यावयाचा, म्हणजे नेहमींप्रमाणें पंचवीस हजारांवर प्रती काढावयाच्या, शिवाय वर्गणीदार नसणाऱ्या वाचकांनाहि तो घ्यावासा वाटणार म्हणून आणखी दहा-पांच हजार प्रती काढावयाच्या, शेंदीडशें चित्रें घालावयाचीं व शेंपन्नास पानें मजकूर तयार करून छापावयाचा; परंतु नुसतें हेंच काम थोड्या मुदतींत व त्या वेळच्या विशेष परिस्थितींत आवरणें शक्यच नव्हतें. आम्हीं काढला असाच व काढला येवढाच ज्युबिली अंक काढणें हें काम देखील आम्हांला अत्यंत परिश्रमाचें व जिकिरीचें

होऊन बसलें. किंबहुना अनेक स्नेही, हितचिंतक व व्यवसायबंधु यांचें जें निष्ठापूर्वक सहाय्य मिळालें तें मिळालें नसतें तर तो अंक याहून रोडका व नीरस असा काढावा लागला असता! सांगण्याचें तात्पर्य इतकेंच कीं, ज्युबिली अंकांत पन्नास वर्षांतील केसरीच्या विविध लिखाणाचा परामर्ष घेण्याची कल्पना चांगली असली तरी, त्या अंकाच्या स्वाभाविक मर्यादा व याबाबत आमचीं साधनें दोन्ही प्रतिकूळ होतीं. म्हणून ती कल्पना आम्हांला अमलांत आणतां आली नाहीं.

पण केसरीविषयीं आजवरचा आमचा अनुभवच असा आहे कीं, केसरीचें कोणतेंहि न्यून पडलें कीं, ते केसरीचे स्नेही, ऋणानुबंधी व हितचिंतक भरून काढतात. अशा समयोचित साहाय्याचा अनुभव केसरीला त्याजवरील अनेक संकटसमयीं आलाच होता; व तोच आज या आनंदाचे प्रसंगीं यावा यांत आश्चर्य काय! केसरीच्या संकट–काळीं मनुष्यबळ व द्रव्यबळ यांची लोकांकडून मदत नेहमीं झाली. आणि त्याच्या एकावन्नाव्या वाढदिवसाच्या आनंदोत्सवाला उद्देशून, त्या वाढदिवसानंतर अवघ्या दहाच आठवड्यांत ज्युबिली अंकांतलें तें न्यून भरून काढणारा हा एवढा नऊशें पानांचा ग्रंथ योजून, लिहवून, छापून प्रसिद्ध करण्याचें प्रचंड काम आपल्या मंडळानें पार पाडलेलें पाहून, केसरीवरील आपल्या प्रेमाबद्दल जितकी कृतज्ञता वाटते तितकेच आपल्या कर्तृत्वशक्तीबद्दल धन्यवाद द्यावेसे वाटतात. आपण सत्काराच्या व अभिनंदनाच्या ज्या ज्या म्हणून वस्तू आम्हांला आज दिल्या त्या सर्वांत 'केसरी–प्रबोध' ग्रंथ हीच खरोखर अधिक मौल्यवान् व स्पृहणीय अशी वस्तू आहे. आणि तिचा आम्ही अत्यंत आनंदानें स्वीकार करितों. विद्यादानाप्रमाणें वाङ्मयदान हेंहि सर्व दानांपेक्षां अधिक श्रेष्ठ व श्रेयस्कर होय. आणि अशा दानाला शारदावरद श्रीमत् शंकराचार्यांचा हस्तस्पर्श झाल्यानें त्याला विशेषच महत्त्व प्राप्त झालें आहे.

आपण दिलेला हा ग्रंथ समग्र वाचून त्याचा बोधानंद उपभोगण्याला आम्हांला अर्थातच अवधि आहे. तथापि त्यांतील कांहीं लेखकांचीं नांवें, त्यांनीं लिहिण्याकरितां घेतलेले विषय, व ग्रंथाचें सामान्य वर्णन पूर्वीं वेळोवेळीं प्रसिद्ध झालें आहे. त्यावरून आम्हीं काढलेल्या ज्युबिली अंकांत जें न्यून राहिलें होतें तें या ग्रंथांत भरून निघणार अशी अपेक्षा उत्पन्न झाली, व ती सफळ होणार अशी खात्रीहि वाटते. वास्तविक कोणत्याहि वर्तमानपत्राच्या पन्नास वर्षांतील लिखाणाचा आढावा काढून कोण किती काढणार! कितीहि वाचलें, व त्यावरून कितीहि

लिहिलें, तरी तें थोडेंच वाटावयाचें. पण लेखक व वाचक या दोघांच्याहि दृष्टीनें या अवीट कामालादेखील स्वाभाविकच मर्यादा पडतात. आढावा हा ढोबळ व स्थूलच असावयाचा. स्वतः सिंहानें केलेल्या सिंहावलोकनांतहि, तो चालून आलेल्या जागेंत उमटलेलें त्याचें प्रत्येक पाऊल, मागें वळलेल्या त्याच्या दृष्टीला दिसूं शकत नाहीं. तात्पर्य, आपल्या ग्रंथानेंहि समाधान न होतां, पुष्कळ वाचकांची केसरीप्रबोध सेवनाची भूक शिल्लक उरेल हें खरें. तरी पण ती केव्हांहि तशी उरणारच. आपण केलें हेंच खरोखर पुष्कळ झालें. अपरिचितांना केसरीविषयीं दिग्दर्शन करण्याला, त्यांतील नमुने पटविण्याला, त्याच्या होकायंत्रांतील कांट्यांची स्थिति व त्याच्या घड्याळांतील कांट्यांची गति दर्शविण्याला, हा साडेआठशें पानांचा ग्रंथ ज्यांना पुरेसा न वाटेल त्यांना केसरीच्या सर्वच्या सर्व लिखाणाचें पुनर्मुद्रण केलें तरी तें पुरें पडेल कीं नाहीं याची शंकाच आहे.

या ग्रंथांतील लेखक कांहीं वृद्ध, कांहीं प्रौढ व कांहीं तरुण असे आहेत. पैकीं पहिल्या दोघांचा केसरीशीं परिचय पुष्कळ वर्षांपासूनचा असणार. तरुणांचा परिचय अलीकडचा आहे. तथापि ग्रंथाची भूमिकाच अशी ठेवण्यांत आलेली दिसते कीं, कोणचाहि विषय कोणींहि आपल्या आवडीप्रमाणें पसंत करून घेतलेला असला तरी, त्याविषयीं केसरींत पूर्वापर काय काय लिहिलें गेलें तें वाचून संगति लावून त्यावरून सुचतील तीं सामान्य अनुमानें काढावयाचीं व तत्समर्थक उतारे द्यावयाचे. अर्थात् लेखकांनीं आपलीं स्वतंत्र मतें सांगण्यापेक्षां केसरीचीं मतें सांगण्याचें बंधन अधिक पडल्यामुळें, त्यांचा उपयोग स्वतःचें तेज पाडणाऱ्या सूर्यापेक्षां, सूर्याचें तेज घेऊन तें जगाला पुरविणाऱ्या चंद्रासारखा सुखदायक झाला आहे. पण यांतच त्यांनीं केसरीकडे थोरपणा देऊन स्वतःकडे लहानपणा घेतला आहे हें उघड होतें, व हें त्यांच्या विनयशीलतेला शोभण्यासारखेंच आहे.

पण या विनयशीलतेलाहि एक योग्य व समर्पक असें कारण आहे. तें हें कीं केसरीचा अनुवाद करणें म्हणजे तो कोणाहि एका व्यक्तीचा अनुवाद करण्यासारखें नसून एका समष्टीचा अनुवाद करण्यासारखें आहे. या समष्टिदृष्टीनेंच, केसरीला कोणीं बरें म्हटलें तर तें टिळकांनाहि व्यक्तिशः स्वतःला बरें म्हटल्यापेक्षां अधिक अभिमानास्पद वाटे. स्वतःच्या मोठेपणापेक्षां स्वतःच्या अपत्यरूप कृतींचें मोठेपण लोकांनीं वाखाणलें तर तें कोणालाहि अधिक आवडतें. शिवाय कृतींचें मोठेपण वाखाणलें तर तें मोठेपण सकारण म्हणून विवेचक व प्रांजलपणाचें ठरतें!

दुसरेंहि एक कारण असें कीं, केसरी म्हटला म्हणजे त्यांत अनेकांचे अनेक गुण एकत्रित झालेले असतात. पुरुषसुक्तांतील सहस्र हा शब्द काढून टाकून अनेक हा शब्द त्या जागीं घातला तर, " अनेकशीर्षा पुरुषः अनेकाक्षः अनेक पाद " हें वर्णन केसरीचें यथार्थ ठरेल. केसरीचेंच काय पण त्याच्या दर्जाच्या कोणत्याहि वर्तमानपत्राचे संपादक स्वतःला 'आम्ही' हा शब्द लावतात तो एका दृष्टीनें अहंकारार्थी पण इतर दृष्टीनें सत्यवचनार्थी असतो. एका फोटोवर दुसरे कांहीं फोटो उमटविले असतां संकीर्ण चित्र निर्माण होतें, त्यांत परिणामीं जो चेहेरा प्रकट होतो तो खास कोणा एकाचाच असत नाहीं. पण लक्षांत भरणारा असा प्रत्येकाचा एखादा अवयव त्यांत प्रमुखपणें उमटतो. एकदां रिव्ह्यू ऑफ रिव्ह्यूजमध्यें ग्लॅडस्टनसाहेबांच्या तत्कालीन प्रधानमंडळाचा असा संकीर्ण फोटो करून दिला होता. त्यांत ग्लडस्टनचें नाक, ॲस्क्विथचें कपाळ, मोर्लेचे डोळे हे प्रमुख दिसत असून एकंदर चेहऱ्याचा रुबाब त्यापैकीं कोणाहि एकट्या व्यक्तीच्या चेहेऱ्यापेक्षां अधिक उठावदार दिसत होता असें मला स्मरतें. वर्तमानपत्रांचेंहि तसेंच असतें. पन्नास वर्षांचा केसरी म्हटला म्हणजे त्यांत किती तरी निरनिराळ्या लेखकांचे प्रमुख गुण प्रकट झालेले असणार ! कोणाचें तेज, कोणाचा आवेश, कोणाचा प्रसाद, कोणाचा युक्तिवाद, कोणाचा विनोद, कोणाचा बहुश्रुतपणा, कोणाची तत्त्वज्ञानाची लकेर, कोणाचें गहन विषयविज्ञान, कोणाचा न्यायनिष्ठ रागिटपणा, कोणाचा मार्मिक कुत्सितपणा, कोणाचें अभिजात दाक्षिण्य. तात्पर्य, हे आपापल्या परीनें स्पृहणीय गुण एकाच विषयाच्या चर्चेत पण अर्थातच निरनिराळ्या वेळीं प्रतिपादनांत प्रगट होऊन, विषयप्रतिपादनांत जी अखंडता जी पूर्णता व सर्वांगीणता येते तेंच वर्तमानपत्राचें खरें सामर्थ्य होय. केसरीचें सरकारविषयक धोरण पाहिलें तर तें पन्नास वर्षांच्या प्रारंभीं जें तेंच तत्त्वतः इतक्या वर्षांच्या अखेरीस आढळणार. एकेवेळीं केसरीच्या संपादकानें सरकारला दैत्य म्हटलें व दुसऱ्या वेळीं त्यानें देव म्हटलें असें झालें नाहीं. स्वराज्य हेंच ध्येय. विद्या, उद्योग, धैर्य, साहस, स्वार्थत्याग हींच तें मिळविण्याचीं साधनें. हाच एक सिद्धांत या पन्नास वर्षांत सतत प्रतिपादिलेला आढळेल. तथापि तो किती तरी निरनिराळ्या रीतीनें व निरनिराळ्या लोकांच्या मनाला पटेल असा ! कोणी एकानें केसरीला 'महाराष्ट्र युनिव्हर्सिटी' किंवा विद्यापीठ असें एकदां म्हटलेलें आठवतें; व त्याला तसें वाटण्याचें कारण कदाचित् हें असावें कीं, एकाच हेतूनें विविध प्रकारची विद्या विविध

प्रकारच्या ज्ञानेच्छु लोकांना विविध गुणांच्या शिक्षकांनीं केसरीच्या द्वारें पन्नास वर्षांत मिळून शिकविली !

असो. 'केसरी-प्रबोध' हा ग्रंथ सर्वस्वीं वाचकांच्या दृष्टीनें लिहिला गेला हें उघड आहे. म्हणजे त्यांतील प्रत्येक लेखकानें अशी दृष्टि ठेवली कीं, "मला केसरीच्या लेखांचा पूर्वीचा परिचय असला नसला तरी, आज हीं जुनीं फाइलें म्हणजे अंकसंग्रह प्रथम वाचणाऱ्या वाचकाला, अमुक एका विषयावर केसरीचें मत काय आहे याची जी कल्पना येईल, ती थोडक्यांत मांडावयाची." आणि अशा रीतीनें पाहिलें असतां इतर वाचकच काय, पण केसरीशीं कमी अधिक वर्षें संबंध असलेल्या आम्हां संपादक उपसंपादक मंडळापैकींहि कित्येकांना या पुस्तकांतील कांहीं कांहीं माहिती नवी वाटेल असा माझा अदमास आहे. वर्तमानपत्रांचीं समग्र फाइलें आधीं फार थोडे लोक ठेवतात. व ठेवलेलीं समग्र अशीं फार थोडे लोक वाचतात. याकरितां केसरींतील थोडथोडा निवडक भाग संग्रहीं ठेवतां यावा म्हणून आम्हीं अलीकडे 'सारसंग्रह' किंवा 'केसरीचें छोटें फाईल' छापून विक्रीस ठेवीत असतों. याच प्रयत्नाचा दुसराहि एक प्रकार असून तोहि उपयोगी पडेल; व मजजवळ कांहीं लोकांनीं उद्गार काढले त्यांवरून गेल्या पन्नास वर्षांत केसरींत आलेल्या एकेका महत्त्वाच्या विषयावरलि लेखांचे सुसंगत सारांश देणारीं, किंवा ऐनजिनसी लेख पुनर्मुद्रित करणारीं, कांहीं पुस्तकें निघण्याचाहि संभव आहे. इतिहास व आयुर्वेद या दोन विषयांसंबंधानें तशा प्रत्यक्ष सूचना मजकडे आल्याहि आहेत. पहावें त्यांतून काय निघतें तें.

स्वतः केसरीच्या संपादकीय मतांना महत्त्व असलें तरी, संपादक उपसंपादक नसलेल्या अशा अनेक विद्वान् गृहस्थांनीं केसरींत गेल्या पन्नास वर्षांत लेख लिहिले आहेत त्यांचेंहि महत्त्व कांहीं कमी नाहीं. या लेखांचा उपयोग केसरी हा मनोरंजक व बोधप्रद करण्याकडे झालेला आहे. उलट लेखकांनाहि केसरीचा उपयोग आपल्या लेखांना म्हणजे मतांना प्रसिद्धि मिळण्याचा झाला. असें हें एक प्रकारें उपकाराचें देवाण-घेवाण असतें. पण त्यांत एकंदर जनतेचें फार मोठें काम होतें.

प्रस्तुतचा ग्रंथ वाचकांच्या दृष्टीनें तयार करण्यांत आला आहे व हेंच योग्य आहे असें म्हणण्याचें कारण, वाचकांचें समाधान होणें यांतच लेखकाच्या श्रमाचें समर्थन व चीज होत असतें. पण या ग्रंथाचे लेखकचसे काय, गेल्या पन्नास

वर्षांत निघालेल्या केसरीच्या सुमारें अडीचतीन हजार अंकांत ज्या लेखकांनीं हरएक प्रकारचे लेख लिहिले, त्यांनीं तरी वाचकांव्यतिरिक्त दुसरा कोण आपल्या डोळ्यापुढें ठेवला होता ? अभ्यास, विचार, मनन व फार तर स्मरणार्थ टिपणें या गोष्टी स्वतःकरितां असतात. पण लेखन हें स्वरूपतःच परसापेक्ष आहे. वाचकांची काल्पनिक मूर्ति डोळ्यांपुढें ठेवल्याशिवाय कोणीहि लेखक हातांत लेखणी घेत नाहीं. आपल्या लेखानें समानधर्म अशा वाचकांना आनंदवूं व संतुष्ट करूं, तो विषम–धर्म असेल तर त्याचीं मतें बदलून आपलीं मतें त्याला पटवून स्वीकारावयास लावूं, किंवा ज्याला स्वतःचीं अशीं मतेंच नसतील त्याला नवी माहिती देऊन मतें बनवण्याला समर्थ करूं यांपैकीं कोणता तरी एखादा, पण वाचक–सापेक्ष असाच, हेतु केसरींतील प्रत्येक लेखकाच्या मनांत होता. हरिदास कथेच्या शेवटीं 'श्रोता तोच वक्ता' असें म्हणून कथेच्या बरेवाईटपणाचें श्रेय श्रोत्याला देतो. त्यांत विनय असला तरी सत्य अगदींच नाहीं असें नाहीं. कारण श्रोत्यांच्या प्रसादानेंच वक्त्याची प्रतिभा पल्लवित होते. वर्तमानपत्रांतील लेखकांचेंहि असेंच आहे. वाचकांची प्रगट किंवा अनुमित अशी पसंती हेंच लेखकाच्या स्फूर्तीचें कारण असतें. व पसंतींतूनच प्रामाण्यबुद्धि हळूहळू उत्पन्न होते. अशाच रीतीनें चिपळूणकर–आगरकर–टिळक अशा केसरीच्या संपादकांनीं केसरींतील लेखांसंबंधानें वाचकांच्या मनांत एक प्रकारची प्रामाण्यबुद्धि उत्पन्न करून ठेवली होती यांत शंका नाहीं. मग तो लेख अग्रलेख असो किंवा बातमीच्या चार ओळी असोत. मोठ्या गोष्टींचा दाखला फक्त सोयीकरितां लहान गोष्टींना लावावयाचा तर असें म्हणतां येईल कीं, वैदिक धर्मवाङ्मयांतील प्रत्येक प्रकार वाचकांना केसरींत आढळण्यासारखा होता. संहिता, पदपाठ, क्रम, जटा, घन, सूत्र, वृत्ति, वार्तिक, भाष्य, टीका, निबंध. तात्पर्य, श्रद्धाशील वाचकाच्या मनाला पटणाऱ्या किंवा प्रिय वाटणाऱ्या अशा वरीलपैकीं कोणत्याना कोणत्या तरी प्रकाराचा आश्रय करून केसरीनें वाचकांना विविध विषयांचें ज्ञान दिलें, व त्यांनीं तें त्या त्या प्रकाराला योग्य अशा श्रद्धाबुद्धीनें आपलेंसें केलें.

असो. केसरींतील लेखकवर्गापैकीं चिपळूणकर, आगरकर, टिळक हीं नांवें सर्वांत अधिक महत्त्वाचीं म्हणून मीं वर उल्लेखिलीं. तरी 'केसरी' हा शब्द अशा कोणत्याहि एका नांवापेक्षां वाचकांना अधिक प्रिय असतो. To see the wood for the trees अशी एक म्हण इंग्रजींत आहे. ती व्यापक दृष्टीची

प्रशंसा करणारी आहे व यथार्थ आहे. दुरून पाहण्याला बन किंवा राई दिसते, फुटकळ वृक्ष दिसत नाहींत. केसरी–प्रबोध ग्रंथांतील लेखकांनींहि प्रायः 'केसरी' ह्याच शब्द वापरला आहे, व्यक्तिशः लेखकांचीं नांवें फारशीं घेतलीं नाहींत असें मला सांगण्यांत आलें आहे, व तसें असेल तर तें योग्यच आहे.

या सत्कारासंबंधीं एक गोष्ट मला विशेष रीतीनें सांगितली पाहिजे ती ही कीं, आपण ' केसरी–प्रबोध ' ग्रंथ तर तयार करून केसरीला अर्पण केलाच पण हा ग्रंथ तयार करण्याचें पूर्वसाधन म्हणून जी सूची, अनुक्रमणिका व वर्षवार घडलेल्या गोष्टींची जंत्री तयार केली तीहि या ग्रंथाबरोबरच अर्पण केली. या साधनांचें महत्त्व अभ्यासकांना फार आहे. म्हणून या देणगीबद्दल आम्हीं आपले विशेष प्रकारें आभार मानतों. जसें कांहीं एखाद्या पाहुण्याला घरीं भोजनास बोलवावें, त्याच्याकरितां शिधा चांगला निवडून पाखडून त्याचा स्वयंपाक चांदीच्या भांड्यांत करावा, आणि भोजन घालून वरतीं तीं स्वयंपाकाचीं भांडीं फिरून शिध्यानें भरून पाहुण्याला नजर करावीं, अशासारखा कांहींसा हा प्रकार झाला आहे. किंवा तीर्थोदकाचा अर्घ्य घेऊन परत तो तीर्थालाच वाहिला–पण चांदीच्या अर्घ्यपात्रा-सह–असेंहि हवें तर म्हणावें.

असो. आपण आम्हां उभयतां ट्रस्टींचा सत्कार केला तो अर्थातच संस्थेच्या दृष्टीनें. त्यांत आमचा व्यक्तिशः कांहींएक संबंध नाहीं असेंच आम्ही समजतों. कारण केसरी हा मोठा म्हणून सन्मानाला–सत्काराला पात्र असेल. पण व्यक्तिशः आमची योग्यता कोणताहि मानसन्मान घेण्याची नाहीं. किंबहुना ट्रस्टी व संपादक हीं नातींहि वेगळींच आहेत. मुंबईस केसरीच्या ज्युबिलीसंबंधानें ब्लॅव्हेटस्की लॉजमध्यें भरलेल्या सभेंत या नात्याच्या पृथक्पणाची जाणीव कांहीं वक्त्यांनीं व्यक्त केली तीच बरोबर होती. आजहि केसरीचा संपादक या नात्यानें माझा या समारंभाशीं कांहीं संबध नाहीं. फक्त ट्रस्टी या नात्याचाच आहे. आणि ट्रस्टी हा सर्वांकरितां सामुदायिक शब्द असें समजून, केसरीचे जुने नवे सर्व संपादक, उपसंपादक, व्यवस्थापक किंबहुना संपूर्ण लेखकवर्ग–म्हणजे ज्यांचा ज्यांचा हात-भार केसरीला गेल्या पन्नास वर्षांत लागला ते सर्व–केसरीच्या आजच्या यशाच, योग्यतेचे, उत्कर्षाचे अंशभागी आहेत असें समजून या अविभक्त कुटुंबातर्फे ( वाटलें तर घराण्यातर्फे असेंहि म्हणा ) आजच्या या सत्काराचा मी स्वीकार करतों. आणि

या कुटुंबांत किंवा घराण्यांत आज जे वयानें म्हणून मानानें लहान आहेत तें उद्यां मोठे होऊन, त्यांच्या हातून केसरीसंस्थेची अशाच सेवा घडावी, व यापुढें यथाकाल आणखी अशा प्रकारचे समारंभ होऊन संस्थेतर्फें मानाचा विडा त्यांना मिळावा अशी प्रार्थना करून मी आपलें भाषण संपवितों.

---

# प्रस्तावना

'राज्यशास्त्र' या विषयावरील हें पुस्तक मीं, प्रो. श्री. ना. बनहट्टी, अभिनव भारत ग्रंथमालेचे मुख्य चालक, यांच्या विनंतीवरून मुद्दाम त्या मालेकरितांच लिहिलें आहे. या नवीन ग्रंथमालेची कल्पना मजपुढें मांडण्यांत आली तेव्हां ती मला फार पसंत पडली. तिच्या कार्यप्रारंभीं प्रो. बनहट्टी यांच्याशीं मीं बराच विचारविनिमय केला व मजकडून शक्य तितकें त्यांना प्रोत्साहन दिलें. पण प्रोत्साहनाचें फळ म्हणून, मालेकरितां मींहि एक ग्रंथ लिहून द्यावा अशी जबाबदारी ओघानेंच मजवर येऊन पडली! अर्थात् ती जबाबदारी कर्तव्यबुद्धीनें व आनंदानें मीं स्वीकारली. आणि त्याप्रमाणें, वेळांत वेळ काढून, स्वतः प्रो. बनहट्टी यांनींच मजकरितां सुचविलेल्या विषयावर हें पुस्तक लिहून देऊन मी त्या जबाबदारींतून उत्तीर्ण झालों आहें.

हें पुस्तक लिहिण्याला हल्लींहून वेगळी वेळ, कांहीं अधिक मुदत, व हल्लींहून अधिक स्वस्थता लाभती तर ती मला हवी होती. परंतु तशी स्वस्थता मिळे-पर्यंत वाट पाहावयाची तर ती किती पाहावी लागेल याचा नियम नाहीं. शिवाय मालेच्या चालकांनीं, त्यांच्या शिरस्त्याप्रमाणें, इतर पुस्तकांबरोबर माझ्या पुस्तकाचीहि जाहिरात दिल्याकारणानें वाचकांचा एकप्रकारचा तगादाच त्यांनीं आपल्या मागें लावून घेतल्यासारखा झाला. तेव्हां वाचकांची अपेक्षा पूर्ण करण्यासाठीं सवडींत सवड काढून मी हें पुस्तक आज लिहून हातावेगळें करीत आहें. अशा रीतीनें मीं त्यांना दिलेल्या अभिवचनांतून, व ते स्वतः वाचकांना दिलेल्या अभिवचनांतून, असे दोघेही आज मोकळे होत आहों याविषयीं आम्हां उभयतांना सारखाच आनंद होत आहे.

प्रस्तुत मालेच्या नियमाप्रमाणें हें पुस्तक लहान आकाराच्या अवघ्या दोनशें पानांतच लिहून संपवावें लागत आहे. आणि विषय तर इतका मोठा यामुळें लिहितांना बरीच कुचंबणा झाली. म्हणजे विषयांतील मुद्दे थोडेच घ्यावे पण तेच खुलासेवार सांगावे ही पद्धति अनुसरावी लागली. तथापि वाचकांची ती एक निराळ्या प्रकारें सोयच होईल असें वाटतें. राज्यशास्त्राच्या विषयावर

जितकें वाचावें किंवा लिहावें तितकें थोडेंच होणार हें उघड आहे. आणि या विषयाचा सूक्ष्म सांगोपांग सविस्तर असा अभ्यास करणाराला इतर साधनें वाटतील तितकीं आहेतच. पण 'शास्त्रें फार अपार जीवित तुझें अत्यल्प रे मानवा' या वचनाप्रमाणें लिहिणारा व वाचणारा यांना अल्पसंतुष्ट बनावें लागतें. किंबहुना या वचनाचें रहस्य लक्ष्यांत घेऊनच या ग्रंथमालेंतलि ग्रंथांच्या विस्तारासंबंधींचे हल्लींचे नियम ठरवावे लागले. तथापि, कोणत्याहि विषयावर हल्लींच्या ग्रंथाच्या आकाराच्या सवा दोनशें पृष्ठाइतका मजकूर वाचून सामान्य वाचकांची (अभ्यासू विद्यार्थ्यांची नव्हे) ज्ञानार्जनाची साधारण भूक भागण्यासारखी आहे, असें म्हणण्यांत फारशी चूक होणार नाहीं असें वाटतें. आणि तसें या पुस्तकानें घडल्याचें दिसून आलें तर माझा श्रमपरिहार झाला असें मी मानीन.

या पुस्तकाचीं मुद्रितें तपासण्याचे कामीं रा. सदाशिव विनायक बापट यांनीं साहाय्य केल्याबद्दल मी त्यांचा आभारी आहें.

पुणें, रविवार, वैशाख
शुद्ध तृतीया
ता. ८ माहे मे सन १९३२

न. चिं. केळकर.

# राज्य–शास्त्र

# भाग १ ला

## प्रास्ताविक

### (१) राज्य–शास्त्र म्हणजे काय ?

'राज्य-शास्त्र' हें इतर शास्त्रांप्रमाणेंच एक शास्त्र आहे. 'शास्त्र' शब्दाच्या सहजच मोठा बाऊ वाटतो. कोणत्याहि विषयाचें शास्त्र सांगोपांग घेतलें तर तें गहन व कठीण असणारच. कोणत्याहि शास्त्रांत मुख्यतः येतात त्या गोष्टी खालीलप्रमाणें:- १ शास्त्रविषयासंबंधानें ज्ञानेंद्रियांच्याद्वारें अनुभवाला आलेल्या तुटक गोष्टी. २ त्यांवरून बांधलेले पक्के नियम. पक्के म्हणजे हजार हिश्शांनीं कधीं खोटे न ठरणारे. ३ अनुभवावरून बांधलेले कच्चे नियम. ( या कच्चेपणाचें कारण असें कीं, अनुभव असावा तितका पुरा व विस्तृत किंवा हुकमी नसतो. ) ४ अनुभव नसतांहि केवळ उपजत बुद्धीनें सुचणारे सिद्धांत किंवा कल्पना. यांना 'कच्चे नियम' इतकेंहि म्हणतां येत नाहीं. कारण त्या कल्पना अद्यापि अनुभवांत उतरलेल्या नसतात. ५ शास्त्र–विषयासंबंधानें कालांतरानें, परंपरेनें बनलेली प्रक्रिया व रूढ परिभाषा. ६ शास्त्रविषयांतील कूट प्रश्न. ७ शास्त्रविषयाची ऐतिहासिक माहिती. कोणतेंहि 'शास्त्र' म्हटलें कीं, त्यासंबंधीं या सहा सात गोष्टींची विचिकित्सा असावयाचीच. राज्य-शास्त्राचेंहि तसेंच आहे.

### (२) राज्य–शास्त्र व कर्मयोग

राज्यशास्त्र हा विषय किती तरी अवघड असा प्रथम वाटतो. पण खरोखर तो तसा नाहीं. प्रत्यक्ष राज्य करणें हें अवघड असेल. पण राज्यशास्त्राचीं मूलतत्त्वें सोपीं आहेत. बरें राज्य करणें अवघड म्हणून तरी केवळ त्या कारणानें कोणीं तें हातचें टाकलें आहे काय ? आपली सत्ता चालते तोंपर्यंत तें सोपेंच म्हणावयाचें. आणि हातीं सत्ता नसेल तर तें एकाद्याला सोपें वाटून तरी काय उपयोग ? आजपर्यंत हजारों लाखों राज्य-सत्ताधीश जगाच्या पाठीवर

होऊन गेले. पण एक तरी छातीवर हात ठेवून सांगू शकला असता काय, कीं मीं अमलांत आणिली तीच सर्वोत्कृष्ट राज्यपद्धति ! तिच्याहून अधिक चांगली पद्धति शक्यच नाहीं ! पण पद्धतीचा तात्त्विक उत्तमपणाचसा काय, नुसत्या यशापुरतें पाहिलें तरी या हजारों लाखोंपैकीं एकहि म्हणूं शकला नसता, कीं माझें राज्य यशस्वी होण्यांत बाकी म्हणून कांहीं राहिलें नाहीं. मनुष्यप्राणी हा जसा पूर्णता पावलेला नाहीं, तशीच त्याची राज्यपद्धति, तसाच त्याचा राज्यकारभार, आणि तसेंच त्याच्या राज्यकारभारांतलें यश !

## ( ३ ) शास्त्र फारसें कठीण नसतें

'राज्य' या शब्दाचा बाऊ वाटतो तसाच तो 'शास्त्र' या शब्दाचाहि वाटत असतो. पण शास्त्राचींहि मूलतत्त्वें फारशीं कठीण नाहींत. राज्यपद्धतीप्रमाणेंच शास्त्राच्याहि पद्धति अनेक असतात. त्यांपैकीं अमूक एकच सर्वोत्कृष्ट असें म्हणतां येत नाहीं. शास्त्राभ्यासी व शास्त्रसंशोधक असे जगांत आजवर हजारों लोक होऊन गेले. पण त्यांपैकीं कोणींहि छातीवर हात ठेवून असें म्हणूं शकला नाहीं कीं माझीच शास्त्रपद्धति सर्वोत्तम ! किंवा मला इतकें यश आलें, कीं त्यांत कांहीं बाकी उरलें नाहीं. राजे लोकांत अहंकारबुद्धि असते तितकीहि शास्त्री लोकांत नसते. कारण राजे हे सत्तेचे भोक्ते व उपासक असतात; पण शास्त्राभ्यासी शास्त्रसंशोधक हे केवळ सत्याचे उपासक असतात. आज जगांत शास्त्राला जें यश; जी प्रतिष्ठा लाभली आहे तिचें कारण हेंच कीं, राजे लोकांप्रमाणेंच त्यांची सत्ता, अर्थात् ज्ञान-सत्ता, ही परस्परविरोधी नसून परस्परोपकारक आहे. एक राजा दुसऱ्या राजाला आपलें असें कांहींहि उचलून देणार नाहीं. पण शास्त्राभ्यासी व शास्त्रसंशोधक आपलें ज्ञान दुसऱ्याला न देण्याचा कृपणपणा करीत नाहींत, किंवा दुसऱ्याचें ज्ञान उपयोगाला घेण्यांत कमीपणा मानीत नाहींत.

## ( ४ ) शास्त्र व कला

शास्त्र म्हटलें कीं त्याचा प्रतियोगी शब्द 'कला' हा डोळ्यापुढें उभा राहतोच राहतो. शास्त्राचा संबंध ज्ञानाशीं तसा कलेचा कृतीशीं असतो. शास्त्रज्ञानाशिवायहि मनुष्य कलेचा व्यासंग करूं शकतो, याचें कारण उपजतबुद्धि ! कलावंत हा कलेचीं बीजें मनांत रुजलेलीं घेऊनच जन्मतो. त्यानंतर त्यानें

त्या कलेच्या शास्त्राचा अभ्यास केला तर चांगलेंच. त्या दुधांत ती साखरच पडली म्हणावयाची. शास्त्रांतील तत्त्वाभ्यासानें कलावंताला आपलीं ध्येयें, आपली अभिरुचि, आपलीं साधनें सुधारतां येतात. तो परिणतप्रज्ञ, प्रतिष्ठितप्रज्ञ महानुभाव होतो. बरें, शास्त्रालाहि कलेचा उपयोग आहेच. कारण, तत्त्व कितीहि चांगलें वाटलें तरी त्याचा प्रत्यक्ष उपयोग कलेच्या कृतींत झालेला दिसल्याशिवाय व लोकांना तो पटल्याशिवाय काय उपयोग? तें तत्त्व किंवा तें ज्ञान नुसतें कल्पना-सृष्टींतच भ्रमण करीत राहावयाचें! कलावंत म्हणजे हात चालविणारे व शास्त्री म्हणजे बुद्धि चालविणारे–हे लोक प्रायः वेगळे वेगळे असतात. शास्त्र व कला या दोनहि घोड्यांवर एकदम बसणारा स्वार विरळा. ईश्वर बहुधा चांगल्या गुणांचा मक्ता एकालाच न देतां त्यांची वांटणी करीत असतो. हें मनांत ओळखून मनुष्यानें शास्त्र व कला यांचा विरोध न मानतां त्यांचा शक्य तितका एकत्र उपयोगच करून घेतला पाहिजे.

## (५) ज्ञान व कर्म यांचा ऋणानुबंध

असो. प्रस्तुत आपण सर्वसामान्य शास्त्र व सर्वसामान्य कला यांचा खोल विचार करीत नसून फक्त राज्यशास्त्र व तदनुषंगानें राज्यकला यांचाच विचार करीत आहों. तथापि, जें जातिसामान्याविषयीं सांगितलें तें व्यक्तिविशेषा-विषयींहि समजावयाचें आहे. राज्याचा व्यासंग कला या नात्यानें करणारे लोक, राज्याचा विचार शास्त्र या नात्यानें करणाऱ्या लोकांपेक्षां, प्रायः वेगळेच असतात; पण उभयतांनींहि मनांत आणलें तर ज्ञान व कृति यांचा ऋणानुबंध त्यांना पुष्कळसा जोडतां येईल. मात्र एकाकरतां दुसऱ्याला हात आखडून थांबण्याचें केव्हांहि कारण नाहीं. राज्यशास्त्र व राज्यकला यांचे प्रवाह नदीच्या फाट्यांप्रमाणें सतत समांतर व जवळजवळ वाहत असतात. राजकीय राष्ट्रां-तील मनुष्यसमाज हा या दोन प्रवाहांच्या मध्य प्रदेशांत वावरत, खपत, श्रमत असतो; व त्याला जरूरीप्रमाणें या प्रवाहांपैकीं केव्हां एकाचें तर केव्हां दुस-ऱ्याचें पाणी पिण्याला मिळण्यासारखें असतें. स्वतंत्र सत्ताधिकारी राजांच्या राज्यांत राज्य–शास्त्रांत निष्णात असणाऱ्या पंडितांना दरबाराकडून बहुमानाचें निमंत्रण येऊन त्यांचा सल्ला घेतला जातो. लोकसत्ताक राज्यांत असले हे तज्ज्ञ व पंडित लोकमताच्या बळावर कायदेमंडळांत स्वतःच निवडले जाऊन प्रधानपद पावतात. मिळून एकच.

## ( ६ ) राज्य-शास्त्राचे दोन प्रकार

राज्य-शास्त्र व राज्य-कला हीं दोनहि कांहींशीं कल्पनासिद्ध पण पुष्कळशीं अनुभवसिद्ध असतात. विद्वान् बुद्धिवान् लोक हे एका अर्थानें अंतर्ज्ञानी. यामुळें अनुभवाकरितां न थांबतां, डोळे मिटून पण डोकें चालवून, आपल्या कल्पनेनेंच ते राज्यशास्त्रें बनवितात. आणि त्यांत राजा कसा असावा, प्रजा कशी असावी, दोघांनीं परस्परांशीं कसें वागावें, राज्यकारभाराची पद्धति कशी राहावी, तिचा अंमल कसा करावा, इत्यादि गोष्टी ते मनच्या-म्हणजे त्यांना इष्ट वाटतात अशा-लिहितात. चाणक्यानें अर्थशास्त्रांत कल्पना व अनुभव या दोहोंचाहि उपयोग केला आहे. ॲरिस्टॉटल यानें राज्य-शास्त्रावरील ग्रंथांत ग्रीसच्या नगरमित राष्ट्रांतील राज्यांच्या अनुभवाचा उपयोग केला आहे, पण स्वतःच्या कल्पनेनेंहि कांहीं सुचविलें आहे. उलट प्लेटो यानें आपल्या रिपब्लिक नामक राजशास्त्रीय ग्रंथांत, पुष्कळसा कल्पनेचा खेळ चालवून, त्याला वाटणारें नमुनेदार राज्य कसें असावें याचें रम्य चित्र रंगविलें आहे. पण तो राज्याचा नमुना बहुधा त्याच्या पुस्तकांतच पडून राहणार! मॅकिव्हेली यानें आपल्या राजाला बोध करण्याकरितां 'प्रिन्स' या पुस्तकांत नमुनेदार राजाची कुटिल राजनीति कशी असावी हें लिहिलें. पण त्या पुस्तकाचा त्या राजाला प्रत्यक्ष उपयोग झाल्याचें कोणीं लिहून ठेवलेलें नाहीं.

## ( ७ ) अनुभवसिद्ध व कल्पनासिद्ध

प्रत्येक शास्त्राप्रमाणें राज्यशास्त्रांतहि पंथ, सांप्रदाय, पीठें, परंपरा आहेतच. आणि राज्यसत्ता हातीं असणारे किंवा हातीं आणूं इच्छिणारे लोक आपल्या सोईला पडेल तोच पंथ प्रायः स्वीकारतात. म्हणजे त्यामुळें मनाच्या आवडीला शास्त्राची जोड सहजच लाभते. पण बिचारें राज्यशास्त्र कुणालाहि कधीं असा आग्रह करीत नाहीं, कीं अमुक एका पद्धतीनेंच तुम्हीं राज्य केलें पाहिजे किंवा करवून घेतलें पाहिजे. आधुनिक राज्यशास्त्र तरी स्वतःसंबंधानें "मी सर्वस्वीं अनुभवसिद्ध व अनुभवनिष्ठ आहें" असेंच म्हणतें. "अनुभवानें सिद्ध झालेल्या पद्धतीच होतां होईतों घ्याव्या व जरूरीप्रमाणें त्यांत कल्पना चालवून सुधारणा करावी" असेंच तें म्हणतें. स्लेट पाटीवर लिहावयाचें तें सगळेंच्या सगळें, पहिलें पुसून टाकून, नवेंच्या नवें लिहितां येतें. पण कागदावर पेन्सिलीनें चित्र काढावयाचें तर, पहिलें काढलेलें सगळें पुसून नवें न रेखाटतां, जुन्यांतल्या रेघा

जरूर तितक्या रबरानें घासून घेऊन, त्या जागीं नव्या रेघा काढावयाच्या, असें केल्यानें भागतें व तें करणेंच सोईचें असतें. यामुळें जगांत नवी म्हटली जाणारी अशी कोणतीहि राज्यघटना, राज्यपद्धति घ्या, ती कोणत्या तरी जुन्या नुकत्याच अनुभवांत येऊन गेलेल्या घटनेची पद्धतीची 'प्रत' मुख्यतः असून, फक्त तींत किंचित् कांहीं नवें पदरचें घातलेलें असतें.

## (८) राज्य-कर्म-कौशल्य हें स्वयंभू जातिवंत असतें

राज्यकारभार करणाराला, त्याच्या संग्रहीं पढीकपणा असला तर तो उपयोगी पडेल कदाचित्. पण नसला तर त्याविणें कोणाचें फारसें अडून राहणार नाहीं. ज्यानें आपल्या सुखप्रद राज्यानें, 'रामराज्य' हा प्रतिशब्दच, राज्याच्या सर्वोत्तम नमुन्याला मिळवून दिला तो—राजा रामचंद्र—यानें राज्यशास्त्राचे कोणते ग्रंथ वाचले होते? शिवाजी महाराज हे आपलें युद्धकौशल्य कोणत्या लष्करी कॉलेजांत जाऊन शिकले होते! किंवा आपल्या मुलकी दिवाणी राज्यव्यवस्थेबद्दल त्यांनीं तज्ज्ञाकडून जे धन्यवाद मिळविले ते मिळण्याला कोणत्या कचेरींत त्यांनीं उमेदवारी केली होती! थोरल्या माधवरावांचीहि तीच गोष्ट. उलट सवाई माधवरावाला शिक्षण देण्याकरितां नाना फडणविसांनीं किती तरी योजना केल्या होत्या; पण त्यांचा कांहीं उपयोग झालेला दिसून आला नाहीं. जगाच्या इतर देशांतहि हाच प्रकार आढळतो. इंग्लंडचे प्रसिद्ध पितापुत्र मुत्सद्दी पिट यांना अल्प वयांतच राज्यकारभाराचें ज्ञान झालें तें कसें? अलेक्झांडर हा अल्प वयांतच राज्यकारभार करूं लागला. कायसर विल्यम यानें अनुभविक प्रौढ मुत्सद्दी प्रिन्स बिसमार्क याला सक्तीनें घरीं बसविलें तेव्हां जगानें त्याला "अविचाराचें धाडस' असें नांव दिलें. पण त्याच कायसरनें पुढें केवढा आटोप दाखविला?

## (९) वयांत आला, सत्पात्र झाला!

हल्लीं आपल्या देशांत प्रत्येक संस्थानांतूनहि तोच प्रकार आढळतो. तो असा कीं, संस्थानिक एकवीस वर्षांचा होतो न होतो तोंच तो राज्यकारभार चालविण्याला लायख झाला अशा समजुतीनें, सरकार त्याला वस्त्रें व कुलमुखत्यारी देतें. तोहि बिचारा ती कुलमुखत्यारी नको असें कधींच म्हणत नाहीं. पण अशा अल्पवयांत अधिकारसंपन्न झालेल्या राजांतूनच बिकानेरचे महाराज, ग्वालेरचे माधवराव महाराज शिंदे, बडोद्याचे सयाजीराव गायकवाड असे राज्यकर्ते

निपजले आहेत. दुसरेपक्षीं ब्रिटिश हिंदुस्थानांतील स्वराज्यसंस्थांच्या अधिकाराचीहि तीच गोष्ट आहे. कारण जबाबदारीच्या स्वराज्यांतहि खरा धनी अखेर मतदार ह्राच समजला जातो. हिंदुस्थानांत अजून खरी जबाबदारी प्रांतिक सरकारपर्यंतहि पोंचली नाहीं म्हणा! परंतु उद्यां मध्यवर्ती सरकारहि जबाबदार झालें तरी मतदाराचाच धनीपणा कायम राहणार व अधिक प्रभावी होणार. पण हा मतदार खरोखर कोण आहे? तर वयानें २१ वर्षांचा झालेला व अमुक इतका कर सरकारला देणारा. म्हणजे मग तो ठोंब्या, अशिक्षित, निरक्षर, मूर्ख, व्यसनी, कसाहि असला तरी हरकत नाहीं. उपपत्ति हीच कीं, जो सज्ञान होतांच घरचा कारभार जबाबदारीनें पाहण्याला–घरचें संसाराचें नफानुकसान करण्याला–लायख होतो तो राज्याच्या कारभारांत लक्ष घालण्यालाहि लाखखच होतो.

### ( १० ) करूनच फार येतें, नुसतें शिकून थोडें येतें

खरोखर ही विचारसरणी बरोबर नाहीं असें कोण म्हणेल? नव्या होतकरू राजाला किंवा मतदाराला राज्यशास्त्र शिकवून तयार करावयाचा म्हटलें तरी त्याला कोणचें शास्त्र, कोणती उपपत्ति, कोणता ग्रंथ शिकवावयाचा? किंवा केव्हांहि, अडीअडचणीच्या कसल्याहि प्रसंगीं, कशाहि प्रकारचा कूट प्रश्न उपस्थित झाला असतां, त्याचें बिनचूक हुकमी उत्तर आगाऊच पढवून ठेवून आपल्या शिष्याच्या पदरांत अविनाशी पाथेय किंवा ताजी शिदोरी बांधून ठेवून देईल असा गुरु तरी कोण भेटणार? तो आजवर कोणालाहि लाभलेला नाहीं व पुढेंहि केव्हां लाभेल असें वाटत नाहीं. याचें कारण असें कीं, राजकारणांत प्रत्यक्ष अनुभवासारखा गुरु नाहीं. अनुभवानंतरचा महत्त्वाचा गुरु म्हणजे स्वतः त्याची प्रज्ञा किंवा प्रतिभा. आणि त्यानंतर तिसऱ्या दर्जाचा महत्त्वाचा गुरु म्हणजे ग्रंथ किंवा पढिक विद्या हा होय. राज्य करूं इच्छिणाऱ्या राजानें, अधिकाऱ्यानें किंवा प्रजेनें या विद्येचा म्हणजे अशा ग्रंथांचाहि संग्रह केलाच पाहिजे. कारण अनुभव घेतां घेतां त्याबरोबर, व प्रसंग पडेल, जरूरी उत्पन्न होईल त्याप्रमाणें, राज्यशास्त्रबोधक ग्रंथांचा उपयोग केल्यास त्यांचेंहि साहाय्य होण्यासारखें असतें. तात्पर्य, राज्यशास्त्राला महत्त्व आहे, पण तें कमी दर्जाचें!

### ( ११ ) एकच मुक्काम पण अनेक वाटा

राज्यशास्त्र हें 'अनुभवसिद्ध' व 'कल्पनासिद्ध' अशा दोन्ही प्रकारचें असतें.

पण कोणतेहि दोन प्रकार म्हटले म्हणजे वाद आलाच. कारण एकेरी प्रश्न व एकेरी उत्तर यांची मोहनी लोकांच्या मनावर फार असते. आणि राज्यशास्त्रा-संबंधानें हे दोन प्रकार सांगितले म्हणजे पुष्कळ लोक असें विचारणार कीं– "दोन प्रकार सांगणें म्हणजे दुटप्पी बोलण्यासारखें आहे. श्रीकृष्णासारखा समजून सांगणारा गुरु व अर्जुनासारखा ज्ञानी समजूतदार शिष्य–असें असूनहि, श्रीकृष्ण गीता सांगत असतां, अर्जुनाला वरचेवर म्हणावें लागलेलें आढळतें कीं, 'तदेकं वद निश्चित्य'! ज्याचें चरित्र लिहावयास घ्यावें त्याची योग्यता स्वर्गाला नेऊन भिडवावी हा चरित्रकाराचा अभिनिवेश झाला. पण अनेक चरित्रें दृष्टीस पडल्यानें मन घोटाळ्यांत पडतें. कारण हाच एक चरित्रनायक जर सर्वोत्तम पुरुष, तर मग बाकीचे ह्याच्यापेक्षां कमी प्रतीचे हें उघडच ठरलें. उत्तम या शब्दाचा अर्थच हा आहे. उत्तम म्हणजे तुलनेनें सर्वोत्तम. मग बाकीच्यांचीं चरित्रें लिहा तरी कशाला! चरित्रें लिहावयाचीं तीं लोकांनीं त्यांचें अनुकरण करावें म्हणून. पण एकाचेंच चरित्र सर्वोत्तम ठरलें तर, अनुकरण करणारानें त्याचेंच अनुकरण करावें म्हणजे काम संपलें. कारण दुय्यम प्रतीच्या मनुष्याच्या चरित्राचें अनुकरण करावयाचें म्हटलें तरी तें अनुकरण पूर्ण व यशस्वी होतें काय? होत नाहीं. आणि कोणाचाहि अनुकरणाचा प्रयत्न जर इतका अपुरा व अयशस्वीच नसला तरी अल्पयशस्वी होणार, तर उत्तम पुरुषाचेंच अनुकरण करावें. मग त्यांतूनच कांहीं फायदा झाला तर होवो."

## (१२) गीताशास्त्राचा दाखला

श्रीकृष्णानें अर्जुनाला क्रमानें सांख्ययोग, ज्ञानयोग, कर्मयोग, भक्तियोग वगैरे मोक्षप्राप्तीचे मार्ग म्हणून सांगितले. पहिला मार्ग सांगितला तेव्हां अर्जुनाला वाटलें असेल, "चला! एक मार्ग डोळ्यापुढें उभा राहिला तेव्हां आपलें त्यानेंच जावें म्हणजे मोक्षाला पोंचूं." पण श्रीकृष्णानें हळूच सांख्य ज्ञानांतून कर्मयोगांत प्रवेश केला. तेव्हां दोन वाटा फुटलेल्या दिसल्या असतां मनुष्य भांबावून जातो तसें अर्जुनाला झालें. पण रस्त्यांचीं नांवें लिहून त्यांकडे बोटें दाखवून रंगविलेल्या पाटीच्या खांबाप्रमाणें श्रीकृष्ण जवळच होते, व दुसराहि रस्ता पहिल्याप्रमाणेंच मोक्षाला पोंचतो असें श्रीकृष्णांनीं सांगितलें. पुढें भक्तिमार्गाचेंहि त्यांनीं असेंच वर्णन केलें. अशा रीतीनें सगळे मार्ग निरनिराळे परंतु एकाच मुक्कामाला जाऊन पोंचणारे असें सांगून, श्रीकृष्णांनीं

त्यांची एकवाक्यता केली. मग अर्जुन म्हणाला " आहेत! तीन मार्ग आहेत! तें सर्व ठीक आहे. ते वेगळे कोणाकरितां कां केले हेंहि मी समजलों. पण श्रीकृष्णा, आतां चल, तूं नेणार त्याच मार्गानें जातों. मला सर्वच मार्ग सारखे, कारण एकाच मुक्कामाला पोंचविणारे. पण आयती तुझी संगत सोबत कर्मयोगाच्या मार्गावर आहे ती सोडून दुसऱ्या मार्गानें कशाला जाऊं ? खुद्द वाटाड्याचाच हात धरून गेलेलें बरें." पुढें कदाचित् श्रीकृष्ण व अर्जुन कर्मयोगमार्गानें मुक्कामाला पोंचले तेव्हां तेथें त्यांना इतर मार्गांनीं आलेले प्रवासीहि भेटले असतील. आणि मग " श्रीकृष्णानें तीन मार्ग सांगितले ते बरोबर होते. ज्यानें त्यानें फक्त आपल्या स्वभावाप्रमाणें व हौसेप्रमाणें एक पसंत केला" हें अर्जुनाला दिसून आलेंच असेल. तीनहि मार्गांनीं एकालाच एकाच वेळीं जाणें शक्य नसतें. त्याच मुक्कामाला निरनिराळ्या तीन वेळीं जावयाचें असेल तर एखादा प्रवासी कौतुकानें चिकित्सनें एकदां हा, एकदां तो दुसरा, व एकदां तो तिसरा अशा तीन मार्गांनीं प्रवास करील. दुर्दैवानें एकदां मनुष्य मोक्षाला पोंचला म्हणजे मग पुनर्जन्म नाहीं! आणि मग मनांत आलें तरी दुसऱ्या मार्गानें प्रवास करण्याची हौस फेडून घेण्याकरितां मागें परत येणें शक्य नाहीं हा भाग वेगळा ! पण या तीनहि मार्गांची उपयुक्तता व फलद्रूपता अर्जुनाला कळली व पटली असेल यांत शंका नाहीं; व " तदेकं वद निश्चित्य " असें आपण उगीच म्हणालों असें त्याला वाटलें असेल !

## ( १३ ) दोन राजमार्गांमधील पाऊलवाट

हा मर्मसूचक दाखला सोडून आतां आपण राज्यशास्त्राकडे वळूं. ज्ञानाचा परिणाम मोक्ष आहे असें म्हटलें तरी केवळ राज्यशास्त्राच्या ज्ञानानें त्या शास्त्रांतला मोक्ष मिळत नाहीं. त्या ज्ञानानें मनुष्याला किंवा समाजाला फार तर उपमोक्षापर्यंत पोंचल्यासारखें होतें. म्हणून पुनर्जन्म प्राप्त होतो. आणि म्हणूनच श्रीकृष्णार्जुनाच्या उदाहरणांत जें घडलें नाहीं तें राज्यशास्त्र—ज्ञानाच्या संबंधानें घडूं शकतें. म्हणजे कोणच्याहि एका पद्धतीनें ( उदाहरणार्थ अनुभवपद्धतीनें ) राज्यशास्त्राचें ज्ञान मिळविलें तर त्यानें सुराज्याचा मोक्ष लोकांच्या पदरीं पडलेला दिसत नाहीं. त्याला परत येऊन पुनः दुसऱ्या म्हणजे कल्पनामार्गानें राज्यशास्त्राचें ज्ञान मिळवावें लागतें. कोणत्याहि एका मार्गानें गेलें असतां, मनुष्य फक्त मोक्षाजवळ जवळ जातो. प्रत्यक्ष मोक्षाला जाऊन

भिडत नाहीं. यामुळें अनुभवाचा ज्ञानमार्ग, व कल्पनेचा ज्ञानमार्ग, हे दोनहि त्याला आलटून पालटून चोखाळावे लागतात. सुदैवानें राज्यशास्त्रावर आज शेंकडों ग्रंथकारांनीं दोनहि मार्गांनीं जाऊन लिहिलेले, म्हणजे अनुभव व कल्पना यांच्या साहाय्यानें राज्यशास्त्राचें संशोधन व परीक्षण केलेले ग्रंथ उपलब्ध आहेत. यामुळें नवीन ग्रंथ रचणाराला दोनहि पद्धति सारख्याच प्रमाण वाटूं लागतात. मात्र तो मनाशीं असें म्हणतो कीं "दोन राजमार्ग दोहोंकडून जातात. पण त्या दोहोंमधून एक पाऊलवाटहि मळलेली अशी दिसते कीं, त्या पाऊल वाटेनें मी गेलों असतां, दोनहि मार्गांच्या जवळून मी प्रवास करीत राहीन. आणि जेथें मला पाऊलवाट अडचणीची वाटेल तेथें, तिचा तितका भाग टाकून, केव्हां अनुभवाच्या डाव्या हाताच्या राजमार्गानें तर केव्हां कल्पनेच्या उजव्या हाताच्या राजमार्गानें मी प्रवास करीन. मीं दोन मार्गांपैकीं कोणाएकाचाच गुलाम कां व्हावें ? कदाचित् माझी मला तिसरीच वाट काढतां येईल ! आणि तिनें जातांना जरूर तेव्हां दोनहि राजमार्गांचा फायदाहि मला मिळेल."

## ( १४ ) राज्यशास्त्र हा समाजशास्त्राचा भाग आहे

इतका विस्तार करून लिहिण्याचें कारण असें कीं, पूर्वीं एक वेळ राज्यशास्त्र हें नुसतें अनुभवसिद्ध असा आग्रह धरणारे, व उलट तें शास्त्र केवळ कल्पनासिद्ध आहे असा आग्रह धरणारे, दोनहि प्रकारचे लेखक होऊन गेले. पण आतां जे ग्रंथकार राज्यशास्त्राविषयीं लिहितात ते अनुभव व कल्पना या दोहोंच्या साहाय्यानें, पण त्यांतल्यात्यांत अनुभवाला अधिक महत्त्व देऊन आपले सिद्धान्त मांडतात. मात्र क्वचित् त्यांतल्या एकाविषयीं त्यांचा पक्षपात थोडासा दिसून आला तरी, दुसरी पद्धति सर्वस्वीं टाकाऊ आहे असें ते म्हणत नाहींत. राज्यशास्त्राला इतिहासाच्या शास्त्रांत घालावें कीं, समाजशास्त्रांत घालावें, किंवा तें स्वतंत्र कल्पनेनें रचावें, असा जो वाद होता तोहि आतां नाहींसा झालेला आहे. तो असा कीं, समाजशास्त्र हें आतां "सर्व शास्त्रांवर व्याप्ति करून शिल्लक उरणारें शास्त्र" असें मानतात. आणि या व्यापक शास्त्रांत, इतिहासशास्त्रच काय पण मानसशास्त्र देखील समाविष्ट होतें असेंहि मानतात. राज्यशास्त्र हेंहि समाजासंबंधीं असल्यामुळें, तें एकंदर समाजशास्त्राखालींच पडणार हें उघड आहे. पण त्यांतूनहि मानसशास्त्र व इतिहासशास्त्र या दोहोंचाहि त्याला आधार

आहे असें देखील मानलें जातें. राज्यशास्त्र लिहावयाला बसावें व सर्व इतिहास विसरावा, आणि मग मनाला विचारावें कीं, " मीं अशी कोणती नवी कल्पना सुचविणार कीं, जिला इतिहास-ज्ञानाचा आधार नाहीं ? कारण माझ्याच स्वतःच्या कल्पनेंतून जरी मी नवा म्हणून सिद्धान्त काढावयाला बसलों तरी, माझी कल्पना ही अगदीं स्वतंत्र अशी आहे कोठें ? अगदीं नवी म्हणून कल्पना काढावी व पृथक्करण करून पाहावें तों, तिचा प्रत्येक भाग पूर्वींच्या अनुभवाचाच आहे असें आढळतें. "

## ( १५ ) भूत हेंच खरें अद्भुत

अगदीं अद्भुत म्हणून कल्पना चालविली तर अजूनहि एखादा नवा देव उत्पन्न करितां येईल. पण दहा तोंडांचा रावण, हजार हातांचा सहस्रार्जुन, घोडतोंड्या तुंबरू, अर्धमनुष्य अर्धपशु असला अवतारी नरसिंह, हीं चित्रें घेतलीं तरी त्यांत आपणाला पूर्वीं माहिती असलेले अनुभवसिद्ध असेच निरनिराळे अवयव एकत्र जोडलेले आढळतात कीं नाहीं ? गणपति हा प्रथम झाला तेव्हां नवा. पण मनुष्य देह व हत्तीची सोंड यांपैकीं नवें कांहींच नव्हतें ! तसेंच हौसेनें, अभिरुचीनें, वैचित्र्यबुद्धीनें कमाल केली तरी पांच पन्नास निरनिराळ्या परिचित वाहनांवर बसलेले किंवा निरनिराळ्या स्थितींतले व पोशाखांतले, गणपति दाखवितां येतील इतकेंच. तसेंच, व्याकरणांतील सकर्मक क्रियापदाचें वाक्य म्हटलें म्हणजे कर्ता, कर्म व क्रियापद हीं तीनहि त्यांत स्पष्ट किंवा अध्याहृत आलींच पाहिजेत, मग कोणी कर्त्यापासून, कोणी कर्मापासून, कोणी क्रियापदापासून वाक्याचा प्रारंभ करो; किंवा कोणी क्रियेवर, कोणी कर्त्यावर, कोणी कर्मावर विशेष जोर देवो. राज्यशास्त्रांतील संस्थांचें व सिद्धान्तांचें असेंच आहे.

## ( १६ ) कल्पना व अनुभव परस्परोपकारीच होत

राज्यसंस्था म्हटली म्हणजे हुकूम करणारा असा कोणी तरी सत्ताधारी पाहिजे. ज्याला उद्देशून हुकूम केला, ज्यानें तो हुकूम मानावा अशी अपेक्षा व ज्यानें तो हुकूम मानला नाहीं तर त्याला शिक्षा करूं असा सत्ताधाऱ्याचा अभिनिवेश असेल असा कोणी तरी प्रजाजन पाहिजे. निश्चित हुकूम पाहिजे. आणि तो अमान्य केल्यास तो बजावून घेण्याची व शिक्षा करण्याची शक्ति पाहिजे. या चार गोष्टी असल्याशिवाय राज्यसंस्थेची बनावट किंवा कल्पनाहि

होऊं शकत नाहीं. या चारहि गोष्टींच्या प्रकारांचें ज्ञान मनुष्याला इतिहासावरूनच झालेलें आहे. हल्लींचे जे राज्यसंस्थेचे प्रकार अंमलांत आहेत ते कांहीं वळणावळणांनीं जुन्या बीजसंस्थांतूनच रूपांतर होत होत परिणत झालेले आहेत. आणि भावी राज्यसंस्था अमुक एक प्रकारच्या असाव्या व त्याच इष्ट होत असें वर्णन किंवा शिफारस कोणाला करावयाची असेल तरी, या जुन्या अनुभवाचीच कसोटी घेऊन ( व्याकरणांतील वाक्याच्या दाखल्याप्रमाणें ) त्याचें निरनिराळ्या पद्धतीनें मिश्रण करून, किंवा त्यांना निरनिराळें स्थान देऊन, किंवा त्यांना निरनिराळें महत्त्व देऊन, ती कल्पना किंवा बनावट सिद्ध केली पाहिजे. म्हणजे अर्थात् अनुभव व कल्पना यांचा सरमिसळच उपयोग केला पाहिजे; त्यांतील कोणतेंहि एक वगळूंच असें म्हटलें तर चालणार नाहीं.

### ( १७ ) विशेषतः समाजशास्त्रांत

समाजशास्त्राला भौतिक शास्त्राचा दाखला अर्थातच देतां येत नाहीं. कारण भौतिक पदार्थांचे गुणधर्म निश्चित स्वरूपाचे असून त्यांचा हुकमी प्रयोग करून पाहतां येतो, त्याप्रमाणें समाजशास्त्रांत असे हुकमी प्रयोग करून पाहतां येत नाहींत. पण भौतिक शास्त्रांतहि जुने अनुभव लक्षांत घेऊन व पुढें कांहीं तरी कल्पना मनांत बसवून ( अनुभवाच्या साहाय्यानेंच पण थोडेसें अनमानधपक्यानेंच ) शास्त्रज्ञानी लोक प्रयोग करतात. समाजशास्त्रांत व त्यांतील अंगभूत राज्यशास्त्रांतहि याच रीतीनें जुना इतिहास आधाराला घ्यावा लागतो, व मग अनुभवानें एखादी नवी कल्पना रचून अनुभवसिद्ध मार्गांनीं ती अंमलांत आणण्याचा प्रयोग करावा लागतो. पण तो साधेलच अशी जामिनकी कोणी मागत नाहीं व कोणी देत नाहीं. अशी जामिनकी मिळती तर सुराज्याचा प्रश्न हटकून सुटून सगळें जग सुखी व संतुष्ट झालें असतें. पण " वांझोटी रडे, एकपुती रडे व सातपुती रडे " या म्हणीप्रमाणें, मात्र ती प्रत्येक वेगवेगळ्या कारणांकरितां रडते या न्यायानें, जगांतील कोणताहि समाज आज कमी अधिक असंतुष्टच आहे.

### ( १८ ) रोज नवा शिधा, नवा स्वयंपाक

कोणी जुन्या सुवर्णयुगांतील सुटसुटीत अल्पप्रमाण राज्यसंस्थांचा लोप झाला म्हणून ! कोणाचा खरा विश्वास एकतंत्री राजसत्तेच्या यशावरच आहे पण

ती सत्ता आज लोपली म्हणून ! आणि कोणी नवी लोकाधीन राजसत्ता अस्तित्वांत आहे पण ज्याच्या हातीं ती सत्ता ते लोकच अपात्र नादान ठरूं पाहातात म्हणून ! मिळून कोणाचेंहि समाधान नाहीं. मात्र सर्व गुण पूर्ण अशा राजसंस्थेचा शोध सुरूच आहे, प्रयोग होतच आहे, उलथापालथ होतच आहे. ताजव्याचें पारडें वरखालीं ढळतच आहे. आणि एकंदरीनें असा प्रकार चाललेला आहे कीं, अंधाऱ्या खोलींत लोकांना डोळे बांधून सोन्याचा गोळा हुडकून काढून हस्तगत करण्याकरितां सोडून दिलें आहे, पण कोणा दुष्टानें हळूच सोन्याचा गोळा तेवढा तेथून काढून लांबविला आहे. असें असून, शोध, धांगडधिंगा, बदाबदी, गर्दी, गोंधळ, मारामारी सुरूच आहे. पण हें सर्व आहे म्हणून शास्त्रविचार करण्याचा मोह कांहीं कोणाचा सुटलेला नाहीं. ज्ञानाची इच्छा आणि जगण्याची इच्छा या दोनहि बरोबरच वाट चालतात. राज्यसंस्था कितीहि प्रयत्न केला तरी यशस्वी होत नाहीं असें पाहूनहि राज्यसंस्थाच मुळीं नको असें कोणी आज म्हणत नाहीं. “ कां न सदन बांधावें कीं त्यांत पुढें बिळें करिल घूस ?” आणि यंत्रें जशीं एकच हेतु सिद्ध करण्याकरितां शेंकडों निरनिराळ्या प्रकारचीं बनत आहेत, त्याप्रमाणें राजकीय सुखाकरितां व नमुनेदार सुराज्य व्यवस्थेकरितां प्रयत्न करण्याचें कोणीं सोडलें नाहीं. इतिहास इतका जुना झाला असला तरी जी नवी पिढी येते तिला सर्वच नवें असतें. दूर दिसणाऱ्या क्षितिजाच्या रेघेपर्यंत आपण प्रवास करून पोंचलों म्हणजे तितक्या दूर अंतरावर पुनः दिसणाऱ्या क्षितिजाची रेघ उमटूं लागते. आणि तेथपर्यंत पोंचण्याचा मार्गहि पूर्वीप्रमाणेंच चालून गेलें पाहिजे असें दिसून येतें. रोज नवा मुक्काम, रोज नवा सिधा, रोज नवा स्वयंपाक, त्याचप्रमाणें रोज नवे वाचक व रोज नवे लेखक. राज्यघटनांची व राज्यशास्त्रावरील ग्रंथांचीहि गोष्ट तशीच आहे.

## ( १९ ) राज्य-शास्त्राचा इतर शास्त्रांशीं संबंध

राज्यशास्त्र हें कल्पनासिद्ध किंवा अनुभवसिद्ध यांपैकीं कसेंहि मानलें तरी, इतर अनेक शास्त्रांशीं त्याचा त्या त्या रीतीनें संबंध येतो. हीं अनेक शास्त्रें म्हणजे समाजशास्त्राशीं चिटकून असलेलीं शास्त्रें. मात्र शुद्ध बौद्धिक शास्त्रें नव्हेत. उदाहरणार्थ, जमाखर्ची हिशेब ठेवणें हें राज्यकारभारांत अवश्य असल्यामुळें व्यवहारापुरतें गणित त्याला लागतें; म्हणून कांहीं गणितशास्त्राशीं राज्य-

शास्त्राचा संबंध आहे असें म्हणतां येणार नाहीं. राज्यांतलीं घड्याळें बरोबर वेळ देणारीं अशीं लावितां यावीं याकरितां राज्यांत एखादी वेधशाळा हवी; म्हणून कांहीं ज्योतिषशास्त्राशीं राज्यशास्त्राचा संबंध आहे असें म्हणतां येत नाहीं. भौतिक शास्त्रांच्या, म्हणजे पदार्थविज्ञान व रसायनशास्त्र यांच्या परिणतीवर राज्यकारभाराला अवश्य असणाऱ्या सैन्याची सुस्थिति व युद्धपात्रता अवलंबून असते; तरी पण राज्यशास्त्राचा व भौतिक शास्त्रांचा प्रत्यक्ष संबंध आहे असें म्हणतां येत नाहीं. याच रीतीनें आणखी असेंहि दाखवितां येईल कीं, इतर अनेक शास्त्रांच्या शोधांचा व प्रक्रियेचा उपयोग राज्यकारभाराच्या निरनिराळ्या खात्यांकरितां करून घ्यावा लागतो, व तज्ज्ञांच्याद्वारें तो करूनहि घेतला जातो, पण राज्यशास्त्राचे सिद्धांत या इतर शास्त्रांवर अवलंबून आहेत असें म्हणतां येत नाहीं.

## (२०) राज्य–शास्त्र व धर्मशास्त्र

आतां धर्मशास्त्र व नीतिशास्त्र हीं घेऊं. यांचा राज्यशास्त्राशीं प्रत्यक्ष फारसा संबंध पोंचत नाहीं. पूर्वीं एकेकाळीं राजसत्ता व धर्मसत्ता हीं एकाच ठिकाणीं संघटित झालीं असल्यानें त्यांचा संबंध उघड होता. परंतु दिवसेंदिवस या दोन सत्ता वेगवेगळ्या होऊं लागल्या आहेत; व राज्यसत्ता ही शिरजोर होऊन तिनें धर्मसत्तेचा उच्छेद करण्याचा सपाटा चालविला आहे. यामुळें धर्मसत्तेचा सामान्य समाजसत्तेंत अंतर्भाव होऊन येथेंहि धर्माला सत्ता म्हणून कांहीं उरणार नाहीं असा संभव वाटतो. आर्य हिंदु लोकांच्या जुन्या संस्कृतींत राज्यशास्त्र हें सगळेंच्या सगळें धर्मशास्त्रांत अंतर्भूत झालेलें होतें. राजधर्म, राजनीति हा धर्मग्रंथांतलाच एक अध्याय असे आणि राजा हा विष्णूचा अवतार ही भावना असल्यामुळें, राजाचे अधिकार व त्याचीं कर्तव्यें यांना धर्मसिद्धांतांचें स्वरूप प्राप्त झालें होतें. पण त्याबरोबर प्रजाधर्मालाहि धर्मसिद्धांतांचें स्वरूप असून, स्वधर्मानुसार वागणाऱ्या प्रजेला स्वातंत्र्याचा हक्क होता, व त्यापुरता राजा हा प्रजेच्या हुकुमांची अंमलबजावणी करणारा मुख्य अधिकारी सेवक असें त्याचें नातें होतें. पण या नव्या मनूंत ते जुने सिद्धांत सर्व मागें पडून जगांतील इतर राष्ट्रसमाजाप्रमाणें राजधर्म व प्रजाधर्म यांना निवळ व्यावहारिक व कायदेबाजपणाचें स्वरूप येऊं लागलें आहे.

## (२१) राज्य–शास्त्र व अर्थशास्त्र

दुसरे पक्षीं इतर कांहीं शास्त्रांचें तसें नाहीं. उदाहरणार्थ, अर्थशास्त्र. अर्थ–

शास्त्रांतील मुख्य तत्त्व असें आहे कीं, मनुष्य व मनुष्यसमाज हा स्वार्थी असून द्रव्यसंपादनार्थ तो हरएक प्रकारच्या खटपटी करीत असतो. या सर्व खटपटींच्या विचारांचें संशोधनाचें शास्त्र म्हणजे अर्थशास्त्र. तसेंच देशाच्या सांपत्तिक स्थितीवर राज्यकारभाराची सुस्थिति, व उलट देशांतील राज्यकारभारावर त्यांतील लोकांची सांपत्तिक सुस्थिति हीं अवलंबून असल्यामुळें राज्यशास्त्र व अर्थशास्त्र यांचा अत्यंत निकट संबंध येतो. राज्यांतल्या फडणिशी व व्यापारी खात्यांचा कारभार चांगला किंवा वाईट होणें, आणि त्यामुळें प्रजेला सुख किंवा दुःख होणें हें, त्या दोन खात्यांत अर्थशास्त्र जाणणारे निष्णात लोक अधिकाराच्या जागांवर असण्यावरच अवलंबून आहे. हल्लींचें हिंदुस्थान सरकार परकी आहे, व स्वदेशांतील म्हणजे विलायतेंतील लोकांचें कल्याण हिंदुस्थानच्या संपत्तीनें करणारें आहे असा प्रवाद प्रसिद्ध व सर्वसंमत आहेच कीं नाहीं ? स्वदेशी बहिष्काराच्या चळवळी प्रथम त्यामुळेंच निघाल्या. आणि हिंदुस्थानच्या लोकांना आर्थिक स्वातंत्र्य मिळालें तरच खरें स्वराज्य मिळालें असें जें म्हणण्यांत येतें तेंहि याच कारणामुळें.

## ( २२ ) अर्थशास्त्राचें वाढतें महत्त्व

पण याहिपलीकडे जाऊन अर्थशास्त्र व राज्यशास्त्र यांचा संबंध दाखवितां येतो. तो असा कीं, हिंदुस्थानांत सरकार परकी असो, पण इंग्लंड, फ्रान्स, रशिया, जर्मनी, अमेरिका या देशांतून तरी तें स्वकीयांचेंच आहे कीं नाहीं ? मग त्या देशांतल्या लोकांचें आर्थिक कल्याण व सरकारचें धोरण यांचा बेबनाव झाल्याची जी ओरड कित्येक वेळां आपण ऐकतों ती कां ? तर त्याचें कारण हें कीं, प्रधानमंडळ स्वकीय ऋणानुबंधी व देशप्रेमी लोकांचेंच असलें तरी, स्वकीयांचेंहि आर्थिक कल्याण साधण्याच्या मार्गासंबंधानें स्वकीयांतच मतभेद होऊं शकतो, व या मतभेदावर प्रधानमंडळाची उलथापालथहि होते. उदाहरणार्थ, देशांत भांडवलशाही वरचढ असावी किंवा कामकरी वर्ग वरचढ असावा, व्यापार खुला असावा कीं बंदिस्त असावा, देशांतले कारखाने किंवा उद्योगधंदे हे सरकारच्या मालकीचे असावे कीं खाजगी मालकीचे असावे, चलनपद्धति कशी असावी, इत्यादि अनेक अर्थ-शास्त्रविषयक बाबी या प्रत्यक्ष राज्यकारभाराच्या धोरणांत समाविष्ट होऊं शकतात आणि बोल्शेव्हिजम किंवा कम्यूनिझमच्या अर्थशास्त्रीय उपपत्तीला तर राजकारणांत हल्लीं इतकें स्थान

आलें आहे कीं, तिच्या पायीं राशियांत राज्यक्रांति होऊन बादशाही तर नष्ट झालीच, पण भांडवलशाहीहि नष्ट होऊन राष्ट्राचें सैन्य हें या नव्या सिद्धांतिक अर्थशास्त्रीय मतप्रसाराचा दूतगण असें स्वरूप त्याला आलें आहे.

## ( २३ ) राज्य-शास्त्र व इतिहासशास्त्र

अशा रीतीनें इतर अनेक शास्त्रांचा उल्लेख केला असतां आम्हीं इतिहास-शास्त्र मात्र अद्यापि वगळलें. पण त्याचें कारण हेंच कीं इतिहासशास्त्र व राज्य-शास्त्र यांचा संबंध आम्ही इतका निकट मानतों कीं त्या दोहोंची जवळ जवळ समान व्याप्तिच होते. विशेषतः जे लोक राज्यशास्त्र हें मुख्यतः अनुभवसिद्ध शास्त्र आहे असें मानितात, त्यांना इतिहास व राज्यशास्त्र यांची समव्याप्ति मानल्याशिवाय गत्यंतरच नाहीं. इतिहासाला सामाजिक हेंहि एक अंग असतें व इतिहासशास्त्र हें समाजशास्त्र या व्यापक सदराखालीं पडतें. पण राज्य-शास्त्र हेंहि समाजशास्त्राचेंच मुख्य अंग मानावें लागतें. यामुळें इतिहासशास्त्र व राज्यशास्त्र यांची समव्याप्ति मानण्यास कांहींच प्रत्यवाय येत नाहीं. जगाचा इतिहास म्हणजे मनुष्यस्वभावाचा इतिहास. राज्यशास्त्र परिणत होण्याला जो अनुभव लागतो तो सर्व ज्याला आपण ‘ इतिहास ’ म्हणतों त्यांतच ग्रथित झालेला आहे. किंबहुना इतिहासांत राज्यसंस्थांच्या हकीकतीला जितकें महत्त्व दिलेलें आढळतें तितकें समाजाच्या इतर अंगांच्या हकीकतीला दिलेलें आढ-ळत नाहीं. यावरूनहि इतिहास व राज्यशास्त्र हीं किती एकजीव आहेत हें दिसून येईल. राज्यकारभारांतून इतिहासवृक्षाचीं बीजें निर्माण होतात व फिरून त्या इतिहास—वृक्षाला राज्यसंस्थारूपी फळें येतात.

## ( २४ ) इतिहास हा मुख्यतः राज्यसंस्थांचाच इतिहास !

कोणताहि इतिहास घेऊन पहा. त्यांत राज्यसंस्थांच्या पूर्वकालीन किंवा तत्कालीन घडामोडींचीच हकीकत मुख्यतः दिलेली असते. जुन्या काळीं स्वतंत्र वागणारे जुलमी सत्ताधीश राजे होते, तेव्हां इतिहासाचा मुख्य विषय त्या राजांनीं व्यक्तिशः किंवा त्यांच्या घराण्यांनीं केलेले पराक्रम, युद्धें, कीर्तिलाभाच्या इतर गोष्टी, सुखलालसेनें केलेले खेळ, चोचले, व्यवस्था, प्रधानमंडळें, सेनापति यांच्या अदलाबदली, बंडें, क्रांत्या, उत्पात, धाडसाचे किंवा लोकोपयोगार्थ किंवा धर्मसाधनार्थ केलेले उद्योग, शास्त्रकलादिकांचा घेतलेला परामर्ष विद्यावृद्धीचे प्रयत्न—इत्यादि विविध पण राजे लोकांनीं केलेल्या गोष्टींच्या वर्ण-

नाचा असे. रोमच्या राज्यासारख्या राज्याचा इतिहास घेतला तर त्यांत आलटून पालटून प्रथम राजे, मग सुलतानी पद्धतीनें व अधिकारानें वागणारे लोकप्रतिनिधी, व मग खुद्द जुलमी बादशहा कसकसे झाले याची, व या सर्वांच्या कारकीर्दींत घडलेल्या राज्यकारभाराची हकीकत वाचावयास मिळते. अथवा अमेरिका स्विट्झरलंडसारख्या राष्ट्रांचा इतिहास घेतला तर लोकशाही राज्यकारभाराची हकीकत वाचावयास मिळते. पण नुसता ' इतिहास ' म्हटला म्हणजे तो राज्य–संस्थांचा इतिहास हाच अर्थ कोठेंहि आढळतो. राजकीय इतिहास हेंच ' राज्यशास्त्रा 'चें प्रधान अंग होय.

## ( २५ ) भविष्यपुराण इतिहास नव्हे

तथापि प्रस्तुत पुस्तकांत कोणत्याहि एका किंवा अनेक देशांचा राजकीय इतिहास समग्र किंवा संक्षिप्त असाहि सांगण्याचा आमचा हेतु नाहीं. इतिहासाचें महत्त्व राज्यशास्त्राच्या या प्रस्तावनेंत उल्लेखिण्याचें मुख्य कारण इतकेंच कीं, पूर्वीं सांगितल्याप्रमाणें राज्यशास्त्र हें प्रायः अनुभवसिद्ध असें शास्त्र आहे व हा अनुभव इतिहासांतच सांपडतो. मग तो इतिहास लेखी, गद्य, ग्रंथ, काव्यें, पवाडे, प्रशस्त्या, दंतकथा किंबहुना अर्धवट अद्भुत वर्णनात्मक आधिदैविक संस्कृतीचीं पुराणें–कोणत्याहि स्वरूपांत असो. मात्र इतिहासाचा विषय भविष्य वर्णन करण्याचा नसतो. पूर्वेतिहासाच्या ज्ञानानें पुढील काळच्या स्थितीविषयीं अनुमान करितां येण्यासारखें असतें; आणि अनुमान व भविष्य यांत म्हणण्यासारखा फरक नाहीं. भविष्य या शब्दांत कांहीं दैवी चमत्काराच्या सामर्थ्याचा अंश असल्याविषयीं लोकभ्रम आहे. परंतु पद्धतशीर केलेलीं, म्हणजे अनुभवावरून सिद्ध झालेले पक्के नियम लावून बनविलेलीं अनुमानें हीं ' भविष्या ' इतकींच खरीं ठरूं शकतात. राज्यशास्त्राहून इतर शास्त्रांनाहि इतिहासग्रथित अनुभव हाच मुख्य पाया आहे. पण त्याला नुसतें ' इतिहास ' हें नांव नसून त्या त्या विषयाचें नांव त्या शब्दाच्या मागें जोडावें लागतें. उदाहरणार्थ, चित्रकलेचा इतिहास, वैद्यकशास्त्राचा इतिहास, प्राणिशास्त्राचा इतिहास इत्यादि.

## ( २६ ) इतिहासज्ञान व शहाणपण

जें फल इतिहासाच्या अध्ययनानें तेंच राज्यशास्त्राच्या अध्ययनानें मिळेल. इतिहासावरून राजकीय शहाणपण शिकण्याचें मनुष्य मनांत आणील तर तें त्याला शिकतां येईल. पण मनुष्यानें इतिहास हा जर केवळ मनोरंजक वाङ्मय

म्हणूनच वाचला, त्यांतील अद्भुत कथा वाचण्यापुरतीच त्यानें आस्था ठेवली, त्यांतील चटकदार गोष्टी हाच काय तो मनुष्यस्वभावाचा खरा किंवा संपूर्ण नमुना मानला, किंवा मन याहून थोडें मोठें करून कां होईना, ऐतिहासिक मानवचरित्रांतल्या आनंदायक प्रसंगांनीं आनंद व दुःखदायक प्रसंगांनीं दुःख मानलें, व अशारीतीनें सहानुभवच घेतला, तरी तेवढ्यामुळें मनुष्यानें इतिहासाचा खरा उपयोग करून घेतला असें होत नाहीं. कारण हे उपयोग वरवरचे आहेत. अंतरंगस्पर्शी नाहींत. भोळ्या श्रद्धाळू लोकांनीं अद्भुत रसपोषक भाग उचलला, सात्विकांनीं सहानुभूतीचा भाग उचलला, आणि वाङ्मयप्रेमी लोकांनीं इतिहासाच्या भाषेंतील वक्तृत्वाचा आनंदरस लुटला, तरी इतिहासाच्या गाभ्यांत अंतरंगांत बोध, शहाणपणाची शिकवण, ही कांहीं बाकी उरतेच. पण त्या दृष्टीनें इतिहास वाचील त्यालाच ती लाभेल. पंचांगभर सण लिहिले आहेत. पण अभागी कपाळकरंट्याला त्यांतला एकहि वांट्याला येत नाहीं. शकुनवंतींत अशुभ शकुनाइतकेच शुभ शकून असतात. पण दुर्दैवी मनुष्याला अशुभ शकुनावरच सुपारी ठेवण्याची बुद्धि होते त्याला काय करणार ?

### ( २७ ) इतिहासांत पुनरुक्ति पण वैचित्र्य असतें

अशा रीतीनें इतिहसांतून अनेकांनीं आपापल्या अभिरुचीप्रमाणें पात्रतेप्रमाणें अनेक भाग उचलले म्हणजे जें सत्व खालीं तळाशीं उरतें तेंच राज्यशास्त्राचें मुख्य घटकद्रव्य होय. विद्यमान सर्व देशांतील राज्यसंस्था पाहिल्या असतां त्या, याच ऐतिहासिक सत्वानें, मात्र पुटावर पुटें बसून व संस्कारावर संस्कार होऊन बनलेल्या आहेत असेंच आढळून येईल. इतिहास हा त्याच त्या प्रसंगांनीं पुनरुक्त झालेला आहे असें दिसतें. त्याचें कारण मनुष्यस्वभाव अनेक युगांतरें झालीं तरी फारसा बदललेला नाहीं. परंतु या पुनरुक्त प्रसंगांतहि बारिक नजरेला हें आढळून येईल कीं, एकसारखा तंतोतंत सोळा आणे प्रसंग दुसरा असत नाहीं. त्यांत फरक असतोच. सर्व मनुष्यें हीं एकच जाति असतां, एकच घराण्यांत काय, पण एकाच आईबापांच्या पोटींहि आलेल्या मुलांचे चेहरे सर्व हुबेहूब सारखे नसतात. एकत्वांत अनेकत्व, सामान्यांत विशेषत्व, व एकजिनसीपणांत वैचित्र्य हीच खरी ईश्वरी किंवा निसर्गकृत लीला होय. आणि जगांत आज शेंपन्नास लहानमोठ्या व कमीअधिक स्वतंत्र अशा देशांत ज्या राजसंस्था अमलांत आहेत, त्यांतील वैचित्र्य पाहून

याच ईश्वरी किंवा निसर्गकृत लीलेचा प्रत्यय येतो. राज्यशास्त्राच्या मूल तत्त्वांच्या वर्णनांत त्या संस्थांचा उपयोग उदाहरणादाखल फार होणारा आहे.

### ( २८ ) राज्यशास्त्राची फलश्रुति

राज्यशास्त्राला 'शास्त्र' हें नांव दिलें म्हणजे, जुन्या हिंदी पद्धतीप्रमाणें त्याची फलश्रुतिहि सांगितली पाहिजे. ती अशी आहे. या शास्त्राचा मूळ प्रणेता ईश्वर होय, कारण त्यानेंच मनुष्यस्वभाव उत्पन्न केला; आणि मनुष्यस्वभावानेंच राज्यसंस्था उत्पन्न केली, म्हणून राज्यशास्त्राचें अध्ययन करणाराला ईश्वरोपासनेचें पुण्य लाभतें. ती ईश्वराचीच एकप्रकारची सगुणोपासना होय. मनुष्यस्वभावांत त्रैगुण्य आहे. परंतु त्यापैकीं सत्वगुणाचा अनुभव देणारे घेणारे लोक थोडेच असतात. मुख्य खेळ रजोगुणाचा असतो. तामस गुण हाहि अपवाद स्वरूपाचाच समजावा. कारण मनुष्यमात्राचे हेतु किंवा चतुर्वर्ग ( धर्मअर्थकाममोक्ष ) केवळ सत्वगुणपालनानें साधत नाहींत; उलट रजोगुणपालनानें जोंपर्यंत त्याचें कार्य साधतें तोंपर्यंत तामसगुणाचा अंगीकार तो करीत नाहीं. रजोगुणांत स्वार्थ व स्वातंत्र्यबुद्धि हीं प्रमुख आहेत. या दोहोंचाहि लाभ मनुष्याला राज्यसंस्थेपासून मिळू शकतो. राज्यशास्त्राच्या अध्ययनापासून अदृष्टफल काय मिळेल हें सांगणें कठिण; कारण तें अदृष्टच. पण धन, धान्य, संपत्ति, यश, कीर्ति, अखंड राष्ट्रीय संततिपरंपरा, परोपकारादि मनुष्यसेवादि मानीव ऐहिक पुण्यमार्गाची प्राप्ती, इत्यादि हीं राज्यशास्त्राध्ययनाचीं दृष्ट फलें होत.

---

# भाग २ रा

## राजसंस्थांचा उगम व आधार

### ( २९ ) मनुष्याचें व्यक्तित्व व सामुदायिकत्व

मनुष्याचा जीवात्मा आणि त्याच्या देहाला मिळालेलें व्यक्तिनाम व व्यक्तिरूप एवढीच काय ती मनुष्यप्राण्याची या जगांत खास मालकीची अशी मत्ता आहे. बाकी हवा, पाणी, भूमि यांपासून तों त्याच्या देशांतल्या राज्यसंस्थेच्या

मालकीच्या संपत्तीपर्यंत सर्वांमध्यें तो यथांश सहभागी असला तरी, त्याची त्यां-वर स्वतंत्र्य मालकी नाहीं. त्याला इतर अनेक भागीदार आहेत. व्यक्ति-नामाच्या पलीकडे जाऊन त्याला आईचें किंवा बापाचें नांव लावावयाचें झालें तरी, आपलीं भावंडेंहि तींच नांवें लावतात, व हक्कानें आणि न्यायानें लावतात, असें त्याला आढळतें. स्वातंत्र्याबुद्धि-प्रधान मनुष्यप्राण्याच्या पारतंत्र्याला, वरील उपाधीच्या त्याच्या बंधनाला, येथून प्रारंभ होतो. पण या उपाधीला कंटाळून तो आपण होऊन वनवास एकांतवास पतकरीत नाहीं. इतकेंच काय पण आश्रयाकरितां, रक्षणाकरितां, सुखवृद्धीकरितां, आनंदवर्धनाकरितां, भागीदारीच्या तत्त्वानें दुःखभार हलका होण्याकरितां, तो होऊन इतरांची संगति स्वेच्छेनें पत्करितो. मनुष्य हें समाजाचें मूलच आहे. आणि मुलें जशीं आई-च्या कुशींत शिरतात, किंवा तिच्या पाठोपाठ तिला चिटकून वावरत असतात, त्याप्रमाणें मनुष्य हा समाजाला सहसा सोडून जात नाहीं व केव्हां केव्हां तर त्याला तो अगदीं बिलगून चिटकून राहतो.

## ( ३० ) सामुदायिक संबंधाचा नफातोटा

उपयोगामुळें किंवा कृतज्ञतेमुळें ममत्व वाटतें व वाढतें. त्याप्रमाणें प्रथम सर्वांत जवळच्या उपयोगाचें म्हणून आपलें कुटुंब म्हणजे आई बाप भावंडें, व तेढ्या नात्याचेहि कांहीं कांहीं आप्त, हे आपलेसे वाटतात. त्यांच्याविषयीं ममत्व व अभिमान वाटतो, व त्यांच्या करितां थोडासा स्वार्थत्याग करण्या-लाहि मनुष्य प्रसंगविशेषीं तयार होतो. मग एकाहून दुसरा अधिक लांब, त्याहून तिसरा कोणी अधिक लांब, या क्रमानें देशाच्या सरकारापर्यंत कमी अधिक ऋणानुबंधी अशा सामाजिक घटकांची साखळी लागते. आपला परका, जव-ळचा, लांबचा, ही भावना सापेक्ष व तुलनात्मक अशीच असते. सर्वात्मतेनें किंवा निखालस आपला व निखालस परका असें कोणालाहि म्हणतां येतच नाहीं. विरोध दर्शविण्याला, म्हणजे व्यवच्छेदकत्वाचें ज्ञान करून देण्याला, केव्हां या साखळींतला हा दुवा तर केव्हां तो दुवा उपयोगी पडेल, इतकेंच. व्यक्तिनाम, पितृनाम, कुटुंबनाम, कुलनाम, गोत्रनाम, जातिनाम, ग्रामनाम, प्रांतनाम, देशनाम या सर्वांचा उपयोग आपलेपणा दाखविण्याप्रमाणें परकीपणा दाखविण्यालाहि यथाप्रसंग उपयोगी पडतो. पण यांपैकीं कोणालाहि कारणपरत्वें तो आपला म्हणो किंवा परका म्हणो, त्या सर्वांचा व त्याचा संबंध न तुटण्या-

सारखा जोडलेला असतो. गोताचा रक्तसंबंध तोडणें अशक्यच आहे. आणि देशांतील सरकारचा राग आला तरी देशत्याग केल्याशिवाय सरकारचा संबंध तुटूं शकत नाहीं.

### ( ३१ ) मनुष्यदेह व राज्यसंस्था यांचें रूपक

प्रस्तुत राज्यशास्त्राच्या पुस्तकांत आपणाला कुटुंब किंवा जातिधर्म यांविषयीं फारसा विचार करावयाचा नाहीं. तर एका टोंकाला मनुष्यव्यक्ति, व दुसऱ्या टोंकाला तो ज्या देशांत, राष्ट्रांत, राज्यांत राहतो तद्विषयक राज्यसंस्था, या पुरताच विचार करावयाचा आहे. आतां व्यक्ति घेतली तरी तेंहि वास्तविक एक राज्यच आहे. कारण व्यक्तिचरित्र पूर्ण होण्याला राज्याप्रमाणेंच व्यक्ती-लाहि घटना व चालकशक्ति असावी लागते, ती असते व ती राज्ययंत्राप्रमाणें राज्यतंत्राप्रमाणें कार्यहि करिते. कोणी तत्त्वज्ञानी इंद्रियांना रथाचे घोडे म्हणतो, व त्यांचा सारथी मन अशी कल्पना करून जीवयात्रा व रथयात्रा यांची सांगड बसण्यासारखें रूपक बनवितो. कोणी मनाला राजा अशी संज्ञा देऊन इंद्रियांना त्याची प्रजा ठरवितो, आणि मन व इंद्रियें यांच्या परस्पर-संबंधाला राज्यकारभाराचें स्वरूप देतो. कोणी म्हणतो शरीर हें वाफेचें यंत्र असून मन हा त्या यंत्रांतला 'गव्हर्नर' आहे. मिळून काय एकच. तीनहि रूपकांत एक स्वतंत्र सत्ताधीश, व इतर त्याची आज्ञा पालन करणारी प्रजा, हीच गोष्ट मानलेली दिसून येते. पण प्रस्तुत आपणाला मनुष्य-व्यक्तिरूप राज्यसंस्थेचाहि विचार करावयाचा नाहीं. तें काम प्राणिशास्त्रवेत्ते व मानस-शास्त्रवेत्ते यांजवरच सोंपविलें पाहिजे.

### ( ३२ ) राज्यसंस्था म्हणजेच राष्ट्रपुरुष

मनुष्यप्राण्याविषयीं ज्याप्रमाणें "तेंहि एक राज्य आहे" असें म्हणतां येतें त्याप्रमाणें उलट, राज्यसंस्था घेतली तरी तो मनुष्यासारखाच प्राणी आहे, असें त्याविषयीं म्हणतां येईल. त्याला समष्टि हें रूप, व राज्यसंस्था हें नांव असलें तरी प्राण्याप्रमाणेंच जगणें, चलनवलनादि करणें, इच्छा आकांक्षा तृप्त करणें, आत्मरक्षण करणें, इत्यादि सर्व गोष्टी प्राण्याप्रमाणेंच राज्यालाहि करावयाच्या असतात. म्हणून राज्यसंस्था हा एक राष्ट्रपुरुष असा कल्पून, त्याचें चरित्र तदनुरूप शारीरशास्त्र व मानसशास्त्र यांच्या सहाय्यानें पाहिलें तपासलें पाहिजे. व्यक्तीऐवजीं संघटित समाज हा गणनेंतील मूळांक असें मानावयाचें इतकाच

फरक. मनुष्यप्राण्याचीं मृत शरीरें चिरून फाडून आंत पाहून शारीरशास्त्र्यांनीं आपलें शास्त्र बनविलेलें आहे. आणि जिवंत मनुष्याचे गुणधर्म पाहून प्राणशास्त्र रचलें गेलें आहे. त्याचप्रमाणें राज्यशास्त्राचीहि गोष्ट होय. हें शास्त्र तयार करणारांना मृत राज्यसंस्थांचा इतिहास तर उपयोगी पडतोच, पण जिवंत राज्यसंस्थाहि या कामीं त्यांना बिनमोल साहाय्य देतात. जिवंत मनुष्यप्राण्याचें अंतरंग अपारदर्शक अशा चामड्यानें मढविलेलें असल्यामुळें, आंतल्या प्राणात्मक क्रिया निरीक्षकाला दिसत नाहींत. पण राष्ट्रपुरुषाचें शरीर अंतर्बाह्य दृष्टीस पडत असतें. चारीं अंगांनीं कांचा लावून बनविलेल्या एखाद्या घड्याळांतल्या चक्राप्रमाणेंच जिवंत राज्यसंस्थांच्या अंगांतील सर्व भागांचीं कामें दूर असून स्वस्थपणें पाहतां येतात.

### ( ३३ ) रूपकाचा खुलासा

आतां राष्ट्रपुरुष म्हटला म्हणजे तें रूपक शक्य तितक्या अंगांनीं पुरें करणें आलें. पण तें तसें पुरें करण्यांत हानि नसून ज्ञान व स्वारस्य यांची वृद्धिच होण्यासारखी आहे. राष्ट्रपुरुषाला शरीर देह म्हणून कांहीं मुलख किंवा भूमिप्रांत पाहिजे. त्या देहांत रक्तपिंडांप्रमाणें कांहीं लोकसंख्या पाहिजे. या लोकसंख्येचा परस्पर संबंध जोडणाऱ्या शिरा, धमन्या, स्नायू, संवेदनाशील तंतु ही सामग्री हवीच; व ती राज्यसंस्थांतर्गत उपसंस्थांनीं बनविली जाते. रक्तपिंड समृद्ध ठेवण्याला पौष्टिकरस लागतो त्याप्रमाणें राष्ट्रपुरुषाच्या शरीरसंवर्धनाला द्रव्य धन संपत्ती हीं लागतात. शरीराच्या एका भागाचा संदेश निरोप दुसऱ्या भागाला पोंचविण्याला ज्ञानतंतूंचें जाळें लागतें त्याप्रमाणें राष्ट्रपुरुषाच्या शरिराला पोस्ट, तार हीं खातीं किंवा दूतगण लागतात. ज्ञानतंतूवर हुकमत चालवून त्यांच्या साहाय्यानें ज्ञानेंद्रियांकडून कामें घेण्याचें काम राष्ट्रशरीरांत करण्याला अधिकाऱ्यांचीं मंडळें असतात. देहसंरक्षणाला जसे हातपाय पुढें सरसावतात त्याप्रमाणें राष्ट्रसंरक्षणाला पोलीस व सैन्य हें असावें लागतें. आणि राष्ट्रशरीर निरोगी तेजस्वी राहण्याकरितां, सुसंस्कृत शुद्ध मेंदूप्रमाणें, राज्यसंस्थेला न्यायखातें, धर्मखातें, शिक्षणखातें इत्यादि लागतात व असतातहि.

### ( ३४ ) राष्ट्रसृष्टींतील भीम व वालखिल्य

आम्हीं राज्यसंस्थेला ' राष्ट्रपुरुष ' हें नांव दिलें आहे. परंतु त्याबरोबर हेंहि लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, मनुष्यसृष्टींत माणसें म्हटलीं म्हणजे तीं सर्वं सारख्या

आकाराचीं, उंचीचीं, वजनामापाचीं, स्वभावाचीं व गुणावगुणांचीं असतात असें नाहीं. त्याप्रमाणें राज्यसंस्था झाल्या म्हणून त्या कांहीं सगळ्या सारख्याच असत नाहींत. वृकोदर भीम हा मनुष्य होता, तसेंच वालखिल्य ऋषी हीं देखील माणसेंच होतीं. पण कोणीकडे तो एकाचा पर्वतप्राय देह, व प्रचंड वृक्ष उपटून खांद्यावर घेऊन त्यांनीं दुसऱ्यांना तडाखे देण्याची शक्ति ! आणि कोणीकडे ती मानवनामधारी, पण गाईच्या खुरानें पडलेल्या खळग्यांत गटंगळ्या खाणारीं, अंगुष्ठमात्र देहधारी वालखिल्यें ! कोणीकडे आधुनिक सँडो गामा ! आणि कोणीकडे सर्कशींत विनोदाकरितां खेळावयास बाहेर काढलेले ठेंगू बटुवामन विदूषक ! असें असतां या सर्वांना 'मनुष्य' हें एकच नांव दिलें जातें, किंबहुना त्या नांवावर त्या सर्वांना सारखाच हक्क सांगतांहि येतो. तसेंच मुंगी आणि हत्ती हे दोघेहि 'प्राणि' या एका सदराखालींच घालावे लागतात. त्याप्रमाणें राज्यसंस्थांचीहि गोष्ट आहे. अंकगणितांत ( १ ) या आंकड्याला गणिताच्या दृष्टीनें कोठेंही सारखीच किंमत. मग तो 'एक' म्हणजे रत्नांचा हार असो किंवा बजरबटू असो; राजा असो किंवा रंक असो; गरूड असो किंवा गांधिल असो ! त्याचप्रमाणें राज्यसंस्था म्हटली म्हणजे तिला अंकगणितांतील 'एकीएके एक' ही किंमत आलीच. आकार, क्षेत्रफळ, लोकसंख्या, उत्पन्न, खर्च, भांडवल, संपत्ती, विद्यासंपन्नता, लष्करी बलाढ्यता, इत्यादि बाबतींत एक राज्यसंस्था किंवा संस्थान दुसऱ्याहून कितीही मोठें असो, त्याची गणति एकाच सदरांत करावी लागते. स्वतंत्रता, स्वाधीनता, अधिकारपूर्णता या गोष्टी दोघांनाहि समान होत.

### ( ३५ ) कांहीं उदाहरणें

आम्ही म्हणतों हें खरें कसें ठरतें हें दाखविण्याकरितां दोन टोंकांचीं अशीं कांहीं उदाहरणें देतों. क्षेत्रफळानें रशिया, संपत्तीनें अमेरिका, अखंडित परंपरेनें व साम्राज्यवैभवानें इंग्लंड, कर्तृत्वानें जर्मनी, इत्यादि राज्यें पहिल्या प्रतीचीं मोठीं आहेत. पण त्यांच्या जोडीला 'आइल ऑफ मॅन' किंवा 'मोनॅको' हीं संस्थानें, राज्यें किंवा राज्यसंस्था बसविणें म्हणजे हास्यास्पदतेचा कळस होतो असें कोणासहि वाटेल. पण तें अनिर्वाह्य ठरतें. कसें तें पहा. मोनॅको या संस्थानचें क्षेत्रफळ फक्त आठ चौरस मैल आहे. एकंदर लोकसंख्या पंचवीस हजाराच्या आंत आहे. तिची वांटणी अवघ्या तीन शहरांत मिळून

झालेली आहे. त्यांतलें सर्वांत मोठें शहर अकरा हजार वस्तीचें असून राजधानीची लोकसंख्या दोन हजार आहे. या राज्याचें मुख्य उत्पन्न जुगारीच्या अड्ड्यांपासून आहे, व तें जास्तींत जास्त एक लक्ष पौंडांपर्यंत असतें. हें संस्थान पोलीस, न्यायाधीश, विद्याधिकारी वगैरे अधिकारी ठेवीत असेल कीं नाहीं, किंवा ठेवीत असेल तर ते कोणत्या दर्जाचे ठेवीत असेल, त्याची कल्पना कोणीहि सहजच करावी. प्रसंग पडल्यास हें संस्थान शत्रूपासून आत्मरक्षण कितपत करूं शकेल याचीहि कल्पना सहज होईल. तथापि, स्वतंत्र राजाच्या अनियंत्रित अंमलाखालीं असलेल्या अशा ॲबिसीनिया, मोरोक्को, इराण, रशिया, तुर्कस्थान, अफगाणिस्तान वगैरे राज्यांच्या जोडीला या मॉनॅकोच्या राज्याला बसवून राज्यशास्त्रवेत्त्याला त्याची गणति व वर्गवारीनें उल्लेख त्या इतरांच्या बरोबरीनें करावा लागतो.

## ( ३६ ) कांहीं गमतीचे प्रकार

मॉनॅकोच्या छोट्या बंदरांत कस्टम खात्याचे अधिकारी कचेरीचा थाट मांडून बसतात, व मोठ्यामोठ्या युरोपियन राष्ट्रांच्या ऐटीनें परदेशी मालावरील जकात सक्तीनें वसूल करितात, हें पाहिलें म्हणजे कोणाला कौतुक वाटणार नाहीं ! तसेंच या संस्थानचे शेंपन्नास शिपाई, ज्यांचें नेहमीचें काम जुगारी टेबलांच्या आसपास घिरट्या घालून एखादेवेळीं एखाद्या दारुड्या बदफैली भामट्याला अटक करण्याचें असावयाचें, तेच एखादवेळीं लष्करी थाटाचा पोषाख करून, एखाद्या प्रतिष्ठित पाहुण्याचा 'गार्ड ऑफ ऑनर' म्हणून सत्कार करितांना, व लगेच 'लष्करी फौज' म्हणून परेडच्या मैदानावर सलामी देतांना घेतांना पाहून किती मौज वाटेल ! पण हा सर्व अधिकारस्वातंत्र्याचा गुण होय. दुसरें उदाहरण इंग्लंडजवळील 'आइल ऑफ मॅन' या बेटाचें. या संस्थानचें ऐन उत्पन्न सुमारें दोनतीन लक्ष पौंड इतकेंच आहे. यांत एकच मोटें शहर सुमारें वीस हजार लोकसंख्येचें व हजार दोन हजार लोकसंख्येची दुसरीं एकदोन आहेत. यांत त्रेचाळीस प्राथमिक शाळा, दोन हायस्कुलें व पोलिससंख्या पासष्ट जवान असें असतां, एरवींचें ऐश्वर्य इतकें कीं, एक गव्हर्नर, एक अटर्नी जनरल, एक मुख्य कायदेकौन्सिल, एक दुय्यम कायदेकौन्सिल, व स्त्रीपुरुष मिळून सुमारें अडतीस हजार मतदार आहेत. पण ब्रिटिश साम्राज्यांत युद्ध

इंग्लंडच्या खालोखाल याचा नंबर लागतो. कारण या बेटाचे कायदे सर्वस्वीं या बेटांतील कायदेमंडळाकडूनच केले जातात.

### ( ३७ ) जार्सी बेटाचें उदाहरण

अशाच रीतीनें ब्रिटिश साम्राज्यांतील दुसऱ्या एका बेटाला, म्हणजे जार्सी या छोटेखानी बेटाला, स्वातंत्र्य किती आहे याचा एक गमतीदार उल्लेख लॉर्ड हॉलडेन यांच्या चरित्रांत आम्हांला नुकताच वाचावयास मिळाला. या बेटाचें क्षेत्रफळ अवघें अठ्ठावीस हजार एकर, व लोकसंख्या पन्नास हजारांच्या आंत आहे. त्याचें उत्पन्न अडीच लक्ष पौंडांच्या आंत भरेल. तथापि कायद्याच्या दृष्टीनें हें राज्य स्वतंत्र आहे तें असें कीं, ब्रिटिश पार्लमेंटचे कायदे या संस्थानला लागूं होऊं शकत नाहींत. त्याविषयीं लॉर्ड हॉलडेन यानें आपल्या बॅरिस्टरीच्या अनुभवांतील एक अनुभव म्हणून खालील हकीकत दिली आहे:—

" जार्सी बेटांत कांहीं दिवस राहत असलेल्या एका फ्रेंच स्त्रीला, बेटांतील कायद्याविरुद्ध घडलेल्या कांहीं एका गुन्ह्याबद्दल, मुख्य न्यायाधिशानें फांशीची शिक्षा दिली. हें ऐकून फ्रान्सच्या सरकारानें इंग्लंडला लिहिलें कीं " या बाईचा गुन्हा पोलिसांनीं खटला भरून फार तर दंड होण्याइतका हलका आहे. तेव्हां हा ' न्यायापवाद ' तुम्ही कसेंहि करून होऊं न द्यावा " ! तेव्हां इंग्लंडच्या परराष्ट्रीय मंत्र्यानें जार्सी बेटच्या अधिकाऱ्यांना तसें लिहिलें. पण ते दाद देईनात. तेव्हां सगळ्यांत मोठा हुकूम म्हणून, खुद्द राजाज्ञा काढवून ब्रिटिश प्रधानमंडळानें त्या फ्रेंच स्त्रीला परस्पर माफी जाहीर केली ! पण जार्सी बेटाच्या कायद्याप्रमाणें, इंग्लंडच्या राजाचाहि हुकूम कां होईना पण तो जार्सी राज्याच्या पार्लमेंटच्या दप्तरीं मंजूर व नमूद झाल्याशिवाय त्याचा अंमल होऊं शकत नाहीं. आणि योग तर असा आला कीं, या पार्लमेंटची एक बैठक पूर्वींच खलास झालेली असून दुसऱ्या बैठकीची तारीख या बाईच्या फांशीच्या शिक्षेच्या अंमलबजावणी तारखेच्या नंतर ठरली होती. तेव्हां कायदेशीर असा कांहीं इलाज चालत नाहीं असें पाहून, शेवटीं इंग्लंडच्या प्रधानमंडळानें राजरोसपणें आडमार्ग स्वीकारला ! तो असा कीं ब्रिटिश आरमारांतील एक छोटें लढाऊ जहाज जार्सी बेटांकडे पाठविण्यांत आलें; फांशीच्या शिक्षेची बाई ज्या तुरुंगांत होती तो समुद्रकांठीं असल्यामुळें लढाऊ जहाजांतील सशस्त्र खलाशी किनाऱ्यावर उतरले; बेधडक तुरुंगांत शिरले; त्यांनीं त्या बाईला उचलून जहा-

जावर आणलें; आणि अशा रीतीनें तिला जार्सी सरकारच्या हद्दींतून पळवून लावल्यामुळें बेटाच्या अधिकाऱ्यांना अधिक कांहीं करितां आलें नाहीं! या भानगडीमुळें इंग्लंडचे न्यायाधिकारी व जार्सीचे न्यायाधिकारी यांचें मोठेंच रण जुंपलें. या मुद्याच्या हजारों कागदपत्रांचीं अनेक जाड फायलें झालीं. मुख्य प्रधान लॉर्ड रोजबरी यांच्या पुढें हाऊस ऑफ लॉर्ड्समध्यें मुकद्मा चालला.

जार्सी बेटातर्फे वकीलपत्र घेणाऱ्या लॉर्ड हॉलडेन याला मुकद्म्याची प्रास्ताविक सुनावणी करण्यासच दोन दिवस लागले! आणि शेवटीं निकाल इंग्लंडविरुद्ध झाला! बिचारी फ्रेंच बाई मृत्यूच्या शिक्षेंतून बचावली. पण तिचा जीव घेणें न घेणें हा या वादांत मुख्य मुद्दा नसल्यानें, 'फॅक्टम व्हॅलेट' म्हणजे 'वस्तुसिद्धि' (झालें गेलें सशास्त्र ठरलें) या तत्त्वाचा आधार घेऊन हें शिक्षेचें प्रकरण पुढें कोणीं धसाला लावलें नाहीं!

## (३८) सांगली दरबार व गणपति संस्थान!

असेंच एक गमतीचें उदाहरण केवळ तत्त्वदृष्ट्या आमच्या इकडीलहि सांगतां येण्यासारखें आहे. तें एका दाक्षिणी संस्थानिकाचें आहे. सांगली संस्थानचे अधिपति पटवर्धन हे गणेशभक्त असून, त्यांनीं आपल्या राज्यांतून उत्पन्न तोडून देऊन संस्थानच्या पोटांतलेंच पण स्वतंत्र संस्थान म्हणून 'गणपति संस्थान' या नांवाचें राज्य उत्पन्न केलें. या नव्या संस्थानांत फौजदारी असा अधिकारी नाहीं, पण गणपति संस्थान हें मुलकी व जमाखर्चाच्या दृष्टीनें पूर्ण स्वतंत्र आहे. तो अधिकार सांगली संस्थानच्या दरबारकारभाऱ्याच्या हातीं असतो; पण स्वतः या संस्थानिकांनाच वहिवाटदार म्हणून कांहीं ठराविक पगार आहे. जुन्या अमदानींत एकदां तात्यासाहेब सांगलीकर यांनीं आपल्या प्रेमांतले दरबार कारभारी आण्णासाहेब पटवर्धन यांना गणपति संस्थानचे मुख्याधिकारी नेमलें. पुढें गणपति संस्थानचे वहिवाटदार म्हणून आपणांला जो पगार मिळत असे तो वाढविला जावा अशी इच्छा संस्थानिक तात्यासाहेब यांना झाली! ही इच्छा अर्थात् दरिद्रीच होती! पण ती सफळ होण्याकरितां संस्थानिकाला (गणपति संस्थानचा वहिवाटदार म्हणून) दरबार–कारभाऱ्याकडे अर्ज करावा लागला! पण त्यानें तो नामंजूर केला!! आतां तात्यासाहेब संस्थानिक व आण्णासाहेब दरबार-कारभारी हे प्रेमानें गळ्यांत गळा घालणारे, व श्रीमंतांनीं आण्णाला "आण्णा मला पगार वाढीव कीं रे!"

असें म्हणण्याच्या परस्पर संबंधांतलेच होते ही गोष्ट वेगळी. पण या गमतीदार उदाहरणानें मोनॅको किंवा जार्सी या संस्थानांच्या म्हणजे राज्यांच्या उदाहरणाप्रमाणेंच, एक मोठेंच तत्त्व प्रस्थापित होतें. तें असें कीं कोणत्याहि राज्यसंस्थेचा मोठेपणा तिला अंतिम अधिकाराचें स्वातंत्र्य किती आहे यावरून ठरवावयाचा व ओळखावयाचा असतो.

## ( ३९ ) आमचीं देशी संस्थानें

हिंदुस्थानचे बादशहा व हिंदुस्थानांतील देशी संस्थानें यांचीं परस्पर नातींहि या दृष्टीनेंच बोधप्रद आहेत. फांशीच्या शिक्षेपर्यंत ज्या संस्थानिकांना स्वतंत्र अधिकारानें गुन्हेगारांना संस्थानच्या न्यायकोर्टात शिक्षा देतां येते असे संस्थानिक हिंदुस्थानांत आज पुष्कळ आहेत. आणि जार्सी किंवा आइल ऑफ मॅन यांप्रमाणें तत्त्वतः आमच्या या देशी संस्थानांना खुद्द ब्रिटिश पार्लमेंटचेहि कायदे बंधनकारक होत नाहींत ! फांशी देण्याच्या अधिकाराप्रमाणें संस्थानाच्या प्रजेकरितां कायदे करण्याचा स्वतंत्र अधिकार कांहीं छोट्या संस्थानिकांनाहि आहे; व तो इतका कीं त्यांच्या राज्यांत कायदेकौन्सिलें नसल्यास, पार्लमेंटचे कायदे खुद्द इंग्लंडच्या राजावर जितके बंधनकारक आहेत तितकेहि ते या संस्थानिकांवर नाहींत ! म्हणजे ते आपल्या मर्जीनें तोंडानें बोलतील तो व हातानें लिहितील तो कायदा होऊं शकतो. अशा संस्थानिकांनीं, आपलीं राज्यें स्वतंत्र आहेत व आपण त्या स्वतंत्र राज्यांचे अनियंत्रित राजे आहों, असें म्हटल्यास कायद्याच्या दृष्टीनें त्याला हरकत कोणती ? हे संस्थानिक व इंग्लंडचे राजे यांचे मित्रभावाचे करार व मित्रभावाचे तह झाले असले तरी, इतर स्वतंत्र राष्ट्रांतील परस्पर तहाइतकेंच त्यांना त्यांचें बंधन आहे. म्हणजे " आम्ही हे तह यापुढें मानणार नाहीं असें एकानें दुसऱ्यास म्हटलें " तरी तत्त्वतः चालण्यासारखें असतें.

## ( ४० ) श्वा युवा मघवा !

आतां हीं संस्थानें झालीं काय, मोनॅको झालें काय, जार्सी झालें काय, हीं मुठींत मावतील एवढीं राज्यें. परराष्ट्रांनीं किंवा इंग्लंडनें चिरडून टाकावयाचें मनांत आणल्यास त्यांना काय उशीर ? येऊन जाऊन राष्ट्रसंघासारख्या त्रयस्थ न्यायाधीशाकडे रडगाणें गावयाचें. पण त्याचा तरी उपयोग कितपत होऊं शकतो हें हल्लींच्या चीन व जपान यांच्या प्रकारणावरून दिसलेंच आहे.

हीं लहान राज्यें जगतातच कशीं ? असा कोणीं प्रश्न केल्यास त्याचें उत्तर खरें असें आहे कीं, तीं बुडविण्यापासून शेजारच्या मोठ्या राष्ट्रांचा म्हणण्यासारखा कांहीं प्रत्यक्ष फायदा नाहीं म्हणून ! किंवा मोठ्यामोठ्या राष्ट्रांच्या स्पर्धेत हीं सांपडल्यानें आयताच परस्पर त्यांचा बचाव होतो. किंवा हिंदुस्थानांतल्या संस्थानांप्रमाणें, तीं खालसा झाल्यापेक्षां स्वतंत्र राहूनच अधिराजाला अधिक उपयोगी पडतात. पण यांतलें कोणतेंहि उत्तर खरें म्हटलें तरी तीं राज्यें स्वतंत्र आहेत म्हणून जगतात असें म्हणण्यापेक्षां, अद्यापि नाश पावलीं नाहींत म्हणून स्वतंत्र आहेत व जोंपर्यंत तीं स्वतंत्र आहेत तोंपर्यंत "श्वानं युवानं मघवानमाह" या पाणिनीच्या सूत्राप्रमाणें कां होईना, तीं राष्ट्रमालिकेंत इतर राष्ट्रांच्या बरोबरीनें बसूं पाहतात व बसूं शकतात हें कांहीं खोटें नाहीं. तात्पर्य, तात्त्विकदृष्ट्या पाहिलें तर एकाद्या राज्यसंस्थेला राज्य म्हणावयाला किंवा त्यांतील सर्वाधिकाऱ्याला राजा म्हणावयाला स्वतंत्र व संपूर्ण अधिकाराशिवाय दुसरें गमकच नाहीं. इतर गोष्टी गौण होत त्या निर्णायक नव्हत.

## (४१) मूलभूत मानवी कुटुंब

उत्क्रांतिवादाचें सर्वच तत्त्वज्ञान खरें नसेल, पण मूळचा सृष्ट जीव हा अणुपरिमाण असून, त्यांतूनच पुढें सर्व विविध जीवसृष्टी परिणत होत गेली ही उपपत्ति बरीचशी खरी वाटते. त्याचप्रमाणें राज्यसंस्था ही मूळ दोन तीन साडे तीन मनुष्यप्राण्यांच्या कुटुंबापासून निघून, आजच्या जगड्व्याळ अशा साम्राज्यापर्यंत क्रमानें परिणत होत आली आहे हीच उपपत्ति इतिहासावरून सिद्ध होते. पण राज्यसंस्थेचे जे अनिवार्य गुणधर्म तेच बीजरूपानें व वृक्षारूपानें अवतरतात. राज्याला कमीत कमी जें लागतें तेंच बाप आई व मुलें मिळून बनणाऱ्या मानवी कुटुंबाला लागतें. साडेतीन माणसांच्या कुटुंबाला निदान सात पावलांनीं आक्रमणारी इतकी भूमि लागतेच. मग ती डोंगराच्या कपारींत सांपडो, किंवा छपरी बंदिस्त बांधिव घरांत सांपडो. या अणुपरिमाण राज्यांतील प्रजा म्हणजे तींच साडेतीन माणसें; किंवा त्यांतला बाप हा राजा म्हणून वगळलाच, तर अडीच माणसें. या तीन साडेतीन माणसांचे हितसंबंध एकजीव झालेले असतात. तीं वेळ पडल्यास सर्व मिळून परक्याशीं भांडतात, झगडतात. या तीन माणसांपैकीं बाप हा प्रबळ म्हणून सत्ताधारी असतो. तो हुकूम करितो ते इतरांना आज्ञाधारकपणें मानावे लागतात; व कोणी न

मानिले तर तो आपल्या अधिकारानें त्यांना शिक्षा सांगून अमलांतहि आणूं शकतो. जें पिंडीं तेंच ब्रह्मांडीं.

### ( ४२ ) कुटुंबाचीच नगरसंघामध्यें परिणति

पुढें कुटुंबाची वाढ होऊन त्याच्याजागीं एकजीव असें कुळ किंवा घराणें आलें. पूर्वींचा जनक बाप म्हणून जो राजा होता तोच आतां कुलपति म्हणून राजा झाला. कुटुंबावर त्याची जी सत्ता तीच या कुळावर किंवा घराण्यावर चालूं लागली. पशूंचा जसा कळप असतो व त्या कळपाचा एक म्होरक्या असतो, तसेंच माणसाच्या घराण्याचें. या घराण्याचें पुढें मोठें घराणें म्हणजे गोत्र बनतें. पण हळू हळू या घराण्याचा इतर घराण्यांशीं हितसंबंध व स्नेहसंबंध जडतो. त्यामुळें रक्तसंबंधाहून वेगळा म्हणजे स्थलसंबंध हाहि सहजीवित्वाचा आधार होतो. गरजा वाढतात, व त्या एकाच कुळांतील लोकांच्या बुद्धीनें व प्रयत्नानें पुऱ्या पडत नाहींत. इतर अनेकांच्या बुद्धीची व श्रमाची सहकारिता हवीशी वाटते व ती मिळूं शकते. देवाण घेवाण सुरू होतें. वस्तुविनिमय वस्तुव्यापार वाढतो. शिकारी पेशानंतर स्थायिक शेतकरीपेशा आला म्हणजे जी सहकारिता दूरदूर राहून मिळते व घ्यावी लागते; तीच उद्योगधंदे कलाकौशल्य वाढलें म्हणजे एकाच चतुःसीमेंतील नगरांत राहून मिळूं लागते. आणि कुटुंबांची परिणति अशा रीतीनें नागरिक समूहांत झाली म्हणजे मग त्या व्यापाच्या मानानें संघटना व व्यवस्था हीं ओघानेंच प्राप्त होतात.

### ( ४३ ) कुटुंब-राज्यांतला राजा

ज्या प्राचीन काळापासून इतिहास म्हणून उपलब्ध आहे त्या काळीं मानवी सहवासाची सहकारितेची परिणती ग्रामसंस्थेपर्यंत आलेली होती. आणि अशा काळांतहि उदाहरणार्थ रोमच्या राज्यांत, जर बापाची सत्ता मुलांवर व बायकांवर अमर्याद होती असें आढळतें तर त्याहून प्राचीनकाळीं, म्हणजे इतिहास–पूर्वकाळीं कुलपति किंवा कुटुंबांतला बाप यालाहि ती अनियंत्रित अबाधित सत्ता असावी असें अनुमान सहजच करितां येते. दरवेशी लोक माकडावानराचें कुटुंब बरोबर फिरवून त्याचे खेळ करीत असतात. त्यांतला बाप माकडीवानरीशीं व पिलाशीं कसा वागतो हें आपण पाहतोंच. त्याचा वचक इतरांना फार असतो. त्यानें इतरांवर रागवावयाचें; त्यांनीं त्याच्यावर रागवावयाचें नाहीं. वेळीं हवा तर इतरांच्या तोंडांत देण्याचा

अधिकार त्याला ! या वानरकुटुंबांतल्या धन्याला ' देवजी धसाड्या ' म्हणतात. आणि म्हटलें तर वाईट दिसेल, पण खरोखर राजा, बादशहा, झार, सुलतान, अध्यक्ष कोणीहि घेतला तरी तो या ' देवजी धसाड्याचा ' च लहानमोठा अवतार होय. माकडवानरांच्या खेळांत प्रजेचें बंड व राज्यक्रांति झालेली दिसत नाहीं. पण मानवी कुटुंबांत ती केव्हां केव्हां होत असते, व राज्यांत तर ती झालेली आपण नित्य पाहतोंच.

## ( ४४ ) ग्रामसंस्था हें प्राथमिक राज्य

उसाचा रस काहिलींत किंवा साखर करण्याचा भांड्यांत घालून खूप तापविला, म्हणजे मग त्या रसांतील पाण्याचा अंश कमी होत जाऊन गुळासाखरेचे कण बनूं लागतात. आणि ते मग इतर कणांशीं मिळून त्यांचा संघटित दाणेदार रवा बनलेला डोळ्याला दिसूं लागतो. त्याप्रमाणें इतिहासांस प्रथम राज्यसंस्थेचें जें स्वरूप दृग्गोचर होतें तें ग्रामसंस्थांतून. या ग्रामसंस्था आपल्यापुरत्या सर्वाधिकारपूर्ण असून त्यांत, प्राथमिक राज्यापासून तों अगदीं आजच्या सुधारलेल्या राज्यसंस्थांपर्यंत मुख्य लक्षणें दिसून येतात, त्यांतलीं कोणतींहि कमी नव्हतीं. गांवच्या सुधराई सफाईपासून तों परक्या ग्रामसमाजाशीं किंवा ग्रामसंघाशीं युद्धतह करण्यापर्यंतचा कारभार ग्रामसंस्था आपला आपण करीत. राज्यसंस्थेच्या उपपत्ति अनेक तत्त्ववेत्त्यांनीं अनेक प्रकारच्या बसाविल्या आहेत. कोणी म्हणतो राज्य हें निवळ जुलमी सत्तेवर अधिष्ठित असतें. कोणी म्हणतो कौटुंबिक प्रेमावर असतें. कोणी म्हणतो परस्परोपयोगित्वावर असतें. कोणी म्हणतो परस्पर करारावर असतें. कोणी म्हणतो आर्थिक गरजेवर असतें. कोणी म्हणतो स्वार्थसामान्यावर असतें. कोणी म्हणतो आध्यात्मिक सहानुभावावर असतें पण यापैकीं प्रत्येक उपपत्तीला आधारभूत अशी एक ना एक ग्रामसंस्था इतिहास दाखवूं शकेल.

## ( ४५ ) ग्रामसंघ हें मुख्य अनुभवक्षेत्र

गांव आणि राव यांचा मेळ नुसत्या यमकानें घातलेला नाहीं तर प्रत्यक्ष अनुभवानें. कारण संघटित ग्रामसंस्थेचें बळ राजालाहि भारी होऊं शकतें. म्हणूनच म्हण पडली कीं, " गांव करील तें राव करणार नाहीं. " ग्रामसंस्थांतून प्रबळदुर्बळांचे नित्य संबंध, विभूतिपूजा, चढाईबढाईचें यशअपयश, अधिकारविभागणीचें तत्त्व, समतोलपणांची साम्यावस्था, उत्कट स्वार्थ, उत्कट परोपकार-

भावना, गुणदुर्गुणांचीं द्वंद्वें—तात्पर्य, त्रिगुणात्मक मनुष्यस्वभावाचे सर्व खेळ सर्व लीला पहावयास सांपडत. दोन हजार वर्षांपूर्वीचा काळ घेतला तर युरोपांतील ग्रीस देशांत व आशिया खंडांतील हिंदुस्थानांत ग्रामसंस्थाच सर्वत्र आढळून येत. याचें कारण दळणवळण जवळच्या जवळ संपत असें. सामाजिक गरजा थोड्या असत. व्यक्तिविषयक ऐषआरामाच्या ख्यालीखुशालीच्या कल्पना मोजक्या मर्यादित विषयापुरत्या असत. ग्रामांतराचा व्यापार बेताचा असे. पण अशाहि स्थितींत खरोखर चवचाल काळाइतकेंच मनुष्याला सुख मिळण्यासारखें असल्यामुळें तो ग्रामसंस्थेच्या राज्यकारभारावर संतुष्ट असून तिचा अभिमान आजच्या राष्ट्रप्रेमी देशभक्ताइतकाच मानी व त्याकरितां स्वार्थत्याग करण्यासहि तयार असे.

## ( ४६ ) सर्व उपपत्ति तेथें तपासून घ्याव्या

वर सांगितल्याप्रमाणें राज्यसंस्थेच्या उत्पत्तिविषयक प्रत्येक उपपत्तीचें उदाहरण प्राचीन ग्रामसंस्थेंत सांपडण्यासारखें आहे. इतकेंच काय पण हीं निरनिराळीं उपपत्तिमूलक तत्त्वें एकाच ग्रामसंस्थेंत बहुधा एकाच वेळीं आढळण्यासारखीं होतीं. कोणतीहि ग्रामसंस्था त्यांतल्या एकाद्या पण एकट्या एक तत्त्वावर पूर्वापार रचलेली किंवा कारभार करणारी अशी आढळली नसती. ग्रामसंस्थेचा पुढारी पाटील जितकी सत्ता चालवी तितकेंच तो गांवच्या लोकांचें ऐकेहि. स्वार्थाला जपणाऱ्या व्यक्तींप्रमाणें परार्थाला झटणाऱ्याहि व्यक्ति ग्रामसंस्थेंत आढळत. एकानें दुसऱ्याचा हक्क संभाळण्याचें व सर्वांनीं मिळून सर्वांशीं जणूं कांहीं एखादा करार असल्याप्रमाणें वागण्याचें ठरविल्याशिवाय ग्रामसंस्था टिकणेंच शक्य नव्हतें. कायद्यासंबंधानें ग्रामसंस्थांतील समाज तर आजच्यापेक्षां अधिक सुरक्षित व सुप्रतिष्ठित असे. कारण या संस्था स्वतःचे कायदे करण्यापेक्षां परंपरागत आलेले कायदे म्हणजे चालीरीती, दाखले, निवाडे मानण्यावरच अधिक भिस्त ठेवीत. यामुळें आजच्या राज्यसंस्थाप्रमाणें तेव्हां बेसुमार नव्या कायद्याचें पीक पिकत नसे, व रद्दी कायद्यांच्या वाळलेल्या कडब्याचे पाल्यापाचोळ्याचे ढीग सांचत नसत. मात्र सनातनत्वाच्या वृक्षावर नवी पालवी केव्हां फुटते व जुनीं पानें केव्हां गळतात हें जवळ जवळ लक्षांतहि येण्यासारखें नसतें.

## ( ४७ ) राज्य म्हणजे अनेक इच्छाशक्तींचा मेळ

कुटुंबापासून साम्राज्यापर्यंत कोणतीहि राज्यसंस्था घेतली तरी तींत तत्त्वतः एकाच इच्छाशक्तीनें सर्व कारभार चालतो हें जरी खरें, तरी प्रत्यक्ष व्यवहारांत अनेक इच्छाशक्तींचा मिश्र खेळ एकसारखा सुरू असतो हेंहि कांहीं खोटें नाहीं. कुटुंबांत बाप हा सत्ताधीश असला म्हणून नेहमीं त्याचीच इच्छा प्रभावी होईल असें नाहीं. त्याची स्त्री व मुलें यांनाहि स्वतःची इच्छाशक्ति असतेच, व आपणांस अनुकूल अशा साधनांनीं ती इच्छाशक्ति प्रभावी करण्याचा तींहि आपापल्या परीनें प्रयत्न करीत असतात. एखाद्या कुटुंबांत बाप दुबळा असून आई हीच तेजस्वी प्रबळ असूं शकते. अशा स्थितींत तीच नवऱ्याला बाजूला बसवून आपल्या मनचें करील. बरें, स्त्री जबरदस्त नसून गरीब असली तर कदाचित् आपल्या गुणांनींच ती पतिप्रेम साध्य करून पतीला वश करूं शकेल. आणि मुलें हीं तर काय आई व बाप या दोघांनाहि प्रिय. त्यांच्याखातर तीं दोघें स्वार्थत्यागहि करितात. हट्ट करून आपलें मनोगत साधणें हा मुलांचा हक्कच आहे. त्यांतून मुलें सद्गुणी व तेजस्वी निघालीं तर बाप त्यांच्या मताला बहुमान देतो, व आपल्या अधिकारांत त्यांना अंशभागी करितो; आणि ही गोष्ट आधुनिक काळाप्रमाणें प्राचीन काळींहि घडत असली पाहिजे. आज आईबाप मुलांना विकूं शकत नाहींत, किंवा देवाला बळी देऊं शकत नाहींत. जुन्या काळीं तो हक्क कायदेशीर रीतीनें त्यांना होता. म्हणून कांहीं तेव्हांहि अपत्यवत्सलता जगांत नव्हती असें नाहीं.

## ( ४८ ) इच्छाशक्ती परस्परांना मान देतात

जी गोष्ट कुटुंबाला लागू तीच समजांतील इतर घटकांनाहि. म्हणजे आपलेपणा परकेपणा या भावना तीक्ष्ण असतांहि जुन्याकाळीं परस्परोपकारित्वाची जाणीव मुळींच नव्हती, किंवा कृतज्ञतेनें, भूतदयेनें एक इच्छाशक्ति दुसऱ्या इच्छाशक्तीला कधींच मान देत नव्हती असें नाहीं. राजा म्हटला म्हणजे तो आपला नेहमींच ताठलेला, रागावलेला, हातांत दंड सरसावलेला असा असे ही कल्पना चुकीची आहे. त्यालाहि प्रजेचें प्रेम व भीति ही असतेच. रोमच्या इतिहासांत पॅट्रिशिअन्स म्हणजे श्रेष्ठवर्गीय व प्लीबिअन्स म्हणजे हीनवर्गीय लोक होते. प्रथम प्रथम त्यांच्यामध्यें फार भांडणें व वेळीं युद्धें होत. आज सनातनी हिंदु व अस्पृश्यवर्गांतहि नाहीं का अशींच भांडणें सुरू ! पण पुढें पुढें हे कलह मिटले. हीनवर्णीयांची

छाप उच्चवर्णीयांवर पडूं लागली. दोघेहि वर्ग देशाच्या सेवेला उपयोगी पडतात हेंहि दिसून येऊं लागलें. तेव्हां ( आज सनातनी स्पृश्यांपैकींच कांहीं जसे अस्पृश्यांचे पुरस्कर्ते झाले आहेत त्याप्रमाणें ) अधिकारसंपन्न पॅट्रिशिअन असेहि कांहीं पुढारी प्लीबियन लोकांकरितां स्वकीयांशीं भांडूं लागले. यामुळें राष्ट्रांत एकजीवता उत्पन्न होऊन सत्तेचा तोल संभाळला जाऊं लागला.

## ( ४९ ) विभूतिपूजा राज्यांत आहेच

राज्यसंस्थेंत मनुष्याच्या विभूतिपूजाप्रियत्वाचा प्रत्यय नेहमीं येतो. घटना कशीहि असो, कोणाहि व्यक्तींत किंवा वर्गात विभूतिमत्व, श्रीमत्त्व किंवा ऊर्जितत्व, दिसून आल्यास तें फुकट जात नसतें. आपला हिंदु धर्म वर्णव्यवस्थेचा पुरस्कर्ता व वर्णांमध्यें उच्च नीच भेद मानणारा असतांहि, अनेक हीनवर्णीय लोक उच्चवर्णीय ब्राह्मणांच्या आदराला व पूजेला पात्र झाले याचें कारण, ते साधुत्वाच्या कोटीला जाऊन पोंचले होते. येथें विभूतिपूजेचें तत्त्वच सिद्ध होतें. त्याचप्रमाणें राज्यसंस्थेंतहि केव्हां प्रधान, केव्हां सेनापति, केव्हां एखादा सैनिक, केव्हां एखादा व्यापारी, केव्हां एखादा धर्मोपदेशक, किंवा साधा प्रजाजनहि आपल्या गुणांनीं पुढारीपण पावून, राज्यक्रांतीच नसली तरी सत्तेचें संक्रमण एका वर्गातून दुसऱ्या वर्गात करितो. अशा वेळीं राज्यघटना नुसत्याच टणक असल्या तर मोडतात व लवचिक असल्या तर तितक्यापुरती उशी खातात किंवा दबतात, व कांहीं वेळानें पुन्हां पूर्ववत् शांततेची घडी बसवून देतात. तात्पर्य, स्वार्थाची स्वाभाविक चढाओढ असतेच; पण तिच्या जोडीला विभूतिगुणांचा उत्कर्ष व मनुष्याच्या उच्च भावना ह्याहि राज्यसंस्थेच्या परिणतीला उपयोगी पडतात.

## ( ५० ) मुख्य सत्ताधारी हा राज्याचा आत्मा

असो. अशा रीतीनें राज्यसत्तेची वांटणी निरनिराळ्या वर्गांमध्यें कशीहि होवो किंवा न होवो, पण राज्यसंस्था म्हटली म्हणजे तत्त्वतः कोणी तरी एक मुख्य सत्ताधारी म्हणून आज्ञा करणारा असावा लागतो; आणि आपल्या आज्ञा लोकांनीं पाळाव्या अशाविषयीं त्यांजवर सक्ती करण्याची किंवा कोणी आज्ञा मोडील तर त्याला शिक्षा करण्याची पात्रता त्याच्यामध्यें असावी लागते. त्याशिवाय ती राज्यसंस्था या नांवाला पात्र होऊं शकत नाहीं. राज्यसंस्थेचा म्हणून जो मुलूख असेल त्या मुलखाच्या सर्व भागांतील लोकांवर ती आज्ञा सारखीच प्रभावी व्हावी

लागते. मग ती आज्ञा त्यांना आवडो वा न आवडो; किंवा न्यायाची असो वा अन्यायाची असो. ही आज्ञा म्हणजे दरएक वेळीं वेगवेगळा काढण्याचा हुकूम असा अर्थ नाहीं, तर राज्यसंस्थाविषयक सर्वच कायदेकानूंचा त्यांत समावेश होतो. या आज्ञापालनाला अपवाद करून ठेवले असतील, तर ते स्वतः त्या कायद्यांनींच करून ठेवले असले पाहिजेत. मोबदला ठरविला असला तरी तो कायद्यानेंच ठरविला असला पाहिजे. तो अपवाद किंवा तो मोबदला व्यक्तिमात्र-प्रजाजनाला आपल्यापुरता किंवा आयत्या वेळीं निर्माण करितां येत नाहीं. राजाच्या या अंतिम अधिकाराचा व व्यक्तिस्वातंत्र्याचा मेळ बसूं शकतो. पण ईश्वरी संकेत आणि जीवात्म्याचें कर्मस्वातंत्र्य यांचा मेळ तत्त्वज्ञानी घालूं शकतात त्याच तत्त्वावर या मुद्याचें विवेचन पुढें सविस्तर करण्यांत येईल.

## ( ५१ ) जुन्याकाळच्या राजाचें धर्मगुरुत्व

सुधारणायुगाचा प्रारंभ केव्हां झाला हें नक्की ठरवितांच येत नाहीं. तथापि या सुधारणायुगापूर्वीं राज्यसंस्था या कुटुंब कुलगोत्र अशा मर्यादित स्वरूपांत होत्या. त्या स्वरूपांतील राज्यसंस्थांमध्यें बाप किंवा कुलपति हा तरी राजा होता, किंवा धर्मगुरु हा राजा होता. धर्माच्या कारभाराला त्या काळीं हल्लींच्या राज्याच्या कारभाराइतकें महत्त्व होतें. आधिदैविक संस्कृतीच्या काळांत धर्ममंत्र, धर्मतंत्र, देवदेवस्की, यज्ञयाग, बलिदान, कौल लावून देवाचे हुकूम घेऊन नंतर कार्योपक्रम करणें यापलीकडे त्या लहान समाजांचा कारभारच फारसा जात नसे. इंग्रजींत अशा संस्थेला Theocratic State म्हणतात. आधिदैविक संस्कृति अगदीं पूर्वींच्या स्वरूपांत नाहींशी झाल्याला पुष्कळ दिवस झाले हें खरें. तथापि ख्रिस्ती धर्मगुरु जो पोप त्याच्या अधिकारांत व बादशहा व सुलतान यांच्या अधिकारांत एकवेळीं फारसा फरक नव्हता हें अगदीं आधुनिक इतिहास सांगतो. पोपमहाराजांची अनुग्रहाची लहर लागली असतां, ते आपल्या राजशिष्यांत सर्व जगाच्या मुलखाची वांटणी करून देत; व निग्रह किंवा शिक्षा करण्याची लहर लागली असतां ते ऐहिकच काय पण पारलौकिकहि शिक्षा देत. या शिक्षेंतून मुक्त होण्याला द्रव्यदान पुरें होत असे ही गोष्ट निराळी! पण दृष्टादृष्ट फलांची सांगड घालण्याची ही सत्ता राजसत्तेहूनहि मोठीच म्हटली पाहिजे नव्हे काय ?

## ( ५२ ) राजाला सद्धर्मपालक म्हणण्याची रीत

पुढें पुढें पोपमहाराजांनींहि वाईट दिवस आले. पृथ्वीवरचे राजे पोपांसारखेच

उन्मत्त होऊन पोपमहाराजांच्या आज्ञा जुमानीतनासे झाले. या राजांनीं धर्माधिकार पोपमहाराजांकडून काढून आपणाकडे घेतला. पण ते अदृष्ट फलांच्या भानगडींत मात्र पडेनातसे झाले ! पापी अपराध्याला स्वर्गाऐवजीं नरकांत पाठविण्याचा व तेथून सोडविण्याचा पराक्रम करण्याचा पोपचा बहाणा राजांनीं चालू ठेवला नाहीं. फक्त धर्मसंरक्षक ही पद्‌वी त्यांनीं आपल्या बिरुदावळींत सामिल करून घेतली. अजूनहि इंग्लंडच्या राजाला Defender of the Faith ही पद्‌वी आहे. इतकेंच नव्हे तर इंग्लंडच्या राज्यकारभारांत धर्माचें म्हणून एक खातें अद्यापि आहे. आणि त्यांतील धर्माधिकाऱ्यांच्या नेमणुका राजाच करतो. शिवाजीमहाराजांना गोब्राह्मणप्रतिपालक, सद्धर्मप्रतिपालक ही पद्‌वी याच अर्थानें होती. पण युरोपियन राष्ट्रांच्या पूर्वींच धर्म व राजकारण यांची फारकत आपल्या इकडे झाली होती. धर्मगुरु हा स्वतंत्र असून राजानेंहि त्याला मान लववायाची पण धर्मगुरूनें राजकारणांत कांहीं अधिकार सांगावयाचा नाहीं, किंवा ढवळाढवळ करावयाची नाहीं; अशी पद्धति आमच्याकडे कृत-त्रेतयुगां-पासूनच चालू आहे.

## ( ५३ ) आधुनिक राज्यांतून धर्माची हकालपट्टी

इस्लामी राज्य हें तर मूळ धर्माच्या पायावरच सर्वस्वीं रचलें गेलें. सातव्या शतकांत या धर्मभावनेनेंच अरबस्थानांतील टोळ्यांना एकजीव व बळकट केलें. तें इतकें कीं, या भावनेच्या स्फूर्तीवर त्यांनीं नवीं शहरें, नवीं राज्यें, नवी संस्कृति स्थापिली, व जुनीं साम्राज्येंहि मोडून टाकिलीं. ज्यू लोकांचें जें राज्य म्हणून स्थापलें गेलें, तें या धर्मभावनेच्या बळावरच. जर्मनींत धर्माधिकाऱ्यांच्या पाठबळावरच टिकाऊ अशा राज्यसंस्था प्रथम स्थापल्या गेल्या. क्लोव्हिसनें फ्रँकिश साम्राज्य याच बळावर स्थापलें, व तें एकदां मोडल्यावर पेपिन यानें त्याच बळावर त्याला पुन्हां जिवंत केलें. कालांतरानें ही स्थिति पालटली. लोकसमाज नास्तिक ( ! ) बनत चालला हा आक्षेप जरी खरा नाहीं, तरी धर्मगुरूंवरील श्रद्धा कमी होत चालली हें खरें आहे. आणि हल्लीं तर, धर्मरक्षण करणें हें ईश्वर व मनुष्यसमाज यांचें काम आहे, त्यांत राज्याधिकाराची लुडबुड उपयोगी नाहीं, हा सिद्धांत लोकसमाजाला अधिकाधिक पटूं लागला आहे. धर्मभावनेनें ज्या समाजांत आपलीं मुळें सर्वांत अधिक खोल रुजविलीं होतीं अशा रशियन व तुर्की समाजांतहि धर्माचें बंड मोडून, राज्यांचें रक्षण आपण करितों

असें म्हणणाऱ्या धर्माला राज्यांकडून रक्षणहि मिळेनासें झालें आहे! खिलाफत व तुर्की सुलतान यांची फारकत झाली; व आज अंगोरा येथील तुर्की प्रजासत्ताक राज्यांत खुद्द धर्मावरच बहिष्कार पडला आहे.

## ( ५४ ) राज्याचें नवें गमक—सामुदायिक उपयुक्तता

अशा रीतीनें प्राचीनकाळीं प्रेम, ममता, गोत, कुळाचा ऋणानुबंध व धर्मभावना यांच्या आधारावर कुटुंब, गोत्र व धर्मगुरूचें राज्य या संस्था रचल्या गेल्या व टिकल्या. पण पुढें हे तीनहि हेतू मागें पडून सार्वजनिक उपयुक्तता हा हेतु राज्य-संस्थांच्या घडामोडींत प्रभावी होऊं लागला. त्याचें कारण राज्यसंस्थांची स्थलमर्यादा व त्यांत समाविष्ट होणाऱ्या लोकांची संख्या या गोष्टी वाढल्या. एका कुटुंबांतले, एका गोतांतले, किंवा एका धर्मपंथांतले अशा लोकांहून अन्य, म्हणजे विजातीय परधर्मीय परभाषा बोलणारे असेहि लोक राज्यसंस्थेच्या कक्षेंत येऊं लागले. याचें कारण केवळ आत्मरक्षणात्मक धोरण सुटून त्या ठिकाणीं आक्रमणाचें धोरण विजिगीषा हीं येऊं लागलीं.

## ( ५५ ) राज्याधिकाराचा तात्त्विक एकसूत्रीपणा

राज्यसंस्थेचें मुख्य लक्षण हें कीं, ' कायदेशिर ' अंतिम राजसत्ता म्हणजे शासनाधिकार कोणा तरी एका उपसंस्थेच्या किंवा एका व्यक्तीच्या हातीं असला पाहिजे. आणि उलट ती सत्ता त्या राज्यांत असणाऱ्या प्रत्येक व्यक्तीवर 'तत्त्वतः' तरी चालली पाहिजे. ' कायदेशिर ' किंवा ' तत्त्वतः ' हें म्हणण्याचें कारण असें कीं, कायदेशिर तात्त्विक राजसत्ता एकाच्या हातीं नांवाला असून वास्तविक सत्ता खरोखर जो राज्याधिकारी नाहीं अशाहि कोणा एकाद्याच्या हातीं असते. पण त्या गोष्टीनें मुख्य शास्त्र—सिद्धान्ताला बाध येत नाहीं. आपण एकाद्या राजाचें उदाहरण घेऊं. राजे लोक छांदिष्ट, लहरी, अहंमन्य, मनोमनस्वी असतात तसेच ते मूर्ख, परप्रत्ययज्ञेय असेहि असल्याचें अनुभवाला येतें. कित्येक राजे स्त्रैण म्हणून बायकोच्या आधीन, कित्येक श्रद्धाळू म्हणून धर्मगुरूंच्या आधीन, कित्येक बेअकली म्हणून कदाचित् सत्—सल्लागाराप्रमाणें बद्—सल्लागारांच्या आधीन, कित्येक ग्राम्यस्त्रीपुरुषसंगतीचे प्रेमी म्हणून आपल्या रखेल्या किंवा पैलवान किंवा खुषमस्कऱ्ये यांचे आधीन असतात. आणि त्या त्या ठिकाणीं राजा हा कळ-सूत्री बाहुलीप्रमाणें पडद्याबाहेर आज्ञा सोडीत असल्यासारखा दिसला तरी, पडद्या-

आड कळ फिरविणारा म्हणून खरा सत्ताधारी असा दुसराच कोणी असतो. पण दरवेशानें किंवा रिंग मास्तरानें गुप्त सूचना केली तरी खेळ केला अस्वलानें किंवा घोड्यानें असेंच म्हणावें लागतें !

## ( ५६ ) कळसूत्री बाहुलीचा प्रकार

आतां राजा ही एक व्यक्तीच मुख्य राजसत्ताधारी असली तर हा गुप्त 'सूत्रधार' हा पत्त्यांच्या डावांतला 'चोर' हुडकून काढणें सोपें असतें. पण ती सत्ता राज्याच्या कायदेशिर घटनेनेंच अनेक उपसंस्थांतून वांटून गेली असली म्हणजे मग तो हुडकून काढण्याचें काम सहजच कठीण होऊन बसतें. 'लंडन-टाइम्स' पत्र हें सर्व वर्तमानपत्रांत वजनदार, पण त्याचा खरा संपादक कोण हें बाहेर लोकांना कधींच माहीत होत नाहीं असें म्हणतात. त्याचप्रमाणें विलायतचें प्रधानमंडळ हें प्रसिद्ध असतें. पण प्रधानमंडळांतल्या व्यक्ति पुष्कळ वेळां अज्ञ अननुभवी असल्यामुळें त्यांना सल्ला देणारे कायमचे खातेवारीचे मुख्याधिकारी हेच मंडळाचें धोरण ठरवून देतात, म्हणून त्यांनाच 'वास्तविक' सत्ताधारी म्हणतां येईल. रॅम्से मॅक्डोनाल्ड हे गेल्या उलथापालथींत वाईटपणाचे धनी ठरून त्यांना मजूरपक्षानें शिव्य दिल्या. पण राष्ट्रावरील ज्या आर्थिक संकटामुळें मॅक्डोनाल्ड यांनीं स्वकीयांना नाखूष नाराज करून जुन्या प्रतिपक्षीयांच्या हातांत हात घालून निवडणुकीच्या महापुरांत उडी घेतली, त्या संकटाची कल्पना आणून देऊन त्याच्या परिहाराची तोड सुचविणाऱ्या तज्ज्ञ अर्थशास्त्रपंडित सल्लागारांपैकीं कित्येकांचीं नांवेंहि शेंकडा पंचाण्णव मतदारांना माहीत नसतील. तथापि कायदेशिर सत्ता चालविली प्रधानमंडळानें म्हणजे मुख्य प्रधानानेंच !

## ( ५७ ) पण तो फार वेळ टिकत नाहीं

इतिहासांत कळसूत्री राजांचीं अनेक उदाहरणें आहेत. अशा प्रकारांत असें दिसून येतें कीं, हा कळसूत्री खेळ फार दिवस चालला म्हणजे तो आपोआप उघडकीला येतो. आणि पत्त्यांच्या एका डावांत ज्याप्रमाणें चोर जरी लपून बसला तरी, शेवटीं कोणाच्या हातांत तो सांपडतो आणि बाकीचे सगळे खेळिये त्यावर तुटून पडतात, त्याप्रमाणें राज्यांतहि प्रजा या खेळानें प्रथम गोंधळून गेली तरी, पुढें मागें राज्यसत्तेची कळ फिरविणारी व्यक्ति उघडी पडते आणि मग सर्व लोकांचे हात तिच्यावर पडून तिचा खून तरी होतो किंवा तिच्यावर खटला होऊन ती तुरुं-

गांत पडते किंवा बडतर्फी हद्दपारी होऊन ती नामशेष होते व आपला कुटिल कारभार पुढें चालविण्याला असमर्थ होते. जगांत राजे लोकांच्या हस्तकांपैकीं शेंकडा नव्वद लोकांना हें प्रायश्चित्त भोगावें लागलें आहे. पहिल्या चार्लस राजाच्या प्रधानाचा इनसाफ होऊन त्याचा शिरच्छेद झाला. राणी मेरी स्टुअर्ट इचा प्यारा सारंगीवाला डेव्हिड रिझिओ याचा तिच्याच दिवाणखान्यांत खून झाला. संभाजीमहाराजांचा नाश होण्यापूर्वींच त्यांचा बदसल्लागार कलुषा कबजी हा प्रधानमंडळानें व प्रजेनें हुडकून हेरून काढला होता. आपल्या आधुनिक देशी संस्थानिकांच्या दरबारींहि असले खेळ पुष्कळ चालतात, व वर सांगितल्याप्रमाणें अखेर मोडतात हें प्रसिद्धच आहे.

## ( ५८ ) कनिष्ठ हा वरिष्ठाचा प्रतिनिधि

राजसत्तेची योग्य मार्गांनीं व अवश्य तितकी विभागणी झाली असतां, कनिष्ठ अशा कोणत्याहि उपसंस्थांनीं अगर अधिकाऱ्यांनीं हुकूम काढला तरी ते वरिष्ठ राजसत्तेचेच ठरतात. म्हणून कायदेशीर प्रश्न निघाला असतां त्या हुकमांना थेट राजाज्ञेइतकाच मान द्यावा लागतो. आणि न्यायकोर्टें तो देतातहि. पण अधिकारविभागणी ही एकसूत्रतेला बाधक नसते, व योग्य अधिकारविभागणीनें वांटून गेलेल्या सत्तेला कळसूत्री म्हणत नाहींत. प्राचीन काळीं राज्यें विस्तारानें व कारभाराच्या व्यापानें लहान होतीं तेव्हां राजाला माहित नाहीं अशा स्थितींत त्याचा हुकूम निघणें शक्यच नव्हतें. पण राज्याचा विस्तार वाढला म्हणजे मग, स्वतः एकट्या राजाला सर्व आज्ञा लिहून नव्हेच पण वाचूनहि सह्या करितां येत नाहींत असें होतें. आणि मोठमोठ्या राज्यांत तर, राजाचे खातेवार सेक्रेटरी व शिक्केनवीस नेमलेले असतात. त्यांचें कामच हें कीं, राजाज्ञेचा म्हणून शिक्का त्यांनींच आज्ञेच्या कागदावर उठवावा. कोणत्याहि मोठ्या कारभारांत मग तो राज्याचा नसला तरी असेंच होतें. मग राज्यांत होईल यांत नवल काय ? सुमारें पंधरा वर्षांपूर्वीं मुंबई गव्हर्नरच्या एका हिंदी एक्झिक्युटिव्ह कौन्सिलराशीं कांहीं कामानिमित्त माझें बोलणें झालें तेव्हां मुंबई सरकारच्या नांवानें निघालेल्या एका ठरावाचा मीं उल्लेख केला. त्यांना तो माहित नव्हता असें दिसलें. मीं विचारलें कीं, " तुमच्यापुढें प्रत्यक्ष कामाची तपशिलवार सुनावणी न होवो, पण मुंबई सरकारचे म्हणून जे वटहुकूम निघतात, ते तरी प्रसिद्ध होण्यापूर्वीं तुम्हांला पाहण्याची संधि असतेच कीं नाहीं ? " त्यावर ते हंसून इतकेंच म्हणाले कीं, " तुमच्या वर्तमानपत्रांत छापून गेलेली अशी

एखादी बातमी किंवा लेख मी सहज काढून दाखवूं शकेन कीं, जो मजकूर तुम्हीं संपादक असतांहि कधीं वाचला अगर पाहिला नव्हता ! ”

## ( ५९ ) अधिकारविभागणी ही स्वाभाविक

हें त्यांचें उत्तर मला थोडेंसें पटलें. कारण पुष्कळ वेळा संपादक जाग्यावर हजर नसतां, त्याचे जागीं काम करणारे जबाबदार दुय्यम सर्व व्यवस्था करून त्याच्या नांवचा अंक नेहमींप्रमाणें काढतात. एक्झिक्युटिव्ह कौन्सिलर मला पुढें म्हणाले, “गव्हर्नर-इन्-कौन्सिल यांच्या आज्ञेनें ठराव निघाला अशी भाषा ठरावांत वापरली असली तरी केव्हां केव्हां खुद्द माझ्या खात्याचे वटहुकूम किंवा ठराव, आपल्या अखत्यारीनें खात्याचा सेक्रेटरी काढतो; व तें करण्यांत त्याला आपण कांहीं कपट करितों किंवा मला फसवितों असें वाटण्याचें कारण नसतें. कारण अधिकार-विभागणी-तत्त्वाप्रमाणें या गोष्टी घडत असतात. राजाची दखलगिरी ही दहा हजार रुपयांच्या चलनी नोटेसारखी आहे. खुद्द तेवढ्या मोठ्या रकमेच्या नोटेची देवघेव व्हावयाची तेव्हां ती नोट बँकेच्या किंवा पेढीच्या मुख्य अधिकाऱ्याच्या दखलगिरीनें दिली घेतली जाईल. पण दहा हजारांच्या नोटेच्या पोटीं जितके चलन-विभाग आहेत तितक्या सर्वांच्या किंमतीच्या नोटा, नाणीं, परचुरण खुर्दा यांचा व्यवहार बँक किंवा पेढी यांच्या दुय्यम व्यवस्थपकांपासून तों खालीं सराफापर्यंत बँकेचे अधिकारीच करितात. हिंदुस्थानसरकारच्या नांवानें या देशांत जो जगड्व्याळ व्यवहार चालतो तो सर्व खडान्‌खडा स्वतः गव्हर्नर जनरलला माहिती असणें शक्यच नसतें. तथापि तात्त्विक किंवा कायदेशीर दृष्ट्या तो सर्व आधिकार स्वतः त्यानें बजाविल्याइतकाच प्रजेवर बंधनकारक होतो.

## ( ६० ) अधिकाऱ्यांचा गंज अवश्य असतो

तात्पर्य, राज्यसंस्थेचा विस्तार होऊन एखाद्या वृक्षाप्रमाणें त्याला मोठ्या फांद्या फुटाव्या, त्यांना पानें फुटावीं, फुलें यावीं, व फळें येऊन त्यांत भावी वृक्षाचें बीज तयार व्हावें हें सर्व स्वाभाविक नव्हे तर अवश्यच आहे. या शाखापल्लवविस्तारानें, वृक्षाच्या मूळ बीजाचें कार्य विफल होत नसून उलट सफलच होतें. तसेंच राज्यकारभाराचेंहि आहे. खुद्द राजा हा आपल्या राजवाड्यांतील दिवाणखान्यांत एकांतांत बसला व देशाच्या अगदीं टोंकाला वावरणारी प्रजा आपल्या घरीं बसली तरी तो त्या प्रजेचा राजा व ती त्या राजाची प्रजा हा संबंध सिद्धच होणारा आहे. नखाला लागलेली जिव्हाळी मेंदूंत संवेदना उत्पन्न करते ती या दरम्यान पसर-

णाऱ्या शरीरवृक्षाच्या असंख्य शाखा—पल्लवांमुळेंच होय. आणि काळजापासून शुद्ध रक्त बाहेर पोंचविण्याला व बाहेरचें अशुद्ध रक्त शुद्ध करण्याकरितां काळजाला नेऊन पोंचविणाऱ्या शिरा व धमन्या नसतील, व वाटेंत स्नायू, अस्थि, चर्म, ज्ञानतंतू वगैरेंचीं ठाणीं किंवा टपालह्यापिसें नसतील तर हें सुस्थिर चाललेलें रुधिराभिसरणाचें कार्य होऊं शकणार नाहीं. म्हणून गव्हर्नर जनरलपासून तों तहत गांवचा पाटील, पटवारी, तराळ येथपर्यंत दरम्यान हजारों अधिकाऱ्यांचा गंज सारखा लागलेला असतो.

## ( ६१ ) हिंदुस्थानचें उदाहरण

हिंदुस्थानचा कारभार पार्लमेंटच्या संमतीनें होतो म्हणून, पार्लमेंटनें असे कांहीं स्थूल कायदे केले आहेत कीं, ज्यांत या हिंदुस्थानांतील कारभाराच्या कायदेशीरपणाचीं बीजें सांठविलेलीं आहेत. पण हीं बीजरूपी कायद्याचीं कलमें फारच थोडीं असतात. हिंदुस्थानांत कायदेकौन्सिल अमुक एक प्रकारचें व त्या कायदेकौन्सिलनें केलेल्या कायद्यांना आपल्या इच्छेस येईल तर गव्हर्नर जनरल यांनीं आपल्या कौन्सिलच्या विचारानें संमति द्यावी किंवा न द्यावी एवढ्या लहानशा मंत्रानें अधिकारविभागणीचें उदक पार्लमेंटमध्यें सुटतें. पण गंगोत्री—यमुनोत्री यांच्या उगमांतून निघणाऱ्या पाण्याच्या प्रवाहांना पुढें नद्या व नद यांचें प्रचंड स्वरूप यावें त्याप्रमाणें, कायद्याच्या या मंत्रोदकाचे पुढें प्रचंड प्रवाह होतात, व अधिकारदानांतून अधिकारदान, फिरून अधिकारदानांतून अधिकारदान, अशा क्रमानें अगदीं खालपर्यंत पेंड पोंचतो. याचें एक प्रत्यक्ष उदाहरण आपण घेऊं. शेतकरी चावडीवर जाऊन जो चार आठ आणे सारा भरतो तो अद्यापि विलायतेंतल्या स्टेट सेक्रेटरीच्या नांवानें हिशेबी जमा होत असतो. आणि उलट वर्षांतून एकदां चावडी सारवण्याला पाटलाच्या सादिलवारांतून जर एका आण्याचें शेण खर्चीं पडलें तर तो खर्च विलायतेंतल्या स्टेट सेक्रेटरीच्याच नांवें जमा झालेल्या पैशांतून व त्याच्या हुकमानें झाला असेंच कायदेशीर दृष्टीनें मानलें जातें. आणि फिरून स्टेट सेक्रेटरीचा अधिकार हा स्वतंत्र नव्हे तर तो खुद्द राजाचाच ! कारण राजाचा अधिकार स्टेट सेक्रेटरींनीं बजवावा अशाविषयीं पार्लमेंटच्या कायद्याचा किंवा निदान अलिकडच्या राज्यघटनेच्या एका कलमाचा आधार आहे.

## ( ६२ ) ' संमतार्थे अनुज्ञा '

इंग्रजींत ज्याला सॉव्हरेंटी म्हणतात त्या संकीर्ण, सर्वंकश व बीजभूत वरिष्ठ राज-

सत्तेचें हें वरील उदाहरण म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं. हें उदाहरण अर्थात् राजानें केलेल्या कायद्याचें झालें. पण राजानें न केलेले असेहि कांहीं कायदे राज्यांत चालूं शकतात व राजसत्तेला प्रजा संमति देते म्हणून राजसत्ता चालते असा जो राज्यशास्त्रांत एक सिद्धान्त गृहीत घेऊन चालतात त्याचाच पूरक सिद्धान्त असा कीं, राजानें न करितां प्रजेनें केलेल्या कांहीं कायद्यांना म्हणजे तिच्या प्रजासत्तेला राजाहि संमति देतो म्हणून राज्यसंस्था चालते. प्रजासत्तेनें निर्माण केलेल्या कायद्याचें उदाहरण म्हणजे, आज हिंदुस्थानांत चालू असलेल्या कित्येक वर्गांना लागणारा ' पर्सनल लॉ ' म्हणजे त्या त्या वर्गांचें व्यवहारधर्मशास्त्र. हिंदु लोकांच्या व मुसलमान लोकांच्या धर्मशास्त्राचा उगम त्यांच्या सनातन चालीरितींत आहे. याला ' कस्टमरी लॉ ' असें म्हणतात. हिंदुसमाजाला आधारभूत असे धर्मसंस्कार किंवा विवाह, दत्तविधान, दायभागाची वांटणी, स्त्रीधन वगैरे व्यवहार कसे व्हावे हें कोणत्याहि पार्लमेंटनें झालेल्या कायद्यानें ठरविलेलें नाहीं. व इंग्रजांनीं हिंदुस्थान जिंकून किंवा इतर रीतींनीं स्वाधीन करून घेऊन, आपलें राज्य विलायतेंतला राजा किंवा पार्लमेंट यांच्या कायद्याच्या आधारावर स्थापलें असलें तरी, 'हिंदुधर्मशास्त्र' हें त्यांच्या हिंदु प्रजेनेंच स्वतः बनविलेलें आहे. आणि प्रत्यक्ष हायकोर्टें, प्रिव्ही कौंसिल हीं न्यायपीठें देखील त्यांच्या चालीरितींच्या कायद्याची अंमलबजावणी करतात. त्याला कोणत्याहि विलायती कायद्याचा आधार घेत नाहींत.

## ( ६३ ) दंड हाच सत्तेचा खरा आधार

असो; " जग कसें चालतें ? कशानें चालतें ? " असा प्रश्न शंभर माणसांना करा. नव्वद तरी एकच उत्तर देतील. ' जग ना ! ईश्वरी सत्तेनें चालतें. ' बरें, जग चालावयाला ईश्वराला सत्ता लागते तसें शहाणपणहि लागतें कीं नाहीं ? आणि सत्ता व शहाणपणा हीं दोन्हीं असलीं तरी, अंतःकरणांत जगाविषयीं प्रेम असल्याशिवाय त्याचा उपयोग ईश्वर तरी कां करील ? प्रेमाशिवाय, ममतेशिवाय एवढी उठाठेव, एवढा उपद्व्याप कोण करतो ? असले प्रश्न विचारून त्याला आणखी थोडें खोलांत नेलेंच तर मग माणूस कबूल करील कीं, जग हें ईश्वराच्या सत्तेप्रमाणें त्याच्या शहाणपणामुळें, प्रेमामुळें, ममतेमुळें चालतें. पण या दुसऱ्या प्रश्नाचीं उत्तरें त्याला सुचवावीं तेव्हांच तीं तो देईल. एरवीं नुसतें मोघम विचारा ' जग कसें चालतें, कशानें चालतें ? ' त्याचें ताबडतोब ठरीव उत्तर तो देणार—" जग

ईश्वराच्या सत्तेनें चालतें." जग चालवावें अशी 'इच्छा' ईश्वराला कोणत्याहि कारणानें होवो. पण त्याला 'सत्ता' आहे म्हणूनच ती इच्छा सफल होते.

## (६४) दंडाचें सर्वव्यापित्व

कुटुंबांतील 'आई' हें नांव व 'प्रेम' यांचें अर्थातच अखंड साहचर्य असतें. पण बापाची गोष्ट तशी नाहीं. मुलांना बापाच्या प्रेमापेक्षां, निदान प्रेमाच्या बरोबरीनें तरी, त्याच्या सत्तेचा दरारा जाणवत असतो. शाळेंत पंतोजी शिक्षण देण्याकरितां असतो, पण विद्यार्थ्यांच्या डोळ्यांपुढें त्याची मूर्तिमंत छडी जशी उभी असते तशी त्याची अमूर्त बुद्धि किंवा कळकळ ही कशी असणार ? आपली जात संघटित प्रयत्नानें जातीला उपकारक असे कांहीं उद्योग करील या आशेपेक्षां, आपण जातीची चालरीत सोडून कांहीं केलें तर आपणाला वाळींत पडावें लागेल, आपलें हुक्कापाणी बंद होईल, लग्नाला मुली-मुलगे मिळणार नाहींत ही भीतिच अधिक प्रतीत होते. पोलीस चोरी उमगून देतात व रात्रीं गस्त घालून रक्षण करतात. पण पोलीस म्हटला कीं त्याजकडून अधिकारानें अनधिकारानें होणाऱ्या छळाची, जुलमाचचि आठवण होते. आणि राजाची अब्रू तर बोलावयासच नको. कारण राजा या शब्दाबरोबर 'दंड' हा शब्द जोडलेला जितका आढळतो तितका दुसरा कोणताहि आढळत नाहीं.

## (६५) वांटून गेली तरी सत्ता शिल्लकच

जी साऱ्या जगाची गोष्ट तीच कोणत्याहि संघटित समाजाची पण आहे असें समजावें. मग तो समाज, कुटुंब, ज्ञाति, नगर, उपराष्ट्र, राष्ट्र किंवा राष्ट्रसंघ-म्हणजे कोणत्याहि आकाराचा किंवा स्वरूपाचा असो. अशा संघटित समाजांत सत्ता मुख्यतः कोणा एकाच्या हातीं असली, तरी ती अंतिमस्वरूपांत सूक्ष्मरूपानें इतरांमध्येंहि कांहीं कांहीं अंशांनीं वांटली जावी लागतेच हें खरें. तथापि स्थूलरूपानें बोलावयाचें असतां एकंदर विश्वाप्रमाणें, जगाप्रमाणें, जगांतला कोणताहि संघटित समाज सत्तेच्या बळावर चालतो असेंच ठळकपणें दिसतें हें कांहीं खोटें नाहीं. ही सत्ता सर्वत्र सर्वस्वीं बळजोरीनेंच मिळविलेली किंवा बळजोरीनेंच टिकविलेली असते असेंहि नाहीं. प्रेम, आदर, कृतज्ञता, श्रेष्ठकनिष्ट भावनेची जाणीव, स्वार्थबुद्धि, अवश्यकता किंवा साधी सोय, इत्यादि गोष्टींनीं सत्तेला मान्यता मिळूं शकते. पण 'सत्ता म्हणजे सत्ता' ही गोष्ट अखेर खरी असें मानल्याशिवाय गत्यंतर नाहीं.

### ( ६६ ) अवमानली गेली तरी राजाज्ञाच

तात्पर्य, सर्वांत वरिष्ठ राज्यसत्ता ज्या कोणाच्या हातीं आहे त्यांच्याच नांवानें व त्यांच्याच हातून हुकूम सुटला म्हणजे तो राजाचा हुकूम झाला. मग तो वास्तविक स्वरूपांत इतर कोणाच्या इच्छेचा परिणाम आहे हें पाहण्याचें कारण नाहीं. उदाहरणार्थ, विलायतच्या पार्लमेंटनें कायदा केला; पण राजानें त्याला संमति दिली नाहीं तर तो कायदेशीर कायदा म्हणजे राजाज्ञा नव्हे. उलट राजाच्या मनांत नसतांहि त्यानें मुख्य प्रधानाच्या धाकानें, भिडेनें, मोहबतीनें, कशीहि त्याला संमति दिली म्हणजे तो क़ायदा झाला. दुसरे पक्षीं अशा रीतीनें राजाज्ञा निघाली तर ती कोणी अवमानणार नाहीं असेंहि नाहीं. ज्या लोकांनीं तुरुंग गजबजलेले दिसतात ते सर्व राजाज्ञा उल्लंघिलेलेच लोक असतात. ज्याला राजसत्तेच्या कायद्याचें स्वरूप प्राप्त झालेलें नाहीं असा शिष्टाचार किंवा नियम मोडल्याबद्दल कोणावर खटला होत नाहीं किंवा कोणाला तुरुंगांत जावें लागत नाहीं. पण तुरुंगांत गेलेल्या लोकांपैकीं कांहीं असें म्हणणारे असतात कीं आम्ही राजाज्ञा मोडण्याचें कृत्यच केलें नाहीं; तर दुसरे कांहीं असें म्हणणारे असतात कीं, आरोपित कृत्य आम्हीं केलें, पण त्याविषयीं तशी राजाज्ञा नसल्यानें तो गुन्हाच होत नाहीं. फक्त सत्याग्रही हा मात्र मुद्धाम गुन्हा करतो व शिक्षा भोगतो. पण त्यामुळें त्यानें मोडली अवमानिली ती मूळ राजाज्ञा नव्हे असें होत नाहीं. कुटुंबापासून साम्राज्यापर्यंत राज्यसंस्थांची धारणा मध्यवर्ती स्वतंत्र सत्तेवरच होते.

---

# भाग ३ रा

## राज्यसंस्थांच्या घटना व वर्गीकरण

### ( ६७ ) राज्यघटना म्हणजे राज्याचें व्याकरण

राज्यसंस्थांचा उगम व आधार यांचा विचार झाल्यानंतर त्याच्या स्थितीचा म्हणजे जीवयात्रेचा विचार ओघानेंच येतो. स्थिति या शब्दांत दोन गोष्टी येतात. १ अस्तित्व किंवा जिवंतपणा, आणि २ कार्यक्षमता. या दोहोंची धारणा एकाच आधारावर होऊं शकते. आणि तो आधार म्हणजे राज्याची कायदेशीर घटना. घटनेची कल्पना ही मनामध्यें सुप्रतिष्ठित होण्याला, व तिचें

मर्म समजून तिची अंमलबजावणी व्हावी असा आग्रह धरण्याला, लोकांची, प्रजाजनांची मनःसंस्कृति बरीच परिणत व्हावी लागते. घटनेसंबंधीं कायदेशीर भाषा सुरू होण्याच्या आधीं पुष्कळ काळ ती घटना अस्तित्वांत असते, व तिचा व्यवहारहि होत असतो. भाषाव्यवहार सुरू झाल्यानंतर फार काळानें व्याकरण उत्पन्न होतें; व तें उत्पन्न झाल्यावरहि व्याकरण न समजतां लहान मुलेंच काय, मोठे प्रौढ वयाचे लोकहि, शुद्ध भाषा बोलत असतात. याचें कारण परंपरागत ज्ञान (पढिक किंवा अभ्यासानें प्राप्त करून घेतलेलें नव्हे). त्याचप्रमाणें राज्यांतील अधिकारी व प्रजाजन हेहि आपापल्या हक्कांचें व्याकरण समजल्याशिवाय ते हक्क परस्परांविरुद्ध बजावीत असतात, याचें कारण उभयपक्षांची उभय पक्षांना परंपरागत संमति! राजकीय हक्क कोणते हे, सामाजिक चालीरीतीप्रमाणें, प्रथम कसे केव्हां जन्माला आले हें कोण सांगूं शकणार? रानांतील पाऊलवाटेची उत्पत्ति कोणीं नक्की सांगितली आहे काय? पण त्याची माहिती नसतां मळलेल्या पाऊलवाटेनें लोक चालतच असतात.

## (६८) हक्कांच्या विरोधांत घटनेचा जन्म

मळलेल्या पाऊलवाटेनें चालत असतांहि त्या वाटेनें चालण्याचा हक्क आपणाला आहे अशी जाणीव लोकांना नसते. पण समजा कीं, ती वाट मध्येंच कोणीं बुजविली किंवा बंद केली तर मग लोकांना चालू वहिवाटीच्या हक्काची जाणीव उत्पन्न होते, ती कोणीं बुजविली बंद केली याची चौकशी सुरू होते, अपराधी सांपडला तर त्याचें पारिपत्य होतें आणि या भांडणांत दुतर्फी हक्कांचा संबंध आला तर मग पंचायतीनें किंवा न्यायकोर्टाच्या सहाय्यानें, त्याचा निर्णय लावून घेण्यांत येतो. पण हें करितांना, व पुढील बंदोबस्ताकरितां, वादग्रस्त हक्काच्या लेखी विधानांची आवश्यकता उत्पन्न होते. राज्यघटना देखील सर्व राष्ट्रांतून प्रथम अशाच अलिखित होत्या. लेखाशिवाय व्यवहार करण्याची जुन्या काळीं रीतच होती. आणि लेखाशिवायहि तो नीट होत असे. मग व्यवहाराची गुंतागुंत थोडी म्हणा, किंवा त्यांची स्मरणशक्ति आधुनिकांपेक्षां अधिक धड व तीक्ष्ण होती म्हणा, किंवा शब्द थोडे पण इमानदारी, विश्वास पुष्कळ होता म्हणा, किंवा शब्दच्छलाला लागणारी कुटिल नीति, कुटिल बुद्धि तेव्हां नव्हती म्हणा—कारण कोणतेंहि असो, जुन्याकाळीं राजे व प्रजा दोन्ही असतां, लेखी राज्यघटना नव्हत्या ही गोष्ट मात्र खरी आहे; पण पुढें समाजस्थिति

बदलून लेख हाच इतर अनेक व्यवहारांचा मुख्य आधार होऊन बसला तसाच तो राजकीय व्यवहारांत राज्यघटनेसंबंधींहि मुख्य आधार होऊन बसला.

## ( ६९ ) फ्रान्सचें उदाहरण

गेल्या दोन तीन शतकांतच जगांतील सर्व लेखी राज्यघटनांना लेखांचें स्वरूप आलें आहे. त्याचीं कारणें दोन तीन प्रकारचीं घडलीं. फ्रान्समध्यें राज्यक्रांति होऊन प्रजासत्ताक राज्य स्थापन करण्यांत आलें व राजा नामशेष झाला. मग तेथें जुनी परंपरागत घटना कशी उपयोगी पडणार ? जुन्या घटनेंत तरी राजानें प्रजेवर जुलूम करावा असें तत्त्व कोठें होतें ? "त्यांचा संतोष हेंच आमचें सुख" ही राजे लोकांची भाषा कायम ठशांनीं छापल्यासारखी जगाच्या प्रारंभापासून सुरूच आहे ! पण मिजास साधूची व वागणूक सैतानाची ही म्हण फ्रान्समध्यें लोकांच्या अनुभवाला येऊं लागली तेव्हां बंड व क्रांति झाली. राजाच गेला तेव्हां घटनेंतलीं निम्मीं कलमें आपोआपच नाहींशीं झालीं. तथापि लोकांच्या हातीं आलेलें राज्य तरी पुढें कोणत्या पद्धतीनें चालावें हा प्रश्न विचाराचाच होता. "दुधानें तोंड भाजलें तेव्हां ताकहि फुंकून घ्यावें," असें लोकांना वाटूं लागलें. नवी घटना सुचविणें हा प्रजापक्षांतील सुपीक मेंदूना एक उद्योगच होऊन बसला. 'आबे साईस' नांवाचा एक क्रांतिकारक रोज रात्रीं बसून एक नवी राज्यघटना तयार करून ती आपल्या क्रांतिबांधवांपुढें मांडी. तात्पर्य नवी राज्यघटना हवी, व ती लेखीच असावी, असें ठरून त्याप्रमाणें घटना मंजूर करण्यांत आली. स्वातंत्र्यवादी क्रांतिकारकांनीं आपल्याच उरांत मारून घेण्याकरितां सोन्याची सुरी बनविली ! कारण घटना म्हणजे बंधन व नियंत्रण !

## ( ७० ) अमेरिकेंतल्या राज्यघटना

अमेरिकेंत याच शतकांत लेखी राज्यघटना बनविण्यांत आली. तिला तर फ्रान्सपेक्षांहि अधिक सयुक्तिक कारण घडलें. फ्रान्समध्यें राजा गेला तरी बाकी जुनी परंपरा चालण्यासारखी होती. पण अमेरिकेनें इंग्लंडचें स्वामित्व झुगारून दिलें, व अगदीं कोऱ्या कागदावर मनाला वाटेल तो मजकूर लिहिण्याच्या भावनेनें घटनेला हात घातला. शिवाय फ्रान्सचें राष्ट्र पूर्वींप्रमाणें एकत्र अखंडच राहिलें; पण अमेरिकेंत स्वातंत्र्ययुद्धांत सामील होऊन स्वातंत्र्य मिळविलेलीं अनेक संस्थानें म्हणजे उपराष्ट्रें होतीं, त्या सर्वांना आपण आपापसांत देखील स्वतंत्र राहावें अशी इच्छा सहजच उत्पन्न झाली. अर्थात् स्वातंत्र्य हें

सर्वांना समान असलें तरी संयुक्त घटना करणें अवश्य होतें. म्हणून लेखी घटना करणें प्राप्त झालें; व या लेखी घटनेंत त्यांनीं आपल्यापुरतें अंतर्गत कारभाराचें स्वातंत्र्य ठरवून घेऊन सर्वांकरितां म्हणून जी घटना केली ती निरगांठीसारखी घट्ट व न सुटण्यासारखी केली. संयुक्त राष्ट्राचें एकच पार्लमेंट, संयुक्त राष्ट्राचें सर्वाधिकारी एकच वरिष्ठ न्यायकोर्ट, सर्वांचा एकच मुख्याधिकारी अध्यक्ष, व परराष्ट्रीय राजकीय संबंधांत सर्वांचें एकच द्वार व मुख अशी ती घटना झाली आणि पुढें एकोणिसाव्या शतकांत कांहीं संस्थानें या निरगांठींतून सुटून जाण्यास पाहूं लागलीं तेव्हां युद्ध होऊन ती निरगांठ अधिकच घट्ट झाली.

## ( ७१ ) महायुद्धानंतरच्या राज्यघटना

नव्या लेखी राज्यघटना तिसऱ्याहि एका कारणानें युरोप खंडांत झाल्या. तें कारण महायुद्धानंतर स्वयंनिर्णयाचें तत्त्व लावून विजयी राष्ट्रांनीं आपल्या हिताकरितां पण परार्थाचा बहाणा करून, नवीं राज्यें निर्माण केलीं हें होय. नवीं राज्यें निर्माण केलीं याचा अर्थ, नवा मुलूख हुडकून काढून, नवे लोक बाहेरून आणून, नव्या वसाहती करून त्यांचीं नवीं राज्यें स्थापलीं असा नव्हे. तर या नव्या राज्यांतले लोक पूर्वी ज्या सरकारच्या अमलाखालीं होते त्यांच्या अमलाखालून त्यांना सोडवून, स्वतः त्यांचीं त्यांच्या पुरतीं स्वतंत्र राज्यें स्थापून सर्वाधिकार त्यांचा त्यांना दिला. तात्पर्य, राज्यच नवें म्हटलें म्हणजे घटनाहि नवी आलीच; व त्याप्रमाणें ती करण्यांतहि आली. या नव्या राज्यांची रचना करितांना त्यांतील सर्व प्रजेला एकसारखीच संमत होईल अशी व्यवस्था अर्थातच झालेली नाहीं. एकाचें बरें करावयास जावें तर दुसऱ्याचें वाईट व्हावें हा अनुभव आला, व या नव्या राज्यांत कांहीं लोक जुन्या सरकारचे अभिमानी तर पुष्कळसे जुन्या सरकारचा द्वेष करणारे असे सर्व एकच राज्यांत कोंबले गेले. यामुळें हितविरोध शिल्लक उरलाच. आणि अल्पसंख्य, बहुसंख्य हा प्रश्न उत्पन्न झाला. म्हणून त्याची व्यवस्था लावण्याकरितांहि नवी लेखी राज्यघटना करावी लागली.

## ( ७२ ) इंग्लंडची राज्यघटना

याच्या उलट इंग्लंड देश घेतला तर त्याच्या घटनेचा कांहीं भाग अलिखित, कांहीं लिखित असें तें मिश्रण आहे. ( १ ) अलिखित भागांत ‘ कॉमन लॉ ’ म्हणजे परंपरागत कायदेशीर चालीरीति यांचा समावेश होतो. या रूढिस्वरूपी

कायद्यावर अनेक ग्रंथकारांनीं टीका लिहिल्या असून, न्यायकोर्टें तो कायदा जणूं कांहीं लिखित असावा त्याप्रमाणें मानून त्यावर सर्रास निर्णय देतात, व हे निर्णय फिरून या अलिखित कायद्यांचें जीवित व कार्यक्षेत्र वाढवितात. फक्त त्या कायद्यांचें प्रत्यक्ष लेखी ' कोड ' ( संग्रह ) सरकारी कायदेमंडळानें बनविलेलें नाहीं. ( २ ) अलिखित कायद्यांच्या जोडीला अलिखित संकेत हेहि राज्यघटनेंत अढळपद मिळवून बसले आहेत, हे संकेत राजा व पार्लमेंट यांच्या वाढत्या व बदलत गेलेल्या संबंधांत निर्माण झालेले आहेत. उदाहरणार्थ, प्रधानमंडळ हें कोणत्याही घटनेच्या कलमान्वयें अस्तित्वांत आलेलें नाहीं. पण तो आतां घटनेचा भागच झाला आहे. (३) याशिवाय लिखित राज्यघटनेंत पूर्वींचे चारटर (सनदा) व स्वतः पार्लमेंटनें केलेले घटनाविषयक कायदे (अॅक्ट, स्टॅट्यूट) यांचा समावेश होतो. उदाहरणार्थ, मॅग्नाचार्टा ( स. १२१५ ), बिल ऑफ राइट्स ( १६८९ ), अॅक्ट ऑफ सेटलमेंट ( १७०१ ) आणि १८३२, १८६७, १८८५ इत्यादि सालचे मतदारी वाढविण्यासंबंधाचे स्टॅट्यूट. हे सर्व लिखित राज्यघटनेचे भाग होत.

### ( ७३ ) ही मुख्यतः अलिखितच आहे

तथापि एकंदरीनें इंग्लंडची राज्यघटना लिखितापेक्षां अलिखितच अधिक भरेल. त्या घटनेचें मुख्य तत्त्व प्रजास्वातंत्र्याचे हक्क प्रस्थापित करणें हेंच आहे. आणि अलिखित घटनेच्या कलमांचें उल्लंघन झालें तरी तें उल्लंघनच होय. 'घटने'चें उल्लंघन म्हणजे 'कायद्या'चें उल्लंघन असें मात्र नाहीं. उदाहरणार्थ, पार्लमेंटमध्यें मुख्य प्रधानावर किंवा प्रधानमंडळावर 'अविश्वासाचा ठराव' मंजूर झाला तरी तो आपण मानूं नये असें त्यांनीं ठरविलें व आपल्या जागांचे तावडतोब राजीनामे दिले नाहींत तर त्याकरितां कोर्टांत फिर्याद चालूं शकत नाहीं. कारण 'कॉमन लॉ' मध्यें प्रधानमंडळ येत नाहीं, व प्रत्यक्ष कायदा म्हणावा तर प्रधानमंडळासंबंधीं स्टॅट्यूट नाहीं. येऊन जाऊन संकेत आहे! तो दोनशें वर्षें अमलांतहि आहे, तथापि त्याच्या आधारावर कोणाला न्यायकोर्टांत फिर्याद करून प्रधानमंडळाला हाकून लावितां येत नाहीं. त्यांना मूळ नेमणाऱ्या राजानेंच बडतर्फ केलें पाहिजे. पण ज्या इतर देशांत प्रधानमंडळाच्या कारभारासंबंधीं प्रत्यक्ष कायदा आहे तेथें न्यायकोर्टांत जाऊन त्याची बडतर्फी मिळवितां येतें. उद्यां हिंदुस्थानांत स्वराज्यघटनेचा कायदा

झाल्यास त्यांत प्रधानमंडळासंबंधानें स्पष्ट कलमच घालावें लागेल. त्या संबंधानें पूर्वीची रूढि किंवा संकेत नाहीं.

## ( ७४ ) राज्यघटना व मनुष्यदेह

राज्य म्हटलें म्हणजे त्याला शरीर आहे, प्रकृति आहे. कोणत्याहि भौतिक शरीराप्रमाणें राज्याच्याहि शरीराची रचना सामान्यतः ठरल्यासारखीच असते. नुसता मानवअस्थींचा सांपळा समग्र जोडून उभा केला असतां, तो मूळचा मनुष्य, देहधारी व जिवंत असा, जगांतल्या कोणत्या देशाचा होता हें सांगणें कठीण. डोकें, तोंड, जबडा, नाक वगैरेंच्या मोजमापावरून अलीकडे शास्त्रज्ञांनीं मानवकुळ ओळखण्याचे कांहीं नियम बांधलेले असून, मनुष्य कोणत्या देशांतील असावा याविषयीं कल्पना चालविण्यास त्यांपासून अगदीं स्थूलपणानें मदत होते. परंतु खरोखर नक्की असें कांहींच सांगतां येत नाहीं. याचा अर्थ मनुष्यदेह हा मुळांत सर्व जगभर रचनेच्या दृष्टीनें सारखाच आहे. सर्व अवयवांची ठेवण एकच, तशीच त्यांची संख्या. पण या मूळच्या सांगाड्यावर मांस, स्नायू, रुधिर, त्वचा वगैरेंचे थर पसरत गेले म्हणजे हळूहळू विषमता प्रगट होऊं लागते. आणि शेवटीं तोंडाकडील भागाची रचना पूर्ण झाली म्हणजे तर स्पष्टीकरण इतकें होतें, भिन्नता व विषमता इतक्या परमावधीला जाऊन पोंचतात, कीं जगांतील कोट्यवधी माणसांत एक व्यक्ति तंतोतंत दुसऱ्यासारखी आढळणें अशक्य होतें. एकाच आईच्या उदरांतून आलेल्या दोन जुळ्या भावंडांचे चेहरेहि हुबेहुब एकासारखे एक नसतात. मग जगांतील दूरदूरच्या भागांतील माणसांचे चेहरे एकसारखे कसे असणार ? ( १ ) सगळ्या मानव जातीचा मूळचा हाडांचा सांपळा एकाच प्रकारचा, पण ( २ ) शेवटीं एका व्यक्तिसारखी दुसरी व्यक्ति असूं शकत नाहीं—या दोन गोष्टी एकत्र केल्या असतां विधात्याचें सृष्टिचातुर्य लक्ष्यांत येतें. आणि समता संभाळून पृथक्पणाची ओळख पटण्याइतकी विषमता उत्पन्न करणें, हाच त्या सृष्टिचातुर्यांतील मुख्य भाग होय असें मनाला वाटूं लागतें.

## ( ७५ ) घटनेचा लिंगदेह

राज्यघटनेला मनुष्यदेहाचा दाखला दिला असतां, वरील गोष्टीचें मर्म राज्यघटना या वस्तूला कसें लावतां येईल याची कल्पना सहज होते. आणि ती अशी कीं, जगांतील कोणत्याहि राष्ट्रांत राजा व प्रजा यांची मूलभूत

कल्पना, तसेंच त्या दोघांमधील संबंधाची मूलभूत कल्पना, एकच आहे. पण प्रत्यक्ष तपासणीच करूं लागल्यास असा अनुभव येतो कीं परिस्थिती-प्रमाणें राजधर्म व प्रजाधर्म यांचें स्वरूप राज्यकारभाराच्या द्वारें इतकें कांहीं वेगवेगळें बनलेलें असतें कीं, कोणत्याहि एका राष्ट्रांतील राज्यघटना दुसऱ्या राष्ट्रांतील राज्यघटनेशीं तंतोतंत मिळूं शकत नाहीं. नुसती ओठाची ठेवण किंवा डोळ्याचा रंग एवढ्यावरून मनुष्याचा स्वभाव वेगवेगळा ओळखतां येतो त्याप्रमाणें, प्रत्येक राष्ट्राच्या राज्यघटनेमध्यें अशी कांहींना कांहीं तरी विलक्षणपणाची बाब असतेच कीं, तिच्या योगानें त्या घटनेचा स्वभाव व प्रकार इतरांपासून वेगळा दिसून यावा. इंग्रजींत 'स्पिरिट' किंवा 'जीनियस' याचा वाचक म्हणून लिंगदेह हा संस्कृत शब्द घेतला तर असें म्हणतां येईल कीं, प्रत्येक राष्ट्रांतील राजकीय समाजाचा लिंगदेह वेगवेगळा आहे. समग्र राज्यघटनेला समर्पक असा पारिभाषिक शब्द संस्कृतांत बनलेला नाहीं. तो आतां नवीन बनवून रूढ करावयाचा आहे. इंग्रजींत राज्यघटनेला कॉन्स्टिटयूशन हा शब्द लावतां येतो. पण त्या शब्दाचा अर्थ कालांतरानें खुद्द इंग्लंडांतच बदल-लेला असून, निरनिराळ्या देशांत तर त्या शब्दाला निरनिराळेच अर्थ आहेत.

## ( ७६ ) घटना शब्दाचे रूढार्थ

राज्यघटनेला मनुष्यदेहाची जी उपमा वर दिली आहे ती अगदीं आधुनिक आहे असें नाहीं. कारण दोन हजार वर्षांपूर्वीं सिसेरो या रोमन राज्यशास्त्रवि-शारदानें राज्यघटनेला 'कान्स्टिटयूशियो' हा शब्द लावलेला होता; व तोच शब्द मनुष्याच्या शरीराला व राज्यघटनेला अशा दोहोंनाहि रोमन भाषेंत लावला जातो. पुढें खुद्द रोममध्येंच त्या शब्दाचा अर्थ वरिष्ठ राजसत्तेनें केलेल्या एकंदर कायदेकानूंचा भारा किंवा गांठोळें असा होऊं लागला. म्हणजे हल्लीं 'कोड' हा शब्द इंग्रजी व फ्रेंच या भाषेंतून वापरला जातो त्या अर्थानें कॉन्-न्स्टिटयूशन हा शब्द रोममध्यें वापरला जाई. इंग्रजी कायदेपंडितांनीं तोच शब्द पुढें घेतला. मात्र त्यांच्याकडून त्याचा अनेक रीतीनें उपयोग करण्यांत आला. बाराव्या शतकांतील कॉन्स्टिटयूशन्स ऑफ क्लॅरेंडन याचा अर्थ "पूर्वीं अलिखित असलेल्या कायदेकानूंचा राजानें करविलेला अधिकारयुक्त संग्रह" असा आहे. इंग्रजींतील 'असाईज' 'चार्टर' 'स्टॅटयूट' 'ऑर्डिनन्स' हे शब्दहि असेच संग्रहवाचक आहेत.

## ( ७७ ) घटनेला महत्त्व येण्याचीं कारणें

पुढें अठराव्या शतकांत कॉन्स्टिट्यूशन या शब्दाला विशेष महत्त्व प्राप्त झालें, कारण इंग्लंडखेरीज इतर सर्व राष्ट्रांतील प्रजेनें बंडें करून, दंगाधोपा करून, किंवा इतर रीतीनें राजावर चढाई व मात करून, राजधर्म व प्रजाधर्म यांचे पूर्वीं जे अलिखित असे कायदे होते ते लिहून काढून जाहिर करण्याला राजे लोकांना भाग पाडलें. आणि अशा रीतीनें लिहून काढवून जाहिर केलेल्या कायद्यांत प्रजेच्या हक्कासंबंधींचे जे नियम होते त्यांचाच विशेषतः उल्लेख होता. याचें कारण उघडच आहे. तें असें कीं, राजा हा अनादि कालापासून सर्व अधिकारांचें व हक्कांचें उगमस्थान असून, त्यांतून जेवढें काढून व तोडून राजा प्रजेला देईल तेवढेच हक्क प्रजेचे अशी समजूत होती. यामुळें राज्यघटना लेखी नसली तरी राजांचें कांहींच बिघडत नसे. कारण त्यामुळें राजानें कसें वागावें याला कांहींच धरबंद पडत नव्हता. पण आपले अधिकार व हक्क प्रजेला लेखी सनदांनीं मिळवितां आले तर त्या आधारावर मात्र प्रजेला राजाशीं सनदशीर रीतीनें भांडतां झगडतां येई. विशेषतः राज्यांतील वरिष्ठ न्यायकोर्टाचे व न्यायदानाचे अधिकार राजा मानीत असला तर ती सनद न्यायकोर्टापुढें दाखल करून राजानें केलेली अमुक एक गोष्ट ही न्यायाची आहे कीं अन्यायाची आहे सांगा ! असा निर्णय प्रजेला लावून घेतां येतो. यामुळें लेखी हक्कांच्या सनदेबद्दल ( म्हणजे कॉन्स्टिट्यूशनबद्दल ) युरोप खंडांत प्रजेनें चळवळ केली; व पूर्वीं एके ठिकाणीं सांगितल्याप्रमाणें, सन १८४८ च्या सुमारास बहुतेक राष्ट्रांत राजांनीं जुन्या अलिखित सनदा तरी लेखी करून दिल्या, किंवा जुन्या सनदा लेखी असल्या तर त्या वाढवून दुरुस्त करून दिल्या. खुद्द इंग्लंडमध्यें राजाच्या अधिकाराला नियंत्रण घालण्याची चळवळ झाली पण त्यांत नवीन लेखी कॉन्स्टिट्यूशन किंवा राज्यघटना करून देण्याची मागणी नव्हती. लोकांचें म्हणणें असें होतें कीं, " राज्यघटना नवीन लेखीच करून पाहिजे असें नाहीं; परंतु पूर्वपरंपरेनें जे हक्क आम्हाला मिळालेले आहेत असें आम्ही समजतों त्यांचा उपमर्द राजाकडून होतो तो न व्हावा. " कसेंहि असलें तरी कॉन्स्टिट्यूशन या शब्दाचा अर्थ, इंग्लंडांत इतका अनिश्चित होता किंवा आहे कीं, खालीं दिलेलीं अगदीं परस्परविरोधी अशीं दोन विधानें या मुद्यावर आढळतात. १७ व्या शतकांत लॉर्ड चेस्टरफिल्ड यानें

असें लिहिलें आहे, "England is the only monarchy in the world, that properly can be said to have a constitution." पण यानंतर १०० वर्षांनीं डी टॉकेव्हिली या फ्रेंच राज्यशास्त्रविशारदानें इंग्लंडच्या राज्यघटनेविषयीं लिहितांना असें म्हटलें आहे कीं, "England was the only country which had got *no* constitution at all." पण अशा रीतीनें 'constitution' या शब्दाची फजिती झाली तरी वरील दोन्हीं विधानें आपापल्यापरीनें खरीं असून त्यांचा समन्वय करितां येतो.

## ( ७८ ) इतक्या वैचित्र्याचें कारण

जगांत राज्यघटना पूर्वी कधीं अगदीं सोळा आणे एकाच नमुन्याच्या नव्हत्या व हल्लीं तर नाहींतच नाहींत. असलाच तर त्यांच्यांत पूर्वीच्या काळींच अधिक सारखवटपणा होता. याचें कारण समाजाची शारीरिक व मानसिक रचना पूर्वीच्या काळीं हल्लींहून अधिक सोपी व साधी होती. राज्यांत सत्ताधारक एकच, व आज्ञाधारकांचीहि संख्या थोडी, कारण राज्याचा मुलूख थोडा. हल्लीं राज्यांचा स्थलविस्तार बेसुमार वाढला आहे. तसाच त्यांतील लोकसंख्येचाहि. यामुळें त्यांत राज्यांचे उपराज्यांचे नमुने फार निरनिराळे. पृथ्वीचें क्षेत्रफळ ५२३ लक्ष चौरस मैल आहे. पण त्यांतल्या ११५ वर ब्रिटिश साम्राज्य, ८६ वर रशियन साम्राज्य, ४२ वर चिनी साम्राज्य व ३५ वर अमेरिकन साम्राज्य पसरलें आहे म्हणजे अवघ्या चारच राज्यांत मिळून या ५२३ पैकीं २७८ लक्ष चौरस मैल खर्ची पडले आहेत. एवढ्या मोठ्या राज्यांचे नमुने बाहेर दिसायला किंवा आंतल्या कारभाराला सर्व सारखे असणें शक्यच नाहीं. अगदीं अंगठीच्या खड्याएवढें राज्य ही कविकल्पनेची अतिशयोक्ति झाली ! पण "चार वेशींच्या आंतलें व एकाच अखंड तटबंदीच्या प्राकारांतलें" असें वर्णन करण्यासारखीं राज्यें प्राचीनकाळीं होतीं तरी त्यांतहि एकच नमुना फार काळ टिकला नाहीं. तर मग वरच्यासारख्या मोठ्या राज्यांत तो कोठून टिकणार !

## ( ७९ ) जो पहावा तो वेगळाच नमुना

राज्यांच्या उत्पत्तीच्या कल्पना व प्रकार जर एकाच नमुन्याचे नाहींत, तर त्यांच्या प्रौढ दशेच्या व तारुण्याच्या म्हणजे सुस्थितीच्या व भरभराटीच्या काळांतले नमुने एकाच प्रकारचे कसे राहतील ! दिसण्यांत सत्ताधारी एक असला तरी त्याचे अंशभागी कितीतरी निरनिराळ्या स्वभावाचे व निरनिराळ्या पात्रतेचे

असतात! तसेंच दिसण्यांत आज्ञाधारक अशी एकच प्रजा एखाद्या राज्यांत दिसली तरी, सत्तेचा शक्य तेवढा मोठा अंश आपल्या हातीं यावा ही त्या प्रजेंतल्या विविध वर्गांची आकांक्षा असल्यामुळें त्यांचा सतत प्रयत्न त्या दिशेनें सुरू असतो. अर्थात् राज्यसत्तेच्या शरीरांत कोठें खळगे पडलेले तर कोठें टेंगळें उठलेलीं दिसतात. याचा अर्थ नमुना बिघडत असतो, बदलत असतो. पत्र्याचीं भांडीं किंवा शाडूचे गणपती एकाच दाबांतून व छापांतून काढतां येतात. तरी त्यांत कोण वैचित्र्य? गणपतींच्या चित्रांचें प्रदर्शन पहा म्हणजे कळून येईल! तसेंच मोटारींचे नमुने पन्नास, तर त्यांच्या इंजिनाच्या तोंडाशीं पाण्याचे नळांवर बसविलेल्या झाकणाचे नमुने दहा हजार तरी असतील! राज्यें हीं जिवंत माणसें आपल्या सुखाकरितां बनवितात. तेव्हां इच्छा व अभिरुचि यांच्या चळवळींतून वळवळींतून अनेक नमुने निघणारच!

## ( ८० ) वर्गवारीचीं नांवें थोडीं व ठराविक असणार

राज्यसंस्थांचें वर्गीकरण आपण करितों तें केवळ लहानमोठेपणावरून न करितां मुख्यतः त्याच्या बाह्यस्वरूपावरूनच म्हणजे घटनेवरून करितों व तसें करण्याशिवाय दुसरा मार्गच नाहीं. हें बाह्यस्वरूप जोंपर्यंत टिकून असतें तोंपर्यंत त्याला ठराविक वर्गवारीचें नांव द्यावें लागतें. बाह्य स्वरूप कायम राहून आंतल्या व्यवस्थेंत सत्ता आज एकाच्या हातीं अधिक तर उद्यां दुसऱ्याच्या हातीं अधिक असें होत असतें. पण त्यामुळें नांव बदलतां येत नाहीं. शिवाय हे फरक केव्हां इतके सूक्ष्म तर केव्हां इतके अस्थिर असतात कीं कदाचित् दर शेंपन्नास वर्षांनीं तत्स्थितिदर्शक वेगळें नांव हुडकून बनवून द्यावें लागेल. पण इतकीं वर्गवारीचीं नांवें तरी कोठून आणावयाचीं? विमानांत "हवेहून जड व हवेहून हलकीं" ह्या नांवानेंच मुख्य वर्गवारी केली जाते. पण या प्रत्येक वर्गांत इतर कितीतरी वर्ग आहेत. जसें एकपंखी, दुपंखी, सीप्लेन, सेलप्लेन, बायप्लेन, ग्लाइडर, इत्यादि. मोटारींची अंतर्रचना किती वेगवेगळी आहे. पण नुसत्या मोटार बनविणाऱ्या कंपन्यांच्या नांवानेंच त्यांची वर्गवारी बनते. त्यांच्या रचनेंतील फरक एका शब्दानें, एका शब्दसमूहानें सांगतां येत नाहीं; तर त्याकरितां वर्णनात्मक वाक्यांच्या वाक्यें, छेदकच्या छेदक खर्चीं घालावे लागतात! आगबोटींचेंहि तसेंच. स्क्रू टरबाइन असल्या दोन चार पारिभाषिक शब्दांनीं त्यांची वर्गवारी संपते.

## ( ८१ ) उचित पारिभाषेचें दारिद्र्य

राज्यसंस्थेची वर्गवारी दर्शविणारे दहा पांच सुटसुटीत शब्द तरी इंग्रजी भाषेंत आहेत. मराठींत तेहि नाहींत. कारण त्या विषयाची मराठींत शास्त्रीय चर्चाच अद्यापि नाहीं. इंग्रजी भाषेंतले हे शब्द देखील पुष्कळसे जुन्या ग्रीक भाषेवरून घेतलेले आहेत. डेस्पॉटसी, मॉनर्की, ॲरिस्टॉक्रसी, ऑलिगार्की, डेमॉक्रसी, टिमॉक्रसी, ब्युरॉक्रसी, थिऑक्रसी, रिपब्लिक, इ० पण यांपैकीं बरे-चसे शब्द आज उपयोगांतून गेलेले असून मॉनर्की, डेमॉक्रसी हेच काय ते दोन शब्द व दोन वर्ग मुख्य असून पोटभेद सर्व कांहींना कांहीं विशेषण लावूनच बनवावे लागतात. जसें राजा उग्रबल असला तर नुसता मॉनर्की किंवा डेस्पॉ-टसी हा शब्द लावावयाचा. आणि राजा हीनबल असून प्रजा उग्रबल असेल तर लिमिटेड हें विशेषण 'मॉनर्की'च्या मागें लावावयाचें. राज्याचा विस्तार मोठा व त्याचे घटक निरनिराळ्या दर्जाचे असले तर त्यांचा संयोग दाखविणारा शब्द फेडरल हें विशेषण आणि एकतंत्रीपणा दाखविणारा शब्द युनिटरी हेंहि विशेषणच आहे. त्याच्यापुढें गव्हर्नमेंट हें नाम लावावें तेव्हां शब्द खरा पुरा झाला. प्रजासत्तेचा उत्कर्ष दाखविणारा शब्द डेमॉक्रसी. पण यानें राजा मुळींच नाहीं असा बोध हटकून होत नाहीं, म्हणून त्याकरितां रिपब्लिक हा शब्द योज-तात. इंग्लंडांत डेमॉक्रसी आहे पण रिपब्लिक नाहीं.

## ( ८१ ) नांवें व वस्तुस्थिति यांत फरक असतो

पूर्वीच्या काळीं राज्याधिकाराची वांटणी निरनिराळ्या विभागांत हल्लीं इतकी झालेली नसे. तथापि होते तेच भेद निखालस स्पष्ट व तुटक होते. ॲरिस्टॉ-टलच्या वेळीं पर्शिया व मॅसिडोनिया हीं राजशासित राज्यें अशीं होतीं कीं, तेथें खरोखरच 'राजा बोले दळ हाले' ही म्हण अक्षरशः खरी ठरे. ग्रीसमध्यें 'एकलेशिया' हा नगरसंघ इतका प्रबळ होता कीं एकट्या दुकट्या लहानसान नगरसंस्थानानें त्या संघाविरुद्ध तोंडांतून ब्र काढण्याची छाती नव्हती. याच्या उलट इंग्रज राष्ट्र घ्या. त्यांतून अमेरिका आयर्लंड हीं तुटून निघालीं व स्कॉट-लंड जोडलें गेलें असलें तरी ( ऑलिव्हर क्रॉमवेलची वीस वर्षांची कारकीर्द वगळली असतां ) इंग्लंडचें राज्य हें राजशासित आहे. कारण राज्याचा राजा कधींहि नाहींसा झाला नाहीं. त्याच्या जोडीला आज निदान आठशें वर्षें पार्ल-मेंट सभा आहे. आणि असें एकहि शतक गेलें नाहीं कीं त्यांत केव्हां राजानें

केव्हां उमरावसभेनें, तर केव्हां लोकांनीं डोकें मध्येंच एकदम वर काढून सत्ता-विभागणीच्या ताजव्याला जोराचा धक्का देऊन तो उलथापालथा करण्याच्या बेतांत आणिला नाहीं. पण आठशें वर्षें इंग्लंडचें राज्य मॉनर्की, फार तर लिमिटेड मॉनर्की या सदराखालींच पडत आहे. विधवेच्या कपाळाचें कुंकू प्रत्यक्ष पुसलें जाईपर्यंत ती सधवाच. नवरा नापत्ता झाला असला तरी ती सुवासिनीच !

## ( ८३ ) याविषयीं कांहीं उदाहरणें

जर्मनी, पोर्तुगाल, स्पेन, ऑस्ट्रिया इत्यादि कांहीं राष्ट्रें थोड्याच वर्षांपूर्वी मॉनर्की ( राजशासित ) या सदरांत पडत होतीं. आतां तीं लोकशासित (रिपब्लिक्स) झालीं आहेत. पण त्यांच्या अंतर्व्यवस्थेंत अधिकाराची वांटणी सर्वस्वीं वरील नव्या नांवाला शोभण्यासारखी नाहीं. आणि फ्रान्स व अमेरिका या नमुनेदार समजल्या जाणाऱ्या रिपब्लिक्समध्यें लोकसभेच्या मानानें सेनेट ( वरिष्ठ ) सभा थोड्या लोकांची असून, स्वतः दोहो राज्यांचे अध्यक्ष तर इतके मोठे सत्ताधारी आहेत कीं राजशासित म्हटल्या जाणाऱ्या इंग्लंडच्या बिचाऱ्या दुबळ्या राजापेक्षांहि त्यांना अधिक प्रभावी सत्ता आहे. तशीच अमेरिकन सेनेटला इंग्लंडच्या हाऊस ऑफ लॉर्ड्सपेक्षां अधिक सत्ता आहे. इटालींत राजा आहे आणि पार्लमेंटहि आहे. पण प्रत्यक्ष सत्ता एकट्या मुख्य प्रधानाच्या हातीं आहे. कारण 'राजा व्हिक्टर एमॅन्युअल बोले दळ हाले' असें नसून 'प्रधान ( डिक्टेटर ) मुसोलिनी बोले दळ हाले' हे शब्द इटालींत आज खरे आहेत. मुसोलिनीच्या फॅसिस्ट पंथाच्या लोकांना निवडणुकींत चारशें उमेदवार उभे करितां येतात व मतदारांनीं यांतील निम्याहून अधिक पसंत न केले तर एक महिन्यानें फेर निवडणुकी व्हाव्या लागतात.

## ( ८४ ) नावें स्थूल, फरक सूक्ष्म

राज्यसंस्थांचें वर्गीकरण इतकें अवघड होऊन बसण्याचें कारण त्या संस्था सजीव प्राण्याप्रमाणें, विकारक्षम, प्रगतिक्षम, परिवर्तनक्षम आहेत. निर्जीव पदार्थांचें वर्गीकरण सोपें असतें. पण राज्यसंस्था ही जर जिवंत माणसांचीच केव्हांहि असणार तर तीहि स्वतः जिवंत म्हणण्याला काय हरकत किंवा असली तर काय आश्चर्य ! व्यक्तींची समष्टि बनली असतां व्यक्तिगुण तर नष्ट होत नाहींतच, पण कदाचित् समष्टीचे म्हणून कांहीं नवीन गुण तिज-मध्यें प्रगट होत असूं शकतील. नवीन गुण प्रगट होऊन फिरून समष्टीच्या

स्वरूपांत फेरफार झाला म्हणजे तत्त्वतः फिरून वर्गीकरण बदलतें. पण लगेच नवें नांव कोठून आणावयाचें? म्हणून मग जुनेच शब्द वापरावयाचे. पण अर्थात् ते तंतोतंत जुन्या अर्थानें नाहीं; तर बदललेल्या लाक्षणिक अशा नव्य अर्थानें. शास्त्रांतील चमत्कारांच्या किंवा पदार्थांच्या मानानें शास्त्रपरिभाषेचे शब्द कोणत्याहि भाषेंत अपुरेच पडतात. बरें राज्यांतल्या एका घटकाची थोडीशी सत्ता गेली व दुसऱ्या घटकाला थोडी अधिक मिळाली, तर तो सूक्ष्मभेद दाखविणारीं, स्टेशनावरलि माल जोखणारासारखीं शेर अच्छेरहि फरक दाखविणारीं यंत्रें कोठें मिळणार? तात्पर्य, वर्गीकरण व नामकरण हें ज्ञानाचें साधन असलें तरी स्थूल शब्दांनींच निर्वाह करून घेणें प्राप्त आहे.

## (८५) वर्गीकरणापुरती समानता

राज्यशास्त्रांत वर्गीकरण करितांना ज्याप्रमाणें मोठ्या राज्यांबरोबर अगदीं लहान अशा राज्यांचा परामर्ष घ्यावा लागतो म्हणून मागें सांगितलें त्याचप्रमाणें सुधारलेल्या राज्याबरोबर अगदीं मागासलेल्या प्राथमिक स्थितींतल्या किंवा रानटी राज्यांचाहि परामर्ष घ्यावा लागतो. कारण राज्य म्हणजे राज्य. त्याची श्रीमंती गरीबी, सुधारणा कुधारणा ही त्याची त्याला व त्यांतल्या प्रजेला! राज्य-शास्त्र्याला त्याचें काय होय? गरीब व कुरूप झाला तरी तो, श्रीमंताप्रमाणें व सुस्वरूपांप्रमाणें मनुष्यच. त्याला मान कमी असेल व त्याचें अनुकरण कोणीहि करणार नाहीं. परंतु खानेसुमारींत, न्यायकोर्टांत, व कायद्याच्या दृष्टीनें सर्व माणसें सारखींच. शरीराची ठेवण लहानमोठी असली तरी इंद्रियें तींच व तितकींच असणार. राज्यसंस्था कशा असाव्या असलें तात्त्विक विवेचन करणें व उत्कृष्ट तेवढेच नमुने कल्पनेनें सुचविणें हाच राज्यशास्त्राचा हेतु मानला तर, त्या शास्त्रांत असल्या लहान मागासलेल्या रानटी राज्यसंस्थांना जागा मिळणार नाहीं. पण समाजशास्त्र म्हटलें म्हणजे समाजांत माणसें आहेत तशीं घेऊनच चाललें पाहिजे. माणसें देवदूतासारखीं किंवा देवासारखीं सर्वगुणसंपन्न असावीं असें म्हटलें तरी ते गुण कोणते हें सांगणें सोपें आहे. पण त्याचा काय उपयोग? मानवी जग म्हणजे बोलून चालून अपूर्णावस्थेंतल्या माणसांचें जग.

## (८६) घटनेवरून वर्गीकरणाचीं उदाहरणें.

[ अ ] केवळ अनियंत्र राजसत्ता चालते अशीं राज्यें.

( १ ) अबिसीनिया ( २ ) अफगाणिस्तान ( ३ ) मोनॅको ( ४ ) मोरोक्को (५) ओमान ( ६ ) हिंदी संस्थानें इ०

[ आ ] संमिश्र---राजसत्ताक व प्रजासत्ताक ( प्रकार १ ला. )

( १ ) बेल्जियम ( २ ) बल्गेरिया ( ३ ) डेनमार्क ( ४ ) इटाली ( ५ ) जपान ( ६ ) नेदरलँड्स ( ७ ) नॉर्वे ( ८ ) रुमेनिया ( ९ ) स्वीडन ( १० ) युनाइटेड किंग्डम म्हणजे इंग्लंड, स्कॉटलंड, उत्तर आयर्लंड ( ११ ) ऑस्ट्रेलिया ( १२ ) कॅनडा इ०. वरील सर्व राष्ट्रांत पार्लमेंटसभा आहेत.

[ इ ] संमिश्र---राजसत्ताक व प्रजासत्ताक ( प्रकार २ रा. ).

( १ ) लक्सेंबर्ग ( २ ) मॉन्टिनीग्रो ( ३ ) सयाम ( ४ ) सर्विया इ० वरील राष्ट्रांत पार्लमेंट नाहीं, पण राजानें प्रजेला सनद ( कॉन्स्टिटयूशन ) देऊन स्वतःवर बंधन घालून घेतलें आहे.

[ ई ] पूर्ण प्रजासत्ताक ( रिपब्लिक ).

( १ ) रशिया ( २ ) टर्की ( ३ ) ग्रीस ( ४ ) पोर्तुगाल ( ५ ) स्पेन ( ६ ) जर्मनी व प्रशिया ( ७ ) ऑस्ट्रिया ( ८ ) फ्रान्स ( ९ ) चीन ( १० ) स्विट्झरलंड ( ११ ) बोलिव्हिआ ( १२ ) चिली ( १३ ) कोलंबिआ ( १४ ) कोस्टारिका ( १५ ) क्यूबा ( १६ ) इक्वेडोर ( १७ ) ग्यूएटेमला ( १८ ) हयाटी ( १९ ) होंडूरास ( २० ) लिबेरिया ( २१ ) निकारागुआ ( २२ ) पनामा ( २३ ) पॅराग्वे ( २४ ) पेरू ( २५ ) सालवाडोर ( २६ ) सँटो डोमिंगो ( २७ ) युराग्वे ( २८ ) आरजेंटिना ( २९ ) ब्राझिल मेक्सिको ( ३० ) व्हेनिझुअेला ( ३१ ) युनाइटेड स्टेट्स ( अमेरिका ) इ.

वरील राष्ट्रांत पार्लमेंट आहेत व त्यांचे अध्यक्ष हेच मुख्याधिकारी आहेत.

आज बहुतेक सर्व राज्यांत ( अ वर्गांतील राज्यें वगळून ) घटनेदाखल लेखी सनदा किंवा पार्लमेंटनें मंजूर केलेले कायदे आहेत. त्या सनदांप्रमाणें किंवा कायद्याप्रमाणें अंमल होत असतो. पण जेव्हां उत्पात क्रांति वगैरे होते तेव्हां राजा किंवा अध्यक्ष हा ती सनद किंवा तो कायदा बाजूला गुंडाळून ठेवून एकतंत्री अमल चालवितो, अथवा बंड होऊन प्रजा किंवा लष्करी अधिकारी हे राजा किंवा अध्यक्ष यांना गुंडाळून ठेवून नव्या निवडणुकी किंवा घटना बनवितात.

वरीलप्रमाणें कांहीं उदाहरणें केवळ स्पष्टीकरणाकरितां घेतलीं आहेत. पण एकंदर जगांतील राज्यांच्या घटनांचें सामुदायिक स्वरूप लक्षांत यावें म्हणून एक सबंधच्यासबंध कोष्टकच खालीं देतों म्हणजे त्यावरून राज्यघटनांचे कोणते प्रकार आज विद्यमान आहेत हें लक्षांत येईल.

# ( ८७ ) निरनिराळ्या राष्ट्रांतील राज्यांच्या

| राष्ट्र | राजधानी | क्षेत्रफळ चौ. मै. (हजार) | लोकवस्ती लक्षसंख्या | राजा किंवा मुख्य सत्ताधीश |
|---|---|---|---|---|
| अल्बोनिया | तिराना | १७.३ | ८.३ | प्रेसिडेंट |
| अर्जेटिना | ब्यूनॉस, आयर्स | ११५३ | १०३ | प्रेसिडेंट |
| ऑस्ट्रेलिया | कॅंबेरा | ३०६५ | ६१ | गव्हर्नर–जनरल |
| ऑस्ट्रिया | व्हीएन्ना | ३२ | ६५ | प्रेसिडेंट |
| बेल्जियम् | ब्रुसेल्स | १२ | ७८ | राजा |
| बोलिव्हिया | सुक्रेलापाज् | ५१४ | २९ | प्रेसिडेंट |
| ब्राझिल | रियोडिजानिरो | ३२८५ | ३६८ | प्रेसिडेंट |
| बल्गेरिया | सोफाया | ३९ | ५४ | राजा |
| कॅनडा | ओटावा | ३७९७ | ९५ | गव्हर्नर–जनरल |
| चिली | सॅन्शिआग्रो | ९० | ४२ | प्रेसिडेंट |
| चीन | पेकिन | ४२७८ | ४४४६ | सेनापति |
| चीन | नानकिन | | | पोलिटिकल कौन्सिल ( कोमिन्टन ) |
| कोलंबिया | बोगोटा | ४४० | ६६ | प्रेसिडेंट |
| कोस्टारिका | सान्जोसे | २३ | ५ | प्रेसिडेंट |
| क्यूबा | हॅव्हना | ४४ | ३४ | प्रेसिडेंट |

## घटनांची माहिती

| लोकसभा (वरिष्ठ) | | लोकसभा (कनिष्ठ) | | राजकीय पक्षांचीं नांवें |
|---|---|---|---|---|
| निवडलेले | नेमलेले | निवडलेले | नेमलेले | |
| १२ | ६ | ६० | ० | एकच सरकारी पक्ष |
| ३० | ० | १५८ | ० | ( १ ) कॉंझर्वेटिव्ह, ( २ ) रॅडिकल, ( ३ ) सोशिॲलिस्ट |
| ३६ | ० | ७५ | ० | (१) नॅशनॅलिस्ट, (२) मजूर, (३) देशी |
| ५० | ० | १६५ | ० | (१) ख्रिश्चन सोशिॲलिस्ट (२) सोशल डेमोक्रॅट, (३) किसान वर्ग |
| १५३ | ० | १८७ | ० | ( १ ) कॅथोलिक, ( २ ) सोशिॲलिस्ट, ( ३ ) लिबरल |
| २८ | ० | ७२ | ० | ( १ ) लिबरल, ( २ ) युनिअनिस्ट, ( ३ ) रिपब्लिकन |
| ६३ | ० | २१२ | ० | ( १ ) कॉन्झर्वेटिव्ह रिपब्लिकन, ( २ ) डेमोक्रॅटिक |
| २७३ | ० | वेगळी सभा | नाहीं | ( १ ) डेमोक्रॅटिक, ( २ ) शेतकरी, ( ३ ) नॅशनल लिबरल |
| ० | ९६ | २४५ | ० | ( १ ) कॉन्झर्वेटिव्ह, ( २ ) लिबरल, ( ३ ) प्रोग्रेसिव्ह |
| ४५ | ० | १३५ | ० | ( १ ) रॅडिकल, ( २ ) कॉन्झर्वेटिव्ह, ( ३ ) लिबरल |
| ० | ० | ० | ० | |
| ० | ५२ | वेगळी सभा | नाहीं | ( १ ) शांततावादी, ( २ ) सुधारणावादी, ( ३ ) कम्युनिस्ट |
| ६८ | ० | ११२ | ० | ( १ ) कॉन्झर्वेटिव्ह, ( २ ) लिबरल |
| ४३ | ० | वेगळी सभा | नाहीं | ( १ ) नॅशनॅलिस्ट, ( २ ) रिपब्लिकन |
| २४ | ० | १२७ | ० | ( १ ) कॉन्झर्वेटिव्ह, ( २ ) लिबरल |

## निरनिराळ्या राष्ट्रांतील राज्यांच्या

| राष्ट्र | राजधानी | क्षेत्रफळ चौ. मै. (हजार) | लोकवस्ती लक्षसंख्या | राजा किंवा मुख्य सत्ताधीश |
|---|---|---|---|---|
| चेकोस्लोव्हाकिया | प्राग | ५४ | १४३ | प्रेसिडेंट |
| डेन्मार्क | कोपेनहेगेन | १६ | ३४ | राजा |
| डोमिनिका | सॅन्तोडोमिंगो | १९ | १० | प्रेसिडेंट |
| इक्वेडोर | क्विटो | ११६ | १५ | प्रेसिडेंट |
| इजिप्त | केरो | ३८३ | १४१ | राजा |
| एस्टोनिया | टॅलिन् | १८ | ११ | प्रेसिडेंट |
| फिनलंड | हेल्सिंगफोर्स | १४९ | ३५ | प्रेसिडेंट |
| फ्रान्स | पॅरिस | २१२ | ४०७ | प्रेसिडेंट |
| जर्मनी | बर्लिन | १८१ | ६३१ | प्रेसिडेंट |
| ग्रेटब्रिटन | लंडन | | | राजा |
| ग्रीस | अथेन्स | ५० | ७० | प्रेसिडेंट |
| ग्वायटेमाल | ग्वायटेमाल | ४८ | २० | प्रेसिडेंट |
| हायाती | पोर्टऑप्रिंस | १० | २० | प्रेसिडेंट |
| होंडुरास | तेग्युसीगाल्पा | ४६ | ७ | प्रेसिडेंट |

# घटनांची माहिती.

| लोकसभा (वरिष्ठ) | | लोकसभा (कनिष्ठ) | | राजकीय पक्षांचीं नांवें |
|---|---|---|---|---|
| निवडलेले | नेमलेले | निवडलेले | नेमलेले | |
| १५० | ० | ३०० | ० | सात आठ राजकीय पक्ष आहेत. (मुख्य पक्ष शेतकरी) दुसरा कम्युनिस्ट |
| ७६ | ० | १४९ | ० | (१) लिबरल, (२) सोशल डेमोक्रॅट, (३) कॉन्झरव्हेटिव्ह |
| १२ | ० | ३२ | ० | (१) नॅशनल, (२) प्रोग्रेसिव्ह |
| ३२ | ० | ४८ | ० | (१) लिबरल, (२) कॉन्झरव्हेटिव्ह |
| १२१ | ० | २१० | ० | (१) वफाद, (२) लिबरल |
| १०० | ० | वेगळी सभा | नाहीं | (१) शेतकरी, (२) सोशिॲलिस्ट, (३) वसाहती |
| २०० | ० | वेगळी सभा | नाहीं | (१) सोशल डेमोक्रॅट, (२) शेतकरी (३) स्वीडिश, (४) युनियन, (५) मजूर |
| ३१४ | ० | ५६५ | ० | (१) रॅडिकल, (२) रिपब्लिकन व इतर तीन. |
| ४९३ | ० | वेगळी सभा | नाहीं | (१) सोशल डेमोक्रॅट, (२) राष्ट्रीय, (३) कम्युनिस्ट, इतर दोन तीन |
| ० | ७४० | ६१५ | ० | (१) कॉन्झरव्हेटिव्ह, (२) लिबरल, (३) मजूर. |
| २८७ | ० | वेगळी सभा | नाहीं | (१) रिपब्लिकन, (२) रॉयलिस्ट, (३) नेमस्त, (४) कम्युनिस्ट |
| ६९ | ० | वेगळी सभा | नाहीं | (१) डेमोक्रॅट, (२) प्रोग्रेसिव्ह, (३) युनियनिस्ट |
| २१ | ० | वेगळी सभा | नाहीं | पक्षभेद नाहीं |
| ४६ | ० | वेगळी सभा | नाहीं | (१) नॅशनल, (२) लिबरल |

## निरनिराळ्या राष्ट्रांतील राज्यांच्या

| राष्ट्र | राजधानी | क्षेत्रफळ चौ. मै. (हजार) | लोकवस्ती लक्षसंख्या | राजा किंवा मुख्य सत्ताधीश |
|---|---|---|---|---|
| हंगेरी | बुडापेस्त | ३५ | ८३ | रीजंट |
| हिंदुस्थान | दिल्ली | १८०५ | ३१८९ | बादशहा |
| आयर्लंड | डब्लिन | २६ | २९ | गव्हर्नर–जनरल |
| इटाली | रोम | ११९ | ४०५ | राजा |
| जपान | टोकियो | २६० | ८३४ | बादशहा |
| जुगोस्लोव्हिया | बेलग्रेड | ९६ | १२० | राजा |
| लॅट्व्हिया | रिगा | २५ | १८ | प्रेसिडेंट |
| लिबेरिया | मॉनरोव्हिया | ४३ | १५ | प्रेसिडेंट |
| लिथ्यूॲनिया | कॉव्हनो | २१ | २२ | प्रेसिडेंट |
| मेक्सिको | मेक्सिको | ७६७ | १४२ | प्रेसिडेंट |
| नेदरलँड्स् | आमस्टरडॅम् ( हेग ) | १२ | ७४ | राणी |
| न्यूफाउंडलंड | सेंटजॉन | १६२ | २ | गव्हर्नर |
| न्यूझीलंड | वेलिंग्टन | १०३ | १४ | गव्हर्नर–जनरल |

## घटनांची माहिती

| लोकसभा (वरिष्ठ) | | लोकसभा (कनिष्ठ) | | राजकीय पक्षांचीं नांवें |
|---|---|---|---|---|
| निवडलेले | नेमलेले | निवडलेले | नेमलेले | |
| १५२ | ९८ | २४५ | ० | (१) युनियन, (२) ख्रिश्चन नॅशनॅलिस्ट, (३) सोशल डेमोक्रॅट |
| ३४ | २६ | १०३ | ४१ | (१) नॅशनॅलिस्ट, (२) इन्डिपेन्डंट, (३) युरोपियन, (४) मुसलमान |
| ६० | ० | १५२ | ० | (१) सरकारी, (२) पूर्ण स्वराज्यवादी, (३) मजूर, (४) स्वतंत्र |
| ० | ४३० | ३९६ | ० | (१) लिबरल, (२) कॅथोलिक, (३) सोशिऑलिस्ट, (४) कम्युनिस्ट |
| २२० | १८७ | ४६४ | ० | (१) मिनेसिटो, (२) सायुकाय, (३) कुराबू, (४) स्वतंत्र. |
| ३१५ | ० | वेगळी सभा | नाहीं | (१) रॅडिकल, (२) क्रोट शेतकरी, (३) डेमोक्रॅटिक, (४) स्वतंत्र, (५) मुसलमान |
| १०० | ० | वेगळी सभा | नाहीं | (१) सोशल डेमोक्रॅटिक मजूर, (२) शेतकरी |
| १० | ० | २२ | ० | (१) व्हिग, (२) लोकपक्ष |
| ८५ | ० | वेगळी सभा | नाहीं | (१) सोशल, (२) डेमोक्रॅट, (३) ख्रिश्चन डेमोक्रॅट, (४) शेतकरी |
| ५८ | ० | २७१ | ० | तत्त्वनिष्ठ पक्ष नाहीं |
| ५० | ० | १०० | ० | (१) कॅथॉलिक, (२) सोशल डेमोक्रॅट, (३) कॅलव्हिनिस्ट, (४) ख्रिश्चन |
| ० | २१ | ३६ | ० | (१) कॉन्झरव्हेटिव्ह, (२) लिबरल. |
| ० | ४२ | ८० | ० | (१) सुधारणापक्ष (२) मजूर (३) नॅशनॅलिस्ट. |

## निरनिराळ्या राष्ट्रांतील राज्यांच्या

| राष्ट्र | राजधानी | क्षेत्रफळ चौ. मै. (हजार) | लोकवस्ती लक्षसंख्या | राजा किंवा मुख्य सत्ताधीश |
|---|---|---|---|---|
| निकारागुवा | मॅनॅग्युवा | ५१ | ६ | प्रेसिडेंट |
| नॉर्वे | ऑसलो | १२४ | २६ | राजा |
| पानामा | पानामा | ३२ | ४ | प्रेसिडेंट |
| पॅरॅग्वे | असन्‌शिअन् | ६१ | १० | प्रेसिडेंट |
| पर्शिया | तेहरान् | ६२८ | १०० | राजा (लोकनियुक्त) |
| पेरू | लिमा | ५३२ | ५५ | प्रेसिडेंट |
| पोलंड | वारसा | १४९ | २९२ | प्रेसिडेंट |
| पोर्तुगॉल | लिस्बन | ३५ | ६० | सेनापति |
| रुमानिया | बुखारेस्ट | १२२ | १७५ | राजा |
| रशिया | मॉस्को | ८१८७ | १४६३ | संयुक्त-अध्यक्ष मंडळ |
| साल्व्हाडोर | साल्व्हाडोर | १३ | १६ | प्रेसिडेंट |
| सायाम | बँगकॉक् | २०० | ९८ | राजा |
| दक्षिण-आफ्रिका | प्रिटोरिया | ४७१ | ७६ | गव्हर्नर-जनरल |
| स्पेन | माद्रिड | १९० | २२१ | प्रेसिडेंट |
| स्वीडन | स्टॉक-होम | १७३ | ६० | राजा |

## घटनांची माहिती.

| लोकसभा (वरिष्ठ) | | लोकसभा (कनिष्ठ) | | राजकीय पक्षांचीं नांवें |
|---|---|---|---|---|
| निवडलेले | नेमलेले | निवडलेले | नेमलेले | |
| २४ | ० | ४३ | ० | (१) कॉन्झरव्हेटिव्ह, (२) लिबरल, (३) रिपब्लिकन |
| १५० | ० | वेगळी सभा | नाहीं | (१) मजूर, (२) रॅडिकल् (३) कॉन्झरव्हेटिव्ह, (४) शेतकरी |
| ४६ | ० | वेगळी सभा | नाहीं | (१) लिबरल, (२) कॉन्झरव्हेटिव्ह |
| २० | ० | ४० | ० | (१) लिबरल, (२) रिपब्लिकन |
| १३६ | ० | वेगळी सभा | नाहीं | निवडणुकीच्या आयत्यावेळीं बनतील ते पक्ष. |
| ३५ | ० | ११० | ० | (१) डेमोक्रॅटिक, (२) कॉन्स्टिट्यूशनल |
| १११ | ० | ४४४ | ० | (१) लोकपक्ष, (२) ज्यूइश्, (३) शेतकरी (४) ख्रिश्चन (याशिवाय अनंत पक्ष आहेत) |
| ७० | ० | १६१ | ० | (१) मॉडरेट, (२) नॅशनॅलिस्ट (३) इन्डिपेन्डंट, (४) राजपक्ष |
| २१९ | ० | ३८६ | ० | (१) नॅशनल लिबरल, (२) शेतकरी, (३) हंगेरियन, (४) जर्मन |
| ४५० | ० | १३५ | ० | (१) कम्युनिस्ट |
| ४२ | ० | वेगळी सभा | नाहीं | तत्त्वनिष्ठ पक्ष नाहीं |
| पांचाचें राजमंडळ | | प्रीव्हि कौन्सिल | | राजकीय पक्ष नाहीं. |
| ४० | ० | १३५ | ० | (१) नॅशनॅलिस्ट, (२) दक्षिण आफ्रिकन, (३) मजूर |
| १५० | ० | २३० | ० | (१) सोशल डेमोक्रॅट, (२) कॉन्झरव्हेटिव्ह, (३) स्वतंत्र, (४) शेतकरी |

## निरनिराळ्या राष्ट्रांतील राज्यांच्या

| राष्ट्र | राजधानी | क्षेत्रफळ चौ. मै. ( हजार ) | लोकवस्ती लक्षसंख्या | राजा किंवा मुख्य सत्ताधीश |
|---|---|---|---|---|
| स्वित्झर्लंड | बर्न | १५ | ३९ | प्रेसिडेंट |
| तुर्कस्थान | अंगोरा | ४९४ | १३६ | प्रेसिडेंट |
| युरुग्वे | मॉंटेव्हिडियो | ७२ | १६ | प्रेसिडेंट |
| व्हेनिझुएला | कॅव्हॅकस | ३९३ | ३० | प्रेसिडेंट |

### टीप--एकट्या इंग्रजी साम्राज्यांतालच वैचित्र्य पहा

इंग्रजी साम्राज्याच्या घटनेचें उदाहरण घेतल्यास त्यासंबंधीं खालील गोष्टी ध्यानांत ठेवण्यासारख्या आहेत. हें साम्राज्य क्षेत्रविस्तारानें खुद्द इंग्लंडपेक्षां एक्याण्णव पट मोठें आहे. इंग्लंड हा त्याचा $\frac{1}{90}$ अंश आहे ! या साम्राज्याची लोकसंख्या बेचाळिस कोटी आहे. यांतील अवघे साडेपांच कोटी लोक वंशानें युरोपियन आहेत. साम्राज्याच्या घटकांचे सहा मुख्य गट होतात. (१) युरोपमधील--इंग्लंड, स्कॉटलंड, आईल ऑफ मॅन, चॅनल आयलंड्स, जिब्राल्टर, माल्टा, सायप्रस. (२) उत्तर अमेरिकेंतील कॅनाडा, न्यूफाउंडलंड, लाब्राडोर, ब्रिटिश ग्वायाना, होंडूरास, फॉकलंड बेटें, व बरम्यूडा. (३) ऑस्ट्रेलियांतील--ऑस्ट्रेलिया, न्यूझीलंड, फिजीन्यूग्वायना. (४) आफ्रिकेंतील--नाताल, ट्रान्सवाल,

## घटनांची माहिती

| लोकसभा (वरिष्ठ) | | लोकसभा (कनिष्ठ) | | राजकीय पक्षांचीं नांवें |
|---|---|---|---|---|
| निवडलेले | नेमलेले | निवडलेले | नेमलेले | |
| ४४ | ० | १९८ | ० | ( १ ) रॅडिकल डेमोक्रॅट, ( २ ) सोशल डेमोक्रॅट, ( ३ ) कॅथॉलिक, ( ४ ) शेतकरी |
| ३१६ | ० | वेगळी सभा | नाहीं | लोकपक्षाशिवाय दुसरा पक्ष नाहीं |
| १९ | ० | १२३ | ० | ( १ ) भांडवलवाला, ( २ ) कोलोरेडो |
| ४० | ० | ६८ | ० | मुख्य लष्करी सत्ता, पक्षभेद नाहीं |

केप कॉलनी, ऑरेंजरिव्हर स्टेट, ऱ्होडेशिया, नायजेरिया, सेंट हेलिना, मॉरिशिअस व संरक्षित संस्थानें इ० ( ५ ) आशिया खंडांतील—हिंदुस्थान, सिलोन-हाँगकाँग, स्ट्रेट सेटलमेंटस, मलाया संस्थानें, लॅन्युअन, बोर्निओ, सारावाक, ( ६ )वेस्टइंडिआ बेटें—जमेका, बहामा, बारबेडॉस, त्रिनिदाद, टोबॅगो, विंडवर्ड व लीवर्ड बेटें. इ०. अशा या प्रचंड साम्राज्याच्या घटकांचें वर्गीकरण करणें फार कठीण आहे. पण त्याचे चार गट होतात. ( १ ) जबाबदारीचें स्वराज्य मिळालेल्या वसाहती ( २ ) अद्यापि तसलें स्वराज्य नसलेल्या पण कायदे-कौन्सिलें असलेल्या ( ३ ) वसाहतमंत्र्याचा अमलाखालच्या. ( ४ ) बादशहाच्या सत्तेखालचें पण कायदेकौन्सिलें असलेंलें हिंदुस्थान.

## ( ८८ ) वैचित्र्यावरून बोध

निरनिराळ्या राष्ट्रांतील राज्यांच्या घटनांच्या माहितीचा हा तक्ता निरनिराळ्या पुस्तकांच्या आधारानें तयार करून दिला आहे. तो बारीक दृष्टीनें पाहणाराला फार बोधप्रद होईल असा भरंवसा आहे. कोठें क्षेत्रफळ पुष्कळच पुष्कळ व त्या मानानें लोकवस्ती फार कमी, तर कोठें क्षेत्रफळ बेताचें असून त्यांतील लोकवस्ती खूप दाट. राज्यांतील मुख्य सत्तेसंबंधानें असें दिसून येईल कीं, आजच्या घटकेला फक्त बेलजिअम्, बल्गेरिया, डेन्मार्क, इजिप्त, ग्रेटब्रिटन, इटाली, जुगोस्लेव्हिया, नेदरलँड्स, नार्वे, रुमानिया, सयाम व स्वीडन इतक्या राष्ट्रांत राजा हा मुख्य व अर्धनियंत्रित सत्ताधारी आहे. पर्शियाचा राजा हा अनियंत्रित सत्ताधारी असला तरी तो लोकनियुक्त आहे. ज्या देशांवर बादशहा राज्य करतो असे फक्त दोनच. एक हिंदुस्थान व दुसरा जपान. तथापि या दृष्टीनें या दोन देशांत सारखेपणा दिसला तरी जपानचा बादशहा हा सर्वस्वीं स्वकीय व राष्ट्रीय असा आहे. हिंदुस्थानचा बादशहा हा केवळ नांवाचा व परकी बादशहा असून सर्व कारभार त्याच्या नांवानें संयुक्त प्रधानमंडळ व प्रधानमंडळाच्या नांवानें खास हिंदुस्थानाकरितां नेमलेला एक स्टेट सेक्रेटरी करितो. वरील कोष्टकांत गव्हर्नर-जनरल असलेले असे देश पांच आहेत. त्या इंग्लंडच्या वसाहती होय. ( न्यू फाउंडलँड हीहि एक वसाहतच आहे. पण तेथील सत्ताधाऱ्याला गव्हर्नर म्हणतात. ) हिंदुस्थानांतील मुख्य सत्ताधाऱ्यालाहि गव्हर्नर-जनरलच म्हणतात; पण हिंदुस्थान हें बादशहाच्या अमलाखालील असल्यामुळें येथील गव्हर्नर-जनरलला व्हाइसरॉय म्हणजे राजप्रतिनिधि अशीहि पदवी आहे. वरील देश वगळले असतां बाकी सर्व देशांत आज लोकसत्ताक राज्यें आहेत; व त्यांच्या अध्यक्षांच्या जागीं ' सिव्हिलियन ' अध्यक्ष आहेत. परंतु स्पेन, पोर्तुगॉल, चीन वगैरेसारख्या राज्यांत अजून लोकसत्ता स्थिर झालेली नसल्यामुळें तेथील अध्यक्ष हे लष्करी असतात व ते अध्यक्षपदाबरोबर सेनापतिपदाचा अधिकार गाजवितात. रशियामध्यें अर्थात् सर्व लोकसत्ताक राज्येंच आहेत. पण मुख्य राज्य निरनिराळ्या लोकसत्ताक राज्यांचें संयुक्तमंडळ असून वरिष्ठ राजकीय सत्ताहि संयुक्त अध्यक्षमंडळाच्या हातीं आहे. त्याचप्रमाणें चीनमध्येंहि दोन राजधान्या व दोन प्रजासत्ताक राज्यें असून मुख्य राजसत्ता पोलिटिकल कौन्सिलच्या हातीं आहे.

## ( ८९ ) वैचित्र्याचा तपशील

कार्यकारी अधिकाऱ्यांसंबंधानें असें दिसतें कीं, प्रायः एक मुख्य प्रधान व त्याच्याबरोबर काम करणारे इतर कांहीं प्रधान मिळून संयुक्त प्रधानमंडळ असतें. जेथें मुख्य सत्ताधीश राजा असतो तेथें निरनिराळ्या प्रधानांची नेमणूक राजा करितो व जेथें लोकसत्ताक राज्य असल्यामुळें ती सत्ता प्रेसिडेंटच्या हातीं असते तेथें त्या नेमणुकी प्रेसिडेंट करतो. तथापि कांहीं ठिकाणीं तरी हा नेमणुकीचा अधिकार केवळ औपचारिक रीत्याच बजावला जात असून, एकंदर राज्यकारभाराची जबाबदारी मुख्य प्रधानावर असल्यामुळें, त्याला आपले सह-कारी मंत्रि पसंत करण्याचा अधिकार असतो. तो ज्यांचीं नांवें पुढें करील त्यांना राजा किंवा प्रेसिडेंट नेमतो; सहसा हरकत घेत नाहीं. क्वचित् एखाद्या ठिकाणीं मुख्य प्रधान, राजा किंवा प्रेसिडेंट यांचा एखाद्या व्यक्तीसंबंधानें मतभेद झाला तर त्याचा निकाल परिस्थितीप्रमाणें, म्हणजे जो कोणी प्रबळ असेल त्याच्यासारखा होतो. प्रधानमंडळांत प्रधान किती असावेत याची संख्या अर्थातच ठरलेली नसते. राज्य लहान मोठें असेल त्याप्रमाणें खातीं कमी किंवा पुष्कळ असतात व त्या मानानें प्रधानांची संख्या असते. सर्वच प्रधानांना कायदेमंडळांत स्थान असतें किंवा प्रत्येक प्रधान हा कोणत्या तरी एखाद्या खात्याचा मुख्य असतोच असें नाहीं. विलायतेंत दोन्ही प्रकार आढळतात. म्हणजे प्रधानमंडळांत समावेश असूनहि विवक्षित खात्याचें काम त्याजकडे नसतें. उलट खात्याचें काम जरी एखाद्या प्रधानाकडे सोंपविलेलें असतें तरी प्रधानमंडळाच्या सभेंत त्याला खुर्ची असतेच असें नाहीं.

## ( ९० ) कायदेमंडळाची बाब

बहुधा प्रत्येक राष्ट्रांत पार्लमेंट किंवा लोकसभा ह्या दोन असतात. तथापि वरील तक्त्यांत एकच लोकसभा असणारीं राष्ट्रें कांहीं आहेत. तीं अशीं : बल्गेरिया, चीन, कोस्टारिका, एस्टोनिया, फिनलंड, जर्मनी, ग्रीस, ग्वायटेमाल, हयाती, होन्डुरास, जुगुस्लेव्हिया, लटेव्हिया, लिथ्यूॲनिया, नॉर्वे, पनामा, पर्शिया, साल्व्हाडोर, तुर्कस्थान. दोन लोकसभा असणाऱ्या राष्ट्रांची संख्या मात्र पुष्कळ आहे. दोन वेगळ्या लोकसभा करण्याचे मुख्य दोन हेतु असतात. प्रजाजनांमध्यें सर्व लोक एकाच दर्जाचे किंवा हितसंबंधाचे असत नाहींत. यामुळें वरिष्ठ सामाजिक दर्जाचे प्रतिनिधि सामान्य जनतेच्या प्रतिनिधींपासून

वेगळे बसावे हा एक हेतु. दुसरा हेतु हा कीं जर खालच्या लोकसभेंत उतावळे-पणानें किंवा अविचारामुळें एकदम कांहीं गोष्टी घडल्या तर त्यांचा फेरविचार होऊन त्या बदलण्याला संधि मिळावी. खालच्या सभेंतील काम वरच्या सभेंत तयार होऊन जाईपर्यंत सहजच कांहीं वेळ जातो. या अवधींत खालच्या सभेंत अविचार किंवा चूक झाली असेल तर ती बाहेर पडते. तीच अवधि देशांतील सर्वसामान्य लोकमत प्रगट होण्याला उपयोगीं पडते, आणि त लोक-मत लक्षांत घेऊन झालेली चूक किंवा अविचार वरिष्ठ सभेला दुरुस्त करितां येतो.

## ( ९१ ) कायदेमंडळाचें द्विदळ

हा अर्थात् केवळ चांगल्या दृष्टीचा खुलासा झाला. पण त्यालाच एक वाईटहि दृष्टि असूं शकते. ती अशी कीं वरिष्ठ सामाजिक दर्जाच्या लोकांना कोणच्याहि गोष्टींत एकदम फेरबदल व्हावा अशी इच्छा नसते. जें आहे तें तसेंच राहण्यांत प्रायः त्यांचें हित असतें. वरिष्ठ सभेंतले लोक कांहीं कांहीं ठिकाणीं स्वतः राजा किंवा प्रेसिडेंट नेमतो. यामुळें त्यांची इच्छा व लोकमत यांत विरोध उत्पन्न झाला असतां वरिष्ठ सभांतले लोक हाताशीं धरून त्यांना आपलें काम करून घेतां येतें. किंवा वरिष्ठ सभेचे लोक राजानें न सांगतां त्याची इच्छा काय असावी हें तर्कानें जाणूनहि अमलांत आणतात. ज्या वरिष्ठ सभांतून सगळे सभासद लोकांनीं निवडून दिलेलेच असतात तेथें ही वाईट दृष्टि लावण्याचें कारण नाहीं. तेथें पहिली म्हणजे भलेपणाची दृष्टि लावणेंच बरोबर होईल. पण जेथें वरिष्ठ सभेंतील सभासद राजा नेमतो तेथें त्या सभेच्या हेतूकडे वाईट दृष्टीनें पाहिलें असतां फारशी चूक होणार नाहीं. हिंदुस्थानांतील वरिष्ठ व कनिष्ठ लोकसभांमध्यें अद्यापि सरकार बरेच सभासद नेमतें. मग ते प्रत्यक्ष त्यांचे पगारी नोकर व अधिकारी असोत, किंवा बिनपगारी बिनअधिकारी असोत. ही संख्या इतरांच्या मानानें थोडी असली तरी ती फार वजनदार व महत्त्वाची ठरते, व या थोड्यांवर सर-काराला पुष्कळ काम करून घेतां येतें. विलायतच्या पार्लमेंटचे दोन भाग असून त्यांतील वरिष्ठ सभेचा प्रत्येक सभासद स्वतः राजानें नेमलेला असो, किंवा पूर्वकालीं राजानें नेमलेल्या लोकांचे वंशज वंशपरंपरेच्या हक्कानें त्या सभेंत बसणारे असोत. या सभेंतील कांहीं उमराव लोक दहा दहा, वीस वीस पिढ्यांचे

आहेत. जसें लॉर्ड सॅलिस्बरी. कांहीं सभासद् मात्र अंगीं योग्यता असतांहि इतर कारणांनीं, कनिष्ठसभेच्या निवडणुकीस उभे न राहणारे असे असतात. पण व्यक्तिशः त्यांचा सन्मान करावा किंवा त्यांच्या अनुभवांचा फायदा घेतां यावा म्हणून त्यांना उमराव बनवून वरिष्ठ सभेंत स्थान दिलेलें असतें. उदाहरणार्थ, लॉर्ड मोर्ले, लॉर्ड स्नोडन. या लोकांची नेमणूक राजानें केली म्हणून ते कांहीं राजाला खूष करण्याकरितां हवें तसें मत देतील अशी कोणाची समजूत नसते. ते पूर्वीच्या आपल्या राजकीय पक्षाचीं मतें घेऊनच वरिष्ठ लोकसभेंत जातात; व त्यांचें नांव उमरावपटांत दाखल झालें म्हणून कांहीं ते दिलानें मिजासखोर किंवा सरदारी थाटाचे बनत नाहींत.

### (९२) वरिष्ठ सभा नष्ट होणार?

पण असल्या सभासदांचें प्रमाण एकंदर संख्येशीं थोडें असल्यामुळें विलायतेंतील ही वरिष्ठ सभा अजूनहि पुराणमतवादी किंवा राजपक्षपाती किंवा जनताहितविरोधी असल्याचें अनुभवाला येतें. वरिष्ठ व कनिष्ठ असा दोन्ही सभांची संमति मिळाल्याशिवाय कोणताहि कायदा पास होऊं शकत नाहीं. म्हणजे कोणतीही सुधारणा होऊं शकत नाहीं आणि वरिष्ठ सभेंतील बहुमत पहावें तर तें नेहमीं वर दर्शविल्याप्रकारचें. यामुळें ही वरिष्ठ सभा, तिला सरकारी जमाखर्चासंबंधीं कोणताहि अधिकार नाहीं तरी, अशी कांहीं एक अडचण होऊन बसलेली आहे कीं, ती मोडून टाकावी असें लोकमत प्रगट होऊं लागलें आहे. पण ती मोडून टाकणें म्हणजे राज्याचा एक जिव्हाळ्याचा मोठा अवयव कापून टाकण्यासारखें अवघड होऊन बसतें. ही अडचण भागविण्याची एक युक्ति अशी आहे कीं, हल्लींच्या लोकसत्तेच्या दिवसांत जबाबदार मुख्य प्रधानाचें राजाला ऐकावेंच लागतें, मग तें त्याला आवडो वा न आवडो. त्याप्रमाणें मुख्य प्रधानानें शिफारस केल्यास राजा नवीन उमराव बनवून त्यांना वरिष्ठ सभेंत स्थान देतो. पण मुळांतच वरिष्ठ सभेची सभासदसंख्या इतकी मोठी आहे कीं अशा आयत्या वेळीं नेमलेल्या उमरावांनीं बहुमताचा पाडाव होणें जवळ जवळ अशक्य असतें. शेवटीं या त्रासाला कंटाळून सन १९११ सालीं ॲस्क्विथसाहेब हे मुख्य मंत्री असतां, कनिष्ठ सभेनें असा कायदा केला कीं, कनिष्ठ सभेनें कोणताहि कायदा एकाच वर्षांत लागोपाठ तीन वेळ मंजूर केला तर मग त्याला वरिष्ठ सभेच्या संमतीची जरूरी नाहीं. अर्थात् असे प्रसंग

थोडेच येणार. कारण वरिष्ठ सभा अलिकडे लोकमताला भिऊन कनिष्ठ सभेचें मन अधिकाधिक संभाळूं लागली आहे. पण अजूनहि एखादे वेळीं खटका उडतोच.

## ( १३ ) वैचित्र्याची मीमांसा

विद्यमान राष्ट्रांतील कोणत्याहि एका राष्ट्राची घटना दुसऱ्या कोणत्याहि राष्ट्राच्या घटनेसारखी तंतोतंत नाहीं. यामुळें तुलनाच करावयाच बसल्यास बारकाव्याचा तपशील किती तरी निघेल. आणि त्या पलीकडे गेलें असतां प्रत्येक राष्ट्राच्या घटनेचा इतिहासहि असाच आढळेल. यांतील मुख्य राष्ट्राच्या घटनेसंबंधानें स्वतंत्र असे, मोठमोठे ग्रंथच झालेले आहेत. आम्हांस प्रस्तुत ग्रंथांत हा इतिहास पाहण्याचें तर कारण नाहींच, पण वर दर्शविलेला भेदद्‌दर्शक तपशिलाचा सगळा बारकावाहि पाहण्याचें कारण नाहीं. राज्यघटनांचा तौलनिक अभ्यास करणें हा एक स्वतंत्र अभ्यासाचाच विषय होतो. पण राज्यशास्त्राच्या केवळ मूलतत्त्वांच्या दृष्टीनें पाहावयाचें तर इतक्या तपशिलांत किंवा बारकाव्यांत शिरण्याचें कारण नाहीं. त्यांतल्या त्यांत लक्षांत घेण्यासारख्या ज्या थोड्या बाब आहेत त्यांचा समावेश वरील कोष्टकांत झालाच आहे. प्रत्येक राष्ट्राची राज्यघटना एकाच वेळीं बनलेली नाहीं. किंवा मूळ एकाच नमुन्याबरहुकूम सर्वांनीं बनविलेली नाहीं. त्या घटना बनत बनतच बनलेल्या आहेत. आणि त्यांतील प्रत्येक घटनेंत त्या त्या राष्ट्राचा राजकिय इतिहास, विद्यमान राजकीय परिस्थिति व समाजाच्या संस्कृतीचें वैशिष्ट्य, यांचा सुगावा लागण्यासारखा आहे. या तीन गोष्टींचें मिळून फळ म्हणजे ती विशिष्ट घटना होय. यालाच इंग्रजींत राष्ट्राची 'जीनिअस' असें म्हणतात. बंगालचे पुढारी दासबाबू हे हिंदुस्थानाला स्वराज्य मागत तेव्हां नेहमीं असें एक वाक्य म्हणत असत कीं, " हिंदुस्थानला स्वराज्य तर पाहिजेच. पण त्याचें निश्चित स्वरूप काय असावें हें हिंदुस्थानाच्या ' जीनिअस ' ला म्हणजे विशिष्ट स्वभावाला अनुरूप असेंच असलें पाहिजे. " ह्या त्यांच्या म्हणण्यांत पुष्कळच स्वारस्य होतें. कारण हिंदुस्थानचें स्वराज्य विलायतच्या स्वराज्याच्या नमुन्यावर सहजच बनविलें जावयाचें, पण विलायतेंत जी पार्लमेंटची पद्धति अमलांत आहे, तीच सर्वस्वीं हिंदुस्थानाला उपयोगी पडेल असें नाहीं. परिस्थितीप्रमाणें त्यांत अवश्य फेरबदल करावा लागेल.

## ( ९४ ) मनाला मानेल ती घटना !

इंग्लंडची राज्यघटना आज आठशें वर्षें अमलांत असतां तिला कायदेशीर स्वरूप देणारा असा कोणताहि एक कायदा नाहीं कीं ज्यांत त्या घटनेचीं सर्व अंगें विधिनियमांच्या रूपानें लिहिलेलीं सांपडतील. हिंदुस्थानांत पहावें तों अलीकडचा राजकीय घटनेचा इतिहास परक्यांनीं आपल्या दृष्टीनें व आपल्या सत्तेनें हवा तसा बनविलेला आहे. त्यांनीं ना धड विलायतेची घटना इकडे अमलांत आणली, वा ना धड इकडच्या राज्यव्यवस्थेचे जुने नमुने पाहून त्याप्रमाणें ती बनविली. हिंदुस्थानचा इतिहास वेगळा, पूर्व परंपरा वेगळी, संस्कृति वेगळी, अनुभव वेगळा, फार काय पण रहाणसिवरणी, उद्योगधंदे व एकंदर परिस्थिति वेगळी आहे. अर्थात् थेट विलायतचा नमुना इकडील स्वराज्यघटनेला उपयोगी पडण्यासारखा नाहीं. खुद्द ब्रिटिश साम्राज्यांत एक दोन शतकें अंगीं मुरलेल्या इंग्रजी संस्कृतीचा पगडा मनावर असलेल्या, व स्वराज्याच्या मार्गावर पहिलीं चार पावलें इंग्रज मुत्सद्यांचा हात धरून टाकणाऱ्या हिंदुस्थानची जर ही स्थिति तर इतर खंडांतील स्वतंत्र राष्ट्रांची स्थिति राज्यघटनेसंबंधानें कशी काय असेल हें सांगावयास नको. म्हटलें तर जगांत जें चांगलें दिसेल त्याचें अनुकरण करण्याची बुद्धि सर्वांना सहजच असते. पण हें अनुकरण करतांना कोणी कोणाचा बांधलेला नसल्यामुळें प्रत्येक राष्ट्रानें आपली स्वराज्यघटना आपल्या मनासारखी बनवावी हें अगदीं सरळ आहे.

## ( ९५ ) पण मूळ तत्त्व एकच

पण रुचिस्वातंत्र्य कोणीं कितीहि ठेवलें तरी वैचित्र्याला मर्यादा ही असणारच. याचें कारण वर सांगितल्याप्रमाणें अनुकरणबुद्धि हें एक असून, शिवाय मनुष्यस्वभाव बहुधा जगभर सारखाच असतो हें त्याहून विशेष कारण होय. अर्थशास्त्रांत ज्याप्रमाणें स्वार्थी बुद्धीचा मनुष्य घेऊनच पुढें विचारास सुरुवात होते, त्याप्रमाणें राजकारणांत मनुष्य हा स्वातंत्र्यप्रिय आहे, असें घेऊनच मग पुढें विचार चालवावा लागतो. म्हणून मनुष्य परतंत्रतेच्या जाळ्यांतून निघून स्वतंत्र होण्याचा प्रयत्न करीत असतां, त्या प्रयत्नांत राज्यघटनेविषयीं सुचणाऱ्या कल्पना बहुधा सर्वांना सारख्याच सुचणार. यामुळें हळूहळू राजतंत्र राज्यपद्धति नष्ट होऊन प्रजातंत्र–पद्धति चहूंकडे स्थापित झालेली आढळून येते. ज्या देशांत अजून एकतंत्री राजा उरला आहे असे देश केवळ अपवाद म्हणूनच उरलेले

आहेत; आणि अशा राष्ट्र हाताच्या बोटांवर मोजण्याइतकींहि उरलेलीं नाहींत. राजाच्या जागीं प्रेसिडेंट किंवा अध्यक्ष आला म्हणजे तो लोकनियुक्त असतो ह्यांतच त्याच्या एकतंत्री किंवा जुलमीपणाविरुद्ध पहिली जामिनकी मिळते.

## ( ९६ ) राजा कां नको ? अध्यक्ष कां हवा ?

तात्त्विकदृष्ट्या अमेरिकन रिपब्लिकच्या अध्यक्षाला कांहीं कांहीं अधिकार टर्कीच्या सुलतानाप्रमाणें अगदीं अमर्याद आहेत असें कदाचित् वकिली पद्धतीनें दाखवून देतां येईल. परंतु प्रत्यक्ष अनुभवाच्या दृष्टीनें हे अमर्याद अधिकार खरे नाहींत. निदान लोकांना इतकें समाधान असतें व पुरतें कीं आपणच निवडून दिलेला मनुष्य, तेव्हां तो अधिकार गाजवील तर बहुधा आपल्याच हिताकरितां गाजवील ! त्यानें तो अधिकार गाजविणें हें त्याच्या जुलमाचें लक्षण नसून आपल्या हस्तकाच्या अलौकिक शहाणपणाचें किंवा अलौकिक लोकहितबुद्धीचें लक्षण समजण्यास काय हरकत ? जुन्या राजाप्रमाणें त्याच्या ठिकाणीं सत्तेचा अभिलाष दिसला तरी तो स्वार्थमूलक नाहीं. जुन्या राजांच्या सत्तेचें पर्यवसान त्यांची स्वतःची मिजास, चैन, वैभव, दुर्गुण, व्यसनें इत्यादिकांमध्यें होत असे, त्याप्रमाणें तरी लोकनियुक्त अध्यक्षाच्या सत्ताभिलाषाचा प्रकार नाहीं असें म्हणणें सयुक्तिक ठरतें. जुने राजे जन्मतः राजे होते, तसे मरतांनाहि आपण रहावें अशी इच्छा त्यांना असे. आपले पूर्वज राजे होते तसेच आपले वंशजहि राजे रहावे अशी त्यांना इच्छा. पण रिपब्लिकचा लोकनियुक्त अध्यक्ष हा काय चार दोन वर्षें स्थानापन्न असेल तेवढाच. ती मुदत संपली म्हणजे तो नदींतील पाण्याच्या बिंदूप्रमाणें पुन्हां समाजांत मिसळून जावयाचा. सांगण्याचें तात्पर्य असें कीं, राज्यघटनांचा विचार करितांना पहिली बाब लक्षांत घ्यावयाची ती ही कीं, राज्य राजतंत्र आहे कीं प्रजातंत्र आहे; आणि हें पहातांना जन्मसिद्ध राजा जाऊन त्याचे जागीं लोकनियुक्त प्रेसिडेंट किंवा अध्यक्ष आला इतकें दिसलें म्हणजे, तात्त्विक राज्यशास्त्राच्या दृष्टीनें, ह्या अध्यक्षाला अधिकार काय आहेत याची तुलना तपशीलवार करीत बसण्याचें कारण उरत नाहीं.

## ( ९७ ) एकच प्रमाण सांपडणें कठीण

यानंतरची गोष्ट मंत्रिपदाची. स्वतः अध्यक्षच जर लोकनियुक्त झाला तर प्रधान किंवा प्रधानमंडळ हें लोकांना जबाबदार होणार हें सांगावयास कशाला

पाहिजे ! मग पडचाकर हा जसा चाकरानें नेमावा; त्याप्रमाणें प्रधानमंडळ हें लोकांनीं निवडलेलें नसून अध्यक्षानें नेमलेलें असलें तरी त्यांत फारसें कांहीं बिघडत नाहीं. यानंतर पार्लमेंट किंवा विधिमंडळें यासंबंधानें पाहतां आज जगांतील राष्ट्रांत वरिष्ठ व कनिष्ठ अशीं दोन प्रकारचीं वेगळीं मंडळें किती राष्ट्रांत आहेत, व एकाच विधिमंडळावर किती राष्ट्रांत काम भागवून घेतलें जातें हें वर सांगितलेंच आहे. विधिमंडळाच्या सभासदांची संख्या किती असावी याविषयीं ठराविक प्रमाण असें नाहीं, तर सामान्यतः प्रजेला आपण प्रतिनिधि निवडून दिला ही जाणीव उत्पन्न होण्याइतकें तें प्रमाण असलें म्हणजे झालें. ह्यापलीकडे जाऊन स्वतः मतदाराची लायकी काय असते ह्याचा विचार करावयास गेलों तर मतदाराच्या पात्रतेला ठराविक असें प्रमाण मुळींच आढळणार नाहीं. विलायतेंत आज शेंकडों वर्षें पार्लमेंट हे मतदार लोक निवडून देत असतां अजूनहि मतदाराची पात्रता, मतदारीचे गट, इत्यादि बाबींसंबंधानें लोक असंतुष्टच आहेत. पण या असंतोषांत फारसें महत्त्व नाहीं. कारण कोणाच्याहि पद्धतींत असंतोष राहाणारच. यानंतर राष्ट्रांतील राजकीय पक्ष. ह्यांना वास्तविक कोणत्याहि राज्याच्या घटनेंत कायदेशीर असें स्थान नाहीं, किंवा त्यांचा नामानिर्देशहि नाहीं. म्हणजे कायद्यांतून नव्हे तर वस्तुस्थितींतून निर्माण झालेली अशी ती एक संस्था आहे. पण मौज अशी कीं, तीच इतकी प्रबळ ठरते कीं पार्लमेंट, प्रधानमंडळ व प्रेसिडेंट ह्यांच्या निवडणुकी व कांहीं मुदतीपर्यंतचा एकंदर राज्यकारभार ह्या संस्थेच्या करांगुळीवर खेळविला जातो. असो; राज्यघटनांच्या कांहीं अंगांचा विचार स्थूल दृष्टीनें येथें केला आहे. तथापि या अंगांचा विचार पुढेंहि मधून मधून येण्यासारखा आहे व येईल.

---

# भाग ४ था

## राष्ट्रव्यक्ति व राष्ट्रसंघ

### (९८) व्यवहारक्षम राष्ट्र

एका बाजूला एक मनुष्यव्यक्ति व दुसऱ्या बाजूला राष्ट्रसंघ हीं दोन टोंकें घेतलीं असतां तीं कल्पनागम्य तर खरींच; पण व्यवहारांत या दोहोंचा फारच थोडा उपयोग होतो. एकटा एक मनुष्य कोठें कोणीं पाहिला आहे काय !

कारण ह्याला पाहिला म्हटलें म्हणजे तेथें पाहणारा कोणी दुसरा आलाच, व तो पाहिल्याचें कोणाला सांगावयाचें म्हटलें म्हणजे तिसराहि आलाच. पण ही काल्पनिक स्थिति आतां मुलांच्या गोष्टींतहि सांगण्यासारखी राहिली नाहीं. सगळें जगच्याजग धुंडाळून निघालेलें आहे. आणि आज दक्षिण अमेरिकेच्या किंवा उत्तर अमेरिकेच्या टोंकाला एखाद्या, कोणीं न धुंडाळलेल्या अशा निबिड अरण्याच्या कोपऱ्यांत जर नवीन मनुष्यवसती सांपडली तर, ती तेथेंहि कुटुंबाच्या स्वरूपांतच काय पण ग्रामसंस्थेच्या स्वरूपांतहि सांपडण्याचा संभव आहे. टोळ्याटोळ्यांनीं वागणाऱ्या जनावरांच्याहि मागें मनुष्य आतां खास राहिलेला नाहीं. उलटपक्षीं एखादा राष्ट्रसंघ कितपत कार्यक्षम होईल, व त्याचा उपयोग किती थोड्या प्रसंगीं होईल, हेंहि आपण पाहतोंच. अशा रीतीनें दोन्हीं अव्यवहार्य टोंकें बाजूला ठेवून देऊन त्याच्या अलिकडे, म्हणजे मध्य बिंदूकडे, येत येत आपण पाहूं लागलों म्हणजे, हल्लीं राष्ट्र हीच राज्यसंस्था सर्वांत अधिक व्यवहार्य अशी आढळते. सर्वांत अधिक व्यवहार्य याचा अर्थ असा कीं, राष्ट्र हें आपल्यापुरतें भरीव, आपल्या सर्व गोष्टींच्या गरजा भागविणारें, स्वतःचें पालनपोषण व संरक्षण करणारें, आपलेपणा परकीपणा यांमधील निश्चित रेघ ओढणारें, परराष्ट्राशीं व्यवहार कोणता ठेवावयाचा, कोणता ठेवावयाचा नाहीं व ठेवावयाचा तो कोणत्या शर्तीवर ठेवावयाचा हें सर्वस्वीं आपल्या इच्छेवर ठरविणारें, आपल्या क्षेत्रमर्यादेंतील प्रजा व्यक्तीला किंवा नागरीक व्यक्तीला शिस्त लावून त्याच्याशीं निग्रहानुग्रहाचा योग्य तो संबंध ठेवणारें, असें आहे.

## ( ९९ ) राष्ट्रव्यक्ति

अंकगणितांतील एकाचा आंकडा म्हणून मागें सांगितला तो हा होय. ह्याच्या आधारानेंच मूलभूत पूर्णांक गणिताचे सर्व प्रकार म्हणजे बेरीज, वजाबाकी, गुणाकार वगैरे होऊं शकतात. यामुळें राज्यसंस्थेविषयीं जें जें कांहीं बोलावयाचें तें तें राष्ट्र या नांवानें बोललें म्हणजे सार्थ, प्रयोजक व सुसंगत असेंच होईल. राष्ट्र म्हणजे राष्ट्र–पुरुष. म्हणजे समजा कीं, जशी कांहीं एक व्यक्तीच. 'अ' राष्ट्राचा प्रजाजन 'ब' राष्ट्रांत असतां, त्याच्यावर जर अन्याय, जुलूम झाला तर, 'अ' राष्ट्र हें त्या एकट्याएक प्रजाजनाच्या ठिकाणीं स्वतः आपण होतों किंवा आहों अशी कल्पना करून घेतें, व त्या परराष्ट्राविरुद्ध आपले राष्ट्रीयत्वाचे हक्क सांगून, बजावून, नुकसानभरपाई मागून, अपमानाचा प्रतिकार

म्हणून माफीची मागणी करून, व या गोष्टी न होतील तर युद्धाला प्रवृत्त होऊन आपले राष्ट्र या नात्यानें हक्क बजावून घेतें. सुमारें पाऊणशें वर्षांपूर्वीं चीन देशावर युरोपियन राष्ट्रांचें अतिक्रमण होत होतें, तेव्हां एका दहा हात लांबीच्या ब्रिटिश होडक्यावरील निशाणाचा अपमान चीननें केला म्हणून ( पण पोटांत अफूच्या व्यापाराचा स्वार्थ ठेवून ) इंग्लंडनें चीनवर हत्यार कसें उपसलें होतें, याचा मनोरंजक इतिहास जस्टिस मॅकॅर्थी यांच्या History of our own Times या पुस्तकांत दिला आहे तो पाहावा. या ठिकाणीं राष्ट्रानें लहानांत लहान स्वरूप स्वीकारलें, म्हणजे एक प्रकारें अणिमासिद्धि सिद्ध करून दाखविली. बरोबर अगदीं याच्या उलट व्यवहार, राष्ट्र हें एखाद्या राष्ट्रसंघाच्या बैटकीला जाऊन बसतें व जगाच्या कारभारांत मत देण्याकरितां आपला हात वर उचलतें तेव्हां घडतो, कारण तेव्हां राष्ट्र हें स्थूलांत स्थूल असें स्वरूप धारण करितें व आपल्या आंगची गरिमा नांवाची सिद्धि दाखवितें असें म्हणतां येईल.

### ( १०० ) राष्ट्रव्यक्तीचे घटक

व्यवहार्य मनुष्य म्हटला म्हणजे तो योगसाधन करून, शरीर कृश करून, पाठीला पोट लावून, अस्थिचर्मरूप असा स्वतःला दाखवितो तेव्हां नव्हे. तसाच शरीरसौंदर्याच्या बक्षिसाकरितां सँडोप्रमाणें तो आपले स्नायू फुगवून आहे त्याच्या दुप्पट शरीर बनवून दाखवितो तेव्हांहि नव्हे. तर नित्य व्यवहारांतला खाता पिता, हिंडता फिरता जो मनुष्य तोच व्यवहार्य मनुष्य. हें जसें आपण घेऊन चालतों तसेंच, कोणत्याहि बाजूची अतिशयोक्ति सोडून, नित्य व्यवहारांतील राज्यकारभार करणारें राष्ट्र तेंच ‘ राष्ट्र ’ असें म्हणावें लागतें. अशा प्रकारचें हें राष्ट्र घेऊन त्याचे गुणधर्म पाहिले असतां, प्रथमच असें दिसून येतें कीं, प्राचीन ग्रामसंस्था किंवा नगरसंस्था यापेक्षां राष्ट्र हें हल्लीं सर्वच बाजूंनीं फार पुढें गेलें आहे. वस्तु मोजा–मापावयाची, किंवा तिची घनता, तिचें महत्त्व हिशेबानें काढावयाचें, तर तिची लांबी रुंदी व जाडी या अंगांनीं विचार करितात. त्या रीतीनें राष्ट्राचाहि विचार अनेक अंगांनीं करितां येतो. तो असा : ( १ ) क्षेत्र-विस्तार व रचना, ( २ ) राष्ट्राच्या मर्यादेंतील किंवा राष्ट्राच्या अंमलाखालील लोकसमुदाय म्हणजे प्रजा, ( ३ ) राष्ट्राची सांपत्तिक स्थिति किंवा त्याचें आर्थिक सत्त्व, ( ४ ) राष्ट्राची संस्कृति किंवा सुधारणा, व राष्ट्राची मनोरचना, आकांक्षा तत्त्वज्ञान वगैरे. यांतील प्रत्येक बाजू घेऊन पाहूं.

## ( १०१ ) क्षेत्ररचना

पूर्वी काय झालें असेल तें असो, पण हल्लीं बहुधा एकहि राष्ट्र असें नाहीं कीं ज्याचा सर्व मुलूख एकाच चतुःसमेंत संलग्न व अखंड असा सांठविलेला आहे. ग्रेटब्रिटन घेतलें तर जगांतील असा कोणताही भाग नाहीं कीं, ज्यांत इंग्लंडच्या राजाचा, कोणत्याना कोणत्या नात्याचा, अधिकार चालत नाहीं. म्हणूनच कोणीं असें म्हटलें आहे कीं, ब्रिटिश साम्राज्यावर सूर्य कधींच मावळत नाहीं. दुसऱ्या टोंकाला आमच्या हिंदुस्थानांतील चिल्लर संस्थानें घेतलीं तरी त्यांचाहि मुलूख असा तुटक असलेलाच आढळेल. एक तालुका येथें तर दुसरा तालुका अनेक मैलांवर आणि तालुका तर किती टिचभर! पण एवढ्या राष्ट्राचे अष्टाधिकार त्यांत चालवावयाचे असतात, व यामुळें राजसत्ता केव्हां केव्हां हास्यास्पद होते. पण वस्तुस्थिति तशी आहे खरी. या संस्थानांनीं पुष्कळ वेळां सरकारला विनवणी करून पाहिलें आहे कीं, मुलखाची देवघेव करून आमचें जें काय राष्ट्र असेल तें एक गठ्ठा करण्याला मदत द्या. पण ब्रिटिश सरकार तसें करीत नाहीं. त्याची अडचण इंग्रज सरकारला भासत नाहीं! कांहीं तालुक्यांतील एक गांव खालसा तर एक गांव संस्थानी! फौजदारी कायद्याचा अंमल करितांना उठल्या बसल्या अडचणी येतात. पण सरकार हें कांहीं जुमानीत नाहीं, कारण तें पडलें वरिष्ठ. त्यांचें कसेंहि भागून जातें, पण संस्थानिक व इंग्रज सरकार दोघांनीं मनांत आणलें तर हीं संस्थानें एक गठ्ठा होणें कठीण नाहीं. इंग्रजी साम्राज्याचें मात्र तसें नाहीं. तेथें समुद्रच्या समुद्र व महासागरच्या महासागर आड येतात. केवळ सोयीच्या दृष्टीनें पाहिलें तर कॅनडा व अमेरिका हीं हद्दीला हद्द लागलेलीं म्हणून तीं एक गठ्ठा व्हावीं. पण तें शक्य नाहीं. अमेरिकेचें राष्ट्र दोन महासागरांत वांटलें गेलें आहे. पूर्वी किंवा हल्लीं नद्या याच राज्यांच्या स्वाभाविक मर्यादा शक्य तेथवर समजल्या जातात. आणि ह्या त्यांनीं मानल्या तर कांहीं व्यवहार सोपा होतो. आज फ्रान्सनें ऱ्हाइन नदी ही आपली एक सरहद्द ठरवून घेतली आहे. पूर्वी मराठ्यांच्या इतिहासांतील तह वाचतांना आपण असें वाचतों कीं, कृष्णा व वारणा या नद्यांमधील मुलूख एकानें घ्यावा, कृष्णा व तुंगभद्रा यांतील मुलूख एकानें घ्यावा वगैरे. पण अशा मर्यादा ठरवून राष्ट्राचें फारसें चालत नाहीं. नदीच्या अलीकडे पलीकडे एकमेकांचा मुलूच असतोच.

## ( १०२ ) सांपत्तिक स्थिति

राष्ट्राच्या हद्दींतील लोक एकाच राजाचे हुकूम मानणारे असावे लागतात. आणि केवळ कायद्याच्या जोरावर ती गोष्ट साधतांहि येते. पण कित्येक वेळां राष्ट्रांतील जमीन प्रजेच्या वसतीला किंवा उत्पन्नाला पुरेशी पडत नाहीं. असें झाल्यावर त्या राष्ट्रांतील लोक जगाच्या इतर पडित भागांत सोयीसवलती पाहून वसाहत करतात; व या क्रमानें राज्याचा भूविस्तारहि वाढतो. राज्याच्या भूक्षेत्रांत लोकवस्ती अमुक इतकी दाट किंवा अमुक इतकी पातळ असावी असा नियम सरकार करूं शकत नाहीं. कारण तें शक्यच नसतें. हवा, पाणी, जमिनीची सुपीकता, डोंगर, पर्वत, रानेंवनें वगैरेमुळें लोकवस्ती दाट किंवा पातळ राहाते. पण राष्ट्राला या गोष्टीची राष्ट्र या नात्यानें अडचण फारशी वाटत नाहीं. कारण कोठें कालवा खणणें, कोठें अरण्यें तोडून साफ करणें, किंवा कोठें नद्यांना बांध घालणें अशा प्रकारची हवी ती सुधारणा राष्ट्राला करितां येते. आणि आगगाड्या वगैरे गेल्यानें राष्ट्रांतील निरनिराळ्या भागांतील उच्चनीच भाव व सरसनिरसता हीं सर्वस्वीं नाहीं तरी पुष्कळ अंशांनीं दूर करितां येतात. राष्ट्र हें राज्याधिकारानें स्वतःपूर्ण असेल. पण सांपत्तिक दृष्ट्या तें तसें असूं शकत नाहीं. म्हणजे कांहीं राष्ट्रें कृषिप्रधान असतात. कांहीं उद्योगप्रधान असतात. कांहींचा समाज मुख्यतः व्यापार व दलाली यांवर अवलंबून असतो. आणि जगांत व्यापाराची उलाढाल चालते ती इतकी कीं, कोणत्याहि राष्ट्रांतील एखाद्या श्रीमंत नागरिकाच्या घरीं गेलों तर, तेथें जगांतील प्रत्येक राष्ट्रामधील व्यापारउदीमाच्या, उद्योगाच्या, कलाकौशल्याच्या वस्तूंचें संग्रहालयच आपल्या दृष्टीस पडेल. याचा अर्थ असा कीं, राज्याधिकारानें स्वयंपूर्ण असणारीं राष्ट्रें अर्थशास्त्रदृष्ट्या अत्यंत परावलंबी असूं शकतात. जगांतील व्यापार होतो तो राष्ट्रें आपलीं स्वतःचीं दुकानें, व्यापारी पेढ्या, किंवा कारखाने काढून करितात असें नाहीं. तो व्यापार सर्व राष्ट्रांतील प्रजाच करिते. तथापि सामुदायिक रीतीनें त्या व्यापाराच्या नफ्यातोट्यांत राष्ट्रांतील सरकारचा कांहीं अंश असतोच. तसेंच एका राष्ट्रांतील भांडवल दुसऱ्या राष्ट्रांतील लोक उद्योगधंद्याकरितां कर्जाऊ घेतात. हुंड्यांचा व्यापार राष्ट्रांच्या समायिक पद्धतीनें चालतो. उद्योगधंद्यांना लागणारें कच्चें द्रव्य तर एका राष्ट्रांतून दुसऱ्या राष्ट्रांत गेल्याशिवाय भागतच नाहीं. तसेंच केव्हां केव्हां

अनेक राष्ट्रांतील लोक मिळून तिसऱ्याच एका राष्ट्रांत समायिक भांडवलाच्या कंपन्या काढून व्यापार करितात, किंवा खनिज पदार्थांचे कारखाने काढतात. पुष्कळ वेळां असेंहि घडतें कीं, अमुक एक माल आपल्या राष्ट्रांत फायदेशीर रीतीनें होणार नाहीं, पण दुसऱ्या राष्ट्रांत तो होतो व तेथून आपल्याला हवा तितका मिळूं शकतो, म्हणून तो माल आपल्या राष्ट्रांत काढण्याचें कारण नाहीं असें अपेक्षेनें ठरवून, लोक स्वच्छेनें परावलंबी बनतात. याच्या अगदीं उलट, पुढें मागें तो माल आपल्या राष्ट्रांत हटकून चांगला तयार होईल असें वाटल्यास, तो माल परराष्ट्रांतून येत असल्यास त्यावर जकात बसवितात. म्हणजे त्या मालाची कांहीं दिवस मुद्दाम महागाई करून नंतर मग आपल्या इकडे तो माल स्वस्त करूं पाहतात. तात्पर्य, हें कीं आज जगांतील कोणतेंहि राष्ट्र परराष्ट्राशीं व्यापारी अगर राजकीय संबंध कायमचा तोडून राहूं म्हणेल तर तें त्याला मुळींच शक्य नाहीं.

## ( १०३ ) भाषा व संस्कृति

पूर्वीप्रमाणें एका राज्यसंस्थेंत एकच भाषा बोलणारे लोक असणें यापुढें फारसें शक्य नाहीं. दळणवळणाचे मार्ग वाढल्यापासून एका ठिकाणचे लोक उठून धंद्याकरितां दुसरे ठिकाणीं जातात. लोकसंख्येची हालचाल किती प्रमाणावर होते हें खानेसुमारीचे तक्ते पाहिले असतां कळून येतें. कित्येक प्रांतांतूनच काय पण, जिल्ह्यांतूनहि निरनिराळ्या भाषा बोलणारांची इतकी संख्या एखाद्या वेळीं असते कीं, त्यांत दोन्ही भाषा बोलणाऱ्या लोकांच्या शिक्षणाची सोय लोकलबोर्डें व म्युनिसिपॅलिट्या यांना करावी लागते. सरहद्दीच्या जिल्ह्यामध्यें तर ही अडचण फार भासते. उदाहरणार्थ, गुजराथ व महाराष्ट्र यांच्या सरहद्दीवरील ठाणें व सबर्बन जिल्हा आणि महाराष्ट्र व कर्नाटक यांच्या हद्दीवरील बेळगांव जिल्हा. आणि दोन भाषा बोलणारी लोकसंख्या झाली असतां कांहीं लोकांना, म्हणजे अर्थात् अल्पसंख्याकांना, मातृभाषेंतून शिक्षण मिळण्याला अंतरावें तरी लागतें, किंवा लोकलबोर्डें व म्युनिसिपॅलिट्या यांना दुहेरी खर्च करावा लागतो. राष्ट्रांत भाषा जशी मिश्र तशीच धर्मसंस्कृतिहि मिश्र असते. आज हिंदुस्थानांतील प्रत्येक भागांतील प्रत्येक जिल्ह्यांत हिंदु, मुसलमान व ख्रिस्ती या धर्मांचे लोक कांहीं कांहीं गांवांत, मोहोल्ल्याला मोहोल्लाच नव्हे पण, घराला घर लागून राहिलेले आढळतील. याशिवाय हल्लीं प्रवासाची हौस पुष्कळ वाढलेली असून, परदेशीं जाऊन येणारे लोक चैनीच्या वस्तूच काय,

पण चालीरीति व क्वचित् बायकाहि परदेशीं आणतात. यामुळें मिश्र संस्कृतीचा देखावा दिसतो; आणि या राष्ट्राची हीच संस्कृति असें निखालस म्हणतां येत नाहीं. एकच संस्कृति, एकच भाषा आमच्या राष्ट्रांत नांदावी, अशी राष्ट्रीय भावनेनें प्रेरित झालेल्या लोकांची तळमळ मनांतून असते; परंतु तें घडून येणें दिवसेंदिवस फार कठीण झालें आहे. बंगालप्रांत घेतला तर त्यांत बंगाली ही मातृभाषा आहे असें वाटतें. पण धर्मान्तर केलेले मुसलमान लोक हे मूळ बंगाली भाषा बोलणारे असले तरी, केवळ धर्मांतरामुळें नव्हे, पण अलीकडील विशेष प्रकारच्या चळवळींमुळें त्यांची प्रवृत्ति बंगालीवर बहिष्कार घालून उर्दू बोलण्याकडे होत आहे. पण या मुसलमानांचें उर्दूहि तितपतच असल्यामुळें, तिसरीच एक म्हणजे अशुद्ध हिंदी भाषा बोलणारे लोक कलकत्त्यांत जितके आढळतात तितके इतर कोणत्याहि शहरीं आढळत नाहींत.

## ( १०४ ) मनोगुण व मतें

मनोगुणांच्या दृष्टीनेंहि राष्ट्रांतील सर्व लोकांचें मनोगुण एरवींहि एकसारखे आढळत नव्हेतच, व अलिकडे तर सुधारणा अनेक अंगांनीं मनुष्यमात्राच्या मनावर आघात करीत असल्यामुळें मनोगुणांत विशेष वैचित्र्य आढळून येऊं लागलें आहे. कायमचे मनोगुण म्हटले म्हणजे संघ करून राहण्याची आवड, विषयासक्ति, भांडखोरपणा, लोभबुद्धि, भय, इत्यादि—म्हणजे प्राथमिक स्वरूपाचा मनुष्यस्वभाव एवढाच कोणत्याहि राष्ट्रांतील लोकांत समान आढळतो. पण " पांच पुरभय्ये आणि सहा चौके " या म्हणीप्रमाणें, सामाजिक व राजकीय दोन्ही प्रकारच्या मतांमध्यें बेसुमार वैचित्र्य उत्पन्न होऊं लागलें आहे. याचें कारण ज्ञान अनुभव हीं दोन्हीं वाढलीं; आणि मतस्वातंत्र्याला फारसें नियंत्रण राहिलें नाहीं. " मी अमुक एक मत प्रगट केलें तर समाजांतील लोक मला काय म्हणतील " ही पूर्वीच्या काळीं जी भीति मनुष्याला वाटत असे ती आतां वाटत नाहींशी झाली आहे. परमतसहिष्णुताहि वाढली. यामुळें सार्वजनिक विषयांतील मतांचे पंथहि वाढले. राष्ट्रांत यामुळें अधिक चळवळी निर्माण झाल्या. तात्पर्य, या सर्व गोष्टी लक्षांत घेतां राष्ट्रांतील एकजिनसीपणा घालविण्याला त्या दिवसेंदिवस अधिकाधिक कारणीभूत होत आहेत. आणि राष्ट्रांत एकीकरण कशाचें उरलें असेल तर मुख्यतः राजसत्तेचें व तदनुषंगानें राष्ट्रीय सांपत्तिक स्वार्थाचें, एवढेंच फार तर म्हणतां येईल.

## ( १०५ ) राष्ट्रहिताची भावना

अजूनहि राष्ट्रसंघटनेची बुद्धि जगांतून गेलेली नाहीं. विश्वबंधुता हें काव्यांतून रमणीय भाषेनें गाण्याचें ध्येय इतकीच त्याची आज योग्यता आहे. 'हें विश्वाचि माझें घर' असें गाणारा मनुष्य आज वेड्यांत काढला जाईल. कारण एका राष्ट्रांतील लोक एकभावनेनें वागले तरच कांहीं निभाव लागेल असें लोकांना वाटतें. आतां जगाचें कल्याण तें राष्ट्राचें हटकून अकल्याण असेंच कांहीं कोणी म्हणत नाहीं. परंतु आधीं आमच्या राष्ट्राचें हित पाहून मग जगाचेंहि साधलें तर साधूं कीं, असें म्हणण्याची प्रवृत्ति आहे. आणि हें राष्ट्राचें हित मुख्यतः एकीकृत राज्यसत्तेच्या बळावरच उगवून घेतां येईल अशी लोकांची भावना आहे. देशाभिमान याचा अर्थ आपल्या राष्ट्रांतील राज्यसत्तेचा अभिमान असाच होतो. मात्र तो अभिमान देशांत स्वकीयांचें राज्य म्हणजे खरें स्वराज्य असेल तरच. कारण जेथें 'राजकीय' सत्ता परकीय लोकांचे हातीं असते, तेथें ही 'राजनिष्ठा' असूंच शकत नाहीं. राष्ट्रीयत्व व राजानिष्ठा यांचा सहजच बेबनाव होतो. आणि नुसता भावनेचा खेळ इतकेंच नसून, अशा राज्यांत खरोखरच राष्ट्रांतील राज्यसत्तेचें हित व प्रजेचें हित यांच्या दिशा वेगवेगळ्या असतात. किंबहुना असा सिद्धान्तच बनून जातो कीं, ज्या कोणत्याहि गोष्टींनीं परकीय राज्यसत्तेचें हित होईल त्या गोष्टींनीं देशी प्रजेचें अनहितच व्हावयाचें. उलट जी कोणतीहि गोष्ट देशी प्रजेला हितकारक व तेजोवर्धक होईल तिनें राजसत्तेवर तितक्यापुरता आघातच होणार! परकीय लोकांचें राज्य एखाद्या राष्ट्रांत असलें म्हणजे, राष्ट्रहिताचें वर्तुळ व राजाहिताचें वर्तुळ हीं प्रायः एकांत एक मिसळत नाहींत. तीं दोन्हीं मिसळून त्यांनीं समानछेद पाडलेला एखादा भाग असेलच तर तो फारच थोडा असणार. पण जगांत असल्या राष्ट्रांचीं, म्हणजे परकीय सत्ता असलेल्या राष्ट्रांचीं उदाहरणें सुदैवानें थोडीं आहेत. लोकसत्ताक अमेरिका, फ्रान्स व इंग्लंड यांच्या साम्राज्यांतच असे कांहीं भाग आहेत. त्यांत आपला हिंदुस्थान व अमेरिकन राज्यांतील फिलिपाइन बेटें हीं प्रमुख उदाहरणें होत.

## ( १०६ ) अल्पसंख्य व बहुसंख्य

युरोपांत, जुन्या इतिहासाचा अवशेष म्हणून, कांहीं लोकांवर परकीय सत्ता महायुद्धापूर्वीपर्यंत आढळे. परंतु या महायुद्धांत स्वयंनिर्णय या नांवाचें एक

तत्त्व पुढें येऊन त्यानें ही स्थिति थोडीबहुत पालटली आहे. म्हणजे विजयी अशा फ्रान्स व इंग्लंड या राष्ट्रांनीं आपल्याला अनुकूल असे लोक ऑस्ट्रिया जर्मनी वगैरे राष्ट्रांच्या सत्तेखालून सोडविले; व त्यांचीं जेथल्या तेथें लहानसहान राष्ट्रें बनविलीं. इंग्लंडांत रिपब्लिक नसेना का, पण अशा नवीन राष्ट्रांना इंग्लंडकडून सरसहा रिपब्लिकचें रूपच देण्यांत आलें. कारण या दिवसांत स्वयंनिर्णयाला उभे राहिलेले लोक प्रथमच, राजा नको व प्रजास्वातंत्र्य पाहिजे असें म्हणणार. पण या स्वयंनिर्णयानें इंग्लंड व फ्रान्स यांचा स्वार्थ साधला तरी परकीय सत्तेचा समूळ नाश झाला नाहीं. कारण पूर्वीं सांगितल्याप्रमाणें अगदीं एक भाषा बोलणाऱ्या एका संस्कृतीच्या एकाच ऐतिहासिक परंपरेच्या व एकाच राष्ट्रीय ध्येयाच्या लोकांचें राष्ट्र बनविणें हें अशक्यप्राय झालें आहे. यामुळें बहुसंख्यावाले व अल्पसंख्यावाले हे परस्परांना विजातीय किंवा परकीय समजत असून, या नवीन राष्ट्रांतील अल्पसंख्याकांच्या हितसंबंधाचें रक्षण करण्याची जामिनकी राष्ट्रसंघानें आपणांकडे घेतली आहे. युरोपांतील चेकोस्लोव्हेकिया, पोलंड, हंगेरी, फिनलंड, लटोव्हिया, जुगोस्लेव्हिया, रुमानिया, अल्बेनिया, आयर्लंड हीं राष्ट्रें स्वयंनिर्णयाच्या तत्त्वावर बनलेल्या राष्ट्रांचीं ताजीं उदाहरणें म्हणून देतां येतील.

## (१०७) भाषावार प्रांतरचना

हिंदुस्थान हा या स्वयंनिर्णयाच्या तत्त्वावरच स्वराज्य मागत आहे. तें त्याला मिळेल तेव्हां येथेंहि हे उपराष्ट्रीय रचनेचे प्रश्न निघतीलच. हल्लीं राउन्ड-टेबल कॉन्फरन्सपुढें आलेल्या हिंदुस्थानच्या नव्या घटनेंत, हल्लींचे प्रांत व संस्थानें या सर्वांची मिळून संयुक्त संघटना करण्याची योजना पुढें आली आहे. परंतु या योजनेनुरूप जर हिंदुस्थानला जबाबदारीचें मध्यवर्ती सरकार व आपले कायदे आपणच करणारें पार्लमेंट मिळालें, तर हिंदुस्थानांतहि प्रांतरचनेचा, म्हणजे खरोखरच एका अर्थानें राष्ट्ररचनेचा प्रश्न निघाल्याशिवाय राहाणार नाहीं. कारण उत्कल, कर्नाटक, आंध्र, वगैरे प्रांतांतील लोक भाषावार प्रांतरचना व्हावी म्हणजे एकप्रकारें नवीन राष्ट्ररचनाच व्हावी, असें म्हणूं लागले आहेत. आणि तसें झालें तर सर्व मराठी भाषा बोलणाऱ्या लोकांचें तरी एक राष्ट्र करा अशी मागणी कां न व्हावी ! तथापि, या जुन्या व होऊं घातलेल्या नव्या राष्ट्रांतील लोकांना हें पक्कें माहीत व कबूल आहे कीं, हीं नवीं राष्ट्रें बनलीं तरी एकीकरणाचा मुख्य

भर त्यांतील राज्यसत्ता संघटित करण्याकडेच राहील. राष्ट्रें लहान झालीं असतां व्यापारविषयक वगैरे अडचणी नवीन उपस्थित होतात. परंतु त्यांची अडचण सोसूनहि आपण एक राष्ट्र बनूं, व राष्ट्रीय भावनेच्या जोरावर निभावून जाऊं असें लोकांना वाटतें. साम्राज्यांत नाइलाजानें सांपडलेल्या लोकांचा साम्राज्याशीं अर्थातच उभा दावा आहे; पण राष्ट्रसंघांत सामील झालेल्या राष्ट्रांचा मात्र राष्ट्रसंघाशीं तसा उभा दावा नाहीं. याचें कारण हेंच कीं, साम्राज्य सत्ता ही बोलून चालून स्वार्थी व परकीय असते. पण राष्ट्रसंघ हें कांहीं कोणा-एका राष्ट्राचें साम्राज्य दुसऱ्यावर लादलेलें नाहीं. राष्ट्रसंघ हा त्यांतील स्वतंत्र राष्ट्रांनीं आपल्या खुषीनें व सहकारितेनें रचिलेलें एक राज्य-यंत्र, राज्यसंस्था आहे, व त्याचा अंमलहि अजून जपून जपूनच चाललेला आहे.

## ( १०८ ) राष्ट्रसंघाची घटना

राष्ट्रसंघाची स्थापना होण्यापूर्वी प्रत्येक राष्ट्र हें पूर्णपणें स्वतंत्र मानलें जात असे. आज देखील त्या त्या राष्ट्रांतील प्रजेवर अधिकारासंबंधानें राष्ट्रांतील मुख्य राजसत्ता ही पूर्वीप्रमाणें पूर्ण स्वतंत्र आहे असेंच समजलें जातें. तथापि गेल्या महायुद्धाच्या वेळेपासून जगांतील बहुतेक मोठ्या राष्ट्रांच्या संमतीनें राष्ट्रसंघ नांवाची एक संस्था निर्माण झाली आहे. राज्यसंस्थेच्या संघटना-वृक्षाचें हें सर्वांत ताजें फळ होय. ह्या राष्ट्रसंघाचा हेतु राष्ट्रांराष्ट्रांतील कायद्यांना स्थायिक व मूर्त स्वरूप देण्याचा आहे. आजपर्यंत राष्ट्रांराष्ट्रांमध्यें कांहीं संकेत होते. पण त्यांना कायदा असें म्हणतां येत नसे. कारण कायद्याच्या शास्त्राप्रमाणें कायदा याचा अर्थ असा कीं, तो सर्वश्रेष्ठ अशा राज्यसत्तेनें काढलेला हुकूम होय; आणि त्या सत्तेचा अधिकार असा कीं, तो हुकूम जो कोणी अमान्य करील त्याला सत्ताधाऱ्यानें योग्य वाटेल ती शिक्षा करावी ! पण राष्ट्राराष्ट्रांच्या दरम्यान असलेल्या संकेतरूपी कायद्याचा जर कोणीं भंग केला तर त्या अपराध्याला शिक्षा कोण करणार ? एरवीं आजपर्यंत एक राष्ट्र दुसऱ्या राष्ट्राशीं, किंवा कित्येक राष्ट्रांचा एक संघ दुसऱ्या कित्येक राष्ट्रांच्या संघाशीं, युद्ध करीत आलाच आहे. पण हें युद्ध न्यायकोर्टाच्या शिक्षेच्या अंमलबजावणीसारखें नसून, राष्ट्राराष्ट्रांतील ईर्षेचें, लोभबुद्धीचें, किंवा खुनशीपणाचें तें फळ असेंच समजलें जाई. युद्धाला कारण कोणतें तरी एक राष्ट्र मुख्य असे. आणि जीं इतर राष्ट्रें या किंवा त्या बाजूला

जाऊन मिळत त्यांचा त्या युद्धांत स्वतःचा असा कांहीं अर्थ किंवा डाव साधावयाचा असे. मग त्याला वरकरणीं कोणतेंहि सोज्वल स्वरूप तीं देवोत! अशा वेळीं युद्धांत पडणाऱ्या राष्ट्रांना नसतें नैतिक तत्त्व किंवा भूतदया सुचते.

### ( १०९ ) राष्ट्रसंघाबद्दल साधकबाधक मतें

पण League of Nations ( 'लीग ऑफ नेशन्स' ) ही संस्था इतक्या निरनिराळ्या राष्ट्रांनीं मिळून बनलेली आहे कीं, त्या सर्वांनीं मिळून एखादी गोष्ट ठरविली तर त्या ठरावाला निवळ स्वार्थ हेंच कांहीं कारण सहसा लावतां येईल असें नाहीं. उदाहरणार्थ, ज्या राष्ट्रसंघांत जर्मनी, फ्रान्स, चीन, जपान व इंग्लंड हीं जी पांच राष्ट्रें सामील आहेत त्या संघानें सर्वानुमतें जर एखादा ठराव केला, तर तो जगांतील शांतता राखण्याच्या हेतूनें केला असावा असें प्रथम दर्शनीं घेऊन चालण्यास हरकत नाहीं. कारण या पांच राष्ट्रांच्या गुंतागुंतीच्या व विरोधी हितसंबंधांनीं बनलेला ताजवा हा खोटा किंवा कपटाचा म्हणणें कठीण. आतां हीं राष्ट्रें या संघांत सामील होण्याचें कारण हें खाचित असेल कीं, यापुढें आपल्याला आणखी काय लाभ होणार असेल तो न होवो, पण आज आपल्या ताब्यांत असलेला कोणताहि मुलूख किंवा लष्करोपयोगी ठाणीं काढून घेतलीं जाणार नाहींत! आपला तळीराम गार ठेवून परोपदेशे पांडित्य करणाऱ्या या राष्ट्रांनीं राष्ट्रसंघ स्थापून कांहीं दिव्य न्यायबुद्धि किंवा अलौकिक समाधानबुद्धि प्रगट केली असें म्हणतां येत नाहीं! अमेरिकेसारखें राष्ट्र अद्यापि या संघांत सामील होत नाहीं. उलट 'रशिया' या राष्ट्राला जगाचा शत्रु समजून राष्ट्रसंघ आपला सभासद करून घेत नाहीं. यावरून सर्व जगाचें मन या संघासंबंधानें निःशंक झालें आहे असें कोणीं म्हणावें! शिवाय राष्ट्रसंघाला खरी कसोटी अद्यापि लागलेली नाहीं. चीन जपान यांच्या चालू युद्धांत ही कसोटी लागण्याचा प्रसंग दिसतो. काय होईल तें पहावें! परंत आपण सर्व राष्ट्रांचा नियंता आहों अशा समजुतीनें राष्ट्रसंघ आज वागत असल्याचा देखावा आहे खरा!

### ( ११० ) राष्ट्रसंघाची भवितव्यता

स्वतः राष्ट्रसंघाचीं सैन्यें किंवा आरमारें नाहींत. आणि निःशस्त्र हिंदुस्थान आज परराष्ट्रांविरुद्ध जसें बहिष्काराचें शस्त्र जास्तींत जास्त घातक म्हणून परजित आहे, किंवा पूर्वी कोरियानें जपानविरुद्ध आणि चीननें अनेक युरोपियन

राष्ट्रांविरुद्ध परजिलें होतें त्याप्रमाणें राष्ट्रसंघाला देखील तूर्त असलींच शस्त्रें उपयोगांत आणून स्वस्थ बसावें लागणार असें दिसतें. आधीं राष्ट्रसंघ सर्वानुमतें ठराव होईल तोच अंमलांत आणणार. केवळ बहुमतानें चालणार नाहीं. आणि सर्वानुमतें ठराव झाला तरी राष्ट्रांचीं सैन्यें व आरमारें हीं हलवून अपराधी राष्ट्राला शिक्षा करण्याच्या मोहिमेवर राष्ट्रसंघ निघेल कीं नाहीं हें अद्यापि ठरावयाचें आहे. हल्लींच्या चिनी-जपानी युद्धांत जपाननें राष्ट्रसंघाचा सल्ला मानला नाहीं तर कदाचित् त्याच्या बंदरांच्या आर्थिक नाकेबंदीचा, म्हणजे त्याचा व्यापार बुडवून त्याला तळ्यावर आणण्याच्या कल्पनेचा, उच्चार झालेला आहे. पुढें मागें कधीं याच्याहि पलिकडे राष्ट्रसंघाची मजल जाईल, नाहीं कोणीं म्हणावें? तसेंच राष्ट्रसंघांतील राज्यसत्ता ही कोणा एखाद्या व्यक्तीच्या किंवा उपसंस्थेच्या हातीं आहे असा देखावा असला तरी, पडद्यामागें सूत्रचालक वेगळे असतात, व ते ती सत्ता चालवितात, याविषयीं मागें लिहिलें आहे. तसाच प्रकार राष्ट्रसंघाच्या संबंधानें होण्याचा संभव नाहीं असें कोणी म्हणावें! म्हणजे राष्ट्रसंघांतहि पक्ष निर्माण होऊन, भांडणें थराला जाऊन, राष्ट्रसंघ कदाचित् मोडला जाण्याचा संभव आहे. किंवा लांचलुचपतीचा प्रकार व कट होऊन सगळ्या राष्ट्रांची मिळून झुंड उठून एखाद्या बिचाऱ्या निरापराधी व दुर्बल राष्ट्रावर पडून त्याचा सत्यानाश होण्याचा दुसराहि संभव आहे. पण राज्यसंस्था म्हटली म्हणजे तिच्या घटनेंत असा कांहीं गुण असतो कीं विशेष प्रसंगीं तिच्या हातून कल्पनातीत भलत्या गोष्टी होणें शक्य असलें तरी, सामान्यतः तिच्या हातून भलतेंसलतें कांहीं होत नाहीं. मनुष्यव्यक्ति व मनुष्यव्यक्तींनीं बनविलेली राज्यसंस्था या दोहोंत संकेताच्या दृष्टीनें जसा फरक आहे तसाच त्यांच्यामध्यें विकारवश होण्याच्या पात्रतेंतहि फरक आहे. मनुष्यव्यक्तीचें माथें फिरलें म्हणजे तो स्वतः उठून काय आगळीक करील, म्हणजे दुसऱ्याची काय खोडी करील व स्वतःचें काय करून घेईल याचा नियम नसतो. पण राज्यसंस्थेचें बुड इतकें जड असतें कीं, तें हलून राज्यसंस्था चालूं लागण्याला आधीं बराच काळ जावा लागतो. या दृष्टीनें पाहतां, राष्ट्रसंघाच्या हातून अद्यापि जगाचें विशेष कल्याण झालें नाहीं असें खरें असलें तरी, या नवीन राज्यसंस्थेचा धाक त्यांत सामील झालेल्या राष्ट्रांना वाटूं लागला आहे ही गोष्ट कांहीं खोटी नाहीं. आणि आपाततः हेंहि सिद्ध होत आहे कीं, संघटित राज्यसंस्थेकडून व्यक्तीच्या बेताल कारभाराला

कांहीं प्रतिबंध झाला तरी नैतिकदृष्ट्या त्याला स्वातंत्र्यनाश असें म्हणतां येत नाहीं. सामुदायिक हिताच्या दृष्टीनें राष्ट्रांतील राज्यसत्तेनें केलेले कायदे किंवा घातलेले निर्बंध पाळणें हें, प्रजेंतील एखाद्या व्यक्तीला अन्यायाचें वाटलें तरी, सामुदायिक कारणाकरितां म्हणून तें बंधन सोसणें जसें त्याला भाग आहे, त्याचप्रमाणें जगांतील कांहीं राष्ट्रांनीं एकजुटीनें राष्ट्रसंघ नांवाचें हें एक नवें राज्य स्थापन केलें आहे. त्या राष्ट्रांपैकीं एखाद्या राष्ट्राला राष्ट्रसंघाचें बंधन गैरसोईचें किंवा अन्यायाचें वाटलें तरी तें त्याला पाळावें लागेल.

## ( १११ ) स्वतंत्र व परतंत्र राष्ट्रें

बाह्यसंबंधाच्या दृष्टीनें जगांतील राष्ट्रांचे मुख्यतः दोन वर्ग करितात. एक स्वतंत्र राष्ट्र ( Sovereign State ) व दुसरें म्हणजे स्वतंत्र नसलेलें राष्ट्र ( Non-Sovereign State ). पैकीं पहिल्या वर्गात युरोपांतील २९, अमेरिकेंतील २१, एशियाखंडांतील ९ व आफ्रिकेंतील २ राज्यें पडतात. पण कांहीं राष्ट्रें व मुलूख असे आहेत कीं, त्यांतील राज्यसंस्था, ज्या कोणत्या असतील त्या स्वतंत्र आहेत असें म्हणावें कीं स्वतंत्र नाहींत असें मानावें याविषयीं शास्त्रज्ञांना संशय वाटतो. याचीं कांहीं उदाहरणें अशीं:—

( १ ) **अंडोरा** हें एक प्रजासत्ताक राज्य आहे. त्याचे दोन अधिराजे-एक फ्रान्स व दुसरा अर्जेलचा बिशप.

( २ ) **डांझिग** हें शहर. हें राष्ट्रसंघाच्या रक्षणाखालचें आहे. पण त्याच्या परराष्ट्रीय कारभाराचीं सूत्रें चालविण्याचा अधिकार एकट्या पोलंडला आहे.

( ३ ) **रोम** येथील पोपचें राज्य. यांत पोपचा अधिकार रोमच्या उपनगरचा भाग, कांहीं मोठमोठ्या इमारती, वाडे, वाड्या यांतील प्रजेवर चालतो. पूर्वीं इटालीच्या राजानें काढून घेतलेले कांहीं राज्याधिकार पोपला नव्यानें देण्यांत आलेले आहेत, व तो आपला वकील परराष्ट्रांना पाठवितो व त्यांच्याशीं तह करतो. तथापि राष्ट्रसंघांत पोपच्या संस्थानाला थारा नाहीं.

( ४ ) **आइसलँड**—डेन्मार्कच्या ताब्यांतील स्वतंत्र राज्य. याचा परराष्ट्रीयसंबंध डेन्मार्कच्या राज्याच्या हातीं आहे.

( ५ ) **आयरिश फ्रीस्टेट**—याला वसाहतीइतकें स्वातंत्र्य मिळालें आहे

तथापि नांवाला तरी आयलर्डचा राजा इंग्लंडचा राजा असून त्याला आयर्लंड-वर गव्हर्नर जनरल नेमण्याचा अधिकार आहे.

( ६ ) **सारबेसिन**— हें संस्थान कोणा एका राष्ट्राच्या ताब्यांत देण्याची गोष्ट चुरशीची व भानगडीची झाली असल्यामुळें त्याचा कारभार राष्ट्रसंघ हें कमिशन नेमून चालवितें.

( ७ ) **सॅन मॅरिनो**—प्रजासत्ताक रिपब्लिक. पण इटालीच्या राजाच्या अंमलाखालीं तें संरक्षणापुरतें आहे.

( ८ ) **कॅनडा, ऑस्ट्रेलिया, न्यूझीलंड, साऊथ आफ्रिकन युनियन** वगैरे वसाहती—यांना पंधरा आणे स्वातंत्र्य पूर्वींच मिळालेलें आहे. आणखी अर्धा पाव आणा स्वातंत्र्य जें व्यवहारांत आहे पण कायद्यांत नाहीं तें लवकरच कायदा करून देऊन टाकण्याचा निश्चय हल्लींच्या प्रधानमंडळानें राजाच्या तोंडून वदविला होता, व वेस्ट मिन्स्टर स्टॅट्यूट नांवाचा कायदा नुकताच पास करून तेंहि दिलें आहे. तात्पर्य, उरलें काय तें पाव आणा स्वातंत्र्य. वसाहतींना राष्ट्रसंघांत स्वतंत्र जागा आहे. तथापि या वसाहतींची गणना शास्त्रज्ञ अद्यापि स्वतंत्र राष्ट्रांत करीत नाहींत !

( ९ ) **इजिप्त**—याला स्वतःचा राजा आहे, व त्याचें स्वातंत्र्य इंग्लंडनें १९२२ सालीं जाहीर केलें. तथापि सुडान, सुएझ कॅनॉल वगैरे बाबतींचा व लष्करच्या संरक्षणाचा अद्यापि कायमचा निकाल लागलेला नसल्यामुळें इजिप्तला स्वतंत्र म्हणावें कीं परतंत्र म्हणावें हा शास्त्रज्ञ लोकांना प्रश्नच आहे.

( १० ) **भूतान**—स्वतंत्र. पण परराष्ट्रीय संबंध ब्रिटिश सरकारच्या ताब्यांत.

( ११ ) **मेसापोटेमिया किंवा इराक**—नांवानें स्वतंत्र पण राष्ट्र-संघाच्या ठरावानें इंग्लंडच्या दिमतीला दिलेलें. अजून तेथें इंग्लंडचा एक वरिष्ठ अधिकारी असतो. पण राजा व प्रधानमंडळ हीं नांवानें कां होईना पण स्वतंत्र कारभार करितात.

( १२ ) **ट्रॅन्स जॉर्डिनिया**—अरेबी अमीर राज्य करतो. पण देखरेख इंग्रजाची !

( १३ ) **असिल, येमेन, नेझद, हासा, झबेल, शमार, कावेट**—यांचेहि राजे अरेबी व स्वतंत्र आहेत. पण आंतून नियंत्रण इंग्रजांचें.

**( १४ ) युक्रेऱ्हाइन, व्हाइट रशिया, जॉर्जिया, रोमानिया, तारतर रिपब्लिक, खिवा, बुखारा**--येथें सर्वाधिकारी अशीं प्रजासत्ताक राज्यें आहेत. तीं रशियाच्या सोव्हिएटशीं संलग्न आहेत..

संशयाच्या स्थितींत असलेलीं वरील सर्व राष्ट्रें नांवानें बरोबरीचीं आहेत. परंतु क्षेत्रफळ, लोकसंख्या, लष्कर, आरमारी सत्ता, सामाजिक, आर्थिक व राजकीय संघटना वगैरे दृष्टींनीं त्यांचा दर्जा मुळींच सारखा नाहीं. ही लहान सहान राष्ट्रोपराष्ट्रांची गोष्ट झाली. पण मोठ्या राष्ट्रांत समाविष्ट असलेलीं जर्मनी व रशिया यांना देखील पहिल्या प्रतीच्या राष्ट्रांत गणावें कीं नाहीं याविषयीं राज्यशास्त्रज्ञांचें आज एकमत नाहीं. असो, म्हटलें तर स्वतंत्र पण म्हटलें तर परतंत्र आहेत अशा राष्ट्रांत खालील राष्ट्रांचाहि समावेश होतो.

क्युबा, हयाती, डोमेनिका, निकारागुवा, झांझिबार, युगांडा, मलाया स्टेटस, ट्युनीस, मोरोक्को व शेवटीं हिंदुस्थानांतील ७०० संस्थानें.

### ( ११२ ) संकीर्ण संबंध

इतक्या निरनिराळ्या दर्जाच्या व प्रतींच्या राज्यांचे कारभार–अंतर्गत व बाहेरलि–हे किती गुंतागुंतीचे असतील याची कल्पना कोणीही करावी. या संस्थानांचे अधिराजे असल्यास त्यांच्याशीं, व निरनिराळ्या परराष्ट्रांशीं, राजकीयसंबंधांचा कारभार चालविणारे अधिकारी यांचे दर्जे १०–२० तरी असतील. हीं सर्व राष्ट्रें आपला अधिकार चालेल तेथवर उघड तह एकमेकांशीं करतात. पण फिरून आंतून कपटतह वगैरे असतातच. विशेष प्रसंगीं निरनिराळ्या मिषांनीं हीं राष्ट्रें आपले वकील गुप्त संभाषणें करण्याकरितां एकमेकांकडे पाठवितात. एकमेकांत विरोध आला म्हणजे प्रत्यक्ष युद्ध सुरू न केलें तरी आपला राग प्रदर्शित करण्याकरितां परराष्ट्रांच्या दरबारीं ठेवलेले आपले वकील परत बोलावतात. परराष्ट्रांच्या आसपास आपलीं सैन्यें किंवा आरमारें पाठवून देऊन, सरहद्दीच्या अलीकडे आपल्याच राज्यांत सैन्यें जमवून युद्ध पुकारण्याच्या बेतांत असल्याचा देखावा करितात. व्यापारी बहिष्कार पुकारतात. आणि इतक्या सर्वांनीं कार्य झालें नाहीं म्हणजे युद्ध करितात. या युद्धांत तीं सर्व एकेकटीं लढतात किंवा वर सांगितल्याप्रमाणें आपल्या पक्षांत इतर राष्ट्रें सामील करून घेऊन लढतात.

---

# भाग ५ वा

## सेंद्रिय सजीव राज्यसंस्थेचीं अंगें

### ( ११३ ) राज्यसंस्थेचा विकास

राज्यसंस्था जसजशी विकास पावत जाते तसतसें तिचें कार्यक्षेत्र वाढत जातें. जनावरांच्या कळपाप्रमाणें कुटुंबाएवढेंच लहान राष्ट्र असेल तेव्हां, कुटुंबाकरितां करण्याचीं कामें फार थोडीं असणार. त्यांतील मनुष्य आपली उपजीविका शिकारीवर करितात. बहुधा बाप व मुलगे सगळेच मिळून शिकारीवर निघतात, व मारलेलीं जनावरें घरीं आणल्यावर तें शिजविण्याचें काम जें घरच्या बायकांकडे असतें तें त्या घरबसल्या करितात. पण त्याहि बाहेर पडून काय मिळेल सें भक्ष्य घेऊन येतातच. अशा या रानटी पेशाच्या वेळीं कांहीं तरी खाऊन भूक भागविणें याहून कुटुंब-कार्य फारसें अधिक राहात नाहीं. नुसतें पोट भरण्याचें काम हातोहात होतें व सोपें असतें. म्हणजे घरीं त्याकरितां कांहीं शिल्लक करून ठेवावी लागत नाहीं. कणगी भरून ठेवाव्या लागत नाहींत. दाराला कुलूप लावावें लागत नाहीं! रोज ताजा शिधा, रोज नव्या जागेवर चूल! त्याचप्रमाणें निवाऱ्याकरितां वसतीदेखील कोठें तरी डोंगर-कपारींत होऊं शकते, व रानांत मरून पडलेल्या किंवा मारलेल्या जनावरांचें कातडेंहि आयतें सांपडतेंच. एका शिकारींत दोन कामें होतात. भूक भागली व वस्त्राची सोय झाली. पण अशा कुटुंबालाहि राज्यसंस्था एवढ्याकरितां म्हणावयाचें कीं, तिचें आद्य तत्त्व व मुख्य तत्त्व हेंच असतें कीं, हुकूम करणारा एक सत्ताधारी व त्याची आज्ञा पाळणारे इतर सर्व. पुढें विकास होतो तो येथूनच.

### ( ११४ ) या विकासाचा क्रम

सर्व जगांत हटकून एकाच क्रमानें ( म्हणजे उदाहरणार्थ शिकारी, शेतकरी, उद्मी, नागरीक, राष्ट्रीय व विश्वबंधु या क्रमानें ) मनुष्याचा विकास झालेला आहे असें म्हणण्याचें कारण नाहीं. पण शास्त्रज्ञ लोक 'सामान्यतः' असा क्रम घेऊन चाललेले आहेत खरे. शिकाऱ्याची स्थिति जाऊन शेतकऱ्याचा पेशा मनुष्य पत्करितो तेव्हां, त्याला कुटुंबांतल्याहून अधिक माणसांची गरज लागते. पेरलेलें शेत हें बरोबर हिंडविण्याची वस्तु नसल्यामुळें, त्या जागेला धरून कुटुंबाला राहावें लागतें. आणि एका ऋतूंत फळ आलेलें दिसलें तर तेथेंच

मुक्काम वाढवून फिरून तोच उद्योग करण्यावाढविण्याची इच्छा त्याला व्हावी हें स्वाभाविक आहे. शेती म्हटली म्हणजे माणसांच्या बरोबर जनावरांचा उपयोग आलाच. पण रोज नवें नवें जनावर धरून आणतां येत नाहीं. जुंवाखालीं मान देण्याला रोज नव्या जनावराला शिकवावयाचें, त्यापेक्षां हातीं असलेलें जनावरच धान्य पेरलेल्या शेताजवळ खुंट्याला बांधून ठेवलें म्हणजे तेंच हवें तेव्हां उपयोगाला येतें. अशा रीतीनें मनुष्यकुटुंब, त्याचें पाळलेलें जनावर, त्यानें पेरलेलें शेत, यांची सांगड हळूहळू पडत जाते. आणि मनुष्य संगतिप्रिय असतो म्हणून त्याच्यासारखाच एखादा कोणी दुसरा शेतकरी त्याच्या शेजारीं येऊन राहतो. या क्रमानें प्रथम वाडी व नंतर खेडेगांव वसतें. आणि तसें झालें म्हणजे ( राज्यसंस्थेच्या विकासाच्या दुसऱ्या टोंकाला ज्याप्रमाणें राष्ट्रसंघ निर्माण व्हावा लागतो त्याप्रमाणें ) या वाडींतला शेतकरी हा व्यक्तिशः एक राष्ट्र आणि तो व इतर सगळे शेतकरी हीं अन्य राष्ट्रें मिळून तो राष्ट्रसंघ, अशी कल्पना किंवा रूपक केलें असतां तत्त्वतः त्यांत फारशी चूक होणार नाहीं. पिंडब्रह्मांड न्यायानें समाजाच्या प्राथमिक घटनेंतच अंतिम घटनेचीं बीजें असतात, आणि प्रतिभासंपन्न मनाला त्या दोहोंचें तादात्म्य सहजच पाहावयास सांपडतें.

## ( ११५ ) आणखी पुढील क्रम

शिकारीच्या मानानें शेतीचा व्याप अर्थातच मोठा, व त्याला लागणारीं साधनेंहि अधिक. या दृष्टीनें पहातां शेतकऱ्याला हळूहळू आपल्या बुद्धीचा उपयोग सहजच अधिक करावा लागतो, व कामाची वांटणी करून द्यावी लागते. घरीं राबता गडी ठेवला म्हणजे घरधन्याची राज्यसत्ता थोडी अधिक वाढली ! घरच्या बायकांमुलांवर सत्ता गाजविण्याचा जो प्रकार असेल त्यापेक्षां नोकरांवर सत्ता गाजविण्याचा प्रकार थोडासा वेगळा असणारच. या स्थितींत घरधन्याचे हुकूम सोडण्याचें काम म्हणजे तें राष्ट्रांतील कायदेमंडळाचें काम झालें व राजाचें किंवा अध्यक्षाचें काम झालें. आणि बायकामुलांकडे व चाकराकडे कामें वांटून नेमून दिलीं म्हणजे ती राष्ट्रांतील अधिकारविभागणी अगर तो खातेवार कारभारच झाला. घरच्या घरींच कोणीं गुन्हा केला तर त्याची न्यायमुनसफी करण्याकरितां लांबचे इतर लोक बोलाविण्याचें कारण नाहीं. पण वाडीच्या सार्वजनिक जागेंत कोणीं करूं नये तें केलें, किंवा एखाद्या कुटुंबाचें नुकसान दुसऱ्या कोणा एखाद्यानें केलें, तर एकटा घरधनी

अर्थातच त्याचा निवाडा स्वतः करूं शकत नाही. म्हणून एखाद्या झाडाखालीं वाडींतले शेतकरी जमून पंचायत पद्धतीनें, म्हणजे एकमेकांचा सल्ला घेऊन, ग्रामणी जो न्याय करीत असतील तो राष्ट्राराष्ट्रांतील न्यायदानपद्धतीचा प्रकार होय. मात्र त्यांत स्वतंत्र मॅजिस्ट्रेटी, किंवा ॲसेसरपद्धति, ज्युरीपद्धति या सर्वांचा समावेश एकत्र झाल्याचें आढळेल. याच क्रमानें समाजाचा विकास लक्षांत आणला म्हणजे हींच खातेवार कामें व हीच अधिकारविभागणी क्रमानें कशी होत जात असेल हें लक्षांत येईल.

## ( ११६ ) राज्यसंस्थेंतील त्रिमूर्ती

कोणतेंहि सरकार म्हटलें म्हणजे त्याच्या मुख्य कार्यशाखा तीन. ( १ ) कायदा करणारा अधिकारी ( २ ) कायद्याची बजावणी करणारा अधिकारी व ( ३ ) न्यायमुनसफी करणारा अधिकारी. एकाच राज्यमूर्तीचीं हीं तीन तोंडें होत. या त्रिमूर्तीपैकीं कायदे करणें हें आपण ब्रह्मदेवाचें काम समजूं. कारण तेथून सर्व कारभाराची उत्पत्ति होते. कायदा लेखी नसेल तोंडी असेल, किंवा नुसत्या मानेनें अगर खुणेनें दर्शविलेला असेल, किंवा ब्रह्मलिखित म्हणून नवा न करितां जुनाच चालविलेला असेल. तथापि कोणत्याहि कारभाराचा उपक्रम होण्याला कायद्याचें विधान हवें, व तेंच या त्रिमूर्तीतील ब्रह्मदेवाचें उत्पत्ति कार्य. कायद्याची अंमलबजावणी करणें हें विष्णूचें कार्य. म्हणजे समाजस्थितीचें व समाजधारणेचें कार्य. न्यायमुनसफीचें कार्य हें शंकराचें असें मानणें फारसें अनुरूप नसलें तरी, पहिल्या दोहोंहून तें काम अगदीं वेगळें आहे. म्हणजे न्यायदानांत जो सात्त्विक भाव लागतो तो आपल्या भोळ्या शंकरांत आढळतो; तसेंच न्यायाधिकाऱ्याला कित्येक वेळां कठोर होऊन शिक्षा करण्याची जी तामसवृत्ति लागते तीहि शंकरांतच विशेष आढळते !

## ( ११७ ) कायद्याची निर्मिति

कायदा हा जरूरीशिवाय उत्पन्न होत नाहीं. आणि आमच्या आधि-दैविक इतिहासांत म्हणजे पुराणांतहि हेंच सांगितलेलें आढळतें कीं, पृथ्वीवर कांहीं संकट आलें व कांहीं नव्या दैवी उपक्रमाची आवश्यकता उत्पन्न झाली, म्हणजे पृथ्वी गाईचें रूप धारण करून ब्रह्मदेवाला शरण जाते, मग तो श्रीविष्णूचा सल्ला घेऊन नवीन उपक्रम होतो. राजा किंवा कायदेमंडळ यांना देखील जर स्वस्थ बसावयास मिळेल व स्वस्थ बसून काम भागेल तर हवेंच असतें.

मुद्दाम होऊन कायदा करण्याची उठाठेव कायदेमंडळ करीत नाहीं. राष्ट्रांतील जुनी स्थिति बदलते व कांहीं नवीनच स्थिति उत्पन्न होते, तेव्हां तिला अनुसरून नवीन राजाज्ञा किंवा कायदे करावे लागतात, किंवा जुन्यांची सुधारणा करावी लागते. पण कांहीं झालें तरी कायदेमंडळाचें काम किंवा राजाज्ञेचे हुकूम काढण्याचें प्रत्यक्ष काम वर्षभर कोठेंच चालत नाहीं. बाराहि महिने चालणारीं कामें म्हटलीं म्हणजे ( १ ) जुन्या कायद्यांची अंमलबजावणी करणें, ( २ ) नवीन लागणाऱ्या कायद्याची पूर्व तयारी करणें व ( ३ ) न्यायदानाचें काम. हीं तीनहि खातीं एकमेकांपासून भिन्न असलीं तरी त्यांचा जिव्हाळ्याचा संबंध मात्र खास आहे.

## ( ११८ ) अंमलबजावणी खात्याचें महत्त्व

कायदा हा सर्व कारभाराचा मूळ आधार या दृष्टीनें राजा किंवा कायदेमंडळ हें सर्वांत महत्त्वाचें वाटतें. परंतु वस्तुतः सुराज्यव्यवस्था नांदावी व राज्यांत अराजकता उत्पन्न न व्हावी, तर अंमलबजावणीचें व न्यायदानाचें हींच कामें अधिक महत्त्वाचीं ठरतात. त्यांतल्यात्यांतहि अंमलबजावणी खातें हें, जसा गाड्याला कणा तसें, राज्यकारभाराला आधारभूत आहे. जमिनीच्या उदरांत वृक्षाचीं शेंकडों पाळेंमुळें जाऊन बसलेलीं असतात, आणि तेथें तीं वृक्षाला पोषक असें पाणी व भूमिगत द्रव्यशोषण करीत असतात. म्हणून जमिनीच्या वर दिसणारा वृक्ष उभा राहूं शकतो, नवीन पालवी धरतो, व फुलेंफळें देतो. त्याचप्रमाणें अंमलबजावणी करणारीं खातीं जर जागृत, उद्योगशील व आपापलीं कामें कसून, किंबहुना सरकारची बाजू घेऊन, करणारीं नसतील तर राष्ट्र समृद्ध, संपन्न व प्रबळ राहावयाचें नाहीं. कायदा कितीहि चांगला असला, नियम कितीहि चांगले असले, तरी त्यांची अंमलबजावणी झाली नाहीं तर लोकांचें व सरकारचें सारखेंच नुकसान होईल. कारण याच विभागांत धनोत्पादक, धनप्रसारक, धनसंरक्षक अशीं सर्व कामें चालतात. अंमलबजावणी करणारे अधिकारी चांगले असतील तर प्रजेला अन्याय न करितांहि त्यांना राजाचें सरकाराचें अनहित न होईल अशा रीतीनें, कारभार करितां येईल व त्यांच्यापुरतें तरी ते न्यायदानाला काम शिल्लक ठेवूं देणार नाहींत. मग लोक आपापसांत भांडणबखेडे करून न्यायपीठाकडे काय धांव घेतील ती खरी.

## ( ११९ ) कानूंचें पोट-नियमांचें महत्त्व

कायदेमंडळ किंवा राजा कायदे करतो ते प्रायः शक्य तितक्या थोड्या शब्दांनीं करतो. तेव्हां त्यांचा अर्थ नीट लक्षांत घेऊन, त्यांचा हेतु पूर्ण होईल अशा रीतीनें नियम करणें व पोटनियम करणें हीं कामें सर्वस्वीं अंमलबजावणी खात्याच्या अंमलदाराकडेच राहतात. नियम व पोटनियम यांचें काम इतकें प्रचंड असतें कीं, कायदेमंडळासारखीं १०-२० मंडळें वर्षानुवर्ष बसलीं तरी तें काम त्यांच्या हातून पार पडणार नाहीं. कायदेमंडळें हीं काल्पनिकच नसलीं तरी निदान तात्त्विक वातावरणांत आपलीं कामें करीत असतात. तें करितांना त्यांच्या डोळ्यापुढें फक्त नमुनेदार व्यक्ति, नमुनेदार लोकसमूह, नमुनेदार प्रसंग, नमुनेदार कार्यें, नमुनेदार अडचणी, नमुनेदार अधिकारी हेच असतात. परंतु अंमलबजावणीचा कारभार राज्यसंस्थेच्या टोंकापर्यंत व प्रजेंतील व्यक्तीपर्यंत जेव्हां जाऊन पोंचतो तेव्हां व त्या दरम्यान, या प्रत्येक एकेकट्या नमुन्यांतून शेंपन्नास पोटनमुने उत्पन्न होतात. म्हणून या सर्वांची व्यवस्था तर लागावी व मूळ कायद्याचा हेतु तर बिघडूं नये अशा युक्तीनें पोटनियम करावे लागतात. या सर्व कामाकरितां कायदेमंडळाकडे परत येण्याची गरज नसते, व प्रत्येक वेळीं तसें येऊन चालणारहि नाहीं. वरिष्ठ अधिकाऱ्यांनीं व कनिष्ठ अधिकाऱ्यांनीं प्रत्युत्पन्नमतित्वाची, प्रसंगावधानाची, दूरदेशीपणाची, सावधगिरीची, ताजी शिदोरी मिळवून स्वयंपाक करावा लागतो. प्रजेंतील लोकांचा संबंध मुख्यतः येतो तो या खात्यांतील लोकांशीं, नियमाशीं व पोटनियमांशीं.

## ( १२० ) प्राणिशास्त्राचा दाखला

प्राणरक्षण आणि जीवितसाफल्य यांच्याकरितां प्राणि-देह हा सर्वावयवसंपन्न असावा लागतो. कांहीं अवयव किंवा इंद्रियें कमी असलीं तरी प्राणी जगत नाहीं असें नाहीं. परंतु त्याची जीवयात्रा व्हावी तितकी सुखानें किंवा सौष्ठवानें होत नाहीं. सर्व अवयव व इंद्रियें असणारा प्राणीहि केव्हां तरी अंत पावतोच, परंतु त्याच्या नशिबीं लिहिलेला आयुर्दाय असेपर्यंत त्याला सर्व इंद्रियें व अवयव यांची जोड लाभली तर ती गोष्ट इष्ट होय. सामान्यतः प्राण्याला पांच इंद्रियें व तत्संबंधीं अवयव असतात. पण कांहीं प्राण्यांना कांहीं इंद्रियें मुळांतच नसतात, किंवा त्या इंद्रियांचें काम करून देणारे अवयव ठळकपणें दृष्टिगोचर असत नाहींत. याचें कारण ते प्राणी व्हावे तितके परिणत झालेले नसतात. उत्क्रां-

तीच्या कामांत ते खालच्या पायरीवर असतात. यामुळें त्यांचीं शरीरकार्यें व जीवनकार्यें थोडीं, व तेवढ्यापुरतींच इंद्रियें व अवयव असल्यानें त्यांचें काम भागतें. पण पूर्ण उत्क्रांति पावलेल्या प्राण्याच्या जीवनकार्याचें क्षेत्र पुष्कळच विस्तृत असतें. यामुळें त्यांचीं इंद्रियें व अवयव हीं देखील परिणत अवस्थेंतलि असतात. एका बाजूला 'अमीबा' नांवाचा लहानांत लहान प्राणी घेतला तर तो केवळ बिंदुमात्र असतो. त्याला ज्ञान कितपत असतें हें सांगतां येत नाहीं. परंतु जगण्याची इच्छा, पोषणाचा उद्योग, व आत्मरक्षणाविषयींचा प्रयत्न इत्यादि जीवलक्षणें या अमीबा प्राण्यामध्येंहि असतात; व आपली पुढची पिढी व प्रजा निर्माण करण्याची शक्तिहि त्यांजमध्यें असते. दुसऱ्या टोंकाला असणारा आधुनिक मनुष्य म्हणजे, अत्यन्त सुधारलेला मनुष्य, घेतला तर वरील तीन चारहि लक्षणें त्याजमध्यें असतातच. पण त्याचा मेंदू व अंतःकरण व बुद्धि इतकीं कांहीं परिणत झालेलीं असतात कीं, अमीबा व हा मनुष्य यांच्यामध्यें जमीनअस्मानाची तफावत पडते. या मनुष्याला आहेत हीं इंद्रियें व अवयव हे अपुरे पडतात, यामुळें आहेत त्यांच्याकडूनच भरपूर व विविध काम घेऊन तो आपलें कार्य करितो.

## (१२१) उभारणी, संहारणी, विभागणी

राज्यसंस्था हा एक जीव किंवा प्राणी मानला तर त्याचीहि गोष्ट अशीच समजावी. अगदीं रानटी स्थितींतलें कुटुंब किंवा ग्रामसंस्था घेतली तर ती या अमीबा प्राण्यासारखी केवळ बिंदुमात्र असते; आणि तिच्या जीवयात्रेंत निरनिराळ्या इंद्रियाकडून व अवयवांकडून होणाऱ्या कार्याचीं मूलतत्त्वें सूक्ष्म बुद्धीला दिसून येत असलीं तरी तीं सहज दिसण्याइतकीं ठळक नसतात. अशा संस्थेच्या कार्यांत विविधपणा नसतो, व विस्तार तर नसतोच नसतो. पण अगदीं आधुनिक व सुधारलेलें असें राष्ट्र घेतलें तर त्यांत याच्या उलट सर्व प्रकार आढळून येईल म्हणजे कार्यांचा विस्तार अतिशय विविध आणि विस्तृत. तसेंच कार्याच्या हेतुसिद्धीचीं साधनेंहि त्यामुळें विविध व संख्येनें पुष्कळ. तथापि हीं दोन टोंकें सोडून देऊन मध्यम प्रतीची राज्यसंस्था घेतली तर तींत कार्यपरत्वें अधिकाराची विभागणी झालेली असून त्या त्या अधिकाराचा योग्य उपयोग करण्याकरितां निरनिराळ्या प्रकारचीं राज्ययंत्रें बनविलेलीं आढळतात. जेथें उभारणी आहे तेथें संहारणी असतेच. एकां-

तून अनेकाची उत्पत्ति होते, पण ते अनेक मुळापासून विलग नसून एकजीव असतात. एखाद्या शहरांत समान्तर रस्ते जोडण्याकरितां मधून मधून आडवे रस्ते असावे, फिरून ते समान्तर रस्ते शेवटीं जोडणारा असाहि एखादा रस्ता असावा, व या सर्व रस्त्यांचें केन्द्र म्हणून कोठें तरी मुख्य ठिकाणीं असावें, त्याप्रमाणें राज्यसंस्थेच्या विभागणीमुळें उत्पन्न झालेल्या निरनिराळ्या खात्यांची गोष्ट आहे. म्हणजे मूळ अधिकाराचें स्थान एकच. पण त्या स्थानापासून वेगवेगळ्या स्वरूपाची व कमीअधिक मोठ्या अधिकारांचीं खातीं निर्माण होतात, तथापि त्यांचा एकमेकांशीं संबंध अगदींच तुटलेला नसतो. आपआपल्यापुरता संपूर्ण अधिकार असेल तो बजावून शिवाय हीं खातीं एकमेकाला मदतगार असतात.

## ( १२२ ) परस्पर गुंतागुंतीचा प्रकार

हीं खातीं अनेक असलीं तरी त्यांचें वर्गीकरण पूर्वीं सांगितलेल्या तीन सदरांखालीं करितां येतें. ( १ ) कायदेकानू, विधिनियम इ० उत्पन्न करणारें खातें; ( २ ) त्यांची निरनिराळ्या परीनें अंमलबजावणी करणारें खातें; व ( ३ ) न्यायखातें. कोणतेंहि खातें घेतलें तरी तें या तिहींपैकीं कोणत्या ना कोणत्या सदरांत पडतें असें दाखवितां येईल. हीं तीन खातीं बहुधा पृथक् असतात. तथापि प्राथमिक स्थितींत तर तीं कमीअधिक एकवटलेलीं आढळतातच, पण परिणत स्थितींतहि त्यांची व्याप्ति थोडीबहुत एकमेकांवर झालेली आढळूं शकते. उदाहरणार्थ, कायदेकौन्सिलांत नुसते कायदे घडण्याचेंच काम होतें असें नाहीं, तर त्यांमध्यें अधिकारी सभासद व इतर सभासद यांच्यामध्यें (अस्तित्वांत असलेल्या किंवा अस्तित्वांत येऊं घातलेल्या) कायदेकानूसंबंधानें चर्चा व विचारविनिमय होतो, सवाल जबाब होतात, ठराव मंजूर नामंजूर होतात, प्रश्नोत्तरांच्या रूपानें मतदारांना व जगाला राज्यकारभाराची माहिती कळविली जाते, जुनीं धोरणें वाईट असतील तर तीं टाकून देण्याचा आग्रह केला जातो, व नवीं चांगलीं धोरणें सुचविलीं जाऊन मान्य करण्यांत येतात, इत्यादि गोष्टी लक्षांत घेतल्या म्हणजे, कायदेकानू करणाऱ्या मंडळांत राज्यकारभाराचें काम म्हणजे अंमलबजावणीखात्याचें कांहीं काम निदान पूर्व तयारीच्या रूपानें केलें जातें हें कबूल करावें लागेल. राष्ट्राचा जमाखर्च पुढें मांडून मंजूर करून घेणें, म्हणजे प्रत्यक्ष कायदा न करतांहि इतर प्रकारच्या

संमतीनें मंजूर करून घेणें ही फार महत्त्वाची गोष्टहि कायदेमंडळांत घडत असते. तात्पर्य, कायदेमंडळ हें दिसण्यांत केवळ कायदे निर्माण करणारें दिसलें तरी त्यांत अंमलबजावणखात्याचें काम थोडेंबहुत मिसळलें गेलेलें असतें. तसेंच कित्येक कायदे असे बनविले जातात कीं, त्यांमध्यें फक्त मूल तत्त्वाचें दिग्दर्शन केलेलें असतें. पण तीं मूलतत्त्वें संभाळूनच का होईना, प्रत्यक्ष करावयाचें असें अंमलबजावणीचें काम इतकें असतें कीं त्याकरितां फिरून नियम व उपनियम करावेच लागतात. यांपैकीं कांहींना प्रत्यक्ष कायद्याचेंहि स्वरूप असूं शकतें, व तें स्वरूप स्वतः कायदेमंडळाच्या अनुज्ञेनेंच प्राप्त होतें. मग सर्व नियम व उपनियम कोण करतें? तर स्वतः कायदेमंडळ तें करीत नाहीं; ते काम सर्वस्वीं अंमलबजावणी खात्यांच्या मुख्य अधिकाऱ्यांवर सोंपविलें जातें. मग तें काम संयुक्त कार्यकारी प्रधानमंडळाच्या संमतीनें होवो किंवा एकेक खात्याच्या अधिकाऱ्यांकडून अधिकारपरत्वें तें केलें जावो. उदाहरणार्थ, प्राप्तीवरील कर, अबकारी, जंगल खातें, जमीनमहसूल, रजिस्ट्रेशन वगैरे खात्यांच्या कारभाराला स्थूल व मूलग्राही अशी मान्यता तत्संबंधीं एखादा कायदा कायदेमंडळानें करूनच मिळालेली असते. परंतु त्या कायद्यांच्या आधारावर पुढें नियम, पोटनियम, अपवाद त्यांचें एवढें मोठें रान माजतें कीं, मूळ कायदा करणाऱ्या लोकांना त्याची जाणीव किंवा दखलगिरीहि नसते. कायदेमंडळांत प्रत्यक्ष न्यायदानाचें काम होत नाहीं. परंतु हाउस ऑफ लॉर्डसारख्या एखाद्य कायदेमंडळाच्या एखाद्या भागाला न्यायदानाचेहि कांहीं अधिकार असूं शकतात. आणि कायदेमंडळ हें जरी न्यायाधिकाऱ्यांच्या नेमणुका करीत नाहीं, तरी न्यायकोर्टांची रचना, त्यांचे अधिकार, व क्वचित् न्यायाधिकारी व्यक्तींना न्यायखात्यांतील विशिष्ट जागांवर काम करण्यास लागणारी पात्रता या गोष्टी आणि न्यायदानाची पद्धत कशी असावी, काम कसें चालावें, पुरावा कसा घ्यावा, न्यायकोर्टांचे निर्णय अंमलांत कसे आणावे इत्यादि गोष्टी मुख्यतः कायदेमंडळच प्रत्यक्ष कायदे करून ठरवून देतें, अशा रीतीनें कायदेमंडळ व न्यायखातें यांचा संबंध निगडित असतो.

## ( १२३ ) एकांत अनेकांचा समावेश

तसेंच एकाच अधिकाऱ्यामध्यें निरनिराळ्या खात्यांचे अधिकार समाविष्ट

होऊं शकतात. उदाहरणार्थ, राजा हा कायदेमंडळाचा मुख्य अधिकारी असल्यामुळें त्या मंडळानें बनविलेल्या कायद्याला मान्यता देणें किंवा मान्यता न देणें हा अधिकार राजाला असतो. न्यायखात्यांतील वरिष्ठ दर्जाचे न्यायाधीश यांची नेमणूक राजाच्या आज्ञेवरूनच होते. इंग्लंडांत सर्वांत वरिष्ठ असलेल्या प्रीव्हि कौन्सिलचा निर्णय राजा प्रायः मानतो ही गोष्ट वेगळी; पण तो न मानण्याचें त्यानें मनांत आणलें तरीहि तो अधिकार त्याला असतोच. अंमलबजावणी खात्याचे मुख्य अधिकारी मिळूनच प्रधानमंडळ बनतें व हे प्रधान नेमणें, काढून टाकणें, व प्रधानमंडळाचे ठराव वाटल्यास बदलणें या गोष्टी राजा करूं शकतो. राजा हा राष्ट्रांतील मुख्य मॅजिस्ट्रेट. तसेंच तो लष्कर व आरमार यांचाहि मुख्य अधिकारी असतो, व युद्ध पुकारणें, तह करणें या गोष्टींना त्याची संमति लागते. यानंतर प्रधानमंडळांतले सभासद घेतले तर असें आढळेल कीं एकेक प्रधानाच्या हातीं अनेक निरनिराळीं खातीं कारभाराकरितां दिलेलीं असतात. कारण खात्यांचे प्रकार जितके पुष्कळ तितके प्रधान नेमतां येत नाहींत, मग त्यांची संख्या कोठें चार, कोठें पांच, कोठें आठ, कोठें फार तर बारा पंधरा येथपर्यंत जाईल. अर्थात् खातेवारीचीं कामें वेगवेगळीं असलीं तरी प्रधान किंवा मंत्री एकच असल्यामुळें एकाच मनानें अनेक खात्यांचा कारभार चालतो हें उघड आहे.

### ( १२४ ) कांहीं उदाहरणें

आमच्या इकडे रेव्हेन्यु कमिशनर हा कलेक्टरच्या वरच्या दर्जाचा असतो परंतु त्याच्याकडे न्यायाधिकार कांहींच नसतो. पण त्याच्या हाताखालीं असणारा कलेक्टर हा जिल्ह्यापुरता अनेक खात्यांचा मुख्य अधिकारी असून, शिवाय त्याला जिल्ह्याच्या मुख्य मॅजिस्ट्रेटचे म्हणजे न्यायदानाचेहि अधिकार असतात. वऱ्हाड प्रांतांत परवां परवांपर्यंत एक्स्ट्रा असिस्टंट कमिशनर, म्हणजे इकडचे असिस्टंट कलेक्टर व डेप्युटी कलेक्टर, या दर्जाच्या अधिकाऱ्यांना मुलकीप्रमाणें फौजदारी व दिवाणीहि अधिकार असत. अलीकडेच त्या अधिकारांची विभागणी करण्यांत आली आहे. तसेंच मामलेदार हाहि रेव्हेन्यू अधिकारी असून मॅजिस्ट्रेट असतो. आणि त्याखालीं गांवचा पाटील हा एक प्रकारें रेव्हिन्यू अधिकारी असून त्याला व्हिलेज पोलिस ॲक्टान्वयें ( अगदीं किमान स्वरूपाचे

कां होईना पण ) मॅजिस्ट्रेटी अधिकार असतात. फक्त तलाठी व कुलकर्णी यांना मात्र रेव्हिन्यूशिवाय दुसरा अधिकार नसतो. तसेंच खात्याच्या मुख्य अधिकाऱ्यामध्यें अशा रीतीनें निरनिराळ्या अधिकारांचें मिश्रण असलें तरी तें फक्त त्यांच्यापुरतेंच असतें. म्हणजे त्यांचे दुय्यम किंवा त्याखालचे कारकुनी फडांतील नोकर यांना असे मिश्र अधिकार असत नाहींत. तसेंच फिरून त्रैगुण्याचा दाखला द्यावयाचा तर असें म्हणतां येईल कीं, राज्यसंस्था चालविणारें सरकार हें त्रिगुणात्मक असतें. त्यांपैकीं तमोगुण लष्कर व पोलिस यांच्या द्वारें प्रगट होतो. रजोगुण कार्यकारी मंडळांतून प्रगट होतो. आणि सत्त्वगुण हा न्यायखात्यांतून प्रगट होतो. वास्तविक हे तिन्ही गुण आपापल्या परीनें उत्कर्षाला पोंचले असतील तरच तें सरकार व ती राज्यसंस्था सुखफलप्रद व ऐश्वर्यसंपन्न होऊं शकेल. पण त्यांतल्यात्यांत न्यायखात्याला जो एक प्रकारचा मान लोक देतात तो इतर कोणत्याहि खात्याला देत नाहींत. कारण कार्यकारी खातें हें स्वार्थी असतें व त्यानें तसें असलेंहि पाहिजे. पण त्यामुळें स्वार्थापोटीं जीं पापें असतात तीं त्या खात्याला चिकटतात. आणि कायदेमंडळ हें कार्यकारी खात्याच्या हातीं बहुधा बाहुलीसारखें असतें. लोकसत्ताक राज्यपद्धतींत असा सिद्धान्तच आहे कीं, जें प्रधानमंडळ कायदेमंडळाला सर्वस्वीं आपल्या हातांत ठेवील तेंच अधिकारावर राहण्याला पात्र आहे. नाहीं तर त्यानें राजीनामा देऊन दूर व्हावें. फार तर आपल्या बरोबर कायदेमंडळहि मोडून टाकून, फिरून नव्या निवडणुकीच्या द्वारें नवें कायदेमंडळ उत्पन्न करून, त्यांत स्वतःला बहुमत मिळवून, फिरून स्वतः प्रधानमंडळाचा अधिकार मिळवावा, व अशा रीतीनें नवी सृष्टि निर्माण करावी.

## ( १२५ ) न्यायखात्याचें वैशिष्ट्य व श्रेष्ठत्व

असो. न्यायखात्याकडे सात्त्विकगुण देण्याचें मुख्य कारण असें कीं तें खातें निःस्वार्थी व निःपक्षपाती असतें अशी समजूत आहे, निदान तें तसें असावें अशी अपेक्षा असते. न्यायाधिकाऱ्यांची नेमणूक राजा किंवा मंत्रिमंडळ करीत असलें तरी, ती नेमणूक एकदां झाल्यावर खऱ्या न्यायाधीशाला सर्वस्वीं आपलें स्वातंत्र्य राखावें लागतें. न्यायाधिकाऱ्याचें मुख्य कर्तव्य विद्यमान कायद्यांचा अर्थ बरोबर करून त्याप्रमाणें निग्रहानुग्रहाचें माप आपल्यापुढें येणाऱ्या कोणाच्याहि पदरांत घालणें हेंच असतें. मग तो वाद दोन्ही पक्षीं प्रजाजनामधीलच

असो, किंवा एका बाजूला प्रजा व दुसऱ्या बाजूला राजा म्हणजे सरकार हें असो. न्यायदानाच्या कामांत पक्षपात, भीडमुर्वत, लांचलुचपत, हीं कांहीं असतां कामा नये. न्यायपीठापुढें कांटेतोल न्याय मिळणें हा राष्ट्रांतील प्रत्येक मनुष्याचा जन्मसिद्ध हक्क मानला जातो. श्रीमंताविरुद्ध गरीबांना, प्रबळाविरुद्ध दुर्बलांना, अधर्मनिष्ठांविरुद्ध धर्मनिष्ठांना, न्यायाधिकारी ही एकच मोठी व खरी जामिनकी मिळू शकते. त्यांचें रक्षण करणारी तीच एक ढाल होय. आणि स्वार्थानें उपस्थित केलेल्या या जगांतील युद्धांत ती ढालच त्यांचें संरक्षण करूं शकते. यामुळें कोणत्याहि राष्ट्रांतील न्यायदानाचें काम कसें चालतें यावरच त्यांतील राज्याची खरी अब्रू अवलंबून असते. सरकारनें एक वेळ वाजवीहून थोडे अधिक कर लादले तरी लोक ते देतात; व ते देऊनहि राष्ट्रांत आपलें पद अस्थिर आहे असें प्रजेला वाटत नाहीं. पण न्यायदानाचा झरा गढूळ झाला म्हणजे आपल्या अन्नांत माती कालवली गेली असें प्रजेला सहजच वाटतें. कारण स्वराज्य भोगणाऱ्या राष्ट्रांत तरी प्रधानमंडळानें आज कर थोडे अधिक लादले तर त्याला व त्या करांना उद्यां काढून टाकण्याची शक्यता मनांत धरितां येते. पण न्यायाधिशावर प्रत्यक्ष लांचलुचपतीचा आरोपच खटल्यांत शाबीत होईल तरच तो पदभ्रष्ट होईल. पण अशा तऱ्हेचा आरोप शाबीत होण्याइतकें दुर्वर्तन न्यायाधिकाऱ्याचें डोळ्यावर येणारें नसेल तर त्याला पदभ्रष्ट करणें हें मंत्रिमंडळाला पदभ्रष्ट करण्याहून अधिक अवघड ठरतें. कारण न्यायाधीश एकदां नेमला म्हणजे तो कायमचा नेमला गेला असा संकेत असतो. एकदां नेमलेला न्यायाधीश सरकारानें नालायकीकरितां काढून टाकला असें क्वचितच घडतें. अशा स्थितींत जर का एखादा न्यायाधीश सरकारपक्षपाती बनला तर लोकांना आधार नाहींसा होतो.

## (१२६) तोच मुद्दा पुढें चालू

न्यायाखात्याला इतरहि कांहीं गोष्टींमुळें विशेष महत्त्व येतें. न्यायाधिकारी हा जसा निःपक्षपाती असावा त्याचप्रमाणें न्यायदानाचें काम फार भानगडीचें होऊं नये, म्हणजे थोड्या वेळांत व थोड्या खर्चांत योग्य न्याय मिळावा हें ध्येय असतें. आणि असें झालें तरच प्रजेला सुख लाभतें व राज्याची अब्रू वाढते. याशिवाय आणखीहि एक कारण असें कीं, कायदेकानू करण्याचें काम हें जरी कायदेमंडळाचें असतें तरी अप्रत्यक्षरीत्या

न्यायाधिकाऱ्यांनाहि एकप्रकारचा कायदा करण्याचा हक्क प्राप्त होतो. तो असा कीं मूळ कायदा होतो तेव्हां फक्त कांहीं विवक्षित स्थितिच कायदेमंडळाच्या डोळ्यापुढें असते. पण जगांतील व्यवहार हे अगदीं एकासारखे एक क्वचितच असतात. म्हणजे व्यवहारव्यवहारांत सूक्ष्म भेद व श्लेष निघतातच. अर्थात् कायद्याच्या मूळ तत्त्वाला धक्का न लावतांहि, त्यांच्या प्रत्यक्ष उपयोगांत, निरनिराळ्या व्यवहारांतील परिस्थितीप्रमाणें, मुरड घालावी लागते. मूळ तत्त्वांची मर्यादा किंवा व्याप्ति कोठें वाढवावी लागते तर कोठें ती संकुचित करावी लागते. कोठें तत्त्वाचा कठोरपणा प्रगट करावा लागतो, तर कोठें सौम्यपणाचा आभास दाखवावा लागतो. कोठें अशी कल्पना करावी लागते कीं न्यायपीठापुढें आलेला व्यवहार कायदेमंडळाच्या डोळ्यापुढें नव्हता ही गोष्ट वेगळी, पण असता तर त्याचा परामर्ष घेण्याकरितां जी व्यवस्था करावी लागली असती ती विद्यमान शब्दांतून निघूं शकण्यासारखी आहे ! तात्पर्य, या नाहीं तर त्या कारणामुळें, आपल्या बुद्धीप्रमाणें, न्यायकोर्टाला आपला निर्णय द्यावा लागतो. अर्थात् त्यामुळें कायद्याचे मूळचे शब्द जरी बदलन नसले तरी न्यायकोर्टाच्या निर्णयानें त्यांतून एक सूक्ष्म असा नवा कायदाच निघतो. आणि मूळचा कायदेमंडळाचा कायदा आणि न्यायकोर्टानें बनविलेला हा कायदा हे दोन्ही जमेस धरून त्यावर आपलें बुद्धिबल खर्चून वादीप्रतिवादी किंवा त्यांचे वकील यांना आपापल्याकडे कायद्याची ओढाताण करतां येते. न्यायाधिकाऱ्यांनीं आपल्या न्यायदानाच्या कार्यांत आपाततः निर्माण केलेल्या या कायद्याला इंग्रजींत Case law किंवा Judge–made law असें म्हणतात. त्याच्या अंमलबजावणीला बंधन इतकेंच कीं हा कायदा निर्माण करण्याचा अधिकार राष्ट्रांतील पूर्णाधिकारी अशा एका किंवा अनेक न्यायकोर्टांनाच असतो. निदान अशा कोर्टांनें दिलेल्या निर्णयाखेरीज इतर, म्हणजे त्याहून खालच्या दर्जाच्या कोर्टानें दिलेला निर्णय मानावा असें कोणास आग्रहानें म्हणतां येत नाहीं. हिंदुस्थानचें उदाहरण घेतलें तर असें दिसतें कीं, प्रांतानिहाय निरनिराळीं हायकोर्टें आहेत त्यांपैकीं एका हायकोर्टाचा निकाल दुसऱ्या हायकोर्टानें, आपल्या समर्थनाकरितां आधार म्हणून इच्छेस येईल तर घ्यावा. पण एका हायकोर्टाचा निर्णय दुसऱ्या हायकोर्टावर हटकून बंधनकारक होतो असें नाहीं. मात्र त्याच हायकोर्टाच्या पूर्वीच्या न्यायाधिशांनीं दिलेला निर्णय, म्हणजे त्यांतून

निघणारा कायदा, हा त्यामागून येणाऱ्या न्यायाधिशाला मानावा लागतो. तसेंच या सर्व हायकोर्टांना वरिष्ठ असें जें विलायतेंतील प्रीव्ही कौन्सिल त्याचा निर्णय मात्र प्रत्येक हायकोर्टाला मानावा लागतो. सरकारी खात्यांपैकीं न्यायखात्याचें महत्त्व अशा अनेक दृष्टींनीं सिद्ध होतें.

### ( १२७ ) कारणपरत्वें श्रेष्ठ-कनिष्ठत्व

कायदेमंडळ, अंमलबजावणी करणारें कार्यकारी अधिकारीमंडळ, आणि न्यायाधिकारी मंडळ हीं तीन एकाच राज्यसंस्थेचीं अंगें होत आणि त्यांचा संबंध त्रिमूर्ति देवतांसारखा किंवा एकाच वृक्षाच्या तीन शाखांसारखा आहे हें मागें दर्शविलेंच आहे. त्यावरून हें लक्षांत येईल कीं, मूळ ठिकाणीं त्यांचा संबंध एकत्र असला तरी आपापल्या कार्यांत हीं तीनहि मंडळें पूर्णपणें स्वतंत्र आहेत. त्यांच्या नित्याच्या कार्यांत एकमेक हात घालूं शकत नाहींत. परंतु कोठें कोठें अंतिम स्थितींत त्यांचा एकमेकांशीं जिव्हाळ्याचा संबंध असून, त्यांपैकीं केव्हां एक वरचढ तर केव्हां दुसरें वरचढ असें घडतें. तरी तें कसें हें थोडक्यांत पाहूं. जे कायदे अलिखित असतील त्यांचा कायदेमंडळाशीं संबंध नाहीं. पूर्वपरंपरेचा शिष्टसंमत व सर्वमान्य आचार या नात्यानें त्यांचा अमल न्यायमंडळें करूं शकतात. याला इंग्रजींत Customary law किंवा Common law किंवा Law of usage किंवा Prescriptive Law अशीं निरनिराळीं नांवें आहेत. हे कायदे अलिखित असल्यामुळें कायदेमंडळाला अर्थातच त्यांत शब्दाची फुटकळ दुरुस्ती करतां येत नाहीं. पण सरकारच्या इच्छेनें किंवा लोकमताच्या जोरावर हा अलिखित कायदा बदलावा असें ठरल्यास कायदेमंडळाला आपल्या स्वतःच्या शब्दांनीं तद्विषयक नवा कायदा करावा लागतो; व असें म्हणावें लागतें कीं, 'पूर्वीं अमुक अमुक कायदा किंवा चालरीत किंवा आचार किंवा समजूत असली तरी, यापुढें अमुक अमुक व्हावें ( किंवा न व्हावें )" आणि अशा शब्दांनीं नवा कायदा बनला म्हणजे मग मात्र न्यायमंडळाला नक्की तेच शब्द घेऊन, व त्यांचा मीमांसाशास्त्राप्रमाणें योग्य तो अर्थ करून न्याय द्यावा लागतो.

### ( १२८ ) एक ठळक उदाहरण

ही अलिखित कायद्यांची गोष्ट झाली. पण कायदेमंडळ जे कायदे स्वतःच्या शब्दांनीं नवे करील ते मात्र अंमलबजावणी मंडळावर व न्यायमंडळावरहि

जसेच्या तसे बंधनकारक होतात. आणि लिखित कायद्यासंबंधानें शब्दप्रामाण्य इतकें कठोर असतें कीं, " कायद्याचे शब्द असतील ते खरे, त्यांच्यामार्गे जाऊन त्यांच्या हेतूंची फारशी चिकित्सा करण्याचा न्यायमंडळाला अधिकार नाहीं. तसेंच त्या कायद्याची घडण होत असतां सरकारतर्फे किंवा इतर कोणी, त्यासंबंधानें कांहीं बोललें असेल तर न्यायमंडळानें ती हकीकत गैरलागू म्हणून अनधिकृत म्हणून सोडून दिली पाहिजे. आणि नुसत्या शब्दांवर विसंबून न्याय दिला पाहिजे." पुष्कळ वेळां न्यायमंडळाच्या लक्षांत हें येतें कीं, "कायद्याचा हेतु एक असतां त्याचे शब्द मात्र चुकून भलते पडले आहेत, किंवा कायद्याच्या अमलबजावणीसंबंधानें ते सुचविणारांनीं ( म्हणजे प्रत्यक्ष सरकारानेंहि ) आपण कायद्याच्या अंमलाविषयीं अमुक एक धोरण ठेवूं असें आश्वासनहि दिलेलें होतें." पण न्यायनिवाडा करतांना या गोष्टी न्यायाधिकाऱ्यांना लक्षांत घेतां येत नाहींत. त्यांनीं कायद्याच्या शब्दावरहुकूमच निर्णय द्यावा, व मग अवांतर गोष्टी लक्षांत घेऊन सारासार विचाराच्या योग्य त्या शिफारशी मात्र कराव्या. सरकार त्यांचा विचार वाटेल तर करील किंवा न करील ! किंवा असेंहि घडतें कीं "आपण जो न्यायनिर्णय देतों तो कोणाच्याहि विवेकबुद्धीला पटण्यासारखा नाहीं, तो असमंजसपणाचा किंबहुना मूर्खपणाचाहि आहे. पण काय करावें ! दुर्दैवानें कायदा हा असा आहे खरा" असें म्हणून त्यांना स्वस्थ बसावें लागतें. न्यायकोर्टाच्या शिफारशी किंवा टीका लक्षांत घेऊन कायदेमंडळानें जुना कायदा दुरुस्त केला तर ठीकच, नाहीं तर न्यायकोर्टाला फिरून जुन्या कायद्याचाच अंमल करावा लागतो.

### ( १२१ ) आणखी उदाहरणें

न्यायकोर्टानें दिलेल्या निर्णयाची अंमलबजावणी अखेरपर्यंत झाली कीं नाहीं हें पाहण्याचा अधिकार न्यायकोर्टाला कांहीं बाबतींत राहातो, कांहीं बाबतींत राहात नाहीं. उदाहरणार्थ–दिवाणी कोर्टाचे हुकूमनामे कांहीं दिवाणी कोर्टाच्या अधिकाऱ्यांकडूनच अमलांत यावयाचे असतात. पण कांहीं मुलकी अधिकाऱ्यांकडेहि बजावणीला यावयाचे असतात. यापैकीं पहिल्या प्रकारच्या बजावणींत कोर्टाचा हात अखेरपर्यंत चालतो. दुसऱ्यांत तो चालत नाहीं. फौजदारी निवाड्यासंबंधानें तर न्यायकोर्टाचे अधिकार निकाल सांगतांच संपतात. म्हणजे शिक्षा झालेला कैदी हा त्यापुढें कार्यकारी अधिकाऱ्यांच्या हातीं

जातो; व तुरुंगांचा म्हणून एक कायदा आहे त्याप्रमाणें कैद्याची व्यवस्था लागते. शिक्षेच्या मुदतींत कैद्याला कसें वागवावें, त्याला अन्नपाणी कसें द्यावें, त्याजकडून काम किती घ्यावें, त्याला शिक्षा कोणती करावी, इतकेंच काय पण त्याला शिक्षेची मुदत भरण्यापूर्वींहि सरकारच्या मर्जीला आल्यास किती दिवस आधीं सोडावा व उरलेली शिक्षा माफ करावी हा सर्व अधिकार सरकाराकडेच जातो. न्यायकोर्टाकडे रहात नाहीं. न्यायकोर्टानें शिक्षा दिलेल्या कैद्यासंबंधानें सरकारला फक्त एकच गोष्ट करितां येत नाहीं ती, मूळ दिलेली शिक्षा एका दिवसानेंहि वाढविण्याची ! दंडासंबंधानें पहातां तो केव्हां कसा वसूल करावा हा अधिकारहि न्यायकोर्टाकडे उरत नाहीं, सरकाराकडे जातो, व येथेंहि सरकाराला मूळचा दंड एक पैशानेंहि वाढवितां येत नसला तरी, तो सर्वच्या सर्व दंडहि वाटेल तर माफ करतां येतो.

### ( १३० ) पुन्हां तेंच

उरलेली गोष्ट स्वतः न्यायाधिकाऱ्यांची नेमणूक व बहाली बडतर्फी या बाबतींत खुद्द हायकोर्ट किंवा प्रीव्हि कौन्सिलपर्यंतचे न्यायाधीश, म्हणजे एकंदरीनें कोणचाहि न्यायाधीश नेमण्याचा अधिकार सरकारचा आहे. तसेंच त्यांची बहाली, बडतर्फी, बदली या सर्व गोष्टी सरकारच्या पोलिटिकल खात्याच्या हातीं राहतात. खालच्या न्यायकोर्टांचें काम तपासण्याचा अधिकार मात्र हायकोर्टाकडे असतो, म्हणून त्या तपासणींत किंवा अपील वगैरेंत खालच्या न्यायाधिकाऱ्यासंबंधानें हायकोर्टाचें जें मत होईल तें त्यांनीं सरकारास कळवावें; पण फक्त शिफारसवजा ! तें मानण्याचा किंवा बाजूला ठेवण्याचा अधिकार सरकारचा आहे. हायकोर्ट किंवा वरिष्ठ कोर्ट यांतील न्यायाधिशांची नेमणूक मात्र खुद्द राजाकडून व्हावयाची असते. यामुळें बहाली, बडतर्फी ही देखील राजाकडेच राहाते. कोणच्याहि न्यायाधिकाऱ्याला कायदेमंडळांत बसतां येत नाहीं, पण कलेक्टरच्या रँकेपर्यंत रेव्हिन्यू अधिकाऱ्यांना फौजदारी न्यायकोर्टाचे अधिकार देतां येतात. त्यापुढें असिस्टंट जज्जापासून अंमलबजावणीचें व न्यायाचें काम यांची फारकत होते.

### ( १३१ ) कायदेमंडळाचें वैशिष्ट्य

कायदेमंडळाचा व बजावणीच्या अधिकाऱ्यांचा वरिष्ठ कनिष्ठ असा संबंध अर्थाअर्थीं कांहींच येत नाहीं. या अधिकाऱ्यांनीं कायदे मोडले तर त्याबद्दल

कायदेमंडळाला स्वतः कांहीं इलाज करतां येत नाहीं. तसेंच न्यायाधिकाऱ्यांच्या वर्तनासंबंधानेंहि, कोणाला कायदेमंडळाकडे तक्रार करतां येत नाहीं. कायदेमंडळाचें काम फक्त कायदे करण्याचें; म्हणजे कायदे नवे करणें किंवा, आहेत ते काढून टाकणें, किंवा त्यांत दुरुस्ती करणें इतकेंच रेखीव, कातीव, मर्यादित, काम कायदेमंडळाकडे असतें. पण बजावणीचे अधिकारी व न्यायाधिकारी यांच्यावर कायदेमंडळाचा कांहीं एक ताबा नसला तरी, खरी तात्त्विक अशी सर्व राजसत्ता कायदेमंडळाच्याच स्वाधीन आहे असें म्हणावें लागतें. कारण सरकारचें झालें तरी कोणतेंहि कृत्य कोणच्या तरी कायद्याखालीं पडतें, कायद्याच्या अनुसार होतें असें जर न दाखवितां आलें, तर ती राजाज्ञाच नव्हे असें समजून प्रजाजनांना ती खुशाल उल्लंघितां येईल. म्हणून सर्व खातेवार कारभाराची रचना कायद्यांच्या आधारावर केलेली असते. मात्र इतकेंच कीं, प्रत्येक अधिकाराची बाब जर न्यायकोर्टांत जाऊं लागली तर अनवस्था प्रसंग येईल म्हणून, खातेवार कारभारासंबंधीं कायद्यांतच असें कलम प्रायः घालून घेण्यांत येतें कीं, त्या खात्याच्या कारभारावर दिवाणी, फौजदारी कोर्टांत फिर्यादच चालूं नये. या बाबी वगळल्या असतां कायद्याला सोडून सरकारनें केलेल्या कोणत्याहि कृत्यासंबंधानें, किंवा इतर सामान्य अपकृत्यासंबंधानें, कोणाहि प्रजाजनाला सरकारवर फिर्याद करतां येते व नुकसानभरपाई मागतां येते. अधिकाऱ्यांवर फौजदारी खटले करण्यासंबंधानें मात्र कायद्यानें विशेष निर्बंध घातले आहेत. म्हणजे सरकारची अगाऊ मंजुरी घेतल्याशिवाय खास राज्यकारभारांत कोणाहि अधिकाऱ्यानें केलेल्या कोणत्याहि कृत्याबद्दल प्रजाजनाला कोर्टांत फौजदारी फिर्याद मांडतां येत नाहीं. अशा रीतीनें कर बसविणें, कर वसूल करणें, कर कमी करणें, व्यापारी जकाती बसविणें, उठविणें, देशांतील चलनी नाण्यांच्या किंमती ठरविणें, सरकारी पेढ्यांचे व खजिन्यांचे कारभार नियमित करणें, सर्व प्रजाजनाला लागू होणारा दिवाणी फौजदारी कायदा बनविणें, खालीं ग्रामपंचायतीपासून वर पोलीस लष्कर आरमार यांच्यापर्यंत कारभारासंबंधीं कायदे करणें, इत्यादि सर्व महत्त्वाच्या बाबतींत कायदेमंडळांनीं मंजुरी दिल्याशिवाय सरकारचें एकहि पान हलूं शकत नाहीं. याच्या तुलनेनें पाहातां अंमलबजावणी खात्यांचे अधिकार किंबहुना न्यायाधिकारींहि यांचे अधिकार पुष्कळच मर्यादित संकुचित आहेत असें म्हणावयास हरकत नाहीं.

## ( १३२ ) सुराज्यव्यवस्थेचें एक मर्म

तीन मंडळांचें हें त्रिदळ एकाच वृक्षावर वाढणारें म्हणून त्या वृक्षाचें संयुक्त अंगच असें असलें तरी, एक गोष्ट निदान तात्त्विक स्वरूपांत खरी असावी, म्हणजे कोणच्याहि एका मंडळाच्या कारभारांत दुसऱ्या मंडळाला हात घालण्यास वाव राहूं नये, असें राज्यशास्त्रज्ञांचें नेहमीं म्हणणें असतें; व सुराज्यव्यवस्थेंत खरी साधण्याची गोष्ट असेल तर ती हीच. असें झालें तर प्रत्येक मंडळावर प्रजेचा विश्वास राहातो. नाहींतर ती सुराज्यव्यवस्था नव्हे, त्या राज्यांत प्रजास्वातंत्र्य नांदत नाहीं, अशी तक्रार सहजच होते. म्हणजे समजा कीं, हायकोर्टापुढें खटला चालूं असतां पोलिटिकल खात्याचा जो मुख्य असेल त्यानें त्या खटल्याचा निकाल अमुक एक व्हावा असें पत्र लिहिलें, व त्याला अनुसरून हायकोर्टानें निकाल दिला अशी लोकांची समजूत झाली, तर सरकार व हायकोर्ट दोघासंबंधानेंहि प्रजेचा अविश्वास होणार नाहीं काय ? किंवा समजा हायकोर्ट जज्जानें कलेक्टर कमिशनर यांना पत्र लिहून कांहीं कामें करवून घेतलीं असतां, त्यांत न्यायकोर्टाचा म्हणून कांहीं संबंध न आला तरी, उभयतांविषयीं लोकांना अविश्वास वाटणारच. तसेंच कायदेमंडळापुढें एखादा कायदा घडणीच्या क्रमांत असतां जर असें बाहेर आलें कीं,सरकारानें कांहीं सभासदांना लांचलुचपत देऊन किंवा त्यांच्या लोभबुद्धीला इतर आमिषें दाखवून आपलीं बिलें मंजुर करून घेतलीं तर सरकाराबद्दल व कायदेमंडळाबद्दलहि लोकांना अविश्वासच वाटेल. समष्टिस्वरूपानें संकीर्णस्वरूपानें हीं तीनहि मंडळें एकमेकांच्या कारभारांत हात घालूंच शकत नाहींत. कारण तत्त्वतःच त्यांचे अधिकार वांटले विभागलेलें असतात. पण त्या मंडळांतील व्यक्तींनीं वरच्यासारख्या कृत्यांनीं उत्पन्न केलेला अविश्वास खुद्द त्या मंडळांना बाधावा यांत काय आश्चर्य ! प्रजेचें जें कांहीं मर्यादित स्वातंत्र्य असतें तें पुष्कळसें या निरनिराळ्या मंडळांवरील विश्वासावरच अवलंबून असतें. आणि तो विश्वास उडाला म्हणजे आपल्याला सुरक्षित उभें राहाण्याला राज्यांत जागाच नाहीं असें प्रजेला वाटतें. आणि ती कुराज्य व्यवस्था होय, सुराज्य व्यवस्था नव्हे, असा तिच्यावर शेरा पडतो.

## ( १३३ ) त्रिदळांचें एकच मूळ

तत्त्वतः राजानें या तीनहि मंडळांचे अधिकारी स्वतःच वेगवेगळे नेमून एका खात्याचा दुसऱ्या खात्याशीं संबंध तोडला पाहिजे. पण इंग्लंडसारख्या देशांत

जबाबदार प्रधानमंडळाची जी नवी टूम अंमलांत आली आहे, तिजमध्यें या तीन मंडळांचें उलट दृढ एकीकरणच होतें. प्रत्येक खातेवार प्रधान किंवा मंत्रि राजानें हवा तेव्हां नेमावा, व तो नालायख ठरेल तेव्हां त्याला काढावें, अशी पद्धत असेल तर हें एकीकरण होणार नाहीं. पण विलायतेंत अलिकडे शें-दोनशें वर्षें पक्षभेदाच्या तत्त्वावर प्रधानमंडळाची रचना अवलंबून असते. यामुळें सर्व खात्यांनीं एकाच मनानें, म्हणजे धोरणाविषयीं एकप्रकारचा कट करून वागावें, एकाचा अपमान तो सर्वांचा मानावा, एक दुखावला कीं सर्वांनीं त्रागा करून उठावें असें घडतें. दिसण्यांत इंग्लंडचा राजा हाच अखेर प्रत्येक प्रधानाची मंत्र्यांची नेमणूक करून, त्याच्या हातीं त्याच्या खात्याचा शिक्कामोर्तब स्वाधीन करितो खरा, पण तो निवळ देखावा होय. एका प्रधानमंडळानें राजीनामा दिला म्हणजे नव्या निवडणुकीनें नव्या उपक्रमास सुरुवात होते. नैमित्तिक जलप्रलय व संहार होऊन फिरून नव्या सृष्टीची उत्पत्ति सुरू व्हावी तसाच हा प्रकार असतो. जलप्रलयांत वटवृक्षाच्या तरंगत्या पानावर श्रीविष्णु बेदरकार राहावे त्याप्रमाणें वर स्वतः राजेसाहेब आणि खालीं सर्वच्या सर्व कायम पगारी नोकरांचा तांडा हा शिल्लकच असतो. कोणत्याहि पक्षाचें मंत्रिमंडळ येवो, त्याच्या होमाचा भात शिजवून द्यायला आणि अग्निपूजेची सिद्धता करून देऊन उदक सोडण्याचे वेळीं हाताला हात लावावयाला, ही कायमची घरधनीण सिद्धच असते. इंद्र नवा आला तरी पतिव्रता व अखंड सौभाग्यवती इंद्रायणी कायमच ! तुमचें प्रधानमंडळ तिकडे राजीनामा देवो, नव्या निवडणुकीची दंगल माजो, या अधिकारी मंडळाचा नित्य स्वरूपाचा कारभार सुरूच असतो. त्यांत खळ पडत नाहीं. असो. निवडणुकींत ज्या पक्षाची सरशी होऊन निर्विवाद बहुमत ज्याला लाभलेलें आढळेल त्या पक्षाच्या पुढाऱ्याला बोलावून, त्याला मुख्य प्रधानकीचीं वस्त्रें व शिक्कामोर्तब देऊन, आपल्या पसंतीप्रमाणें नवे जुने हवे ते खातेवार प्रधान किंवा मंत्रि उपमंत्रि निवडून घेण्यास राजा सांगतो. आणि मुख्य प्रधानानें पसंत केलेल्या व्यक्तीला प्रधान म्हणून पत्करून त्याच्या खात्याचें शिक्कामोर्तब त्याला द्यावें लागतें. अशा रीतीनें संघटित झालेल्या प्रधानमंडळांत न्यायमंडळाचे मुख्याधिकारीहि ( लॉर्ड चान्सेलर ) असतात. सर्व सत्ता या संयुक्त कार्यकारी प्रधानमंडळाकडे येते व आपल्या बहुमताच्या जोरावर तें मंडळ सर्व प्रकारचा कारभार करतें. हें प्रधानमंडळ अधिकारारूढ असतां कायदे करण्याच्या उपक्रमापासून अंमल-

बजावणीच्या अखेरच्या कृत्यापर्यंत त्यांचाच अधिकार चालतो, पण त्याची जबाबदारीहि त्याजवरच राहते. आणि लोकमतांत क्रांति होऊन, उत्पात होऊन, किंवा जुन्या प्रधानमंडळाचा कंटाळा येऊन त्याचा पार्लमेंटांत पराभव होईल तोंपर्यंत हें गाडें असेंच चालतें. या सर्व प्रकारांत ध्यानांत घेण्याची गोष्ट हीच कीं, कायदेमंडळ, कार्यकारीमंडळ, व न्यायाधिकारमिंडळ हीं स्वतंत्र असावीं असें जें तत्त्व तें साधत नाहीं. पण शेवटीं राज्यकारभारांत लोकांना जें पटेल तेंच बरोबर ! कारण लोकांचें सुख व समाधान तेंच राज्यकारभाराचें ध्येय व साध्य. इंग्लंडचे लोक वाटल्यास उद्यां ही राज्यपद्धति बदलतीलहि ! पण आज हें असें आहे खरें !

---

# भाग ६ वा

## प्रातिनिधिक राज्यपद्धति

### ( १३४ ) प्रातिनिधिक तत्त्वाचें सर्वव्यापकत्व

राज्यसंस्थेचा उगम व आधार, तिची घटना व वर्गीकरण, आणि तिचीं ज्ञानेंद्रियें व कर्मेंद्रियें यांचा विचार केल्यावर दुसऱ्या ज्या एकाद्या गोष्टीचा विचार करावा लागतो ती म्हणजे राज्यसंस्थेच्या सर्व व्यवहारांत दिसून येणारें प्रातिनिधिक तत्त्व ही होय. प्रातिनिधिक तत्त्व म्हणजे एकानें दुसऱ्याचा बदली किंवा एजंट किंवा वकील किंवा मुनीम म्हणून तेंच कृत्य अधिकारानें करण्याचें तत्त्व. राज्यसंस्थेच्या कारभारांत हें तत्त्व कसें उपयोगांत येतें हें पाहण्यापूर्वीं जगाच्या इतर व्यवहारांत तें कसें कोठें दिसून येतें, हें पाहिलें म्हणजे राज्यकारभारांतहि तें कसें शिरतें हें समजण्यास कठिण जाणार नाहीं. जगाच्या व्यवहाराचे दोन भाग, एक लौकिक आणि दुसरा पारमार्थिक. आणि पारमार्थिक व्यवहारांत जर हें तत्त्व लागूं पडतें तर लौकिक व्यवहारांत तें लागूं पडेल यांत काय आश्चर्य ! यांत प्रथमच हें दिसून येतें कीं, ब्रह्मस्वरूपीं ईश्वर हा निराकार व निर्गुण असल्यामुळें त्यानें सगुणरूप घेणें म्हणजे प्रतिनिधीद्वारां प्रगट होणें होय. मग तें रूप तो कोणाच्याहि इच्छेनें व कोणत्याहि कारणाकरितां घेवो. अवतार हे तर बोलूनचालून ईश्वराचे प्रतिनिधीच होत. गीतेंतील

विभूतिवर्णनांत व परिगणनेंत ईश्वर आपल्या तोंडानेंच आपले प्रतिनिधि कोण कोण हें सोदाहरण सांगत आहे. अवताराच्या महत्त्वापर्यंत न पोंचणाऱ्या देवता याहि ईश्वराच्या प्रतिनिधीच होत. कारण त्या तशा नसत्या तर त्यांची पूजा कोण करील ? त्यांना बळी कोण देईल ? ही पूजा व हें बलिदान घेऊन या देवता, त्यांना तोडून दिलेल्या ईश्वरी अधिकाराच्या खात्यांत भजकपूजकांवर अनुग्रह करितात तो ईश्वराकरितांच. ईश्वर त्यांचे हे अधिकार काढून घेईल तर मग त्यांची पूजा कोण करील ? या प्रतिनिधींचीं मुखत्यारपत्रें सहीशिक्क्याचीं व लेखी असत नाहींत व मनुष्याला तीं पाहावयास सांपडत नाहींत. पण मनुष्यानें आपण होऊनच तीं मुखत्यारपत्रें मनानें मानलीं तर मग देवतांना तीं दाखविण्याचें काय कारण ? मुखत्यारपत्रें नसतांच देवता कारभार करतील तर ईश्वर त्यांना पाहून घेईल. पण पूजा व भक्ति हीं देऊन उपासकानें आपलें काम करून घेतलें म्हणजे त्यांच्या परस्परांतला तरी व्यवहार मिटला ! उलट बलिदानांत वास्तविक स्वतःचाच बळी द्यावयाचा असतां मनुष्य कोंबड्यां-बकऱ्यांवर भागवितो व देवता त्यावर भागवून घेतात, तेथें हें कोंबडें बकरें मनुष्याचा प्रतिनिधिच नव्हे काय ? अग्नि हा तर अनेक देवतांचा मिळून प्रति-निधि आहे. कारण त्याच्याद्वारेंच त्यांना यथोचित हविर्भाग मिळतात. त्याला देवतांचा कलेक्टरजनरल म्हणतां येईल. अशा रीतीनें देवदेवता जर प्रतिनिधि-द्वारां व्यवहार करितात तर मनुष्यानेंहि तो केल्यास काय नवल ?

## ( १३५ ) धर्मकृत्यांतलें प्रातिनिधिकत्व

आपल्या धार्मिक कृत्यांत आपण प्रतिनिधीचा सर्रास उपयोग करतों. काशी-रामेश्वरच्या यात्रेहून परत आलेल्या यात्रेकरूच्या पायां पडलें म्हणजे पुण्यांश मिळतो; या ठिकाणीं यात्रेकरू हा पूर्वीं अयोजित पण पश्चात् स्वीकृत असा प्रतिनिधिच ठरतो. जपानुष्ठानाला प्रायः इतर ब्राह्मण बसवून आपण फक्त त्यांना दक्षिणा दिल्यानें व त्यांचा आशीर्वाद घेतल्यानें अनुष्ठानाचें पुण्य आपण मिळवितों तें प्रतिनिधिद्वाराच होय. ब्राह्मण वेदाधिकारी असूनहि स्वतः कर-ण्याचीं अनेक वैदिक कृत्यें तो ब्राह्मणद्वारा आचार्यद्वारा उपाध्यायद्वारा करितो तें त्याला प्रतिनिधि नेमूनच. मग क्षत्रियवैश्यादि, म्हणजे अन्यप्रधानकार्य-व्यापृत लोक, बहुतेक काम प्रतिनिधिद्वारा करवून घेत असल्यास काय नवल ? मुंजींत लंगोटी व जानवें घालावयाचें तें मुंजानें आपलें आपणच घातलें पाहिजे,

पण नंतर उपाकर्मप्रसंगीं तो आपले वेदमंत्र संभाळण्यासाठीं उपाध्यायाजवळच देतो. फक्त विवाह व तत्संबंधीं पुढील सर्व कृत्यें ज्याचीं त्यानें करावयाचीं असतात व करावीं लागतात. तीं प्रतिनिधिद्वारा होऊं शकत नाहींत! धर्मकृत्यांतील मनुष्यव्यक्तीप्रमाणें वस्तूंचीं कार्यैंहि प्रतिनिधिद्वारा होऊं शकतात. पूर्वीं यज्ञांत जिवंत पशुहत्या करावी लागे त्याऐवजीं नव्या कारुणिक जगांत पिंडपशूनें काम भागूं लागलें. मधुपर्काला वत्सतरी न मारली तरी चालू लागून, गोघृत दुग्धांनीं मधुपर्क केला असतां पाहुणे त्या प्रतिनिधींची सेवा मान्य करूं लागले. गंधाक्षतांनीं अडचणीच्या वेळीं सर्व पूजोपचारांचें काम करितां येतें. आणि सुपारी तर बोलावयासच नको! पाटावर बसवून तिला गंधफूल वाहिलें कीं गणपति, किंवा पूजार्ह अन्य हवी ती देवता, किंवा ऋषी यांचें कार्य ती करिते. आणि पत्नी उपलब्ध किंवा उपस्थित नसल्यास तीच सुपारी कनवटीला लाविली असतां पुरुषाला दांपत्यानें धर्मकृत्य केल्याचें फळ लाभतें.

## ( १३६ ) लौकिक व्यवहारांतलें प्रातिनिधिकत्व

केवळ लौकिक व्यवहारांतील प्रतिनिधिद्वारा कार्य करण्याचीं उदाहरणें देत बसण्याचें फारसें कारण नाहीं. कारण ती गोष्ट लोकांच्या चांगल्या परिचयाची आहे. मुखत्यारपत्र हें एक कायदेशीर साधन असून, त्यामुळें प्रतिनिधित्व सिद्ध व सफळ होतें; मात्र कांहीं मुखत्यारपत्रें विशिष्ट कामापुरतींच असतात तर कांहीं कुलमुखत्यारपत्रें म्हणजे कोणत्याहि कामाला चालण्यासारखीं असतात. मुखत्यारपत्र केव्हांहि रद्द करतां येतें. पण तें तसें रद्द होईपर्यंत मुखत्याराला यजमानाचे सर्व हक्क व अधिकार कायदेशीर रीतीनें वापरतां येतात. न्याय–मुनसफीच्या कामांत दिलेलें वकीलपत्र हें विशिष्ट कामापुरतें दिलेलें मुखत्यारपत्रच होय. या उसन्या प्रतिनिधीच्या अधिकारानें वकील हा आपल्या कुळाशीं इतका तादात्म्य पावूं शकतो कीं, क्षणभर कुळाच्या जागीं आपणच आहों अशी भावना करून घेऊन प्रथमपुरुषी भाषाहि तो वापरतो. पेढीवाल्या सावकाराच्या निरनिराळ्या पेढ्यांच्या गादीवर बसून धन्याकरतां व्यवहार करणारे मुनीम हे अगदीं सरळ अर्थानें प्रतिनिधीच होत. वतनदार लोकांत बदली देण्याची चाल फार आहे. वतन तर सोडावयाचें नाहीं पण त्या वतनासंबंधीं करण्याची चाकरी तुच्छ मानून ती स्वतः करावयाची नाहीं. म्हणून वतन संभाळण्याकरितां बदली कामगार देतात व सरकारहि असे बदली

नेमून घेऊन त्यांजकडून काम घेतें. हिंदी संस्थानांतून ही चाल फार पाहावयास सांपडते. तेथें कामगारी नोकरीप्रमाणें मानसन्मानाच्या कामींहि बदली चालतो. सणावारीं किंवा दरबारच्या दिवशीं सरदार दरकदार किंवा दरबारी स्वतः हजर राहूं न शकेल तर त्यानें आपला मुलगा पाठवावा, व त्यानें पंक्तीचें जेवण वडिलाकरितां जेवावें व अहेरनजराणा वडिलांकरितां करावा अशी अजून रीत आहे. प्रतिनिधित्वाचा दुसरा एक असा प्रकार आहे कीं, एकेक व्यक्तीनें आपापला प्रतिनिधि नेमून देण्याप्रमाणें अनेकांनीं मिळून संयुक्त अधिकारानें प्रतिनिधि देण्याची व्यवस्था आधुनिक काळांत कायद्यानें केलेली आहे. तिला इन्‌कॉर्पोरेशन् असें म्हणतात. इन्‌कार्पोरेशन् ही पद्धति व तींतून निर्माण झालेली वस्तू कॉर्पोरेशन्. या पद्धतीप्रमाणें अनेक लोक कांहीं विशिष्ट अधिकार प्राप्त करून घेऊन एकत्र येऊन सर्वांची मिळून समाईक कंपनी किंवा संस्था बनवून ती नोंदून ( रजिस्टर करून ) घेतात. व या नोंदणींत दाखल झालेल्या नियमाप्रमाणें चिटणीस म्हणून जो सर्वाधिकारी नेमण्यांत येतो त्याला, त्या संयुक्त संस्थेकरितां, सर्व कायदेशीर व्यवहार म्हणजे पैशाची देवघेव, करार, फिर्यादी–अर्यादी इत्यादि करतां येतात व त्या संस्थेला व इतरांना बंधनकारक होतात.

## ( १३७ ) प्रातिनिधिक तत्त्वाचीं दोन टोंकें

वर सांगितलेलीं पारमार्थिक व लौकिक व्यवहारांतलीं उदाहरणें ध्यानांत घेतलीं म्हणजे जगांत प्रातिनिधिक तत्त्वाला किती महत्त्व आहे हें सहज कळून येईल. तेव्हां आतां तें राज्यसंस्थेला कसें लागूं पडतें हें पाहूं. या संस्थेचें कार्य नेहमीं दुतर्फी असतें. म्हणजे एका अंगीं राजा किंवा अध्यक्ष किंवा जो कोणी मुख्य सत्ताधीश असेल तो आणि दुसऱ्या अंगीं प्रजा. यापैकीं राजा किंवा अध्यक्ष हा शब्द उच्चारला असतां डोळ्यापुढें एक व्यक्ति उभी राहिल्याचा भास होतो, तरी प्रत्यक्ष कार्यांत त्या व्यक्तींत एका समष्टीचाच संक्षेप झालेला असतो. ही समष्टि म्हणजे राजा–अध्यक्षापासून सरकारी म्हणून जें जें काम तें तें करणारी अगदीं शेवटल्या पायरीपर्यंतची अधिकारी व्यक्ति. या समष्टीचें एक टोंक राजा किंवा अध्यक्ष हें असून दुसऱ्या टोंकाला पाटील कुलकर्णी किंबहुना तराळ व वेसकर बेलीफ पटेवाला या अधिकारी व्यक्ती येतात. आणि एक राजा सोडला म्हणजे मुख्य राज्यसत्तेच्या अंगभूत असणारे निरनिराळे अधिकार यथांश धारण करून बजावणारे हे सर्व अधिकारी त्या राजाचे प्रतिनिधीच होत. आणि खुद्द राजा हा देखील

उच्च राजधर्माच्या दृष्टीनें प्रजेला प्रतिनिधि असें मानलें म्हणजे प्रातिनिधिक तत्त्वावर एकंदर राज्यसंस्था कशी अधिष्ठित आहे हें ध्यानांत येतें. प्रजा ही राजाचा प्रतियोगी व ती बोलूनचालून समष्टीस्वरूपच आहे. तथापि या दुसऱ्या बाजूलाहि असा चमत्कार दृष्टीस पडतो कीं, राजसत्ता ही जशी अधिकाऱ्यांच्या एका समष्टीवर पसरून अंतिम स्वरूपांत कोणातरी एका अधिकारी व्यक्तीच्या रूपानें मूर्त स्वरूपांत प्रगट होते, त्याचप्रमाणें प्रजा ही मुळांतच समष्टीरूपानें असली तरी तिलाहि कार्यक्षम होण्याकरतां अखेर व्यक्तिरूपानें प्रगट व्हावें लागतें. अगदीं एकतंत्री म्हणजे अनियंत्रित राज्यपद्धति ( डेस्पॉटिझम् ) असेल तेथें या प्रजाव्यक्तीला कायदेशीर असा हक्क कोणताच नसतो. तिच्या संबंधानें राजा केवळ नैतिकदृष्ट्या राजधर्म स्मरून, आपलें कर्तव्य ओळखून, या प्रजाव्यक्तीचे हक्क काय मानील ते मानील. पण तत्त्वतः ती प्रजाव्यक्ति सजीव असूनहि निर्जीवाप्रमाणें, किंवा मनुष्य असूनहि गोठ्यांतील गुराप्रमाणें, सर्वस्वीं पराधीन अशी असते. पण जेथें राजसत्ता नियंत्रित व नियमबद्ध असते तेथें प्रत्येक प्रजाजनव्यक्ति ही राज्यसंस्थेचा प्रतिनिधीच ठरते.

### ( १३८ ) राजा व प्रजाजन सारखेच

नियंत्रित राज्यपद्धति ही प्रायः प्रातिनिधिकच असते. कारण राजाचे हक्क मर्यादित केले असतां बाकी उरलेले हक्क प्रजेला मिळतात, व ते प्रजेनें बजवावयाचे तर तिला कोणी तरी प्रतिनिधि आपला म्हणून नेमून देऊनच बजवावे लागतात. मात्र प्रजेची संख्या पुष्कळ असल्यामुळें तिला सर्वांकरितां म्हणून एकच प्रतिनिधि नेमून भागण्यासारखें नसतें, कारण प्रतिनिधि नेमावयाचा तो कांहीं व्यक्तिशः आवडीमुळें, विश्वासामुळें, व पात्रता पटल्यामुळें नेमण्यांत येतो. आणि सर्व प्रजेसंबंधानें हे सर्व गुण एका कोणाहि व्यक्तींत असणें शक्य नाहीं म्हणून प्रतिनिधींची संख्याहि स्थानपरत्वें, हितपरत्वें पुष्कळच मोठी असावी लागते. एका अंगाला तत्त्वतः सर्वाधिकारसंपन्न राजा किंवा अध्यक्ष असला तरी, दुसऱ्या अंगाला प्रजाप्रतिनिधि ( म्हणजे मतदार ) हा, अंशाधिकारी असूनहि, आपली मिजास राजाच्या किंवा अध्यक्षाच्या बरोबरीची समजूं शकेल. कारण एकटें एक मतहि मतदारसंघाच्या निवडणुकींत काय किंवा कायदेमंडळाच्या बैठकींत काय सर्व पारडें फिरवूं शकतें ! व्यक्तिशः मतदार प्रजाजनाच्या तात्त्विक अहंकारासंबंधानें एक मौजेची गोष्ट एके ठिकाणीं वाच-

ण्यांत आली ती अशी. अमेरिकेच्या राजधानीच्या शहरीं एकदां अमेरिकन रिपब्लिकचा अध्यक्ष रस्त्यानें चालत जात असतां एक अमेरिकन नागरिक रस्ता ओलांडतांना त्याच्या आड आला. तेव्हां जवळच्या एका जाणत्या गृहस्थानें त्या नागरिकाला किंचित् दटावून म्हटलें, "अरे जरा बाजूला हो, आपल्या रिपब्लिकच्या अध्यक्षाची वाट अडते ना!" तेव्हां त्या नागरिकानें उलट आढ्यतेनें उत्तर दिलें व म्हणाला, "मी बाजूला होत नाहीं. त्यानेंच वाटेल तर दुसऱ्या बाजूनें जावें. तो रिपब्लिकचा अध्यक्ष असेल, पण मी मतदार प्रजाजन म्हणजे मूर्तिमान रिपब्लिकच आहें." या गोष्टीचें मर्म सहजच लक्षांत येण्यासारखें आहे.

## (१३९) नियमांची आवश्यकता

पूर्वीं एके ठिकाणीं सांगण्यांत आलेंच आहे कीं, हल्लींच्या काळांत आतां सर्वस्वीं अनियंत्रित व अनियमबद्ध अशा राज्यसंस्था फारशा उरलेल्या नाहींत. यामुळें प्रातिनिधिक तत्त्वाचा अंमल जवळजवळ जगभर दिसून येतो. हें तत्त्व कार्यक्षम होणार तर अर्थात् फिरून निरनिराळ्या तत्त्वांवर मतदारांचे संघ किंवा गट बनवावे लागतात. मतदारीची पात्रता ठरवावी लागते. मतदानाच्या कार्यांचे नियम बनवावे लागतात. मतदारांनीं निवडून देण्याच्या कायदेमंडळांतील प्रतिनिधींच्या जागांची संख्या ठरवावी लागते. या प्रतिनिधींनीं तेथें कार्य कसें करावयाचें याविषयीं नियम बनवावे लागतात. आणि शेवटीं या प्रतिनिधींनीं निवडून दिलेलें किंवा इतर रीतीनें अस्तित्वांत आलेलें प्रधानमंडळ किंवा कार्यकारी मंडळ यांच्या हातून काम कसें घ्यावें, व त्या कामाला तें मंडळ पुढें अपात्र ठरलें किंवा त्याच्या हातून चुका किंवा अपराध घडले तर त्याला जबाबदारी जाणवून कामावरून दूर करून दुसरें एकादें मंडळ त्याच्या जागीं कसें नेमावें, याचेहि नियम करावे लागतात. पण या नियमांत स्थानपरत्वें, लोकपरत्वें, इतकें वैचित्र्य असतें कीं, तुलनात्मक अभ्यास करूं इच्छिणाऱ्या विद्यार्थ्याला प्रत्येक राष्ट्रासंबंधानें असणारा हा नियमसंग्रह हातीं घेऊन त्याचा सूक्ष्म अभ्यासच करावा लागेल. म्हणून प्रस्तुतसारख्या लहानशा पुस्तकांत तें सर्वस्वीं अशक्य होय. मात्र प्रातिनिधिक राज्यपद्धतीचीं सर्वसंमत म्हणून स्थूल अशीं कांहीं तत्त्वें आहेत तींच याखालीं अगदीं संक्षेपानें दिलीं आहेत.

## ( १४० ) धनी-प्रतिनिधि म्हणजे बिंब-प्रतिबिंब

प्रातिनिधिक पद्धतीची गरज कबूल केल्यानंतर धनी व प्रतिनिधी यांचे संबंध कसे असावे हा प्रश्न सहजच उत्पन्न होतो. धनी म्हणजे यजमान किंवा प्रतिनिधि नेमून देणारा मुख्य हक्कदार किंवा अधिकारी. धनी हा शब्द मुख्यार्थदर्शक असून सोपा व सुटसुटीत असल्यामुळें तोच आम्हीं योजिला आहे. असो. धनी व प्रतिनिधि यांचा संबंध कसा असावा याचें उत्तर एका वाक्यांत असें देतां येईल कीं त्यांचा संबंध बिंब--प्रतिबिंबासारखा असावा. त्यासंबंधाचें याहून अधिक समर्पक वर्णन करणें जवळ जवळ शक्यच नाहीं. धनी हें बिंब व प्रतिनिधि हें प्रतिबिंब. पण नुसतें आरशांत तोंड पाहून प्रतिबिंब निर्माण करतां येतें तसा धन्याला प्रतिनिधि निर्माण करतां येत नाहीं. फार तर आपल्या प्रतिनिधीचे गुण काय असावेत हें लक्षांत आणून मनाच्या आरशांत त्याचें चित्र पाहून प्रतिनिधीची निवड केली जाते किंवा केली जावी असें म्हणतां येईल. किंवा हे गुण ठरविणें देखील कठीण आहे. गुणांनीं प्रतिनिधि हा धन्याच्या मानानें कनिष्ठ असेल किंवा बरोबरीचा असेल किंवा श्रेष्ठहि असेल. पैकीं कनिष्ठ गुणांचा प्रतिनिधि धन्याकडून सहसा वर्ज्यच मानिला जाईल. पण एकाद्या अपवादभूत प्रसंगीं समानगुण किंवा श्रेष्ठगुण न मिळेल तर कनिष्ठ गुणहि पत्करावा लागेल. समजा निवडणूक उभी आहे. स्वतःला तर तिला उभें राहातां येत नाहीं, आणि समान किंवा श्रेष्ठगुण असा दुसराहि कोणी उमेदवार उभा राहात नाहीं, तर मिळेल तसा प्रतिनिधि स्वीकारावा लागतो. समानगुण प्रतिनिधि नेमण्यांत आनंद वाटेल. श्रेष्ठगुण मनुष्य आपला प्रतिनिधि होण्याला मिळेल तर त्या आनंदांत बहुमानाची भर पडेल.

## ( १४१ ) चांगल्या प्रतिनिधींचा तुटवडा

हल्लींच्या दिवसांत इतक्या निरनिराळ्या जागा निवडणुकीकरितां उपस्थित होतात कीं त्यांतील फार तर एकाद्या जागेकरतां मनुष्य उमेदवार म्हणून स्वतः उभा राहील. अर्थात् बाकीच्या सर्व जागांकरतां आपलें मत देऊन त्याला प्रतिनिधि नेमूनच काम करून घ्यावें लागतें. उलटपक्षीं त्यानें निवडणुकीला स्वतः एकाद्या जागेकरतां उभें राहावयाचें ठरविलें तरी निवडणूक हें काम अनेक दृष्टींनीं कठिण असल्यामुळें, तो या फंदांत पडणें बरें नव्हे असें म्हणून अंग काढून घेतो. जे लोक निवडणुकींत प्रतिनिधि म्हणून निवडून येतात

त्यांच्यापेक्षां अधिक चांगले लोक एकंदर प्रजाजनांत नसतात हें म्हणणें उघडच धाडसाचें आहे. पण अधिक चांगले लोक उपलब्ध असतां ते निवडणुकीस उभे न राहाण्याचें कारण असें असूं शकतें कीं, त्यांना अहंकार असल्यामुळें लोकांकडे जाऊन मत मागणें हें त्यांना कमीपणाचें वाटतें किंवा ते गुणी असले तरी लोकप्रिय नसतात. किंवा त्यांचा स्वभाव भिडस्त असतो. किंवा इतर कामांतच त्यांना अधिक आनंद वाटतो. किंवा निवडणूक यशस्वी करण्याला लागणारें मनुष्यबळ व द्रव्यबळ त्यांना नसतें. अशा अनेक कारणांनीं चांगले लोक प्रतिनिधि होण्याला पुढें येत नाहींत. यामुळें वर सांगितलेले दोष किंवा वैगुण्यें ज्यांच्यामध्यें असतात अशा उमेद्वारांतूनहि धन्याला प्रतिनिधी निवडावे लागतात.

## ( १४२ ) नियमांचें वैचित्र्य

स्वतः धनी म्हणून पुढें कोणीं यावें, किंवा प्रतिनिधि म्हणून कोणीं कोणास निवडून द्यावें हा अर्थात् प्रजाजनांतील ज्या त्या व्यक्तीचा खाजगी विचार होय. पण सर्वसाधारणरीत्या प्रजेचे प्रतिनिधी किती निवडून घ्यावे व ते कसे घ्यावे हें ठरविणें प्रत्येक राष्ट्रांतील अधिकाऱ्यांचें ( म्हणजे ज्या राष्ट्रांत प्रातिनिधिक पद्धति मान्य झाली आहे त्यांतील अधिकाऱ्यांचें ) एक मुख्य काम असतें. तें काम कांहीं नियमांनींच करावें लागतें. पण पूर्वीं दर्शविल्याप्रमाणें या नियमांत इतकें पुष्कळ वैचित्र्य असतें कीं, एका राष्ट्रांतील नियमांशीं दुसऱ्या राष्ट्रांतील नियमांचा मेळ घालूं पाहाणें हा जवळजवळ कालापव्यय ठरतो. कारण हें वैचित्र्य निरनिराळ्या राष्ट्रांच्या नियमांतच आढळून येतें असें नाहीं, तर एकाच राष्ट्रांतील निरनिराळ्या भागांतील नियमांमध्येंहि तें दिसून येतें. पण या वैचित्र्याचें कारण रुचि-भेद तर खराच, पण तें सर्वस्वीं नुसत्या लहरीचें प्रदर्शन असेंच केवळ म्हणतां येत नाहीं. तर तें वैचित्र्य परिस्थितीच्या सूक्ष्म अवलोकनाचें, न्यायबुद्धीचें, सूक्ष्म विवेकाचें, आणि उत्कृष्ट तारतम्याचेंहि फळ असूं शकतें.

## ( १४३ ) प्रतिनिधि निवडण्याचे कांहीं मुख्य नियम

प्रातिनिधिक तत्त्वाची इतकी विचक्षणा करून आतां या पद्धतींतील नियमांच्या मुळाशीं जीं सर्वसाधारण तत्त्वें असतात त्यांचा थोडासा निर्देश करितों. धनी जसा आपला प्रतिनिधि गुणांनीं व मतांनीं प्रतिबिंबरूप असावा असें मानतो, त्याप्रमाणें एकंदर प्रजेच्या वतीनें येणाऱ्या प्रतिनिधींचें मंडळ हेंहि त्या

प्रजेच्या मताचें शक्य तितकें बरोबर प्रतिबिंब असावें असाच हेतू तद्विषयक योजना करणाऱ्या अधिकाऱ्यांचा असतो. मात्र त्यांतल्यात्यांत या गोष्टींतील प्राथमिक कार्य अधिकाऱ्यांच्याच हातीं असल्यामुळें शक्य तेथें ते नियमांना आपल्या आवडीच्या धोरणाचें वळण लावतात. पण अशी गोष्ट असली तरी खालीं दिलेले नियम म्हणजे अर्थात् तत्त्वें हीं प्रायः अबाधित असतात असें घेऊन चालण्यास हरकत नाहीं. ( १ ) कायदेमंडळें व लोकसभा यांतील सभासदांची संख्या फार थोडी असूं नये, व उगाच फार वाढविलेलीहि असूं नये. अगदीं थोडी संख्या असेल तर लोकमत व्हावें तसें प्रतिबिंबित होत नाहीं; आणि ही संख्या अवजड झाली तर काम चांगलें होत नाहीं. म्हणून राष्ट्राच्या मानानें म्हणजे एकंदर राष्ट्रांतील मतदारसंख्येच्या मानानें प्रतिनिधींची संख्या असावी. ( २ ) अशा कायदेमंडळांतील किंवा सभांतील निर्णय अल्पमत बहुमत मोजूनच करावयाचे असतात; यामुळें प्रजेनें निवडलेले प्रतिनिधी सरकारानें नेमलेल्या प्रतिनिधींपेक्षां पुष्कळच अधिक असले पाहिजेत. असें झाल्यानें सत्तेचें पारडें एका बाजूलाच कायमचें झुकलेलें राहून हा राज्यसंस्थेचा ताजवा खोटा व कुचकामाचा ठरेल असें सकृद्दर्शनीं वाटतें. परंतु सरकारनें नेमलेल्या प्रतिनिधींची संख्या थोडी असली तरी, त्यांचे हातीं कांहीं जादा व विशेष अधिकार असल्यामुळें हे दोन्ही पक्ष जवळ जवळ तुल्यबलच होतात. आणि त्यांतूनहि लोकपक्षाचें पारडें थोडेसें जड असलें तर तें इष्टच असतें. कारण राज्यसत्तेचा मूळ उगम सरकार नसून लोक हेच होत. साध्या बाजारांतहि घेवाऱ्याचें पारडें दुकानदाराच्या पारड्यापेक्षां थोडेंसें तरी खालीं जाईल तेव्हांच सौदा पुरा होतो. ( ३ ) प्रजाजनांकडून निवडून येणाऱ्या प्रतिनिधींमध्यें देशांतील सर्व पक्षोपपक्ष व हिताहितसंबंध यांचा परामर्ष घेतला जावा. समानता संभाळूनहि गुणोत्कर्षाला अधिक किंमत देणें व निराश्रितांचें संरक्षण करणें या दोन्ही गोष्टी न्याय्य समजल्या जातात. ( ४ ) सर्व प्रजाजन हे तत्त्वतः एक गठ्ठा मानण्यांत आल्यामुळें, राष्ट्रांतील कोणताहि प्रजाजन कोणत्याहि भागांतील इतर प्रजाजनांचा प्रतिनिधि होण्यांत फारसें कांहीं बिघडत नाहीं. तथापि निवडून येणारा व निवडून देणारे यांच्यामध्यें अधिकांत अधिक जिव्हाळ्याचा संबंध असावा; व तो ज्या भागांतला रहिवासी त्याच भागांत निवडून आलेला एकंदरीनें अधिक बरा. कदाचित् सर्वश्रेष्ठ अशा प्रातिनिधिक संस्थेला हा नियम लावूं नये. पण जस-

जसें खालीं उतरत जावें तसतसा हा नियम अधिकाधिक योग्य ठरतो. (५) निवडणुकी शक्य तितक्या एकाच पद्धतीनें व एकाच वेळीं व्हाव्या. या करितां सोईचे व व्यवहारक्षम असेच मतदारांचे गट बनवावे. (६) मतदार-संघांतील घटकभूत जो व्यक्तिशः मतदार त्याच्या पात्रतेविषयीं कांहीं नियम असावेत. त्यांतील मुख्य म्हटले म्हणजे ती व्यक्ति सज्ञान असावी, किंबहुना अमुक एक ( उदाहरणार्थ पंचवीस वर्षे ) वयाची तरी निदान असावी. या खालींहि वयाची मर्यादा जाणें अशक्य नाहीं; व शेवटली मर्यादा म्हटली म्हणजे सज्ञान होण्याचें वय अर्थात् १८ किंवा २१ वर्षें ही मानली जाते. (७) वयाच्या पात्रतेप्रमाणेंच दुसरी पात्रता म्हणजे मुख्यतः सरकार देण्याची पात्रता. म्हणजे मतदार होण्याची इच्छा असेल त्यांनीं सरकारला किंवा स्थानिक स्वराज्यसंस्थेला कोणत्याहि रूपानें प्रतिवर्षीं कमींत कमी कांहीं ठरीव रक्कम देत असलें पाहिजे किंवा शिक्षण, जाहीर मान्यता, किंवा संपत्ति-मत्ता इत्यादि विशेष गुण मतदार होणाऱ्याच्या अंगीं असले पाहिजेत. (८) पण वरील नियमांतील पात्रता असूनहि कांहीं विशेष कारणाकरितां मतदार होण्याला मनुष्य अपात्र ठरूं शकेल. उदाहणार्थ, वेडेपणा, नादारी, विशिष्ट प्रकारची गुन्हेगारी, सरकारी नोकरीचा संबंध इत्यादि. (९) प्रतिनिधि हें मतदारांचें प्रतिबिंब मानल्यास उमेदवार हा मतदारसंघापैकींच असावा असा नियम सामान्यतः योग्य ठरतो. पण त्याला अपवादहि असूं शकतील. याचा अर्थ सर्वसाधारण पात्रतेच्या, व विशेष प्रकारच्या अपात्रतेच्या बाबी जशा मतदारांना तशाच त्या उमेदवारांनाहि लागूं पडतात. (१०) कमींत कमी पात्रतेच्या गुणांची अट मतदाराला पुरी पाडतां आली म्हणजे त्याला जो मताधिकार, तोच त्याच अंगांनीं अधिक संपन्नता असणाऱ्या प्रजाजनालाहि असावा. संपन्नता अधिक म्हणून मताधिकार अधिक नसावा. (११) एका मतदाराला होतांहोईतों एकच मत असावें, व त्याला तें कोठल्या तरी मतदारसंघांत एकदां नोंदण्यापेक्षां अधिक संधी किंवा सवलत असूं नये. (१२) मतदारसंघ लहान मोठा असेल त्या मानानें प्रतिनिधींच्या जागांची संख्या असावी. (१३) सत्पात्र ठरलेल्या मतदारांची यादी निवडणुकीच्या-पूर्वीं कांहीं काल तरी निश्चित ठरावी. ती ठरेपर्यंत उलटसुलट तक्रारी ऐकून निर्णय होण्याला संधि मिळावी, पण ती मुदत टळल्यावर मतदारांच्या यादीला

कुलूप लागलें असें समजावें, व तींत नंतर ढवळाढवळ करण्याचा अधिकार कोणालाहि राहूं नये. ( १४ ) अशा यादींच्या अधारेंच निवडणुकी व्हाव्या व त्या होण्याचें स्थल, काल, वेळ, मतपत्रिकांचें स्वरूप, मतदानाचा प्रकार, निवडणुकीचे अधिकारी, मतांची मोजदाद करून जाहीर करण्याचा निर्णय, कोणाची कांहीं रीतसर तक्रार असेल तर तिचा विचार करून देण्याचा न्यायनिवाडा व त्याचे अधिकारी, या सर्वांविषयीं लेखी निश्चित नियम असावे. ( १५ ) प्रतिनिधि होऊं इच्छिणारानें मतदारांची मर्जी वाटेल तशी संपादन करावी. तथापि कांहीं गोष्टी त्यानें करण्याच्या नाहींत. उदाहरणार्थ, प्रतिपक्षावर बदनामी होण्यासारखे खोटे जाहीर आक्षेप घेऊं नयेत. खोटी निंदा नालस्ती करूं नये. मतदारांना पैसे देऊं नयेत किंवा देण्याचीं आश्वासनें देऊं नयेत. त्यांच्यावर जुलूम जबरदस्ती करूं नये. धाक दाखवूं नये. जोखीम घालूं नये. त्यांना मेजवान्या देऊं नयेत किंवा खाद्यपेयाचें आमिष दाखवूं नये. एकाच्या जागीं भलता कोणी मतदार म्हणून नेऊं नये. भाड्याचीं वाहानें ठेवूं नये. स्वतःचा खर्चहि कांहीं ठराविक मर्यादेपलीकडे करूं नये, व तो ठराविक मुदतींत योग्य अधिकाऱ्याला दाखविल्याशिवाय राहूं नये. इत्यादि वरील नियम लक्षांत घेतल्यास हें दिसून येईल कीं, त्यांचा हेतू मतदानपद्धति शक्य तितकी निर्दोष करण्याचा आहे. आणि यांतील मुख्य दोष म्हटला म्हणजे मतदानपद्धतीचा उपयोग अप्रामाणिकपणें करणें हा होय. अप्रामाणिकपणानें ज्याचा तो दोषी होतोच; पण इतरहि त्यामुळें फसले जातात. यामुळें प्रतिनिधीची नेमणूक ज्या खुल्या दिलानें व सहज भावनेनें व केवळ पात्रापात्रतेवर लक्ष ठेवून व्हावी तशी होत नाहीं. आणि हें साधण्याकरतां मतदानपद्धतींत एक नियम प्रायः कोठेंहि असतो तो हा कीं, बाहेर उमेदवार व मतदार कांहींहि करो, परंतु मतदारानें प्रत्यक्ष मत कोणाला दिलें हें बाहेर कोणाला कळूं नये म्हणून मत देण्याची जागा इतकी गुप्त ठेवतात कीं, तींत मतदाराशिवाय दुसरा कोणी एकाच वेळीं असूं नये. मतदार हा एरवीं उमेदवाराच्या पाशांत कितीहि सांपडला असला तरी, अखेरचा महत्त्वाचा व मुद्दयाचा जो एक क्षण म्हणजे प्रत्यक्ष मत देण्याचा, त्यावेळीं तरी तो सर्व पाशमुक्त राहवा, व त्यानें तेथें काय केलें हें कोणास कळूं नये. इतकी सुरक्षितता केल्यावर मग सरकार झालें तरी अधिक काय करणार !

## ( १४४ ) नियम असूनहि असमाधान राहतेंच

असो. याहून अधिक बारकाव्यांत शिरलें असतां संयुक्त मतदारसंघ, जातवार मतदारसंघ, परस्पर-विरोधी हितसंबंधाचें संरक्षण करण्याच्या योजना, इत्यादि पुष्कळ गोष्टींचा विचार करावा लागेल. परंतु त्या एकेक मुद्यावर एकेक किंवा अनेकहि ग्रंथ होऊं शकतात व आहेतहि. हिंदुस्थानांत निवडणुकीचें तत्त्व प्रविष्ट झाल्यास फारच थोडा काळ लोटलेला आहे. पण इतर देशांतून प्रातिनिधिक राज्यपद्धति पुष्कळ दिवसांची असतां, अजूनहि तिच्या स्थानिक गुणदोषासंबंधानें आतां कोणाचें कांहीं म्हणणें राहिलेलें नाहीं अशी पावती पटलेली नाहीं. एक तर, प्रातिनिधिक राज्यपद्धति नांवानें सुरू असली तरी तिच्या अंमलबजावणींत अथपासून इतिपर्यंत सत्तालोलुप अशा राजाधिकाऱ्यांचा हात वावरत असल्यामुळें, एकेक झाड तोडून जंगल साफ करावें त्याप्रमाणें लोकसत्तेला पदोपदीं झगडा करावा लागला आहे. पण राजसत्ताधिकाऱ्यांचा संपर्क नाहींसा झाला तरी, निरनिराळे राजकीय पक्ष व उपपक्ष यांच्यांतील परस्पर-हितविरोधहि कांहीं कमी जिकीरीचा ठरत नाहीं. ब्रिटिश पार्लमेंटचा इतिहास या दृष्टीनें निदान तीन-चारशें वर्षांचा असला तरी, अजून विलायतेंतील मतदानपद्धति सदोष आहे असें विशिष्ट पक्षाकडून म्हटल्याचें ऐकिवांत येतें. आहे तें ठीक आहे असें मि. बाल्डविन यांचा कॉन्झरवेटिव्ह पक्ष म्हणत असतो. लिबरल पक्षाचे अध्वर्यु लॉइड जॉर्ज हे मतदानपद्धति व प्रतिनिधींची वांटणी निर्दोष होण्याकरतां अजूनहि नवे नियम सुचवीतच आहेत. आणि मजूर पक्षाचें समाधान तर होण्याला फारच अवकाश आहे ! कारण अमीर-उमरावांची वरिष्ठ सभा आधीं मोडून टाकवी, व देशांत मजूर पक्षाच्या मतदारांची संख्या अधिक असतां प्रत्यक्ष पार्लमेंटमध्यें आपल्याला अबाधित असें बहुमत मिळत नाहीं, अशी मजूर पक्षाची तक्रार आहे. तात्पर्य, प्रातिनिधिक राज्यपद्धतींत सुधारणा होण्याला अंत नाहीं असेंच म्हणावें लागतें. जनतेला कोठेंहि राज्याधिकारांत प्रतिनिधिद्वारां पडलेलें आपलें प्रतिबिंब पाहावें असें फार वाटतें. पण तें प्रतिबिंब पाहाण्याला अवश्य तो आरसा मिळत नाहीं; व मिळाला तरी त्याच्यावरचा मळ ओरखाडे हे नाहींसे होत नाहींत. इतर इतक्या बाबींत मनुष्यप्राणी अपूर्णावस्थेंत आहे, मग राज्यसंस्थेंतील प्रातिनिधिक पद्धतींतच तो पूर्णावस्थेला कसा पोंचणार !

## ( १४५ ) पण लोकसत्तेकडेच एकंदरीनें पारडें झुकत आहे

प्रातिनिधिक राज्यसंस्थेंत निवडणुकीला महत्त्व आहेच, तरी कित्येक राष्ट्रांत निवडलेल्या प्रतिनिधींच्या लोकसभेच्या जोडीला दुसरी एक सभा असते. तिच्यांतले सभासद् निवडले जात नाहींत तर सरकाराकडून नेमले जातात. इंग्लंडांतील हाउस ऑफ कॉमन्स हें पहिल्या प्रकारच्या सभेचें व हाउस ऑफ लॉर्डस् हें दुसऱ्या प्रकारच्या सभेचें उदाहरण होय. पहिल्या प्रकारच्या प्रतिनिधींना 'रेप्रेझेंटेटिव्ह' व दुसऱ्या प्रकारच्या सभासदांना 'प्रेझेंटेटिव्ह' असा शब्द लावतात. दोहोंतील फरक हा कीं, हे पहिल्या प्रकारचे सभासद् राजाकडून नांवानें व्यक्तिशः बोलावले जात नाहींत. ज्या त्या मतदारसंघांतील शेरिफ नांवाच्या अधिकाऱ्यांना राजाकडून हुकूम सुटतो कीं, "तुम्ही गांवचे लोक बोलवा, आणि त्यांना म्हणावें कीं, तुमच्यातर्फे कोण प्रतिनिधि येणार असतील ते निवडून द्या, म्हणजे मग त्यांना तुमच्याकरतां म्हणून सभेला बोलावूं." पण हाउस ऑफ लॉर्डसच्या सभासदांना खुद्द जातीनें त्यांचें त्यांच्याकरितांच निमंत्रण असतें. अमक्यातर्फे या असें नसतें. म्हणून 'प्रेझेंटेटिव्ह' याचा अर्थ राजाला भेटविण्याला व राजानें बोलवण्याला योग्य अशा व्यक्ती. राजा व प्रजा यांच्या सत्तेंतील आणेवारीची वांटणी करण्याला ठराविक साधन नाहीं. ( १ ) पूर्वी सर्व सोळा आणे सत्ता आपल्या एकट्याच्या हातीं आहे असें म्हणणारे राजे होऊन गेले. ( २ ) त्यापुढें कांहीं राजांनीं असा सामोपचाराचा झोंक दाखविला कीं रुपयांतले आठ आणे तुमचे आठ आणे माझे. आणि ( ३ ) यानंतरची स्थिति अशी कीं राजाचे हातीं फक्त आणा-दोन आणे सत्ता राहिली व बाकीची लोकांकडे गेली. पहिल्या स्थितींत लोकसभाच नसणार हें उघड आहे. आणि त्याचीं उदाहरणें शेंकडों हिंदी संस्थानांतून आज ठळक दिसून येतात. लोकसभा व उमरावसभा यांची जोडी हें दुसऱ्या स्थितीचें दर्शक होय. आणि दोरीवर उभा राहून कसरत करणारा मनुष्य ज्याप्रमाणें एकदां इकडे व एकदां तिकडे झोंके घेतो त्याप्रमाणें, राजसत्ता बनेल त्याप्रमाणें राज्यसत्ता एकदां या जोडीपैकीं लोकसभेवर आधारते व एकदां उमरावसभेवर आधारते. पण हे झोंके घेणें फार वेळ टिकत नाहीं. मुद्राराक्षस नाटकांत म्हटल्याप्रमाणें राजसत्ता ही "सा स्त्री स्वभावात् असहा भरस्य तयोर्द्वयोरेकतरम् जहाति" म्हणजे दोघांच्या खांद्यावर हात ठेवून उभी राहण्यांत ती भारावते, आणि मग त्यापैकीं कोणातरी एकाला सोडून देते व दुसऱ्याच्या खांद्यावर दोन्ही हात ठेवून विश्रांति घेते. त्याप्रमाणें राज्यस-

त्तेनें गेल्या शें–पन्नास वर्षांत हळूं हळूं उमरावसभेवर भर देण्याचें टाकून, ती लोकसभेवरच अवलंबून राहूं लागली आहे. कारण देशांतील इच्छाशक्ति व लोकमत हें लोकसभेच्या बाजूला बहुधा सगळेंच्या सगळें झुकूं लागल्यामुळें, पुष्कळ राष्ट्रांतून उमरावसभा नष्ट झाल्या आहेत व लोकसभाच तेवढ्या शिल्लक राहून त्यांतील सर्व सभासद लोकांनीं निवडलेले असतात. लोकप्रतिनिधींनीं सर्व जागा व्यापल्यामुळें राजप्रतिनिधींना थारा नाहीं असें होत चाललें आहे.

## ( १४६ ) गणितानें प्रतिनिधित्व खोटें पडतें

पण राजा व प्रजा यांच्यांतील वादाचा असा निकाल लागला तरी, म्हणजे सर्वाधिकार लोक-सभेकडे आणि लोकसभांतील सर्व सभासद निवडलेले अशी स्थिति आली तरी, या निवडलेल्या सभासदांना तरी खरें प्रातिनिधिकत्व कोणाचें आहे, कितपत आहे, व तें किती वेळ टिकूं शकेल हे प्रश्न शिल्लक राहातातच; व त्यांचीं उत्तरें देणें हें काम फार कठीण आहे. कसें तें पाहूं. निवडणूक उभी राहिली, पण एकटा एक उमेदवार निवडणुकीला पुढें आला; व तो इतका बलाढ्य किंवा शिरजोर आहे कीं त्याच्यापुढें आपला टिकाव लागणार नाहीं म्हणून दुसरा कोणीच उमेदवार उभा राहात नाहीं. तसें झालें म्हणजे ठरल्या तारखेला निवडणुकीच्या अधिकाऱ्याला जाहीर करावें लागतें कीं एकच उमेदवार होता म्हणून निवडणुकीचें कारण नाहीं. याचा अर्थ निवडणुकीशिवाय प्रतिनिधि निवडून आला ! आणि या विरोधाच्या शब्दांतच खरें शंकास्थान आहे. हा निवडलेला उमेदवार बलाढ्य होता म्हणजे तो इतर उमेदवारांना कुस्तींत भारी ठरला असा अर्थ. पण त्यामुळें तो गांवच्या मतदारांना आवडला असें मात्र ठरत नाहीं ! इतर उमेदवारांच्या अभावामुळें, म्हणजे स्वतः मतदारसंघाच्या दुबळेपणामुळें, तो त्यांच्यावर लादला गेला. राक्षस किंवा पैशाच विवाहांतील पति हा जसा स्त्रीचा खरा धर्मपति होऊं शकत नाहीं, तसाच हा बलाढ्य उमेदवार त्या गांवच्या जनतेचा खरा प्रतिनिधि होऊं शकत नाहीं. असें असतां तो लोकसभेंत जाऊन बसणार आणि गांवाकरितां म्हणून मत देणार ! मग यांत खरें प्रतिनिधित्व कुठचें आलें ! यानंतर एक दुसरें उदाहरण घेऊं. त्यांत कल्पना करूं कीं, एकाच जागेकरितां दोन किंवा अधिक उमेदवार उभे राहिले, आणि निवडणूक झाली तींत सर्वांत अधिक मतें मिळालेलाच उमेदवार निवडून आला. तरी वस्तुतः कदाचित् असें आढळेल कीं, गांवची लोकसंख्या दहा हजार, त्यांतल्या सात हजा-

रांचें नांव मतदार म्हणून यादींत दाखल झालें, पण त्यांतलेंहि चारच हजार लोकं मतें देण्याला गेले, आणि निवडणुकीला उमेदवार चारच उभे होते त्यांना मतें पडलीं तीं अशीं—पहिल्याला १२ शें; दुसऱ्याला १ हजार, तिसऱ्याला ९५०, व चवथ्याला साडेआठशें. म्हणजे दहा हजार वस्तीपैकीं अवघ्या बाराशें लोकांनीं ज्याला निवडलें तो दहा हजारांचा प्रतिनिधि ठरला ! चार हजारांपैकीं १२ शें लोक हा हवा म्हणणारे निघाले, पण उरलेले २८ शें लोक हा नको म्हणणारे निघाले हें उघड होत नाहीं काय ?

## ( १४७ ) बिंब-प्रतिबिंबाला गडांतरें

याहून पुढें आणखी अडचणी आहेत. १२ शें लोकांच्या मतांनीं उमेदवार निवडला खरा; पण त्यानें निवडणुकीच्या वेळीं वचन आश्वासन दिलें असेल तर तें फक्त एकाद्दुसऱ्या महत्त्वाच्या व त्यावेळीं वादग्रस्त ठरलेल्या मुद्यांवर. पण इतर मुद्यांवर मतें देण्याची वेळ आली तर हा प्रतिनिधि आधीं हजर राहील कीं नाहीं ! हजर राहिला तर मत देईल कीं त्रयस्थपणाचा आव घालून जागा धरून बसेल ? आणि मत दिलें तरी कबूल केल्याप्रमाणें देईल कीं नाहीं ? पण तसें न देतां त्यानें वचनभंग केला तर लोक त्याचें काय करणार ? हा वचनभंग दोन्ही प्रकारचा म्हणजे सकारण किंवा अकारण असूं शकेल. तो सकारण असेल तर फार तर ईश्वराघरीं रुजूं होईल. पण मतदारांचें काम, गांवचें काम बिघडलेंच कीं नाहीं ? गांवचें लोकमत निश्चित असतां फुकट गेलें व प्रातिनिधिक तत्त्व खोटें ठरलें त्याची वाट काय ? आणि तो वचनभंग अकारण असेल, म्हणजे अप्रामाणिकपणाचा, लोभबुद्धीचा, स्वार्थाचा असेल तर मग बोलावयासच नको. प्रातिनिधिक तत्त्वाची ती फटफजीतीच झाली ! वचनभंग सकारण असेल तर तो गांवीं जाऊन लोकांशीं युक्तिवाद करील; व त्यांत यश न आलें तर त्याला शेवटीं म्हणावें लागेल कीं, " माझ्या विवेकबुद्धीप्रमाणें मीं केलें. मीं आपली बुद्धि गहाण टाकून निवडणूक जिंकली नाहीं. माझी विवेकशीलता लक्षांत घेऊनच तुम्हीं मला निवडून दिलें. मग मीं आपली विवेकशक्ति चालविली यांत विश्वासघात काय झाला !" पण त्याला असेंहि म्हणतां येईल कीं, " निवडणुकीच्या वेळीं माझ्याकडून अमुक एक प्रकारें मत देईन असें वचन घेतलें होतेंत व मीं दिलें होतें. पण तें दिलें तेव्हां सगळ्या बाजू तुम्हांला व मला कळल्या नव्हत्या. लोकसभेंत जाऊन बसल्यावर पूर्व पक्ष उत्तर पक्ष होऊन वाद झाला. चर्चा झाली. नवी

लेखी तोंडी माहिती पुढें आली. तेव्हां केवळ वचन दिलें म्हणूनच तसें मत दिलें असतें तर मी मूर्ख ठरलों नसतों काय ? पण मी मूर्ख म्हणवून घेण्यालाहि भिणार नाहीं; तथापि तुमचें धडधडीत नुकसान होणार असें दिसलें तें उघड्या डोळ्यानें कसें करूं ? मी गांवचा ना ?" तात्पर्य, मी गांवचा व आपला म्हणजे एका अर्थानें प्रतिनिधीच असें तर तोंडानें म्हणतो, आणि गांवाविरुद्ध मत देऊन प्रतिनिधित्व बुडवितो याचा मेळ कसा घालावयाचा ? तर त्याचें उत्तर हेंच कीं, प्रातिनिधिक तत्त्व हें खरें व चांगलें असलें तरी तें प्रत्येक खरें ठरणें, किंवा कसोटीला उतरणें, किंवा गांवांतील प्रत्येक मनुष्याचें समाधान त्यानें होणें, ही गोष्ट अशक्य कोटींतली म्हणून सोडून दिली पाहिजे. तत्त्व म्हटलें तरी व्यवहारांत त्याला मर्यादा पडणारच.

## ( १४८ ) निवडणूक म्हणजे लग्नाची गांठ

वरील विवेचन निवडून दिलेल्या सुजाण माणसाविषयीं झालें. पण या निवडणुकींच्या द्वारानें देशभर स्वार्थी व नाठाळ अशा किती तरी प्रतिनिधि म्हणविणारांची जनतेशीं गांठ पडते ! आणि तसें झालें म्हणजे निवडणूक किंवा प्रातिनिधिकत्व हा करार नाहीं, तर हिंदु विवाहाप्रमाणें संस्कार आहे, असें आढळून येईल. शेरीफनें निवडणुकीचा निकाल दिला म्हणजे या लग्नाची टाळी पडली. मग पुढें ठरलें असेल त्याप्रमाणें तीन किंवा पांच वर्षांपर्यंत प्रतिनिधि हा नवरा व मतदार जनता ही बायको असें नातें जडून राहातें ! कांहीं जातींत घटस्फोट तरी होऊं शकतो. पण निवडणुकीच्या मुदतींत मतदाराला प्रतिनिधीपासून घटस्फोट मिळूं शकत नाहीं. या प्रतिनिधीच्या निंदेचे जाहीरनामे रोज गांवभर लागले, किंवा सगळ्या गांवानें रोज एकदां जमून निंदाव्यंजक ठराव पास केले, तरी 'लोकसभेंत मी गांवचा प्रतिनिधि ' म्हणून तो मिरवणार, सोडणार नाहीं. सुप्रसिद्ध मुत्सद्दी एडमंड बर्क, खुद्द याच्या संबंधांतच अशी गोष्ट घडली. तेव्हां त्यानें आपल्या मतदारांना जें पत्र लिहिलें तें वाचण्यासारखें आहे. कारण त्यांत प्रातिनिधिक पद्धतींचें खरें रहस्य व मर्यादा एका प्रामाणिक राजकीय तत्त्ववेत्त्यानें सांगितलेलीं आहेत. व्यवहारांतील इतर प्रनिनिधींचें प्रतिनिधित्व चुटकीसरशी काढून घेतां येतें. मुनिमाची नेमणूक, मुखत्याराचें मुखत्यारपत्र, वकिलाचें वकीलपत्र, या गोष्टी रद्द करण्याला क्षणहि लागत नाहीं. पण निवडलेला प्रतिनिधि कांहीं मुदतीपर्यंत रद्द होत नाहीं. मग दरम्यान लोकसभा बरखास्त होण्यासारखा एखादा शुभ अपघातच झाला तर गोष्ट वेगळी ! सरकार आपल्या नोकरींत जेव्हां नोकर

लोक नेमतें तेव्हां त्यांना प्रतिनिधि समजूनच नेमतें. पण धनी व नोकर यांच्या संबंधामुळें या प्रतिनिधीला सरकारला वाटेल तेव्हां बडतर्फ तरी करतां येतें. स्टेट सेक्रेटरी हा राजाच्या आज्ञेनें व्हाइसरॉयालाहि क्षणांत परत बोलावूं शकेल. आणि एखादा एक्झिक्युटिव्ह कौन्सिलर किंवा हायकोर्ट जज्ज अनिष्ट ठरला तर त्या प्रतिनिधीला सरकार क्षणांत बडतर्फ करूं शकतें. पण कायदेशीर विधिमंडळाची गोष्ट जरा वेगळी आहे. त्यांत 'नेमून दिलेला' प्रतिनिधि अप्रिय किंवा अनिष्ट ठरल्यास तो काढून टाकणें ही गोष्ट लोकसभेंत ' निवडून दिलेला ' प्रतिनिधि काढून टाकण्यापेक्षां अधिक सोपी खरी; पण तेथेंहि अपवाद होऊं शकतो. कायदेमंडळांत सरकारनें ' नेमून दिलेला ' सभासद नोकर या नात्यानें नेमलेला असेल तर त्याचा राजिनामा हुकमी मागतां येतो. कारण समजा त्यानें तो न दिला तर त्याला नोकरीवरूनच काढलें म्हणजे त्याचें कायदेमंडळांतलेंहि अधिष्ठान गेलेंच. पण समजा कीं, सरकारनें नेमलेला सभासद हा खाजगी गृहस्थ आहे. आणि सरकारशीं बेबनाव झाला असतांहि जर तो म्हणेल कीं " मी मुदत भरेपर्यंत येथील जागा सोडणार नाहीं, " तर सरकार पश्चात्ताप पावो पण त्या प्रतिनिधीचें मात्र चालूं शकेल. अशा रीतीनें प्रतिनिधित्वाच्या अडचणी लोकांप्रमाणें राजालाहि असूं शकतात. प्रतिनिधि आंत घेण्याचें यंत्र ' निवडणूक ' हें आज बनून राहिलें आहे. तें दिवसेंदिवस सुधारलें जात आहे, व कालांतरानें बरेंचसें निर्दोष होईलहि. परंतु निवडणुकीनें आंत घेतलेला प्रतिनिधि हुकमी बाहेर घालविण्याचें यंत्र अद्यापि निघालेलें नाहीं.

## ( १४९ ) एक साधारण समजूत

कोणचेंहि राज्य झालें तरी तें लोकमतावरच अवलंबून असतें, अशी एक सर्वसाधारण म्हण किंवा समजूत आहे; पण सकृद्दर्शनीं तितकीशी खरी वाटत नाहीं. कारण लोकमत प्रतिकूल असतांहि तें अनेक कारणांनीं, पुष्कळ वेळपर्यंत किंवा कदाचित् केव्हांहि, प्रभावी होऊं शकत नाहीं. पण म्हणून तोंपर्यंत चाललेलें राज्य लोकमतानेंच चाललें आहे असें म्हणणें बरोबर नाहीं. असंतोष हा या काळांत प्रजेच्या मनांत धुमसत असतो, व त्यामुळें तिचें मन पिचत असतें. परंतु भडका होऊन त्यांत अप्रिय अशा राज्यकर्त्यांची आहुति पडणें किंवा न पडणें हें इतर अनेक गोष्टींवर अवलंबून राहतें. तें घडून येईपर्यंत गुप्त किंवा निष्क्रिय राहाणाऱ्या 'असंतोषाला' 'संमति' असें नांव देणें म्हणजे 'संमतार्थे मौनं' या म्हणीचा दाखला

घेऊन अतिशयोक्ति करण्यासारखेंच आहे. मात्र मनांत असंतोष किंवा नापसंती असतां ती प्रगट किंवा प्रभावी न करणें हा कांहीं म्हटलें तरी अखेर प्रजेचाच दोष किंवा अपराध ठरतो, यास्तव त्याबद्दल तिचा नाजूक निषेध करण्याकरितां म्हणून 'तिच्या संमतीनेंच राज्य चालतें' असें हवें तर म्हणावें! आणि हातून जोंपर्यंत इष्ट प्रतिक्रियेचा पराक्रम घडत नाहीं, तोंपर्यंत मनुष्यानें हा निषेध व ही निंदा सोसून मुकाट्यानें बसणेंच प्राप्त आहे. पण अशा लोकांचा अशा शब्दांनीं निषेध करावा कीं नाहीं हा खरोखर मुख्य प्रश्न नसून, प्रश्न आहे तो असा कीं, अप्रिय जुलमी राज्यें केवळ प्रत्यक्ष उलथून पडत नाहींत म्हणून तीं लोकांच्या ( प्रजेच्या ) संमतीनेंच चालतात हें म्हणणें तत्त्वदृष्ट्या बरोबर होईल काय ? व त्याचें उत्तर 'नाहीं' असेंच द्यावयास पाहिजे.

## ( १५० ) जशी पात्रता तसा लाभ

जुलमानें गांजलेले व परिस्थितीनें नाडलेले लोक आपण सोडून देऊं. पण ज्यांना लोकमत प्रकट करण्याचें साधन हातीं मिळालेलें आहे, आणि असें असतांहि जे लोक त्या साधनांचा उपयोग भरपूर करून घेत नाहींत व आपलें मत प्रभावी करीत नाहींत, त्यांना मात्र 'संमतार्थे मौनं' हा न्याय लावणें अन्यायाचें होणार नाहीं. राष्ट्र स्वतंत्र आहे व अमुक एक गोष्ट हवी तर घडवून आणणें व नको तर हाणून पाडणें याविषयीं त्यांना अधिकार व सत्ता आहे; असें असतांहि जर लोक योग्य ती खटपट न करितां उगीचच नुसती ओरड किंवा तक्रार करीत बसतील तर A free nation gets the government it deserves असें म्हणून त्यांना खिजविण्यांत कांहींच चूक नाहीं ! झारशाहींत बिचारा रशियन शेतकरी जुलमाखालीं चिरडला जात होता, तेव्हां वरील न्याय लावून त्याला खिजविणें अधमपणाचें ठरलें असतें. कारण त्यावेळीं तो स्वतंत्र नव्हता. पण आज रशियामध्यें जिकडेतिकडे लोकसत्ताक संस्थानेंच स्थापलीं गेलीं असतां, आज जर कोणी रशियन लोक म्हणूं लागतील कीं, "हल्लींचा राज्यकारभार आमच्या संमतीशिवाय चालतो " तर मात्र त्यांचें म्हणणें कोणी ऐकणार नाहीं. तीच गोष्ट इंग्लंडसारख्या राष्ट्राची. कारण तेथें सर्व कारभार लोकतंत्र आहे. बिचारा राजा स्वतः कांहींच करूं शकत नाहीं. म्हणून एखाद्या गोष्टीबद्दल किंवा प्रधानमंडळाबद्दल स्वतः राजानेंच एकवेळ कुरकूर केली, व माझ्या संमतीशिवाय ती गोष्ट घडते असें म्हटलें, तर तें एक वेळ शोभेल. पण मताधिकारसंपन्न अशा इंग्लंडांतील स्वतंत्र लोकांना तें म्हणणें शोभणार नाहीं.

## ( १५१ ) याचीं उदाहरणें

या संमति–असंमतींतील सूक्ष्म भेद दाखविण्याला हिंदुस्थानचें उदाहरण घेतलें तर तें चांगलें उपयोगी पडेल. कारण संमति–असंमतीचे खरे खोटे सर्व प्रकार येथें आजच्या स्थितींत पहावयास सांपडतात. आपण वरिष्ठ कायदे-कौन्सिलचेंच उदाहरण घेऊं. कोणताहि कायदा पास करणें न करणें याचा निदान प्राथमिक तरी अधिकार या कायदे-कौन्सिलाला आज आहे. या कायदेमंडळांत लोक-नियुक्त सभासदांचें बहुमत आहे असें मंडळांतील सभासदांच्या संख्येवरून म्हणणें प्राप्त आहे. कारण एकंदर १४०–१४५ सभासदांपैकीं निदान १०० लोकांनीं निवडून दिलेले असतात. असें असतां खालीं लिहिलेल्या निरनिराळ्या प्रकारच्या गोष्टी या कायदेमंडळांत हल्लीं संभवतात. ( १ ) सरकारानें बिल पुढें आणलें व कायदेमंडळानें तें मंजूर केलें; म्हणजे त्यांतल्या १०० लोकनियुक्त सभासदांपैकीं निदान बहुमत बिल मंजूर करण्याला अनुकूल पडलें. या ठिकाणीं मूळ बिल सर-कारानें पुढें आणलें असलें तरी तें मंजूर होण्याचा कारभार लोकांचा लोकांनींच केला, व यापुरता राज्यकारभार हिंदी राष्ट्रांतील लोकांच्याच संमतीनें झाला असें म्हणावें लागेल. कारण लोकनियुक्त शंभर सभासदांपैकीं एकाव्वन अनुकूल व एकूणपन्नास प्रतिकूल अशीं मतें बिलावर पडलीं, म्हणजे अवघ्या दोनच अधिक मतांनीं बिल मंजूर झालें; तरी तें लोकांनींच मंजूर केलें. कारण लोकसत्ताक राज्यपद्धति झाली म्हणजे लोकालोकांतहि मतभेद संभवतो; पण अशा वेळीं बहुमताचा निर्णय तोच एकंदर जनतेचा निर्णय म्हणणें ही परिभाषा लोकसत्ताक राज्यपद्धतींत सर्वमान्य झालेली आहे. आणि असा कांहीं तरी नियम केल्याशिवाय गत्यन्तरच नाहीं. ( २ ) सरकारानें बिल पुढें आणलें व तें कायदेमंडळानें नामंजूर केलें, ही गोष्ट कांहीं थोडे लोकनियुक्त सभासद बिलाला अनुकूल मत देणारे असले तरी घडूं शकेल. उलट कांहीं सरकारनियुक्त सभा-सद तटस्थ राहिल्यानें किंवा त्यांनीं प्रतिकूल मत दिल्यानें बिल नामंजूर झालें तरी त्याबद्दल सरकार तक्रार करूं शकत नाहीं व राष्ट्रानें तें बिल नामंजूर केलें असेंच त्यांनाहि म्हणावें लागतें. पण अशा नामंजूर झालेल्या बिलाचेहि पुढें दोन प्रकार होऊं शकतील. एक असा कीं सरकार ती नामंजूरी स्वीकारून गप्प बसेल. या ठिकाणीं बिल नामंजूर होऊन घडणारा राज्यकारभार हा लोकमतानेंच घडला हें म्हणणें यथार्थ ठरेल. पण याचाच दुसरा प्रकार असा होईल कीं, गव्हर्नर

जनरल आपल्या अधिकारांत तें नामंजूर झालेलेंहि बिल सर्टिफाय करून कौन्सिल ऑफ् स्टेटकडून मंजूर करवून घेईल, किंवा तेथेंहि तें नामंजूर झालें तर ऑर्डिनन्सच्या रूपानें अमलांत आणील. या ठिकाणीं जर कोणी असें म्हणेल कीं देशांतील वरिष्ठ कायदेमंडळ हें लोकनियुक्त असल्यामुळें झाला हा कारभार लोकमतानेंच झाला तर तें म्हणणें अन्यायाचें होईल. कारण कायदेमंडळापुढें आलेल्या बिलाला अखेर कायद्याचें स्वरूप आलें खरें, पण तें लोकमतानें नव्हे तर लोकमत विरुद्ध पडलें असतांहि ! ( ३ ) पण तिसराहि एक प्रकार घडूं शकतो व तो मात्र थोडा गमतीचा आहे. तो असा कीं, सरकारनें एखादें अनिष्ट बिल पुढें आणलें, त्यावर मतें घेतांना अधिकारी तटस्थ राहिले; फक्त लोकनियुक्त सभासदांचीं मतें घेतलीं गेलीं; पण त्यांतल्या कांहीं लोकांनीं सरकारच्या लोभाला किंवा आमिषाला बळी पडून किंवा जातिद्वेषानें बिलाला अनुकूल मत दिल्यानें तें पास झालें. तर येथें तें लोकमतानेंच पास झालें असें म्हणावें लागेल. मग त्यावर जर कोणी असें म्हणेल कीं, " छे ! ही गोष्ट लोकमतानें घडली नाहीं. कारण कांहीं लोकनियुक्त सभासदांनीं स्वार्थबुद्धीनें किंवा द्वेषानें अनुकूल मतें दिलीं म्हणून असें घडलें ! " तर त्याला असें उत्तर देतां येईल कीं तुमचे थोडे तरी लोकनियुक्त सभासद बेइमान कां झाले ? अर्थात् A nation gets the government it deserves. फार तर यांतील गव्हर्नमेंट या शब्दाच्याऐवजीं laws असा शब्द बदलून घालतां येईल. परंतु झालेल्या प्रकाराला लोकमताचा पाठिंबा आहे हा अपवाद कांहीं केल्या टळूं शकणार नाहीं ! आणि बहुमत होईल इतके प्रतिनिधी निवडण्याचा अधिकार दिला असतांहि सरकारी लोभाला स्वार्थाला बळी पडणाऱ्या यांच्याहून अधिक चांगले प्रतिनिधी मिळाले नाहींत तर लोकच नादान किंवा अपात्र कां न म्हणावें ? त्यांनीं दुसऱ्या कोणाला बोल कां लावावा ? राष्ट्रांतील लोकांना मताधिकार दिला व हें करून सरकारनें आपलें कर्तव्य बजावलें ! पण लोकांनीं निवडून दिलेले प्रतिनिधी जर स्वार्थी दुबळे निघाले तर ते तसे निघूं नयेत याचीहि जामिनकी सरकारनेंच घ्यावयाची कीं काय ? तात्पर्य, या तिसऱ्या प्रकारांत घडला तो प्रकार राष्ट्रांतील सुज्ञ समंजस लोकांना आवडण्यासारखा नसला तरी, तो राज्यकारभार लोकसंमतीनेंच झाला किंवा होतो असें त्यांना कबूल करावें लागेल.

### ( १५२ ) स्थानिक स्वराज्याचें उदाहरण

पण या प्रकाराचीं, मनावर अधिक ठसा उमटविणारीं, उदाहरणें हल्लीं आमचीं

लोकलबोर्डें व म्युनिसिपालिट्या यांच्या कारभारांत दिसून येतात. आज मुंबई इलाख्यांतील बहुतेक म्युनिसिपालिट्यांतून लोकनियुक्त सभासदांचें बरेंच मोठें बहुमत असतें. उदाहरणार्थ, पुण्याच्या म्युनिसिपालिटींत एकंदर पन्नास सभासदांपैकीं पंचेचाळीस इतके सभासद लोकांनीं निवडून दिलेले आहेत. अध्यक्ष, उपाध्यक्ष, कार्यकारी मंडळें हीं लोकनियुक्तच असतात. त्यांच्या निवडणुकींत सरकारचा हात कायदेशीर रीतीनें फारसा कोठें शिरकत नाहीं. या संस्थेच्या नियमांना अखेर मंजूरी सरकारची लागत असली तरी, अमुक एकच नियम अमलांत ठेवा अशी सक्ति सरकाराला करितां येत नाहीं. म्हणजे सरकाराला नियमांच्या बाबतींत विधायक सत्ता नाहीं. या संस्थेचे सर्व अधिकारी नेमणें, काढून टाकणें ही तिच्या पूर्ण अखत्यारींतील गोष्ट आहे. आणि अशा या संस्थेला सुमारें चार चौरस मैल क्षेत्रांत बारा तेरा लाख रुपयांचें उत्पन्न असून त्यांतील प्रत्येक पै सर्वस्वीं म्युनिसिपालिटीला हवीतशी खर्चतां येते. म्हणजे अल्पप्रमाणांत खालच्या दर्जाचें कां होईना पण शहर म्युनिसिपालिटी हें नागरिकांना संपूर्ण स्वराज्य लाभलेलें आहे. मग त्या संस्थेचा जो कारभार चालतो तो शहरच्या लोकमतानें चालतो असें म्हणावयाचें कीं नाहीं ? अर्थात् ही गोष्ट कोणासहि तत्त्वतः नाकबूल करतां येणार नाहीं. तथापि, जेथें ऐकावें तेथें म्युनिसिपालिटीला दिलेल्या शिव्याच कानीं पडतील. तिचे गुण घेतलेले किंवा आभार मानलेले सहसा कानीं यावयाचे नाहीं. पण संस्थेंतील तीन चतुर्थांश किंवा चार पंचमांश सभासद प्रत्यक्ष लोकांनीं निवडून दिलेले असतां लोकांनीं जर म्युनिसिपालिटीला शिव्या दिल्या तर त्यांनीं त्या स्वतःलाच दिल्या असें होत नाहीं काय ? व संस्थेचा कारभार लोकमतानें चालत नाहीं असें त्यांना कोणत्या तोंडानें म्हणतां येईल ? यावर कोणी कदाचित् असें म्हणेल कीं, मतदारांची संख्या अजून पुरेशी नाहीं. ती आणखी वाढावयास हवी. स्वराज्यसंस्थेंत गरीब व श्रीमंत यांत मुळींच भेद राहूं नये, विषमता उरूं नये, या अन्तिम व उज्ज्वल ध्येयाच्या दृष्टीनें या म्हणण्यांत कदाचित् थोडेंसें तथ्य असेल. परंतु आजपर्यंतच्या अनुभवावरून पाहतां मतदारांची संख्या आणखी वाढली तरी ती फक्त भरींत भर पडली इतकेंच होईल. त्यामुळें कारभार सुधारेल किंवा संस्थेच्या शिव्या वांचतील असें खात्रीनें म्हणवत नाहीं.

## ( १५३ ) लोकमत प्रभावी होण्याचा मार्ग

मतदारांची संख्या वाढविल्यानें खालच्या वर्गांतून प्रतिनिधि निवडून येण्याला

मदत होते ही गोष्ट खरी. आणि समतेच्या तत्त्वाच्या दृष्टीनें पहातां स्वराज्य संस्थेंत ( मग ती वरिष्ठ असो कनिष्ठ असो ) श्रीमंताबरोबर गरीब, विद्वानाबरोबर अशिक्षित, व शहाण्याबरोबर अज्ञानी लोकप्रतिनिधि बसून त्या सर्वांनीं मिळून एक-दिलानें एकमतानें सार्वजनिक हिताचें काम करणें हें भूषणास्पद आहे. असे प्रतिनिधी संस्थेंत आल्यानें तिला सर्वांगीण सर्वव्यापक अशी दृष्टि लाभते. तथापि मतदारी फैलावली व लोकप्रतिनिधींची संख्या वाढली म्हणून संस्थेचा कारभार हट-कून सुधारेल अशी हमी देतां येणार नाहीं. कित्येक वेळां असेंहि घडतें कीं, थोडे पण निवडक लोक राज्यसंस्थेंत असून त्यांच्या हातीं सत्ता असेल तर तिचा उपयोग अधिकाऱ्यांवर दाब ठेवण्याचे कामीं अधिक यशस्वी रीतीनें होतो. पण प्रतिनिधींची संख्या थोडी असली काय, जास्त असली काय, त्यांच्यामध्यें स्वार्थपरायणता जितकी कमी असेल, कोणतेही प्रश्न समजून घेण्याची व त्या-करितां श्रम करण्याची पात्रता अधिक असेल, व जी गोष्ट खरी व लोकहिताची अशी वाटेल तिच्याविषयीं आग्रह धरण्याची चिकाटी जितकी अधिक असेल त्या मानानें खऱ्या लोकमताची छाप कारभारावर पडेल. तोंपर्यंत लोकमत म्हणजे तें फक्त आडनांवाचें होय. निरनिराळ्या खात्यांचे अधिकारी आपले अधिकार बेगु-मान चालवितात, आणि संस्थेंतील सभासदांची नालायकी किती आहे याचा अंदाज मनाशीं करून उलट त्यांना मनांतून हसत असतात. लोकमताला प्रबळ इच्छाशक्तीचा जोर मागून नेट देण्याला उभा असेल तेव्हांच तें लोकमत प्रभावी होईल; व तें अशा रीतीनें प्रभावी होईल तेव्हांच ती संस्था खरी लोकसत्तात्मक होईल.

## ( १५४ ) अधिकारपात्रता व लोकमत

अनुभव असा येतो कीं, लोकांना जे हक्क नाहींत ते दिले तरी त्यांच्याकडून त्या हक्कांचा उपयोग व्हावा तसा करून होत नाहीं. कित्येक लोकांना कोणत्याहि अधिकाराची नुसती हेटाळणीच करण्याची संवय असते. अशा लोकांना एखादा नवा अधिकार दिला तर ते त्याचा कौतुकानें व आनंदानें स्वीकार करण्याचें बाजूस राहून, त्याची उलट थट्टाच करितात, आणि अमुक केलें तरी काय होणार ? तमुक केलें तरी काय होणार ? हे त्यांचे निराशाजनक प्रश्न चालूच असतात. दुसरे कित्येक नवे अधिकार मिळाल्यानें मनांतून आनंदतात, पण या हेतूनें कीं, या अधिकारांचा उपयोग करून कांहीं तरी अधिक स्वार्थ साधतां येईल. इतर

कांहीं लोक असे असतात कीं, त्यांना अधिकाराची हाव मोठी पण राज्यकारभार सुधारण्याकडे त्यांचा उपयोग करून घेण्याचें शहाणपण त्यांच्या अंगीं नसतें. यामुळें ते स्वतः निस्स्वार्थीपणानें वागत असले तरी, असें कांहीं भलतेंच करून ठेवतात कीं, त्यांना हा अधिकार नसता तर बरा असें म्हणण्याची पाळी येते. कांहीं लोक अधिकारानें इतके फुगून जातात कीं आपणाला कांहींहि अधिकार असला तरी आपण म्हणजे कांहीं सर्व संस्था नव्हे हें लक्षांत न राहून, आपण म्हणजेच संस्था व संस्था म्हणजेच आपण अशा भावनेनें अधिकाराचें अतिक्रमण करतात व फजित होतात.

## ( १५५ ) अवांतर अडचणी

लोकसत्ताक राज्यसंस्थेंतील हे व्यक्तिगत दोष झाले. पण दुसरे कित्येक दोष, संस्थेंतच अन्तर्भूत झालेले असतात, व त्यामुळें व्यक्ति आपणांकडून ठीक वागल्या तरी त्याचा व्हावा तितका उपयोग होत नाहीं. उदाहरणार्थ, राष्ट्रांत विशिष्ट मताची किंवा पक्षाची मतदारसंख्या एकंदरीनें पुष्कळ असेल. परंतु प्रत्यक्ष निवडणुकींत असा प्रकार होऊं शकतो कीं, त्या पक्षाचीं भरपूर मतें पडूनहि संस्थेमध्यें अखेर बहुमत होतें तें अशाच दुसऱ्या पक्षाचें कीं, पहावयाला गेल्यास त्यांच्या बाजूला मतदारसंख्या कमी होती, किंवा निवडणुकींत मतें कमी पडलीं. असें होण्याचें कारण मुळांत मतदारांच्या संख्येची वांटणी निरनिराळ्या मतदारसंघांत यथाप्रमाण झालेली नसते. थोडे मतदार असणाऱ्या संघाला जितके प्रतिनिधी पाठविण्याचा हक्क तितकेच प्रतिनिधी पाठविण्याचा हक्क पुष्कळ संख्येच्या मतदारसंघालाहि असूं शकतो. आणि राष्ट्रांत असे विशेष किंवा जादा हक्क असणारे मतदारसंघ जितके अधिक तितकी या प्रकारची विषमता व लोकमताची निष्फळता अधिक अनुभवाला येईल. उदाहरणार्थ, मुंबई कायदेकौन्सिल घेतलें तर त्यांत सुमारें शंभर मतदार-संख्या असणाऱ्या युनिव्हर्सिटीला एक सभासद पाठवितां येतो. तसेंच सुमारें शंभर मतदारसंख्या असणाऱ्या मुंबई शहर म्युनिसिपालिटीला एक प्रतिनिधि पाठवितां येतो. पण सव्वालाख लोकसंख्या असणाऱ्या पुणें शहराला एकच सभासद पाठवितां येतो. व सहा सात लक्ष लोकसंख्या असणाऱ्या कुलाबा जिल्ह्यालाहि एकच सभासद पाठवितां येतो. अर्थात् सभासदांच्या संख्येच्या बाजूनें समता असली तरी मतदारांच्या संख्येच्या बाजूनें ती विषमताच होय. मग कायदे-मंडळांत लोकमताचें बरोबर प्रतिबिंब कसें पडावें ?

## ( १५६ ) प्रतिबिंबाचें विकृत दर्शन

विलायतेंत या विषमतेचे चमत्कार पूर्वी पुष्कळच पहावयास सांपडले, व अजूनहि ते पहावयास सांपडतात. १८३२ सालापर्यंत व त्यानंतरहि कांहीं वर्षें असा प्रघात होता कीं कांहीं कांहीं श्रीमंत व्यक्ति व उमराव लोक यांना निरनिराळ्या युक्त्यांनीं पार्लमेंटांतील तीन तीन चार चार समासदांच्या जागा आपल्या खिशांत असल्यासारख्या ताब्यांत ठेवतां येत असत; व त्यामुळें त्या मतदारक्षेत्रांना 'पॉकेट बरोज' ( Pocket Boroughs ) असें नांवच पडलें होतें. कांहीं मतदारक्षेत्रांतून दहा वीसच मतदार असतां त्यांना एकेक सभासद निवडतां येई. १८३२ सालापासून ही विषमता बरीच काढून टाकण्यांत आली आहे. पण इतर रीतीची विषमता निघालेली नाहीं. उदाहरणार्थ, १८८६ सालीं होमरूलच्या प्रश्नावर मोठ्या निकराची निवडणूक झाली तेव्हां या विषमतेच्या वांटणीमुळें अखेर असें आढळून आलें कीं, होमरूलपक्षाच्या बाजूला एकवीस लक्ष मतें पडून त्यांना २८३ जागा काबीज करतां आल्या; पण युनियनिस्ट पक्षाला अवघीं वीस लक्ष मतें, म्हणजे एक लक्ष कमी मतें, पडूनहि त्यांना ३८७ जागा मिळाल्या. दुसऱ्या एका निवडणुकींत कॉन्झरव्हेटिव्ह पक्षाला बारा लक्ष मतें पडून ३५६ जागा मिळाल्या. आणि लिबरल पक्षाला चौदा लक्ष मतें पडून जागा मिळाल्या अवघ्या २९६ च. १९२४ सालच्या निवडणुकींत व १९१८ सालच्या निवडणुकींत असेच प्रकार घडले. म्हणजे ज्या एका पक्षाला एकंदर मतसंख्येपैकीं शेंकडा त्रेपन्न इतकीं मतें पडलीं त्याला पार्लमेंटांतील एकंदर सभासदांच्या संख्येंतील शेंकडा ८० जागा मिळवितां आल्या. याचें कारण असें कीं मतदारसंघाची फाळणी कितीहि कसोशीनें केली तरी ती तंतोतंत बरोबर होऊं शकत नाहीं. एका संघक्षेत्रांत मतदारसंख्या जितकी असते त्याच्या दुप्पट किंवा तिप्पटहि संख्या दुसऱ्या एखाद्या मतदारसंघाच्या क्षेत्रांत असूं शकते. शिवाय राष्ट्रांत अनेक राजकीय पक्ष असल्यास असेंहि घडतें कीं, एखाद्या संघक्षेत्रांत एकाद्या पक्षाला बिन निवडणुकीनेंच जागा हस्तगत होते. एखाद्या क्षेत्रांत दोन पक्ष युद्धाला उभे राहातात तर दुसऱ्या एखाद्या क्षेत्रांत तीनहि पक्षांच्या उमेदवारांची गांठ पडते. यामुळें नोंदलेलीं मतें व निवडणुकींत मिळालेल्या जागा यांचें प्रमाण सारखें बसूं शकत नाहीं. जेथें काळजीपूर्वक समता सिद्ध करण्याचा प्रयत्न झालेला आहे तेथें ही

स्थिति, मग जेथें तसा प्रयत्न झालेला नाहीं किंवा निवडणुकीच्या मूळ तत्त्वांतच कांहीं दोष राहिलेले आहेत तेथें समता कशी साधणार ? फ्रान्स-मध्यें राज्यक्रान्ति झाली तींत मुख्य कटाक्ष विषमता घालविण्यावर होता, पण क्रांतिकारकांनीं जी राज्यघटना बनवली त्यांत स्त्रियांना मतदारींतून अजिबात वगळलें ! आज इतक्या वर्षांच्या झगड्यानंतर विलायतेंत स्त्रियांना मतदारीचा हक्क दिला आहे. पण त्यांतहि विषमता ठेवलीच आहे ती अशी कीं, जो मत-दारीचा हक्क पुरुषांना एकविसाव्या वर्षीं प्राप्त होतो, तो स्त्रियांना तिसाव्या वर्षांपर्यंत प्राप्त होत नाहीं. आणि एकवीस वर्षांखालच्या कोणाहि मनुष्याला तर मतदारीचा हक्कच कोठेंहि नसतो. अर्थात् लोकमत व लोकसत्ता यांच्या दृष्टीनें त्या वया-खालचे लोक कोठें गेले ?

## ( १५७ ) ब्रिटिश पार्लमेंटचें उदाहरण

इंग्लंडचें पार्लमेंट इंग्लंडचे सर्व कायदे करतें ही गोष्ट खरी. पण एखादें प्रधान-मंडळ अधिकारारूढ आहे तोंपर्यंत त्याला पार्लमेंट हें बहुमताच्या जोरावर आपल्या हातांतील बाहुल्यासारखें नाचवितां येतें. प्रधानमंडळ हें त्या काळापुरतें बहुमत-वाल्यापक्षाचे प्रतिनिधी किंवा प्रतीक असें आपण समजूं; आणि एखाद्या निवड-णुकींत एका पक्षाला मतदारांच्या बहुसंख्येनें पसंती दर्शविली म्हणजे फिरून निवडणूक होईपर्यंत तें प्रधानमंडळ जे जे कायदे करील ते पासहि होवोत ! पण ते बरोबरच आहेत असें कशावरून म्हणावयाचें ? ते बरोबर असोत नसोत, पास व्हावयाचे याचा अर्थ अल्पसंख्याक मतदारांचें तितका वेळ कांहीं चालाव-याचें नाहीं. त्यांना मत, शहाणपण, देशाभिमान असून नसून सर्व सारखाच. पार्लमेंटमध्यें लोकसत्तेच्या राज्यांत हवें त्याला हवें तें करितां येतें अशी आपल्या लोकांची समजूत आहे. पण ती अगदीं खोटी आहे. पार्लमेंटच्या एकंदर बैठ-कींत एका वर्षांत खासगी सभासदांना आपलीं बिलें पुढें मांडण्याला दहापांच दिवसहि मिळत असतील कीं नाहीं शंकाच आहे. " आम्हांला सरकारी कामा-करितां वेळ पाहिजे " असें प्रधानमंडळानें म्हटलें म्हणजे सर्व खासगी उपक्रमाला कुलूप लागतें, व अल्पसंख्याक सभासदांचें काम म्हणजे सांपडेल तेथें विरोध किंवा नुसती टीका करणें इतकेंच उरतें ! बरें लोकसत्ता आहे म्हणून, मिळेल तें काम करण्याकरितां कां होईना, पार्लमेंटच्या बैठकींना किती सभासद हजर अस-तात हें पाहिलें तर खेद वाटण्यासारखा प्रकार असतो. आधीं खुद्द पार्लमेंटचें

सभागृहच इतकें लहान आहे कीं, पार्लमेंटचे सगळे सभासद हजर राहूं म्हणतील तर त्यांना पुरेशीं बाकेंहि त्या सभागृहांत नाहींत ! यामुळें समारंभाच्या पहिल्या दिवशीं, किंवा पुढल्या एखाद्या चुरशीच्या सामन्याच्या दिवशीं, पक्षोपपक्षांनीं नेमलेल्या आपल्या गुराख्यांनीं (Whips) उनाड सभासदांचीं गुरें पार्लमेंटमध्यें वळवून आणून घातलीं म्हणजे सभासद लोक कसे कोठें उभे राहातात हें पाहिलें असतां, डोंबाऱ्याचा खेळ पाहाण्याला जमलेल्या निरुंद जागेंतील तमासगिरांची आठवण होते ! एखादे वेळीं गर्दीचा हा थाट, नाहीं तर नेहमीं शुकशुकाट !

## (१५८) निवडणुकीची सर्कस

पार्लमेंटमध्यें प्रवेश करून घेणाऱ्या सभासदांपैकीं उलट सुलट बाजूचे पांचपन्नास लोकच काय ते या लोकसभेच्या कामांत कसून व अभ्यासून लक्ष घालतात. याहून आणखी कांहीं थोडे लोक हे पार्लमेंटचें काम व नियम समजूं शकतात. पण त्यापलीकडे गेलें असतां, सगळाच अंधकार असतो. आतां पार्लमेंटचे सगळेच सभासद बोलूं लागले तर पार्लमेंटच्या कामाकरितां एक वर्षाचे १४ महिने करावे लागतील हें खरें. तरी भाषणें न करितां कां होईना पार्लमेंटचें काम समजणें, त्यांत लक्ष घालणें, त्याचा अभ्यास करणें, खाजगी प्रयत्नांची कसोशी करणें हें तरी कोण किती करितो ? आज इंग्लंडांतच पार्लमेंटकडे बोट दाखवून लोकशाहीची थट्टा करणारे पुष्कळ लेखक व तत्त्वज्ञानी आहेत, व त्याचें कारण खरोखरच हल्लींचा अनुभव ! मतदारांची स्थिति तर सभासदांहूनहि वाईट आहे. म्हणजे निवडणुकीच्या चार दिवसांत त्यांच्या अंगाला राजकारणाची जी हळद लागेल तेवढ्यानेंच त्यांच्या अंगचे जे काय कपडे रंगतील ते रंगतील. आणि निवडणुकींत झालें तरी त्यांची स्थिति सर्कशींतील श्वापदाप्रमाणें असते ! आपण पाहातोंच कीं, सर्कशीच्या तंबूंत गर्दी इतकी चिकार भरलेली असते कीं, माणसाळलेला माणूससुद्धां ती पाहून चकीत व्हावयाचा ! त्यांतून ते मोठमोठे दर खांबागणिक एकामागून एक लावलेले अल्लाउद्दीन किटसन लाइटचे दिवे ! बँडच्या बेसूर आवाजाला तर खळच नाहीं. अंगभर पदकें लावून जनावरासारखा नटलेला, हातांत चाबूक घेतलेला रिंगमास्तर उभा ! वाघसिंहाची गाडी तंबूंतील पिंजऱ्याच्या तोंडाशीं आणून सोडतांच प्रकाशानें दिपून गेलेल्या डोळ्यांनीं तीं श्वापदें स्वतःच उडी टाकून पिंजऱ्यांतून बाहेर येतात; व चाबकाकडे पाहून

ठरीव खेळ करून होतांच, आपल्या सापळागाडीचें तोंड उघडलेलें दिसतांच, बाहेर पडण्यापेक्षां अधिक वेगानें व उतावीळपणानें आपण होऊन आपल्याजागीं जाऊन बसतात. बरोबर अशाच शब्दांनीं विलायतेंतील निवडणुकींमधील मतदारांचें वर्णन कोणी एकानें केलें आहे व तें पुष्कळसें खरें आहे.

## ( १५९ ) सण गेला सणंगहि गेलें

निवडणूक म्हणजे चार दिवसांचा सण ! निवडणुकीच्या धांदलीच्या काळांत व्याकरणदृष्ट्या पूर्ण असलेलीं वाक्यें बोलण्याचीहि कोणाला सवड होत नाहीं. निशाणें, चित्रें, हस्तपत्रकें व खाणाखुणा यांनींच सर्व मतानुयायांचा झगडा चालावयाचा. आणि एकदां निवडणूक संपली व निकाल जाहीर झाला, म्हणजे फिरून पुढची निवडणूक येईंपर्यंत मतदार आपले घरच्याघरीं ! बरें जेथें स्वतः मतदारहि लांचलुचपतीला बळी पडून आपलीं मतें देण्याला तयार होतात, तेथें त्यांच्या प्रतिनिधींनीं पार्लमेंटांत जाऊन साधेल तेव्हां साधेल तसा लग्गा मारल्यास त्याला तरी नांवें कशीं ठेवावयाचीं ? लोकशाही झाली म्हणून लांचलुचपत थांबली अशी गोष्ट नाहीं. या लांचलुचपतीचीं उदाहरणें अगदीं ग्रंथाधारें संक्षेपानें सांगूं लागलों तर तोहि एक ग्रंथच होईल. म्हणून त्याचा नुसता उल्लेख करून पुढें जाणें भाग आहे. सुधारलेल्या राज्यसंस्थेंतील एका नमुनेदार कायदेमंडळाची ही गोष्ट झाली. पण ती जशी इंग्लंडची तशीच इतर अनेक देशांचीहि आहे. आणि ती हकीकत सांगण्याचा हेतु तरी हाच कीं, राजसत्ता जाऊन पुढें लोकसत्ता आली असें वरकरणीं झालें तरी दिसते इतकी लोकमताची सत्ता खरोखर लोकांच्या पदरांत पडत नाहीं.

## ( १६० ) राजा हा प्रजेचा प्रतिनिधि कितपत होईल ?

मतदाराचा व त्याच्या प्रतिनिधीचा संबंध बिंबप्रतिबिंबाचा मानला जातो तो पदरांत पाडण्याला इतक्या नडी, तर मग राजा किंवा अध्यक्ष किंवा सर्वाधिकारी यांच्या संबंधांत तर बोलावयासच नको. प्रजाजनांपैकीं शेंकडा किती जणांच्या तो दृष्टीला पडतो ! मग त्याशीं बोलणें चालणें होण्याची, त्याला दुःखनिवेदन करण्याची, व त्याजकडून न्याय मिळविण्याची खटपट प्रजाजन कशी करणार ! " राजा सातव्या मजल्याच्या महालांत बसला असला तरी, खालीं रस्त्यावर सुटलेली घंटेची दोरी कोणीहि हलविली असतां तो त्याची गांठ घेतो, विचारपूस करतो व न्याय देतो " ही योजना कपोलकल्पित गोष्टीला ठीक आहे ! मारक्या धन्याच्या एका जनावरानें म्हणे तोंडांत ती दोरी धरून ओढली, व राजानें खालीं येऊन पाहिलें.

तों त्याचें भक्कळ गेलेलें पोट व वण उठलेली पाठ त्याला दिसली ! तेव्हां त्याच्या धन्याला राजानें शिक्षा केली, व त्यापुढें त्या जनावराला खास आपल्या तबेल्यांत नेऊन बांधलें ! ही नवलकथाहि त्याच कपोलकल्पित योजनेला शोभण्यासारखी आहे. आपल्याकडील रामासारख्या न्यायी राजाचीं वर्णनें कवींनीं केलेलीं वाचून आनंद होतो; आणि मुळांत कांहीं का असेना, पण कवीला तरी अशा रामराज्याची कल्पना सुचावी याचा अभिमान वाटून, प्रातिनिधिक तत्त्वाच्या टीकाकाराला देण्याला तें उत्तर चांगलेंसें वाटतें. प्रसंगविशेषीं आपण म्हणतोंच कीं " पहा, हिंदु लोकांच्या राजकीय कल्पना किती उदात्त त्या. उदाहरणार्थ रघुवंशांत वर्णिल्याप्रमाणें वरतंतूचा शिष्य कौत्स ऋषि, गुरुदक्षिणेकरितां याचना करण्यासाठीं रघुवंशीय राजाकडे गेला असतां, राजानें त्याला किती तरी कुशल प्रश्न विचारले. आणि शेवटीं असेंहि विचारलें कीं, तुमच्या आश्रमांतील पहिलटकरीण हरिणी सुखानें बाळंत झाली ना ? " पण आणखी हेंहि लक्ष्यांत ठेवावें कीं, राजानें असली कोरडी चौकशी करून भागविलें नाहीं, तर त्याला हवी तितकी गुरुदक्षिणा राजानें दिली. आधुनिक काळांतील एखादा राजा किंवा संस्थानिक चुकून एकदां चार लोकांना भेटलाच तर देखाव्याकरितां असले कांहीं कोरडे प्रश्न विचारतील. पण गुरुदक्षणेकरितां मागितलेली रक्कम कितपत देतील हें माहीतच आहे. तात्पर्य, हिमालयाच्या बर्फाच्छादित शिखराकडे पाहून एखादे वेळीं एखादा देव दिसल्याचा भास व्हावा त्याप्रमाणें प्रजेला राजदर्शन हें अगदीं दुर्मिळ; पण तेंहि खोटें असतें गव्हर्नरसाहेब गांवांतून जावयाचे असले म्हणजे त्यांचें दर्शन प्रजेला घडावयाचें तर दूरच; पण मुळीं रस्त्याची नाकेबंदीच होते; मग राजदर्शन कुठलें !

## ( १६१ ) होमिओपाथिक गोळीचा दाखला

हल्लीं पूर्वींसारखीं नगरराज्यें राहिलीं नाहींत, व आतांचीं राज्यें हीं एवढीं मोठीं झालीं आहेत कीं राजदर्शन तर राहोच; पण कायदेकौन्सिलांत किंबहुना लोकलबोर्डांत व म्युनिसिपालिटींत आपल्यातर्फे निवडून गेलेला प्रतिनिधि कोण कसा आहे याचें सूक्ष्म व्यक्तिज्ञानहि मतदारांना नसतें. कित्येक देशांतील राजपुत्राच्या व राजकन्येच्या विवाहाप्रमाणें, वधूचें वराला दर्शन नाहीं, वराचें वधूला दर्शन नाहीं, प्रतिनिधीद्वारें दोघांनींहि एकमेकांना संमति द्यावयाची विवाह व्हावयाचा ! निवडणुकींत उमेदवार आपला जाहिरनामा काढतो तो मतदाराला ठाऊक नसतो, व मतदारानें निवडणुकीच्या वेळीं गुप्तपणें टाकलेलें मत उमेदवारांना माहीत नसतें. पण शेवटीं ते

निवडतात ते याला निवडतात, हा त्यांचा प्रतिनिधि होतो, व कायदेमंडळांत बसून तो त्यांच्याकरितां काम करतो. कायदेमंडळ व प्रत्यक्ष प्रजा यांचा हल्लीं इतका दूरान्वय आहे. तथापि प्रातिनिधिक राज्यपद्धतीची उपपत्ति मात्र कांहीं खोटी नाहीं. डोळ्याला जवळ जवळ न दिसणारी होमिओपाथिक गोळी पेलाभर पाण्यांत विरवून घेतली असतां, मनुष्याला औषध घेतल्याचा भास होतो. आणि हा नुसता आभासच क्वचित् गुणकारी ठरतो असें वैद्यक शास्त्रावर विश्वास ठेवणारे लोक मानतात. होमिओपाथिक औषध तयार करितांना कित्येक वेळां ही विरवणूक इतकी सूक्ष्म होते म्हणतात कीं, एकास एक लक्षपट ! आणि कित्येक कायदेकौन्सिलांतून बसणाऱ्या प्रतिनिधींची संख्या व एकंदर मतदारसंख्या यांचें प्रमाण एकास एक लक्ष असेंहि आढळेल. प्रस्तुत लेखक स्वतः मध्यभागातर्फे वरिष्ठ कायदेमंडळांत दोनदां निवडून आला. त्या निवडणुकींतील प्रमाण एकास ३५ हजार इतकें जवळ जवळ पडलें. म्हणजे त्याला इतक्या लोकांनीं मतें दिलीं नसलीं, व त्यांतील बहुमतानेंच तो निवडून आला असला तरी, पुढें कौन्सिलांत बसल्यावर "मी ३५ हजार मतदारांचा किंवा सुमारें ६० लक्ष लोकांचा प्रतिनिधि आहे" असा अभिनिवेश त्याला बाळगतां येई; उलट त्या ६० लक्ष लोकसंख्येपैकीं किंवा ३५ हजार मतदारांपैकीं, ज्याला कायदेकौन्सिलाची आठवण होत असेल त्याला तरी अमुक एक गृहस्थ हा तेथें आमचा प्रतिनिधि आहे असा अभिनिवेश असेल. असल्या दूरान्वित कां होईना पण आपलेपणाच्या भावनेचें कार्य थोडेंबहुत सफल होतेंच. राज्यसंस्थेच्या विकासाच्या हल्लींच्या प्रचंड स्वरूपांत दिवसेंदिवस हें प्रमाण आणखीहि जास्तच होणार. कारण मतदारांची संख्या वाढणार, किंवा पुढेंमागें २१ वर्षें वयाचे सर्वच स्त्रीपुरुष मतदार होणार. तात्पर्य, राजा बादशाहा तर प्रजेच्या डोळ्याला दिसत नाहींच. पण प्रजेचा प्रतिनिधिहि मतदारांनीं डोळ्यांनीं न पाहिलेला असूं शकतो. आणि अधिकारीवर्ग घेतला तरीहि त्यांतले वरिष्ठ अधिकारी फार थोड्या प्रजेच्या दृष्टीस पडतात. प्रजेची गांठ अगदीं कनिष्ठ दर्जाच्या अधिकाऱ्याशीं पडावयाची. आणि त्यांच्याद्वारें नियम कानू यांच्याशींच काय तो प्रजेचा खरा संबंध यावयाचा. तात्पर्य, प्रातिनिधिक राज्यसंस्थेच्या मुळाशीं बिंबप्रतिबिंब भाव असतो हा संकेत मनाला बरें वाटण्यासारखा आहे यांत शंका नाहीं. तो संकेत प्रत्यक्ष अनुभवांत उतरणें फार कठिण. तथापि अपूर्णगुण अशा मनुष्यसमाजांत कांहीं अनुभव तर कांहीं संकेत मिळूनच काम भागवून घेणें प्राप्त आहे.

## ( १६२ ) औषध तेंच पण अनुपान बदलतें

लोकसत्तेच्या नवीन युगांत कांहीं कांहीं गोष्टी, त्यांचा पुरा विचार केल्याशिवाय आपण जिभेवर खेळवितों. त्यापैकींच लोकमत व लोकसत्ता या दोन होत. कोणत्याहि राष्ट्रांतील लोकांच्या हातीं त्यांच्या राज्यकारभाराची अंतिम सत्ता असावी, आणि केव्हांहि झाला तरी लोकांकरितां म्हणून जो राज्यकारभार व्हावयाचा त्याला लोकमताचा आधार असावा; हे सिद्धान्त तत्त्वतः निरपवादच होत यांत शंका नाहीं. पण थोडें फार खोलांत गेलें असतां या दोन्ही सिद्धान्तांना केवळ अपवाद नव्हते पण त्यांत बरेच श्लेष निघण्यासारखे असतात हें कोणासहि तेव्हांच कळून येईल. अपवाद न म्हणण्याचें कारण हेंच कीं, मूळ तत्त्वाला बाध येईल असें त्या श्लेषांत कांहीं नसतें. पण कोणत्याहि तत्त्वाचा व्यावहारिक उपयोग औषधासारखा करावा लागतो, म्हणजे प्रकृतिमान पाहूनच औषध द्यावें लागतें. औषध तेंच, पण रोग्याची प्रकृति सूक्ष्म असेल तर औषध अल्प प्रमाणांत दिलें पाहिजे; व त्याची प्रकृति एरवीं सुदृढ असेल तर औषधाचा ढोस जरा मोठा दिला तरी चालतो. तसेंच औषध घेणारा मनुष्य प्रौढ व आपलें हित जाणणारा असेल तर त्याला कडू पदार्थांच्या अनुपानांतून औषध घेण्यास सांगण्याला हरकत नाहीं. पण त्या जागीं लहान मूल असेल तर अनुपान गोड पदार्थांचें ठेवावें लागतें. त्याचप्रमाणें लोकसत्तेच्याहि राज्यांत लोकांना सत्ता वांटून देणें व लोकांचें मत घेणें या गोष्टीवरील औषध व अनुपान यांच्या दाखल्यांतल्याप्रमाणें तारतम्यानें व सारासार विचारानेंच अमलांत आणावयाच्या असतात. आणि तसें न झालें तर औषध चांगलें असूनहि कदाचित् तें पोटांत जात नाहीं, किंवा गेलें तर भलताच परिणाम करितें.

## ( १६३ ) लोकमत मोजण्याचे मार्ग

लोकमत हा जरी लोकशाहीचा आधार म्हटला तरी तें ' लोकमत ' अजमावयाचें याचा अर्थ, तें मत प्रगट करण्याची सत्ता किंवा अधिकार ज्यांना दिला गेला आहे अशा व्यक्तींच्या मतांचा हिशेब करूनच तें अजमावावें लागतें. एरवीं दुसरा मार्ग नाहीं. पण लोकमत घ्यावयाचें तर लोकांना एकत्र बोलवावयाचें, व तेथें त्यांच्या आवाजावरून किंवा वर केलेल्या हातांच्या संख्येवरून मतमोजणी करावयाची, हे दिवस आतां उरले नाहींत. ही गोष्ट फार तर एखाद्या खेडेगांवांतच शक्य होते. पण आतां खेडीं शहराएवढीं झालीं, शहरें जिल्ह्याएवढीं झालीं व जिल्हे प्रांताएवढे होऊं लागले, तेव्हां मताधिकारी लोकांना एकत्र

जमवून त्यांचें मत घेणें ही गोष्ट सहजच अशक्य कोटींत गेली. राष्ट्राचा विस्तार मोठा यामुळें मताधिकारी लोक फार दूरवर राहाणार. यामुळें ( १ ) एक तर ते असतील तेथें जाऊन त्यांचें मत घेणें, किंवा ( २ ) त्या मताधिकाऱ्यांनीं आपल्यातर्फें नेमून निवडून दिलेल्या प्रतिनिधींच्याद्वारें त्यांचें मत घेणें, हे दोनच मार्ग शिल्लक उरतात.

## ( १६४ ) प्लीबीसाईट किंवा रिफरेंडम

परंतु त्यांतल्यात्यांत पहिला मार्ग हा अव्यवहार्य ठरतो. कारण राज्यकारभार म्हटला म्हणजे त्यांत रोज अनेक प्रश्न उत्पन्न होणार; आणि लोकसत्तेची मिजास पाहावी तर ती अशी कीं, लोकांचें मत प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष रीतीनें घेतल्याशिवाय कोणताहि महत्त्वाचा प्रश्न निकालांत निघूंच नये! मग उठल्या सुटल्या दरेक प्रश्नावर दरेक मताधिकाऱ्याचें मत त्याच्या घरीं किंवा त्याच्या गांवीं जाऊन घेत बसावयाचें, म्हणजे शेंकडों हजारों अधिकाऱ्यांना तोच एक उद्योग वर्षानुवर्ष व वर्षांतल्या प्रत्येक दिवसाला पुरून उरण्यासारखा होईल. अर्थात् ही अडचण सूज्ञ लोकांच्या लक्षांत तेव्हांच येणारी असल्यामुळें, ते मनानें लोकसत्तेचे व लोकमताचे पुरस्कर्ते असतांहि त्यांना देखील ही पद्धति सोडून द्यावी लागते, तिचा आग्रह धरतां येत नाहीं. क्वचित् कर्णाच्या वासवी शक्तीप्रमाणें अगदीं एखाद्या निर्वाणीच्या प्रसंगीं हा एवढा खटाटोप करणें इष्ट वाटेल तर तो ते करतील. पण तेंहि अगदीं नाइलाज म्हणून. जर्मनी, स्वित्झर्लंड इत्यादि कांहीं राष्ट्रांच्या घटनेंत मूलभूत मताधिकारी व्यक्तींचें मत घेऊन त्यावरून अखेर निर्णय करण्याची योजना प्रथमपासूनच राज्यघटनेंत घालून ठेवण्यांत आलेली आहे, व स्वित्झर्लंडमध्यें त्या योजनेचा उपयोग केव्हां केव्हां केलाहि जातो. पण जर्मनींत ही योजना कायदेशीर असूनहि तिचा अंमल अगदीं एखाद्या वेळीं घडतो. आणि इंग्लंडसारख्या देशांत तर या योजनेचें नांवहि कधीं ऐकूं येत नाहीं. तात्पर्य, अशा रीतीनें लोकमत अजमावण्याच्या या अव्यवहार्य पद्धतीचा केवळ नामनिर्देश करूनच ती विचारांतून सोडून देण्याला हरकत नाहीं. मग उरली दुसरी पद्धति म्हणजे मताधिकारी लोकांनीं निवडून दिलेल्या प्रतिनिधींच्याद्वारें त्यांचें मत अजमावण्याची. ही पद्धति सयुक्तिक व व्यवहार्य असल्यामुळें लोकसत्ताक अशा सर्व राष्ट्रांत तिचाच उपयोग सर्रास केलेला आढळतो. या प्रतिनिधींच्या मंडळांना पार्लमेंट किंवा कायदेमंडळ असें म्हणतात; आणि

त्यासंबंधानें तपशीलाच्या गोष्टी ठिकठिकाणीं निरनिराळ्या आढळल्या तरी, त्यांचें मूलभूत तत्त्व जवळ जवळ एकच असतें. तें हें कीं, लोकमत अप्रत्यक्ष रीतीनें कां होईना पण तें अजमावण्याचे ठराविक प्रसंग, ठराविक नियम असावे; व त्या त्या प्रसंगीं त्या त्या नियमांनीं मत प्रगट झालें म्हणजे तेंच राष्ट्राचें मत असें समजावें. याहून अधिक कांहीं करतां येतच नाहीं.

## ( १६५ ) सत्ताधिकाऱ्यांचा मायावी बहाणा

राष्ट्रामध्यें जी अंतिम सत्ता असते असें तत्त्वतः आपण समजतों ती सत्ता आहे खरीच. ती खोटी नाहीं. लोक जसे तिची घोषणा गर्वानें किंवा अहंकार-बुद्धीनें करतात त्याप्रमाणें राज्यांतले अधिकारीहि ती गोष्ट विनयानें कबूल कर-तात. तेहि म्हणतात कीं "आम्ही अधिकार चालवितों तो कांहीं आमच्या घरचा किंवा आम्हांला जन्मसिद्ध लाभलेला नाहीं. तर लोकसत्तेनें व लोक-मतावर चालणाऱ्या सरकारानें म्हणजे लोकांनींच आम्हांला दिलेला आहे. म्हणून तो त्यांना केव्हांहि आमच्या हातून काढून घेतां येईल व आम्हांलाहि तो परत करावा लागेल." पण उभयपक्षीं या गोष्टी केवळ वरकरणी झाल्या. त्या प्रत्यक्ष अमलांत येणें हीच लोकमताची खरी कसोटी होय. लोकमतावर राज्यकारभार चालावा ही गोष्ट इतकी स्वाभाविक व सोज्वळ आहे कीं ती कोणीच नाकबूल करीत नाहीं. जुलमी राजेदेखील लोकमताची पर्वा अगदींच करीत नाहींत असें नाहीं. आणि जुलमी एकतंत्री राजेचसे काय, आज स्वतंत्र राष्ट्रेंदेखील जगांतील इतर राष्ट्रांच्या लोकमताविषयींची काळजी थोडी-बहुत तरी बाळगतात असें दिसून येतें. याचें प्रत्यन्तर हें कीं आपण आपल्या साम्राज्यामध्यें प्रजेवर जो जुलूम करितों त्याच्या हकीकती ऐकून आपणा-विषयीं अमेरिकेंतील लोकांचें मन कलुषित होऊं नये याकरितां खुद्द इंग्लंड आज पुष्कळ पैसा खर्च करितें, पोलिटिकल खात्यांतले आपले गुप्त दूत तिकडे पाठवून अन्तस्थ कारवाई करतें, किंवा प्रसंगविशेषीं आपल्यांतील चतुरस्त्र कीर्तिमान् व वजनदार मुत्सद्दी वकील म्हणून, व्याख्याते म्हणून, प्रवासी म्हणून अनेक मिषांनीं तिकडे पाठवितें. हेतु हा कीं, त्यांच्या प्रयत्नानें साम्राज्यांतील जुलमाची खरीखोटी दुसरी बाजू कळवून, किंवा हिंदी लोकांची बेसुमार नालस्ती करून, कोणीकडून तरी आपल्या दुष्कीर्तीचा उपशम अथवा प्रतिक्रिया करावी. ही स्वतंत्र राष्ट्रांची गोष्ट झाली. जुलमी राजांचीं चरित्रें पाहिलीं तरी ते लोक-

मताला मान देण्याचा निदान बहाणा तरी करितात हें दिसून येईल. आणि हाच राजाकडून प्रजेला करभार ! मनांतून जुलूम करण्याची, म्हणजे आपली इच्छाशक्ति प्रभावी करण्याची बुद्धि असली तरी अगदीं उघडपणें बेगुमानपणें लोकमताचा धिक्कार करणारा राजा मूर्खच समजला पाहिजे आणि त्याचें फळ त्यानें भोगलेलेंहि आढळेल. मग लोकनियुक्त कायदेमंडळांतून किंवा पार्लमेंटांतून जबाबदार प्रधानमंडळें नेमूनच जेथें त्यांच्या हातून राज्यकारभाराचें काम घेतलें जातें, तेथें हीं प्रधानमंडळें उठल्या बसल्या लोकमताला नमस्कार करितात, व लोकमताला मान दिल्याखेरीज आपण पाण्याचा घोटहि घेत नाहीं असें दाखवितात, यांत आश्चर्य तें कसलें ? पण खरी लोकमताची सत्ता प्रभावी व्हावयाची तर लोकांकडून पदोपदीं लोकमत प्रगट झालें पाहिजे, तें अंमलांत येण्याचा आग्रह त्यांनीं धरला पाहिजे, व लोकमत अंमलांत आणण्याची टंगळ-मंगळ अधिकाऱ्यांनीं केल्यास त्यांच्यावर हात उगारण्याची म्हणजे त्यांना पद-भ्रष्ट करण्याची, त्यांची उलथापालथ करण्याची, कसोशी त्यांनीं केली पाहिजे. हें न घडेल तर त्या लोकमताची किंमत कुलटेच्या कपाळावरील कुंकवाइतकीच ठरेल. कुंकू लोकमताच्या नांवानें लावावें व लोकांची तात्त्विक सत्ता कबूल करावी, पण आपल्या मनाला मानेल तसा कारभार किंवा स्वैराचार प्रत्यक्ष करावा, असेंच घडेल व ‘ लोकशाही ’ हें निवळ पोकळ नांव होईल.

## (१६६) महायुद्धानंतरचा चमत्कार

महायुद्धापासून लोकमताच्या सत्तेचें नांव विशेष पुढें आलें. इंग्लंडांत १६८८ पासून, फ्रान्समध्यें १७८० पासून, व युरोपांतील इतर देशांमध्यें १८४८ पासून लोकसमाजाकडून राजकीय हक्कांची मागणी सक्रिय सुरू झाली. पण चळवळ करून स्वतः लोकांना आपल्याकरितां लोकसत्तेच्या कार्याला जें उज्ज्वल स्वरूप आणतां आलें नाहीं तें १९१५ पासून, म्हणजे महायुद्ध ऐन रंगांत आल्यापासून आलें. याचें कारण स्वतः राज्यकर्त्यांनींच त्याला उचलून हातीं धरलें हें होय. लोक करीत होते तोंपर्यंत जी चळवळ स्वार्थी भासली व त्यामुळें जिला थोडा कमीपणा आला, तीच राजे प्रधान अध्यक्ष अशा—म्हणजे प्रत्यक्ष सत्ता गाजविणाऱ्या-अधिकाऱ्यांच्या हातून होऊं लागतांच तिला परोपकाराचें स्वरूप व त्यामुळें मोठेपणा आला. वास्तविक महायुद्धाचें खरें कारण इंग्लंड व जर्मनी यांची आर्थिक चढाओढ व चुरस ! पण युद्ध सुरू

झाल्यावर सर्विया व बेलजम् या राष्ट्रांच्या स्वातंत्र्याच्या पायमल्लीचें निमित्त करून दोस्तराष्ट्रें "लोकसत्तेवर संकट !" "लोकसत्तेची लाज राखा !" "लोकसत्तेच्या संरक्षणाकरितां हातीं हत्यार घ्या !" असा आक्रोश करूं लागलीं, आणि हा आक्रोश अटलांटिक महासागर ओलांडून पलीकडे गेल्यामुळें भोळा प्रेसिडेंट विल्सन या आक्रोशांत सामिल झाला. पूर्वींहि उत्तर अमेरिका व दक्षिण अमेरिका यांचें युद्ध झालें त्यांत, वास्तविक एका बाजूला गुलामांच्या पद्धतीपासून होणारा आर्थिक फायदा वांचविणें, व दुसऱ्या बाजूला अमेरिकेच्या राज्यघटनेचें कायदेशीर तत्त्व संभाळणें, असले हेतु होते. तथापि प्रेसिडेंट अब्राहिम लिंकन यानें 'लोकसत्तेला' धोका आल्याचा बहाणा केला, पण दरोड्याची दंगल सुरू झाली म्हणजे आंतील चोरच तींत मिसळून 'चोर चोर' म्हणून ओरडूं लागतात किंवा आगीचा भडका होऊन लोक ती विझवावयाला लागले म्हणजे स्वतः आग लावणारे लोकच कांचा मारून घागरी उचलून इतरांबरोबर हौदाकडे धावूं लागतात, असा अनुभव केव्हां केव्हां येतो त्यांतलाच वरील प्रकार होय.

### (१६७) पण तात्पर्य उघड आहे

युद्धानंतर तहाचे वेळीं जर्मनीला कायमचा लगाम व पायबंद घालण्याचें कारस्थान सुरू झालें तेव्हां कपटपटु लॉईड जॉर्ज यानें व त्याचीच री ओढून प्रे. विल्सन यानें एक नवा सिद्धान्त उत्पन्न केला. तो असा, "लोकसत्तेचा संचार अबाधित होण्याइतके जगाचे मार्ग सुरक्षित ठेविले पाहिजेत !" हे मार्ग सुरक्षित ठेवावयाचे म्हणजे त्यांतून कायसर विल्यमसारख्या वाटमाऱ्या दरोडेखोरांचें कायमचें उच्चाटन करावयाचें ! ठीक आहे. जर्मन कायसर याला पकडून ठेवा किंवा फांशी द्या; कांहीं हरकत नाहीं. तो तरी असा काय चांगला होता कीं त्याची ऐट त्याच्या शत्रूंनीं चालूं द्यावी ? पण त्याच्या उच्चाटनानें तरी जगांतले मार्ग लोकमताच्या सुखसंचाराला हवे तितके सुरक्षित झाले काय असा प्रश्न उत्पन्न होतो आणि कित्येकांच्या मतें लॉईड जॉर्ज किंवा मुसोलिनी इत्यादि मनोमनस्वी सत्तालोलुप प्रधान हे कायसर विल्यमइतकेच लोकमताचे शत्रु असून त्यांनीं आपापल्या परीनें लोकसत्तेला खिंडींत गांठून तिचा खून करण्याला कमी केलेलें नाहीं. तात्पर्य, केवळ लोकमताचें, लोकसत्तेचें नांव घेऊन ओरडत उठलें म्हणजे मनुष्य खरा लोकमतवादी, लोकसत्तावादी ठरतो असें नाहीं. तर युगधर्माप्रमाणें "लोकसत्ताक राज्यपद्धति" हें एक नवें ध्येय लोकांच्या तोंडी

खेळूं लागलें आहे इतकाच त्याचा अर्थ. खरी लोकसत्ता, खरें लोकमत म्हणजे काय,याचाच अर्थ जेथें निश्चित नाहीं तेथें लोकसत्ताक राज्यपद्धतींची कल्पनाहि अनिश्चित असावी यांत काय आश्चर्य ! कारण ध्येय स्पष्ट निश्चित असलें तरी तें साधण्याचीं साधनें बरोबर नक्की हाताला सांपडणें ही गोष्ट परम कठीण होऊन बसते. लोकसत्तेच्या साधनांचेंहि असेंच झालें आहे. ही गोष्ट पटण्याला इतकेंच सांगितलें म्हणजे पुरें कीं, ज्या राष्ट्रांतून लोकसत्ताक राज्यपद्धति असल्याचें बाहेर लोक समजतात त्यांतलेच जाणते लोक या गोष्टीचा ठांसून इनकार करणारे आढळतात. यावरून काय समजावें ! आणि हे लोकहि लोकसत्ताविरोधी किंवा विद्वेषी नव्हत, तर त्या सत्तेचा ध्येयरूपानें आत्यंतिक स्वरूपांत पुरस्कार करणारे. ते विद्वेषी असतील तर सहजच गैरसमज करून घेतील. पण पुरस्कारकर्ते गैरसमज कां करतील ! अर्थात् त्यांच्या नैराश्ययुक्त उद्गारांना महत्त्व दिलेंच पाहिजे. ते निराश होतात म्हणूनच लोकसत्ता ही एक केवळ माया आहे असें त्यांना केव्हां केव्हां म्हणावें लागतें !

---

# भाग ७ वा

## राज्यसंस्था व स्वातंत्र्य

### ( १६८ ) स्वातंत्र्यवादाचा पूर्वपक्ष

( १ ) अराजकता विराजकता या स्थिति वाईट. (२) राज्यसंस्था ही चांगली व समाजसुस्थिर्ताकरितां अवश्य. ( ३ ) राज्यसंस्था म्हटली कीं पूर्ण व अंतिम सत्ता ही त्या संस्थेंत कोणाच्या तरी हातीं असून सर्व प्रजाजनांनीं ती मानलीच पाहिजे. ( ४ ) नाहीं तर राजदंड सोसण्यास तयार झालें पाहिजे. अशा क्रमानें राज्यसंस्थेचें महत्त्व वाढवून ठेवलें म्हणजे मग प्रश्न उत्पन्न होतो तो असा कीं, राज्यसत्तेविषयीं हें सांगितलें तें सर्व ठीक आहे, पण मग प्रजेची वाट काय ? प्रजासमाजाला व व्यक्तीला स्वातंत्र्य म्हणून कांहींच नाहीं व नसावें कीं काय ? आणि तसें झालें म्हणजे मग मनुष्यानें जगावें तरी कशाला ? बिचारी अराजकता तरी बरी ! कारण तिच्या अमलांत मनुष्याच्या अंगांत बळ असेल तर ज्याचा त्याला आपला हात उगवून तरी घेतां येतो. पण राज्यसंस्थेच्या अमलांत तेंहि कांहीं करतां येत नाहीं. कारण तुमची ही राज्यसत्ता अशा व्यक्तिकर्तृक पराक्रमाला, तो जुलूम म्हणून, आड येणार ! पण राजसत्ताधारी व्यक्तीला

किंवा संस्थेला हवा तो जुलूम किंवा अन्याय करण्याला व प्रजाजनांची स्वतंत्रता हिरावून घेण्याला पूर्ण मोकळीक ! कारण तुमच्या राज्यसंस्थेचें तत्त्वच हें कीं, प्रजाजनांपैकीं प्रत्येकावर मुख्य राज्याधिकारी व्यक्तीची किंवा उपसंस्थेची सत्ता चालली पाहिजे! तर मग राज्यसंस्थेचें ध्येय व स्वातंत्र्याच्या कल्पनेनें वेडावलेल्या कवींचें ध्येय यांत कायमचा दुस्तर विरोधच आहे कीं काय ?

## ( १६९ ) एकांतवासांत स्वातंत्र्य सुलभ

भावनात्मक ध्येयवादी कवि आणि थंड डोक्यानें विचार करणारे राज्यशास्त्रज्ञ यांच्या सिद्धान्तामध्यें जो हा दुस्तर विरोध म्हणून दिसतो तो तितकासा खरा नाहीं. वास्तविक ज्याला स्वातंत्र्य आवडत नाहीं किंवा गुलामगिरी आवडते असा मनुष्यच काय, पण इतर कोणताहि प्राणी नाहीं व असणें शक्य नाहीं. पण एका काळचा अनुभव दुसऱ्या बदललेल्या काळाला लावून तेंच ध्येय असें मानल्यानें हा विरोधाभास उत्पन्न होत आहे. अति प्राचीन काळचें व्यक्तिस्वातंत्र्याचें ध्येय आधुनिक काळांत कल्पनारम्य वाटलें तरी व्यवहार्य ठरत नाहीं. प्राचीनकाळीं जगांत वस्ती थोडी, पाऊलवाटेशिवाय रहदारीचा मार्ग नाहीं, चहूंकडे अरण्यें माजलेलीं, वस्तीला, शिकारीला, शेतकीला, जमीन हवी तितकी ऐसपैस, अशा परिस्थितींत मनुष्यप्राणी वाटेल तसा स्वेच्छाचारी वागत असे. त्याला संगतीची इच्छाच झाली तर त्यानें होऊन उठून दुसऱ्या माणसाकडे जावें. एका दृष्टीनें हा एकांतवास कितीं तरी रमणीय होय. आणि त्याचें प्रत्यंतर हेंच कीं, हल्लींच्या काळींहि त्या जुन्या एकांतवाससुखाचा अनुभव निदान मधून मधून केव्हां केव्हां मिळाला तर त्यावर मनुष्य उडी घालतो. श्रीमान् व हौशी लोक शहरांत मोठमोठ्या वाड्यांतून राहत असले तरी खेडेगांवीं बागांत, शेतांत, नदीकडेला, वनश्री, मोकळी हवा, निर्मळ वाहतें पाणी यांच्या लोभानें ते लहान झोंपड्या मांगर बांधून ठेवतात, आणि सवड सांपडतांच तेथें जाऊन चार दिवस राहून येतात. पण ही चार दिवसांची गोष्ट झाली. नेहमींचें काय ?

## ( १७० ) पण संगत केली स्वतंत्रता गेली

पण या एकांत निर्जन निवासापेक्षां दुसरें कांहीं त्याला अधिक प्रिय नाहीं असें म्हणावें तर, तो शहरांत येऊन कां राहूं लागला ? अपवाद म्हणून एकांतवास त्याला मधून मधून प्रिय असला तरी, नेहमीं नियमतः तो शहरच्या गर्दीत कां राहण्याचें पसंत करतो ? याचें उत्तर हेंच कीं, मनुष्य हा खरोखर मनानें

कायमचा एकांतवासप्रिय नाहीं. तो जुटीनें जमावानें राहणारा म्हणूनच अगदीं प्राचीन काळापासून प्रसिद्ध आहे. मनुष्यगुणांच्या स्वाभाविक परिणतीला, त्याच्या सांसारिक गरजा भागण्याला, शत्रूपासून त्याचें संरक्षण होण्याला, सहानुभावी समानधर्म अशा कळपांतच राहणें त्याला श्रेयस्कर असतें. म्हणून तें त्याला आवडतेंहि. कळप हा शब्द माणसांना लावला म्हणून कांहीं बिघडत नाहीं, कारण सर्व प्रकारच्या प्राथमिक प्रवृत्तींत मनुष्य हा पशुपक्ष्यांसारखाच आहे. आहार, निद्रा, भय–निवारण इत्यादि गोष्टी एकांतवासांत जितक्या सफळ होण्याचा संभव, त्यापेक्षां त्या सुसंघटित अशा कळपांतच खरोखर अधिक शक्य आहेत. आणि एकाच्याऐवजीं जेथें दहा जमले तेथें दहांचीं मनें, दहांच्या आकांक्षा, या सगळ्या सारख्याच असल्यानें, त्या सफळ करून देण्याच्या कामीं त्या दहांपैकीं प्रत्येकाला इतरांशीं सहकारिताच नव्हे तर स्वार्थत्यागहि करावा लागतो हें कवि नीट लक्षांत घेत नाहींत.

## ( १७१ ) कवींचे क्रियावान बंधु--‘ अराजक ’ !

कवींचे दुसरे बंधु अराजकतावादी हे कवींहून अधिक कठीण. कारण कवि स्वातंत्र्यगीत नुसता गात बसेल. पण गाऊन गप्प बसेल. पण अराजक क्रांतिकारक हा हातांत जंबिया, पिस्तूल किंवा बाँब घेऊनच उठावयाचा. त्याला मुळीं कसलेंच राज्यनियंत्रण नको. अन्यायाचा, जुलमाचा, स्वातंत्र्यनाशाचा खरा प्रतिनिधी म्हणून त्यानें आपल्या मनानें एखादी व्यक्ति हेरून रोखूनहि ठेवलेली असते. आणि त्याचा घात केला म्हणजे याला वाटतें कीं आपण कृतकृत्य झालों ! त्याला हें माहीत नसतें कीं कोणतीहि एक व्यक्ति मनुष्यवर्गावर जुलूम करण्याला व स्वातंत्र्य हिरावून घेण्याला समर्थ नसते. अशा प्रकारच्या अनेक व्यक्ती असतात. त्यांचा संघ किंवा संस्था असते. त्यांच्या हातीं सत्ता व सत्तानुकूल साधनें असतात. अशा लोकांची परंपरा अखंड असल्यासारखी असते, यामुळें एक जुलमी दुष्ट आपण मारला तर त्याची जागा घेण्याला दुसरा कोणी पुढें येण्याला असतोच. हें सर्व तो क्रांतिकारक जाणतो. परंतु निदान एका व्यक्तीच्या हातीं आहे तें तरी तिनें करावें, नुसतें मनांत पिचत बसण्यांत काय अर्थ आहे ? असें म्हणून तो उडी घेतो. अशा रीतीनें हा धाडसी सुधारक निःस्वार्थी म्हणून पूज्य वंदनीयहि वाटतो. पण पुष्कळ वेळां अराजकता निर्माण करावयाची म्हणजे

काय कसें करावयाचें तें कसें टिकवावयाचें व स्वातंत्र्य पद्रांत पाडून घ्यावयाचें, याचें तत्त्वज्ञान कांहींच त्याचे जवळ असत नाहीं. शेंडेनक्षत्र उगवलें, अपशकून करून गेलें, बाकी नित्यक्रम चालू आहे तो आहेच, म्हणून वाईट वाटतें.

## ( १७२ ) स्वातंत्र्याची देवघेव

पण कविलोक जर स्वातंत्र्यालाच सर्वांत श्रेष्ठ असा 'अर्थ' समजतात, तर त्या अर्थाचाहि थोडाबहुत त्याग करण्याला प्रत्येक मनुष्यानें तयार व्हावयाला नको काय? दहांतल्या प्रत्येकानें आपली स्वतंत्रता थोडीथोडी स्वेच्छेनें आंखडती घेतली, व त्यामुळें उरल्या सर्व स्वतंत्रतेचा उपभोग जर त्या सर्वांना निश्चित व निर्भय मिळत असला, तर तो स्वार्थत्याग म्हणण्यापेक्षां तें स्वार्थ-साधनच कां म्हणूं नये ! चार लांकडांची चौकट करावयाची असली तर, सांधे-जोड होण्याकरितां त्यांतल्या प्रत्येक लांकडानें आपलें टोंक थोडेसें तासून घेण्याला, व आपल्या टोंकांत खांच घेऊन तींत दुसऱ्या लांकडाच्या टोंकाला जागा करून देण्याला, तयार झालें पाहिजे. चारहि लांकडें आपल्यां-तला एक तुकडाहि गमावण्याला तयार नसतील तर सांधेजोड होणार नाहीं व चौकट बनणार नाहीं. तात्पर्य, इतर वस्तूंच्या अदलाबदलीप्रमाणेंच आपल्या स्वतंत्रतेचा कांहीं अंश दुसऱ्याला देणें व दुसऱ्याचा घेणें हा निव्वळ अदलाबद-लीचाच एक प्रकार व उघड सौदा होतो. तेव्हां वास्तविक तो शुद्ध स्वार्थ-त्याग तरी कसा म्हणावा ! दहा माणसें एकत्र येऊन सर्वस्वीं आपल्या मनाप्रमाणें स्वतंत्र वागूं द्या बरें ! म्हणजे मग पहा काय चमत्कार होतील ते ! पण त्या दहांना उपजत बुद्धीनेंच हें कळतें कीं जगांत दिल्याघेतल्याशिवाय कांहीं नाहीं. आणि स्वातंत्र्याची देवघेवहि त्यांतलीच होय.

## ( १७३ ) कर्मबद्ध जीवात्म्याची अनुकंपनीय स्थिति

मनुष्य हा स्वातंत्र्यप्रेमी स्वातंत्र्यवादी असें आपण म्हणतों. पण निग्रह व नियंत्रण यांचा उपयोग जगांत किती आहे ही गोष्ट त्याची त्याला घरच्या घरींच काय पण प्रत्यक्ष स्वतःच्या व्यक्तिचरित्रांतहि दिसून येण्यासारखीच आहे. मात्र याचा प्रथम थोडासा वेदांत पद्धतीनें विचार करूं. परब्रह्म हेंच काय तें सर्वस्वीं स्वतंत्र खरें. पण जीवात्मा हा स्वतंत्र आहे काय ? मुळींच नाहीं. बिचाऱ्याचा उपाधींशीं झगडा सुरू नाहीं असा क्षण तरी जातो

काय ? एका देहाचें पतन झाल्यावर दुसऱ्या देहाचा स्वीकार करीपर्यंत त्याचा कितीसा काळ जात असेल हें माहीत नाहीं ! पण दुसरा देह न घेण्याचें स्वातंत्र्य त्याला असूनहि; तो त्या स्वातंत्र्याचा उपयोग करीत नाहीं असें म्हणावयाचें ? कीं मुळांत त्याला तें स्वातंत्र्यच नाहीं ? पण दुसरा देह घेणें, ही गोष्ट ऐच्छिक असली किंवा अनिच्छेनें घडत असली, तरी ती घडते खरी. म्हणजे एकदां कर्माचें लचांड मागें लागल्यामुळें त्यांतून त्याची मुक्तताच सहसा होत नसावी असें वाटतें. पिंजऱ्यांत ठेवलेल्या पांढऱ्या उंदरासारखी त्याची स्थिति होते. उत्क्रांतीचा उद्योग म्हणून तो पिंजऱ्यांत ठेवलेल्या रहाटावर चढतो, व सायकलस्वाराप्रमाणें पाय मारूं लागतो, तों एक दांडा पायाखालून जाऊन दुसरा दांडा तेथें येतो. पण उंदीर उद्योग करूनहि जागच्या जागेवरच! मुक्तीचा प्रयत्न म्हणून आपणाकडून तो करीत असतां क्षणोक्षणीं तें मायाचक्र त्याला दमवीत असतें व फसवीत असतें.

## ( १७४ ) पण कर्माचा मूळधनी ज्याचा तोच ना ?

जीवात्मा अविनाशी व उपाधि ही विनाशी हें खरें. पण जी उपाधि बदलून बदलून कां होईना पण त्याला चिकटून राहते, त्याची पाठ सोडीत नाहीं, ती विनाशी म्हणून तरी काय उपयोग ? तिच्या ताब्यांतून सुटून अमृतत्व किंवा मोक्ष मिळवावा आणि स्वातंत्र्यसिद्धीचा झेंडा उभारावा व मिरवावा ही त्याची इच्छा खरी. पण कर्माच्या कायद्यानें बद्ध झाल्यामुळें बिचाऱ्याचें कांहीं चालत नाहीं. नेहमीं झगडा सुरू. उपाधि उत्पन्न करणाऱ्या ईश्वराविरुद्ध त्याची नित्य तक्रार व अध्यात्मिक राजद्रोहात्मक चळवळ सुरू आहे. स्वतंत्र मानल्या जाणाऱ्या जीवात्म्याकडून "ईश्वरा, कशाला फिरून जन्माला घातलेंस" ही रडकथा रोज सुरूच आहे! "आत्म्याच्या अंगावर पडलेलें नामरूपादि माया-सृष्टीचें घोंगडें कोठें विरळ असेल तर कोठें दाट असेल, त्यांतून बाहेरचा उजेड दिसत असेल किंवा नसेल, पण तें सर्वच्या सर्व अंगावरून निघाल्याशिवाय त्याचा कोंडलेला आत्मा बाहेर पडून मोकळी हवा खाऊं शकत नाहीं, व तोंपर्यंत घामाघूम करणारा उबारा कमी होत नाहीं." मुळांत आयता तो थंड ब्रह्मात्म-स्वरूप निर्गुण होता तो काय वाईट होता? कशाला त्यानें सगुण होण्याची इच्छा केली ? कशाला तो लीलाप्रिय झाला ? कशाला त्यानें सूक्ष्म देह (लिंगदेह),

स्थूल देह, मन, बुद्धि, प्राण इत्यादिकांच्या व्यवस्थाबंधनाचा स्वीकार करून कर्मचक्राच्या रहाटावर पहिलें पाऊल ठेवलें ?

### ( १७५ ) सिद्धांतिक महत्प्रश्नाची मांडणी

अव्यक्ताला व्यक्त व निर्गुणाला सगुण करण्याचें ( ऐच्छिक ) आद्यकर्म घडल्यामुळेंच मायासृष्टीचें चक्र सुरू होतें. त्यानंतर क्रिया व प्रतिक्रिया रूपानें मायासृष्टि व कर्म यांचा आघात व परिणाम एकमेकांवर होऊं लागतो. आणि आत्मा जो या भानगडींत एकदां गुरफटून जातो तो मग त्या बंधनांतून बाहेर पडलाच तर महत्प्रयासानें बाहेर पडतो ! अंतरात्म्याचें स्वरूप हें अर्थातच बदलत नाहीं. पण कर्माप्रमाणें एक प्रकारचें नामरूप बदलून दुसऱ्या प्रकारचें हीन किंवा उच्च नामरूप त्या ठिकाणीं येतें. द्रव्य तेंच; पण आकार, घाट, रंग, घटना वेगळी, नांव वेगळें, गुण वेगळे. आधिभौतिक शास्त्रांतहि, शक्ति अविनाशी आहे—ती फक्त आपलें नामरूप व क्रियाप्रकार बदलते—असाच सिद्धांत आहे. "या नामरूपांना आधारभूत झालेली जी शक्ति तिलाच समष्टिरूपानें ब्रह्म व व्यष्टिरूपानें जीवात्मा" असें म्हणतात. कर्माप्रमाणें इतर आनुषंगिक गोष्टी व फलस्वरूपी गोष्टी बऱ्या वाईट झाल्यास त्याचा दोष कर्मालाच आहे. त्यांत परमेश्वराचा दोष नाहीं. पण दोष कोणाचाहि असला तरी जीवात्म्याची वाट काय ? त्याला स्वातंत्र्य मिळवावयाची, प्रस्थापित करावयाची कांहीं आशा आहे काय ? कीं त्यानें कर्मांचा व नामरूपात्मक प्रकृतीचा दास होऊन, जुन्या जन्मांतलें कर्म व या जन्मांतलीं नाठाळ इंद्रियें नेतील तिकडे गेलें पाहिजे ?

### ( १७६ ) या प्रश्नाला वेदांत शास्त्राचें उत्तर

याला वेदान्तशास्त्राचें उत्तर आशा उत्पन्न करण्यासारखेंच आहे. तें शास्त्र जीवाला म्हणतें:—"बाबा, तूंच कर्मानें उपाधीचें चक्र उत्पन्न केलें आहेस हें खरें. पण तुझ्या मनांत मोक्ष मिळविण्याची खरी इच्छा झाली म्हणजे तुझ्या इंद्रियांना मोक्षानुकूल कर्में करण्याची प्रवृत्ति होईल. वाफ भांड्यांत नुसती कोंडली तर ती स्फोट करीत नाहीं. पण ती तापविली गेली म्हणजे स्फोट करिते. अशा रीतीनें जें नैमित्तिक आगतुंक प्रेरकत्व आत्म्याला येतें तें कर्माच्या कायद्यापासून भिन्न व स्वतंत्र असतें. ती प्रेरणा प्रकृतिसृष्टींतील नाहीं, तर ब्रह्मसृष्टींतली आहे. हा झगडा सुरू झाला आणि मोक्ष

मिळविण्याची इच्छा टिकून असली म्हणजे, आत्माच मनुष्याला मोक्षानुकूलकर्मे हुडकून काढण्याला, पसंत करण्याला शिकवितो व मग त्याचा त्यापुढील व्यवहार मोक्षाच्या दिशेनें होतो. या गोष्टीला अनुलक्षूनच गीतेंत "उद्धरेदात्मनात्मानं नात्मानमवसादयेत् । आत्मैव ह्यात्मनो बंधुः आत्मैव रिपुरात्मनः" असें म्हटलें आहे. असो, कर्मविपाकानें येणारें पारतंत्र्य व आत्मस्वातंत्र्य या दोन सिद्धांतांचा समन्वय वेदांतशास्त्रज्ञांनीं केला आहे त्याहून, राज्यशास्त्रांतील व्यक्तिस्वातंत्र्याचा व राज्यसत्तेचा समन्वय करणें हें कांहीं अधिक कठीण नाहीं.

### ( १७७ ) 'स्वातंत्र्य' शब्दाच्या अर्थाचीच खरी अडचण

राज्यसंस्थेंतहि व्यक्तीला स्वातंत्र्य असतेंच. पण होतें काय कीं, राजकीय बाबतींत 'स्वातंत्र्य' या शब्दाचा अर्थ निश्चित नसतो. विशेषतः कवि वगैरे भावनाप्रधान लेखक स्वातंत्र्याचीं कवनें करितात. आणि तितकेच भावनाप्रधान, पण कविता न करितां न येणारे, लोक तीं कवनें गातात. यांत अशा कांहीं एक प्रकारच्या स्वातंत्र्याची कल्पना असते कीं व्यवहारांत ती कधींच अनुभवाला येणार नाहीं. प्लेटोप्रमाणें कोणी कवि, स्वातंत्र्याची विधायक रचना केलेली एखादी गोष्ट किंवा नाटक किंवा काल्पनिक इतिहास किंवा प्रबंध लिहील तर त्याला कळेल तरी कीं, त्याचें स्वातंत्र्य ही काय वस्तु आहे ! व ती राज्यसंस्थेंत सोळा आणे कां मिळणार नाहीं ? पण स्वातंत्र्याचीं स्तोत्रें पुष्कळ वेळां बिनबुडाचीं बिनहाडाचीं असतात. त्यांत कोणत्या तरी जुन्या किंवा नव्या फाजील जुलमी अन्यायी व्यक्तीचें किंवा संस्थेचें चित्र डोळ्यापुढें ठेवून, त्यावर प्रतिक्रियारूप विध्वंसात्मक टीकाच केलेली असते. पण ती टीका नित्याच्या प्रत्यक्ष व्यवहाराला मार्गदर्शक होऊं शकत नाहीं. कित्येक वेळां जुलूम तर नाहींच, पण नुसतें साधें बंधन हेंच कवीचें पित्त खवळवितें ! उदाहरणार्थ, एकाद्या मालकानें आपला पोपट सोन्याच्या पिंजऱ्यांत ठेवला, त्याला ताज्या पेरू डाळिंबाशिवाय दुसरें खाणेंच ठेवलें नाहीं, हिरव्या रेशमाचे पडदे रात्रीं त्याच्या पिंजऱ्यावर सोडले व पुण्यप्रद रामनामाचा पाठ पढविला, तरी कवि म्हणणार "अधःपात ! हाय हाय ! कोण ही स्वातंत्र्यहानि !"

### ( १७८ ) व्यक्तिनिष्ठ हक्कांच्या मर्यादा

राज्यसंस्था झाली तरी तिच्यांतील प्रजाजनांना व्यक्तिशः शक्य तितकें आचारस्वातंत्र्य असावें हें कोणीहि कबूल करील. पण 'शक्य तितकें' म्हणजे

किती हाच मुख्य प्रश्न व तो फारच अवघड आहे. शक्य याचा अर्थ "स्वतः व्यक्ति हवें म्हणेल तितकें" असा सूचित करितां येणार नाहीं. त्याला दुसरें कांहीं तरी गमक असलें पाहिजे. आणि तें हेंच कीं, "त्या व्यक्तीप्रमाणेंच इतर प्रजाव्यक्तींचें स्वातंत्र्य संभाळून उरेल तें." "नारूचा स्वातंत्र्यावर जितका हक्क तितकाच धारूचाहि कां नाहीं!" त्याचा तो हक्क कोणीं काढून घेतला? हे हक्क कोणीं आधीं बोलला कोणी आधीं पुढें येऊन मागूं लागला, म्हणून ते त्याला द्यावयाचे असें म्हणतां येणार नाहीं. "आधीं बोलेल तो तीन खाईल व मागाहून बोलेल तो दोन खाईल" अशी पांच लाडवांची वांटणी एका गोष्टींतल्या पैजेमध्यें ठरली होती तसें का येथें कांहीं आहे? म्हणजे आधीं मागेल त्याला तीन हक्क किंवा तिप्पट हक्क व मागाहून मागेल त्याला दोन किंवा दुप्पट हक्क असें कांहीं राज्यसंस्था प्रजेला म्हणूं शकत नाहीं. सार्वजनिक हक्काच्या, सार्वजनिक उपभोगाच्या गोष्टी मर्यादित असतील तेथें आधीं कोण? व कुणाला काय व किती? हें तद्विषयक कांहीं नियम करून त्याप्रमाणें सरकार सांगूं किंवा देऊं शकेल. पण कांहीं हक्क जन्मसिद्ध व अगदीं प्राथमिक असतात, तेथें आधीं व मागाहून याला अर्थच राहात नाहीं. करारानें हक्क ठरतील तर आगेंमागें जास्त कमी हें होऊं शकेल.

## ( १७९ ) उलट सुलट उदाहरणें

याचें एकेक उदाहरण घेऊं. जी. आय. पी. रेलवे आतां सरकारच्या मालकीची झालेली आहे. ती कांहीं नियमाप्रमाणें रात्रींच्या प्रवासाकरितां डब्यांतून जागा राखून ठेवते. म्हणून, जेथें एकच जागा शिल्लक उरली असेल तेथें, 'अ' नें आधीं अर्ज केल्यास त्याला ती मिळावी, 'ब' नें मागाहून अर्ज केल्यास ती त्याला मिळूं नये असें म्हणण्या भांडण्याचा हक्क 'अ' ला कायदेशीरपणें उत्पन्न होईल. सरकारी मैदानांतील खुल्या जागेवर कोणी आधीं जाऊन उभा राहिला असेल तर ती जागा त्या वेळेपुरती त्याची झाली, दुसऱ्या कोणाला तेथें येऊन "ती मला पाहिजे, तूं निघून जा" असें म्हणतां येणार नाहीं. किंवा समजा, एका डोंगरांत सोन्याच्या खाणी निघण्यासारख्या आहेत म्हणून कोणी एकानें, सरकार मागेल ती फी भरून, प्रथम परवाना काढला व मनापली म्हणजे कुलहक्काची सनद घेतली, तर ती काढून सरकाराला दुसऱ्या कोणाला देतां येणार नाहीं. पण एखाद्या बुडणाऱ्या गलबतावर आधीं मला

जगूं द्या असें म्हणून 'अ' नें जर 'ब' ला उचलून समुद्रांत फेंकून दिलें तर तो खुनी आरोपी ठरेल, व समुद्रांत बुडण्याऐवजीं फांशी जाऊन मरेल.

## ( १८० ) मूलभूत हक्कांची उपलक्षणात्मक यादी

हक्कांमध्येंहि दोन प्रकार आहेत हें वर सांगितलेंच. पैकीं मनुष्याचे कांहीं कांहीं हक्क जन्मसिद्ध असतात. ते देऊन दिले जात नाहींत व काढून घेऊं म्हटल्यानें काढून घेतले जात नाहींत. उदाहरणार्थ, ( १ ) जगण्याचा हक्क. (२) आत्मपोषणार्थ उद्योग करण्याचा हक्क. ( ३ ) स्वधर्मांप्रमाणें आचरण्याचा हक्क. ( ४ ) मातृभाषा बोलण्याचा हक्क. ( ५ ) पसंत पडतील ते सामाजिक आचार स्वीकारण्याचा हक्क. ( ६ ) पसंत पडेल त्या माणसाशीं संगति ठेवण्याचा म्हणजे खासगी किंवा जाहीर सभांत भाग घेण्याचा हक्क. ( ७ ) मतप्रतिपादनाचा हक्क. ( ८ ) वडिलार्जित स्वार्जित वित्त मत्ता उपभोगण्याचा हक्क. ( ९ ) आत्मसंरक्षणाचा हक्क. ( १० ) मुलांवरील पालकत्वाचा हक्क इत्यादि.

## ( १८१ ) मूलभूत हक्कांनाहि मर्यादा पडूं शकतात

वरील हक्क जन्मसिद्ध सनातन खरे. पण ते हक्कहि अमर्यादित असूं शकत नाहींत. ही गोष्ट या सर्व हक्कांच्या विधानांचा अगदीं शब्दशः अर्थ करूं लागलों तर उघड होईल. पण त्याचीं उदाहरणेंच देऊंः—

( १ ) **जगण्याचा हक्क**—खून केल्याबद्दल ज्याला फांशीची शिक्षा झाली आहे त्यानें हा हक्क मूलभूत म्हणून सांगून काय उपयोग ? फांशीची शिक्षा डोक्यावर घेऊन तो तुरुंगांतून पळून गेला तरी त्याला पकडून आणून आधीं फटके मारतील व मग फांशींहि देतील. कारण जेव्हां त्यानें खून केला तेव्हां आपणाप्रमाणें दुसऱ्यालाहि जगण्याचा हक्क आहे हें त्यानें लक्षांत ठेवलें काय ?

( २ ) **आत्मपोषणार्थ उद्योग करण्याचा हक्क**—शब्दशः घेतल्यास या हक्कांत चोरी करणें, दरोडे घालणें, या गोष्टीहि येऊं शकतील; पण ते गुन्हे आहेत व राजा त्याला या मार्गांनीं आत्मपोषण करण्याला अर्थातच प्रतिबंध करील. येथेंहि हा 'हक्कदार' (?) ज्याची चोरी करूं म्हणणार त्याला आपल्या वित्ताची मालाची चोरी होऊं नये, मालकी संभाळण्याला सरकारनें मदत करावी असें म्हणण्याचा हक्क आहेच कीं नाहीं ? चोरीची संवयच आहे व एरवीं तलफ भागत नाहीं असें असेल तर त्यानें आपल्याच एका खिशांतला पदार्थ चोरून दुसऱ्या खिशांत घालण्याचा खेळ करावा ! बरें या चोरानें चोरी करून माल

घरीं आणून ठेवला, आणि दुसरा कोणी चोर येऊन तोच नेऊं म्हणूं लागला तर मग कसें ? चोरी न उमगल्यास पचनीं पडलेल्या मालासंबंधानें स्वतः हा चोरच उद्यां नागरिकाचा प्रजाजनाचा जन्मसिद्ध हक्क सांगून पोलिसाची मदत मागेल कीं नाहीं ! व ती सरकारला द्यावीच लागेल कीं नाहीं ?

( ३ ) **स्वधर्माप्रमाणें आचरण्याचा हक्क**—घरीं बसून दार लावून वाटेल त्यानें वाटेल तो धर्माचार पाळावा. पण मुसलमानाला चौकांत हिंदुसमक्ष गाय मारण्याला, किंवा हिंदूला मशिदीपुढें वाद्य वाजविण्याचा नवा प्रघात पाडण्याला, सरकार हरकत करूं शकतें हें प्रसिद्ध आहे व तें योग्यहि आहे. तसेंच घरीं, दारें लावून घेऊनच कां होईना पण, जर कोणी शाक्तपंथी मनुष्यवध करूं म्हणेल तरी त्या " धार्मिक बलिदाना " च्या आचाराला प्रतिबंध होणारच ! आपखुषीनें धर्मांतर करण्याचा हक्क प्रजेला आहे. पण धर्मांतर जुलूमजबरदस्तीनें करविणें हा गुन्हा होईल. येथेंहि हक्क म्हणून आरंभिलेल्या एकाच्या कृत्याशीं दुसऱ्याच्या प्रतियोगी हक्काचा संबंध येतो. म्हणून हक्कांच्या या झगड्यांत सरकारनें हात घातला व प्रतिबंध केला तर, ती व्यक्तिस्वातंत्र्याच्या हक्काविरुद्ध गोष्ट घडली असें होत नाहीं. आपला धर्म दुसऱ्याला पटविण्याच्या हक्कासारखाच, तो न पटवून घेण्याचाहि हक्क, स्वयंभू आहे.

( ४ ) **मातृभाषा बोलण्याचा हक्क**—या हक्काला प्रतिबंध सहसा होत नाहींच. क्वचित् प्रसंग येईल तर तो असा कीं, कायदेकौन्सिलच्या सभेंत उत्तम फर्डे इंग्रजी बोलणारा म्हणून माहीत असलेला मनुष्य मुद्दाम बाष्कळपणा करावा, कौन्सिलची थट्टा उपहास करावा, या बुद्धीनें मातृभाषेंतूनच बोलण्याचा हक्क सांगेल तर अध्यक्ष त्याला तसें करण्याला परवानगी कदाचित् न देईल. अर्थात् नियमाप्रमाणेंच तें करितां येईल तर ! याहि ठिकाणीं दुसऱ्याच्या हक्काचा संबंध येतो. कारण कायदेकौंसिलचें काम राज्याचें व राष्ट्राचें आहे. त्यांत एक सभासद काय बोलतो हें समजून घेण्याचा हक्क इतर सभासदांना आहे. फारच झालें तर " देशभाषेंतून बोलण्याची परवानगी नाहीं तर मी बोलतच नाहीं" असें वाटेल तर सभासदानें म्हणावें. त्याच्यावर भाषण करण्याचा जुलूम अध्याक्षालाहि करितां येणार नाहीं. उलटपक्षीं सभासदाला जर खरोखरच मातृभाषेशिवाय दुसरी भाषाच येत नसली तर मात्र त्याला स्वभाषेंतून बोलूंच द्यावें लागेल. या ठिकाणीं हक्कांची उलट-

सुलट मर्यादा कशी पडते हें पाहण्यासारखें आहे. आजच्या वरिष्ठ कायदे-कौन्सिलांतून कांहीं भाषणें मराठींत व उर्दूत होतात तशींच तीं तामील भाषें-तूनहि होऊं शकतील.

(५) **पसंत पडतील ते सामाजिक आचार स्वीकारण्याचा हक्क**—सामान्यतः हा सरकारी प्रतिबंधाचा विषय होऊं शकत नाहीं. स्त्रियांनीं पुरुषांचा किंवा पुरुषांनीं स्त्रियांचा पोशाख अशीहि अदलाबदल केली तरी चालेल. पण "मीं कोणताच पोशाख न करितां केवळ नैसर्गिक स्थितींत सार्वजनिक जागेंत हिंडे फिरेन" असा हक्क कोणी सांगूं लागेल तर तो मानला जाणार नाहीं. कारण "डोळ्यांनीं असभ्यपणाचे आचार पहाण्यास आम्हांला भाग पडूं नये, अथवा आमच्या सदभिरुचीला योग्य संरक्षण मिळावें" असें म्हणण्याचा हक्क प्रत्ये-काला आहे. लंडनमध्यें उन्हाळ्याच्या दिवसांत वयांत आलेलीं [ कायदेशीर सज्ञान ] अविवाहित स्त्रीपुरुषांचीं जोडपीं हाईडपार्कसारख्या मैदानांत किंवा सार्वजनिक बागांत मनसोक्त कामुकक्रीडा करितात. यांत कदाचित् ते आपण फक्त लग्नविधीविरुद्ध सामाजिक बंड करतों असें म्हणतील, व खरोखर त्यांच्या स्वैराचारानें कोणत्याहि विवाहसंस्थेच्या कायद्याचा भंग होत नाहीं. तथापि पोलीस अशा लोकांना हुडकून काढून पकडून त्यांच्यावर खटले करितात, व त्यांना न्यायकोर्टांत शिक्षा होतात, याचें कारण "मनाची नाहीं तरी जनाची तरी लाज हवी" हें सूत्र होय. कांहीं गोष्टी दिसल्यानें डोळ्यांना मनाला दुःख होतें तें होऊं नये हा दुसऱ्याचा हक्क येथें स्वैरवर्तनाच्या हक्काच्या आड येतो.

(६) **पसंत पडेल त्या माणसाशीं संगति ठेवण्याचा हक्क**—हा हक्क दिवसेंदिवस अधिकाधिक मान्य होत चालला आहे. लोक आर्थिक व्यवहाराकरितां किंवा सार्वजनिक हित साधण्याकरितां कंपन्या असोसिएशन वगैरे करितात, व त्या रजिस्टर करण्याकरितां कायदे व नियमहि असतात. अर्थात् एका व्यक्तीचे जे मालमत्तेसंबंधाचे वगैरे हक्क ते, (अनेक व्यक्तींची संघटना ही देखील एक व्यक्तीच आहे अशा समजुतीनें,) जुटीनें व्यवहार करण्याकरितां मनुष्याला मागतां येतात. कायदाहि ते देतो. तथापि येथेंहि मर्यादा आहेच. कारण चोरीचा माल विकत घेण्याकरितां; व त्याचा नफा वांटून देण्याकरितां, जर कोणी कंपनी

काढली किंवा जुगारीच्या खेळाची कंपनी काढली, तर कायदा त्याला हरकत घेईल. कारण अशा कंपन्यांचा व्यवहार इतर लोकांच्या हिताला बाधक असतो. अशा कंपन्या रजिस्टर होऊं शकत नाहींत. जाहिर सभांतून जमून सहकारितेनें ठराव करून मतप्रदर्शित करण्याचा हक्क न्याय्य आहे. सरकारच्या व प्रजेच्या लढ्यांत विशेष प्रकारच्या सभा समित्या होऊं नयेत असें नैमित्तिक हुकूम सरकार केव्हां केव्हां करितें. पण त्यांना चांगलें वाईट म्हणणें याविषयीं सर्वसामान्य नियम घालतां येत नाहींत. तें प्रत्येक प्रसंगीं गुणावगुणावरूनच म्हटलें पाहिजे.

(७) **मतप्रतिपादनाचा हक्क**--हा हक्क अर्थात् न्याय्य व जन्मसिद्ध असाच आहे. या हक्काची व्याप्ति जुन्या काळापेक्षां हल्लींच्या नव्या काळांत दिवसेंदिवस वाढत आहे. कायदेकौन्सिलें व पार्लमेंट यांचा तर सामान्यतः असा नियमच असतो कीं, त्यांत सभासद जें काय बोलेल त्याबद्दल त्याच्यावर खटला होऊं नये. पण तेथेंहि उगीच एकाद्या व्यक्तीची निंदा कोणी सभासद करूं लागेल तर अध्यक्ष त्याला थांबवूं शकेल. तीच गोष्ट असभ्य अपमानास्पद अशा शिव्यांची. परंतु एरवीं भाषण कितीहि कडक व प्रत्यक्ष राजद्रोही असलें तरी त्याकरितां त्याच्यावर खटला होऊं शकत नाहीं. "धैर्य असेल तर हेच शब्द कौंसिलच्या, पार्लमेंटच्या बाहेर पडून मग बोला पाहूं कीं" असें म्हणून प्रतिपक्षी त्याला घोड्यावर घालोत किंवा नामर्द म्हणून फजीत करोत. पण कायदेमंडळांत तो बोलला हा तरी गुन्हा होत नाहीं. कौंसिलाबाहेरहि, पार्लमेंटबाहेरहि, "राज्यघटना बदलावी, इतकेंच काय, पण राजा नसावा, त्याचा राजमुगुट विकून वितळून त्याचे पैसे करावे व प्रजेच्या हितासाठीं ते खर्च करावे" असे कोणी म्हटलें, तरी तें निवळ मतप्रतिपादन या सदराखालीं पडेल व त्यावर खटला होणार नाहीं. पण प्रत्यक्ष सक्रिय बंडखोरी ही मात्र सरकार अर्थातच चालूं देणार नाहीं. येथें या व्यक्तीच्या हक्काला इतरांच्या हक्काचा विरोध आला म्हणून प्रतिबंध. हीच मर्यादा.

(८) **मालकीची मालमिळकत उपभोगण्याचा हक्क**—हा अगदीं प्राथमिक स्वरूपाचा हक्क असल्यामुळें त्याला बंधनें फार थोडीं असतात, तथापि या हक्काच्या उपभोगाकरितां आपल्या मिळकतींतून सरकारला कायदेशीर कर द्यावे लागतात, कायदेशीर खासगी कर्जफेड करावी लागते, मृत्यूमुळें

डोईबदल झाल्यास, ( एकाकडून दुसऱ्याला वारसाहक्कानें मृत्युपत्रानें मिळकत जात असली तरी) सरकाराला म्हणून त्याचा कांही अंश डेथड्यूटीच्या कोर्टफीच्या रूपानें द्यावा लागतो, तसेंच आपली मिळकत वापरावयाची तर ती दुसऱ्याच्या हक्काला, कायदेशीर सुखोपभोगाला, बाध न येईल अशाच रीतीनें वापरली पाहिजे. आपल्या घरचें सांडपाणी दुसऱ्याच्या घरांत शिरणार नाहीं, आपल्या घरच्या बांधकामाचे दगड दुसऱ्याच्या अंगावर पडणार नाहींत, अशीच व्यवस्था ठेवली पाहिजे. आपलें कुत्रें चावरें असेल तर त्याला मुसकें घातलें पाहिजे. आपलें मूल मारकें असेल तर तें आवरलें संभाळलें पाहिजे. दुसऱ्याचा परंपरागत उजेड हवा बंद होईल अशा रीतीनें आपलें घर बांधतां नये किंवा झाड वाढूं देतां नये. आणि अशा कामीं दुसरा मालक आपल्या जागेवर करितां येतील ते प्रतिकाराचे प्रकार करील त्यांना हरकत घेतां नये. तात्पर्य, या सर्व बाबतींत आपले व दुसऱ्याचे हक्क हे चक्राच्या दात्यांप्रमाणें तीक्ष्ण असतात. तेव्हां त्यांचे हे दाते एकांत एक बरोबर बसतील, एकमेकांवर आपटणार नाहींत, असाच मिळकतीचा उपभोग घेतला पाहिजे.

( ९ ) **आत्मसंरक्षणाचा हक्क**—हाहि जन्मसिद्ध व नैसर्गिक असाच हक्क किंबहुना सर्वांत अधिक महत्त्वाचा हक्क आहे. म्हणून त्याची व्याप्ति विस्तृत व मर्यादा थोड्या असा प्रकार आहे. दिवाणी कायद्याच्या दृष्टीनें तर कांहीं मर्यादाच नाहीं असें म्हणतां येईल. पण फौजदारी कायद्याच्या दृष्टीनें कांहीं मर्यादा आहेत त्याहि संकुचित नाहींत. प्रत्येक देशाच्या पीनल कोडांत गुन्ह्यांच्या अपवादाच्या सदरांत या मर्यादा स्पष्ट सांगितलेल्या असतात.

( १० ) **स्वतःच्या मुलांवरील पालकत्वाचा हक्क**—मुलाचे अज्ञानदशेंत पालनपोषण करण्याची जबाबदारी ज्याप्रमाणें कायद्यानें आईबापांवर टाकलेली आहे. त्याचप्रमाणें त्यांचा संभाळ करण्याच्या कामांत इतरांनीं हात न घालावा असेंहि म्हणण्याचा त्याचा हक्क उघडच प्राप्त होतो. पालनपोषणाची जबाबदारी एकावर, व त्यांना ताब्यांत ठेवण्याचा हक्क दुसऱ्याचा, हें विसंगत होय. आईबापांपैकीं पालन करण्याचा पहिला हक्क बापाचा. त्यानंतर आईचा. पण विशेष कारणाकरितां न्यायकोर्टें सरकारतर्फे या दोघांचाहि हक्क काढून घेऊन तो एखाद्या सरकारी अधिकाऱ्याकडे देतात, किंवा खासगी गृहस्थ किंवा दूरचा नातलग यांजकडेहि देतात. अल्पवयी मुलांना फूस लावून अनीति-

मार्गाला लावण्याचा धंदा करणारे कांहीं दुष्ट लोक असतात, व दुर्दैवाची गोष्ट कीं हा धंदा करणारे आईबाप व आप्तहि अनेक खटल्यांतून उघडकीस येतात. या ठिकाणीं सरकारचा अभिनिवेश सात्त्विक असून तो असा कीं अज्ञान मुलें हीं प्रथमतः आईबापांचीं मुलें खरीं, परंतु त्यानंतर तीं राष्ट्राचीं मुलें होत. म्हणून आईबाप त्यांचा सांभाळ करूं न शकतील तर तो करण्यास सरकारनें सरसावून आपल्या सत्तेनें आईबापांनाहि योग्य तो प्रतिबंध केला पाहिजे.

## ( १८२ ) स्वतंत्रता ही सापेक्ष आहे पण ती आहे !

तात्पर्य, हक्क व स्वातंत्र्य हीं सापेक्ष आहेत. म्हणून कोणत्या स्थितींत कोणत्या दर्जाचें स्वातंत्र्य मागावें याचा विचार सुटला म्हणजे मग अनवस्थाच प्राप्त होणार. निर्जन अरण्यांतल्या तळ्यांत नग्नस्नान करणें व लंडनच्या रस्त्यांत नग्नपणें हिंडणें हीं दोनहि सारखींच ठरतील काय ? वास्तविक दोनहि क्रिया एकाच स्वरूपाच्या होत. पण ज्या स्वातंत्र्याची अपेक्षा पहिल्या उदाहरणांत योग्य ठरेल ती दुसऱ्यांत कधींहि योग्य ठरणार नाहीं. मनुष्य हा कळपांत, संघांत, समाजांत राहाण्याची इच्छा करूं लागला तेव्हांपासूनच त्यानें आपलें स्वातंत्र्य आपल्याच हातानें गमावण्यास सुरवात केली असें म्हणावें लागतें. तात्त्विक दृष्ट्या राज्यांतली सर्वश्रेष्ठ अंतिम सत्ता ही राजाच्या हातीं आहे हें खरें असलें तरी, त्याबरोबर हेंहि खरेंच आहे कीं त्या सत्तेमुळें प्रजाजनांतील व्यक्ति-स्वातंत्र्य सर्वस्वीं नष्ट होत नाहीं. वरिष्ठ राज्यसत्तेचें कार्य व उद्देश हे सामुदायिकच असणार. प्रजेंतलि व्यक्तीकडे राज्यसत्ता ही व्यक्तिदृष्ट्या पाहत नाहीं तर शक्य तितक्या सामुदायिक रीतीनें पाहते. आणि असें केल्यानें जो कोणचा फायदा होतो तो व्यक्तीकरितां कधींच नसतो तर सर्वच प्रजासमाजा-करितां, निदान कांहीं वर्गाकरितां, तरी असतो. आणि वर्ग म्हटला तरी तो लहानसा समाजच. राज्यसत्ता व व्यक्तिस्वातंत्र्य यांचा मेळ ईश्वरी नियति व जीवात्म्याचें कर्मस्वातंत्र्य यांच्याप्रमाणें बसूं शकतो हें पूर्वीं सांगितलेंच आहे. पण हें भारी तोलाचें अध्यात्मिक उदाहरण सोडून अगदीं क्षुद्र स्वरूपाचें असें व्यवहारांतलेंच उदाहरण घेतलें तरी तीच गोष्ट सिद्ध होते. आपण घरच्या पाळीव जनावरांना दाव्यानें किंवा कासऱ्यानें बांधून ठेवतों. त्यामुळें त्याला पळून लांब जातां येत नाहीं हें खरें. पण दावें हें थोडें मोठें, त्याहून मोठें, आणखी त्यांहून मोठें अशी कल्पना केली असतां जनावराला त्याच्या कामा-

पुरती, म्हणजे जखडून न राहतां खाऊन पिऊन निजून शेवटीं पाय मोकळे करण्यापर्यंत, स्वतंत्रता मिळतेच कीं नाहीं ? राज्यसंस्थेतल्या प्रजाजनाला तर याहिंपेक्षां किती तरी अधिक स्वातंत्र्य असतें !

**( १८३ ) दुतर्फी स्वातंत्र्याची टक्कर होणार नाहीं काय ?**

आपणाला जसें स्वातंत्र्य हवेसें वाटतें तसें तें इतरांनाहि हवें असतें हें अगदीं सामान्यबुद्धीच्या माणसालाहि कळतें. हें न कळतें तर, मनुष्य घराबाहेर पडला असतां वाटेवर जातां येतां त्याच्या इतर माणसांशीं टकरीच टकरी घडत सुटतील. पण वाटेनें जातां येतां समोरासमोर कोणी दोघे आले असतां त्यांतला प्रत्येकजण दुसऱ्याला बगल देऊन जात असतो. आणि हें त्याला आत्मौपम्यबुद्धीनेंच कळतें, त्याकरितां कायदा लागत नाहीं. रस्त्यानें गाड्या मोटारी यांनीं डाव्या हातानें जावें असें म्हटलें म्हणजे त्या हुकमानें रस्त्याच्या दोनहि बाजूंच्या रहदारीची आपोआप व्यवस्था होते. कारण रस्त्याची डावी बाजू ही एका दृष्टीनें उजवी आणि जी उजवी तीच दुसऱ्या दृष्टीनें डावी होऊं शकते. रस्त्यावर जाण्यायेण्याचा नियम दर्शविण्याकरितां "डाव्या बाजूनें जा" अशी पाटी असते ती कदाचित् पायीं चालणाऱ्या मनुष्य व्यक्तींना उद्देशून लिहित नसतील. पण जो हिताचा मार्ग जनावरांनीं ओढण्याच्या गाड्यांना तोच स्वतःच्या पायांनीं चालणाऱ्या माणसांनाहि कां लागू होऊं नये ! कदाचित् गाड्यामोटारींच्या टकरीइतक्या माणसांच्या टकरी घातक होत नसतील. पण पुष्कळ वेळां असें वाटतें कीं हा उत्कृष्ट नियम मनुष्यैहि पाळतील तर आहे याच्या निम्यानेंहि रस्त्यावरील गर्दी त्रासदायक होणार नाहीं. रस्त्यानें जाण्यायेण्याचा नियम हेंच एकंदर व्यवहारांतल्या स्वातंत्र्यनियमनाचें उपलक्षण समजावें म्हणजे झालें. अगदीं पहिला पाय पडला त्या बिंदूपासून त्याच दिशेनें अगदीं सरळ रेषेनें मनुष्य जाऊं म्हणेल, व समोरून येणाऱ्या कोणालाही बगल म्हणून देणारच नाहीं असें म्हणेल, तर रस्त्यांतच काय पण ज्याच्या त्याच्या घरांतहि टकरी होऊं लागतील ! पण हें जर घडूं नये, तर मनुष्यानें आपल्या गतीच्या दिशेला व गतीच्या वेगाला प्रसंगानुसार दुसऱ्याकरितां म्हणून कांहीं थोडी मर्यादा घालण्याला तयार झालें पाहिजे. आपल्या कल्पनेंत जोंपर्यंत एकच व्यक्ति असेल तोंपर्यंत तिला अशी मर्यादा घालण्याची कल्पना अर्थातच येणार नाहीं, पण

एकीच्या जागीं दोन किंवा अनेक व्यक्ति आल्या कीं या मर्यादेला प्रारंभ झाला, व व्यक्तिस्वातंत्र्याची सापेक्षता सिद्ध झाली. आणि हें जाणून मनुष्य हा स्वतःच जर बगल देण्यास तयार होतो तर राज्यसत्ता झाली तरी जें नियमन घालते तें सर्वांनीं सर्वांना अशीच बगल द्यावी म्हणूनच असत नाहीं काय! राजसत्ता ही नियमन करिते नियंत्रण घालते तें कोणा एकट्या व्यक्तीच्या दुस्वासानें नव्हे, तर त्यानें सामुदायिक कल्याण होणारें असतें म्हणूनच. तुरुंग व वेडयाचीं इस्पितळें यासारख्या प्रतिबंधाच्या जागा दुसऱ्या कोणत्या! परंतु त्यांचा हेतु काय असतो!

## (१८४) राज्यसंस्थेचें कार्यक्षेत्र व स्वातंत्र्य-नियमन

राज्यसंस्थेकडून होणाऱ्या नियंत्रणाचा व त्याच्या कार्यक्षेत्राचा कार्यव्याप्तीचा अवश्य संबंध असतो, व यासंबंधाचें त्रैराशिक समच असतें. अर्थात् राज्यसंस्थेच्या वाढीबरोबर सरकारच्या कर्तव्याच्या कल्पनाहि वाढू लागल्या. त्या कल्पनांच्या वाढीचा परिणाम **व्यक्तिस्वातंत्र्य** कमी होऊन सरकारी सत्तेचें क्षेत्र वाढण्यांत होतो. मात्र वाढलेल्या सत्तेनें सरकार जें कांहीं करतें तें प्रजेच्या म्हणजे नागरिकांच्या हितबुद्धीनेंच करतें, अहितबुद्धीनें करीत नाहीं, ही गोष्ट बहुतेक सर्व लोक कबूल करतात, आणि अशी कबुली देत असतांच जे सूक्ष्म भेद तत्त्वाचे म्हणून निघतात त्यावरच राज्यांतील राजकीय पक्षांची रचना होते. ते पक्ष स्वतःला वर्चस्व मिळविण्याचा प्रयत्न करीत राहतात. पण हा प्रयत्न होत असतां, कोणत्याहि वेळीं जें कायदेमंडळ अधिकारारूढ असतें तें स्वतंत्र मतदारांनींच निवडून दिलेलें असतें. व त्या कायदेमंडळांतूनच प्रधानमंडळ नेमण्यांत आलेलें असतें. यामुळें त्यांतील कोणताहि पक्ष व कोणतेंहि मत प्रभावी झालें व त्याप्रमाणें राज्यकारभार चालला तरी, ती गोष्ट एकंदरीनें लोकमताच्या संमतीनें होत असते हें कोणालाहि नाकबूल करतां नाहीं. सरकारचें काम प्रजेंतील व्यक्तिमात्राला आपलें स्वातंत्र्य राखून तें अनुभविण्याला जे अडथळे येतील ते दूर करावयाचे इतकेंच. समजूत अशी कीं, प्रत्येक मनुष्याला आपलें हिताहित कळत असतें व त्या दृष्टीनें जो तो आपली बुद्धि चालवून आपल्या हातून होईल तितका स्वहित साधण्याचा प्रयत्न करीत असतो. जी एकाची गोष्ट तीच सर्वांची. पण त्यांतच अशी गोम निघते कीं ज्यांत एकाचें हित त्यांत दुसऱ्याचें अहित व ज्यांत एकाचें अहित त्यांत दुसऱ्याचें हित

असा विरोध व्यवहारांत उत्पन्न होऊं शकतो, व अशा प्रसंगीं न्यायान्याय पाहून एकाचा हक्क संरक्षण करण्याकरितां दुसऱ्याच्या अतिक्रमणाचें निवारण करणें हें सरकारचें कर्तव्य ठरतें. याचा अर्थ असा नव्हे कीं अशा प्रकारच्या पोलिस बंदोबस्ताहून सरकारचें दुसरें कर्तव्यच नाहीं. कारण न्यायदान व पोलिस बंदोबस्त एवढ्यावरच कोणत्याहि राज्यकारभाराची समाप्ति झालेली क्वचित्‌च आढळेल.

### ( १८५ ) आत्मघातालाहि प्रतिबंध

एकापासून दुसऱ्याचें संरक्षण करावें, कोणालाहि कपटानें किंवा जुलूमजबरदस्तीनें स्वार्थ साधून दुसऱ्याचें नुकसान करूं देऊं नये, हें तर सरकारचें कर्तव्य ठरतेंच. परंतु यापलीकडे जाऊन एकाविरुद्ध दुसऱ्याला मदत करण्याशिवाय त्या दोघांनाहि उपयुक्त व हितकर अशा कांहीं गोष्टी सरकारला आपल्या सत्तेनें करितां येण्यासारख्या असतात, व त्या सरकारनें करूं नये असें म्हटलें तर सहजच वेडेपणा होईल. एकापासून दुसऱ्याचें रक्षण करण्याप्रमाणें स्वतः ज्याचा तोच आत्मघातकी होऊं पाहील तर त्याचेंहि रक्षण करणें हेंहि सरकारच्या कक्षेंत येईल. अर्थात् खुनाप्रमाणें आत्महत्येलाहि सरकार प्रतिबंध करील; व येथें दुसऱ्या कोणाचा प्रतिकार करण्याचा प्रश्न नसून ज्याचा तोच आत्मघातकी होऊं पाहातो, म्हणून त्याचें त्या बाबतींत व्यक्तिस्वातंत्र्य हिरावून घेण्याचा हक्क सरकारला प्राप्त होतो ही गोष्ट कोणीहि नाकबूल करणार नाहीं. तसेंच सरकारनें पब्लिक वर्क्स खातें काढून रस्ते केले, बांधले किंवा पोस्ट ऑफिस, तार ऑफिस काढून लोकांचीं पत्रें पोंचविण्याची किंवा तांतडीनें बातम्या पोंचविण्याची व्यवस्था केली, किंवा इस्पितळें काढलीं, किंवा बाजार बसविले, बांधले, आगगाडीचे रस्ते बांधले किंवा निराश्रित लोकांना काम मिळावें म्हणून उपयुक्त कारखाने काढले, तर यांत व्यक्तिस्वातंत्र्याच्या संरक्षणाचा प्रश्न येत नसून सामुदायिक हित साधण्याचा प्रश्न येतो. कोणीहि व्यक्तिस्वातंत्र्यवादी सरकारच्या या कारभाराला नांवें ठेवणार नाहीं. अर्थात् या कामापुरता जसा सरकारच्या कर्तव्याचा विस्तार झाला तसाच तो आणखी वाढवून त्यांत अशाच इतर गोष्टी समाविष्ट करतां येतात. व्यक्तिस्वातंत्र्य हें सामुदायिक हितसाधनाला विरोधी ठरवूं शकत नाहीं. ज्याचें हित त्याला कळतें, आपल्या बुद्धीप्रमाणें आपलें हित साधण्याला प्रत्येकाला मोकळीक असावी, त्याच्या अंगच्या पात्रतेप्रमाणें त्याला यश किंवा अपयश लाभेल, हें म्हणणें खरें असलें

तरी जी गोष्ट एक मनुष्य दुसऱ्याकरितां सहसा करीत नाहीं व जी सामुदायिक हिताची गोष्ट करण्याला कोणाहि एकाला सामर्थ्य असूं शकत नाहीं, तीच गोष्ट सर्वांच्याकडून थोडथोडा द्रव्यांश घेऊन कोणा सरकारानें स्वतः पुढें येऊन सर्वांकरितां केली तर तिला काय हरकत ? कारण असें केल्यानें व्यक्तिस्वातंत्र्य नष्ट न होतां, बुद्धिविकासाला व कर्तृत्वाला वाटेल तितकी विविधता व वाव राहून सामुदायिक हिताच्या गोष्टी करितां येतील. अमेरिकेंत जेथें अगदीं नव्या वसाहती वसल्यामुळें सर्वच गोष्टी हव्या तितक्या व हव्या तशा करण्याला, दुसऱ्याला उपसर्ग लागल्याशिवाय पुष्कळ वाव होता तेथें, सरकारचें कार्यक्षेत्र अगदीं संकुचित असावें हा सिद्धान्त प्रथम पटला. पण तेथेंच पुढें तो तसा टिकला नाहीं. व्यक्तीचेंच काय पण स्वतंत्र संस्थानांचेंहि स्वातंत्र्य मर्यादित असूं शकतें, व ही मर्यादा घालणारी अशी कांहीं तरी उच्च भावना व वरिष्ठ शक्ति असूं शकते ही गोष्ट पुढें उत्तर अमेरिकेनें दक्षिण अमेरिकेशीं युद्ध करून सिद्ध केली. आणि हल्लीं तर अमेरिकन सरकार हें व्यक्तिस्वातंत्र्यापेक्षां समुदाय-स्वातंत्र्य श्रेष्ठ या तत्त्वाच्या जोरावरच राज्य करीत आहे.

## ( १८६ ) जुन्या तत्त्ववेत्त्यांचें मत मागें पडलें

फ्रान्समध्यें एवढी मोठी राज्यक्रांति होऊन प्रजासत्ताक राज्य स्थापित झालें तरी राजाच्या ऐवजीं लोकसभा व तिचें मंत्रिमंडळ एवढाच फरक झाला. ही क्रांति करणारांनीं व्यक्तिस्वातंत्र्यापेक्षां समता व विश्वबंधुत्व यांवरच अधिक जोर दिला. इंग्लंडांत जॉन स्टुअर्ट मिलसारख्या तत्त्ववेत्त्यांनीं, ते स्वातंत्र्यवादाचे पुरस्कर्ते असूनहि, असें म्हटलें आहे कीं, "केवळ व्यक्तिसंरक्षण हेंच काय तें सरकारचें मुख्य कर्तव्य किंवा एकटें एक कर्तव्य होऊं शकत नाहीं. जें कोणा एकाचेंच नव्हे तें सर्व सरकारचेंच कर्तव्य होय. इतकेंच काय पण पुढें पुढें सरकारच्या कर्तव्याची सीमा वाढून व्यक्तिस्वातंत्र्याला उघड उघड आळा घालणें हेंच सरकारचें मुख्य कर्तव्य होऊन बसतें." उदाहरणार्थ, आपल्या लहान मुलांना शिक्षण द्यावें किंवा त्यांना तशींच राहूं द्यावीं हें व्यक्तिस्वातंत्र्याचें अगदीं साधें उदाहरण म्हणून वाटेल. परंतु बहुधा लोकसत्ताक अशा प्रत्येक राष्ट्रांत सक्तीच्या शिक्षणाचे कायदे झालेले आहेत. परदेशांतून आपल्याला हवा तो माल आणविण्याची स्वतंत्रता प्रत्येकाला सामान्यतः असते व असावी हें ठीकच आहे. पण पिण्याची दारू, हत्यारें, परदेशांत खरेदी केलेले गुलाम वगैरे आपल्या

देशांत आम्ही येऊं देणार नाहीं असें तर सरकारला म्हणतां येतेंच. शिवाय आंत येऊं देण्यासारख्या मालावरहि जकाती बसवून मालांच्या किंमती कमी-जास्त होऊं देण्याचा अधिकारहि हल्लीं कोठलेंहि सरकार बजावित असतें. इंग्लंडमध्यें कांहीं विशेष स्थानिक परिस्थितीमुळें खुल्या व्यापाराचें साम्राज्य सुमारें एक शतक चाललें. परंतु आतां तेंच इंग्लंड संरक्षित व्यापाराचें पुरस्कर्तें बनलें आहे. व्याज किती घ्यावें ही गोष्ट सावकार व कूळ यांच्या दरम्यान करारानें ठरावी हें ठीक आहे. परंतु अमुक एका दरापलीकडे सावकारनें व्याज घेऊं नये असे कायदे करणाऱ्या सरकाराला जुलमी न म्हणतां नीतिमानच म्हणतात. मुंबईत रेंट अॅक्ट झाला तो भाडेकऱ्यांवर जुलूम न व्हावा म्हणून केला म्हणून तो न्यायच मानला गेला. तसेंच फॅक्टरी अॅक्ट होऊन कारखानदारांनीं मजुरांपासून किती तास काम घ्यावें, त्यांना सुट्टी केव्हां द्यावी, त्यांना कमींतकमी किती वेतन मिळावें, कारखान्यांत आरोग्याच्या सोई कशा असाव्या, या गोष्टी कारखानदारांच्या-संबंधानें जुलमाच्या दिसल्या तरी खरोखर त्या दुर्बळावरील जुलूम वांचविणाऱ्याच होत. कांहीं आधुनिक तत्त्वज्ञानी म्हणतात कीं आतां समाजांतील परस्पर-संबंधाची अतिशय गुंतागुंत झाली आहे, आणि याकरितां अगदीं साधा व मूलभूत दिसणारा जो स्वातंत्र्याचा एक हक्क, म्हणजे मतस्वातंत्र्याचा, त्यालाहि आळा घालणें प्राप्त होत आहे. युद्धाच्या वेळीं राष्ट्राच्या हिताकरितां म्हणून मुद्रणस्वातंत्र्याला आळा घालण्यांत येतोच कीं नाहीं? पण मग शांततेच्या काळांतहि रशियासारख्या देशांतील सरकारानें आपले अर्थोत्पादनादि कार्य-क्रम अमलांत आणण्याकरितां जर मुद्रणस्वातंत्र्याला आळा घातला तर त्याला कोणीं नांवें कां ठेवावीं? कारण युद्धाचा हेतु राष्ट्राचा मुलूख अखंड अभंग रहावा व राष्ट्राची इभ्रत रहावी असा असतो. पण एखाद्या स्वदेशी सरकारला जर असें वाटलें कीं, आपल्या कांहीं उपक्रमानें राष्ट्राची अर्थोत्पादक शक्ति एकदम पुष्कळ वाढविण्यासारखी आहे तर, त्या उपक्रमाविरुद्ध प्रयत्न होऊं नयेत म्हणून मुद्रणस्वातंत्र्याला आळा घातला तर त्याला तरी नांवें कां ठेवावीं? राष्ट्राचा मुलूख अखंड अबाधित ठेवणें हें एका बाजूला, आणि संघटित शक्तीनें व सक्तीनें जर देशाची संपत्तिमत्ता वाढविणें शक्य असेल तर ती वाढविणें हें दुसऱ्या बाजूला, या दोन गोष्टींची तुलना केली तर दुसरी गोष्ट पहिलीहून कमी महत्त्वाची कां मानावी? आणि पहिलीकरितां

जर मुद्रणस्वातंत्र्याला आळा घालणें योग्य ठरेल तर दुसऱ्या गोष्टीकरितांहि तें योग्य ठरावें असें समाजसत्तावाद्यांचें म्हणणें आहे !

## ( १८७ ) व्यक्ति रुष्ट पण समाज पुष्ट

येथपर्यंत व्यक्तिस्वातंत्र्याविषयीं विवेचन झालें. त्याचा मतितार्थ इतकाच कीं राज्यसंस्थेची परिणति जसजशी होत चालली आहे तसतसें व्यक्तिस्वातंत्र्य हटत चाललें आहे असा भास होतो. पण आधीं तें खरें नाहीं. आणि खरोखर जेथें तें हटलेलें आढळतें तेथें ती गोष्ट स्वतः त्या मनुष्याच्या व त्याच्या समाजाच्याहि हिताला पोषक व वर्धक अशीच असते. पण या हानीचा मोबदला त्याला अन्य रीतीनें भरपूर मिळालेला आहे. तो असा कीं लोकसमाज हा राजे लोकांच्या जुलमापासून पूर्णपणें स्वतंत्र झाला असून, त्या समाजाला मिळालेलें स्वातंत्र्य हें पर्यायानें त्या समाजांतील प्रत्येक व्यक्तीचेंच स्वातंत्र्य होय. म्हणून हें स्वातंत्र्य लोकांनीं अलीकडे कोणकोणत्या बाबतींत मिळविलें याचा थोडासा विचार करूं. "लोकांना कितीही स्वातंत्र्य दिलें तरी काय ? त्यांच्या अंगीं शहाणपण, अनुभव, सत्प्रवृत्ति, स्वार्थत्यागाची तयारी व श्रम करण्याची पात्रता, आणि कांहीं अंशीं आत्म्यौपम्य भाव हे गुण नसले तर त्या सत्तेपासून खरें सुराज्य निर्माण होत नाहीं व सुख लागत नाहीं." हें खरें, तरी पण स्वातंत्र्य मिळविणें ही पहिली पायरी, व वरील गुणांनीं तिचे फायदे पदरांत पाडून घेणें ही दुसरी पायरी होय. आधीं पहिल्या पायरीवर चढावें आणि मग दुसरीवर चढतां येतें कीं नाहीं हें पहावें हा क्रम स्वाभाविकच आहे; आणि त्याप्रमाणें गेल्या कित्येक शतकांत प्रत्येक राष्ट्रांतील प्रजा आधीं होईल तितकी सत्ता व स्वातंत्र्य हीं मिळविण्याच्या उद्योगाला लागलेली आहे असें आढळतें.

## ( १८८ ) जुन्या जुलमी सत्तेवरचा पहिला विजय

या चढाईच्या धोरणांत पहिला हल्ला अनियंत्रित राजसत्तेवर झालेला आहे. लोकांचें राजाला म्हणणें हें कीं " आम्ही प्रजाजन आजवर तुमचे 'गुलाम' होतों पण यापुढें तें चालणार नाहीं." याचा अर्थ असा नव्हे कीं प्रत्येक प्रजाजनाच्या पायांत बिड्या घातलेल्या होत्या, किंवा प्रत्येकाच्या पाठीमागें हातांत चाबूक घेऊन राजा त्याला आपल्या कामावर राबवीत असे. पण ही बकासुराची पाळी केव्हां केव्हां शब्दशः कांहीं लोकांवर येत असे हें कांहीं खोटें नाहीं. वेठ बिगारीला लोक धरून त्यांना मजुरी मुळींच न देऊन, किंवा फार थोडी देऊन, राजे लोकांनीं

आपले राजवाडे, महाल, क्रीडामंदिरें, बागबागिचे बांधून तयार करून घेतले नाहींत काय ? लोकांना सक्तीनें सैन्यांत दाखल करून लढाईवर पाठविलें नाहीं काय ? राजाला खर्चाला पैसा कमी पडला म्हणजे त्यानें वाटेल त्या श्रीमंत व्यक्तीवर किंवा वर्गावर हुंड्या लिहून पैसे वसूल केले नाहींत काय ? राजे लोकांनीं लोकांच्या घरच्या बायका जबरीनें काढून नेणें वगैरेसारख्या कमालीच्या दुष्टपणाच्या व अनीतीच्या गोष्टी आपण सोडून देऊं. पण त्या सोडून दिल्या तरी राजे लोकांनीं केवळ आपला आर्थिक स्वार्थ किंवा आपली इभ्रत किंवा आपली चैन ही पुरी करण्याकरितां आपल्या इच्छेप्रमाणें लोकांवर सक्ती केली नाहीं काय ? लोकांवर जुलूम केला असें यथार्थपणें म्हणण्याला शेंकडा शंभर लोकांवर तो जुलूम झाला पाहिजे असें नाहीं. पण वर सांगितल्याप्रमाणें कांहीं थोड्या लोकांवर तरी ती होती. आणि सोडतींत कोणाच्या दुर्दैवाचें तिकिट निघेल हें अर्थातच निश्चित कळण्यासारखें नसल्यामुळें, प्रजाजनांपैकीं प्रत्येकाच्या मनांतून ती धास्ती वाटत रहाते. सर्वांना आपण एकाच संकटांत आहों अशी भावना जागृत राहून सर्वच आपापल्या परीनें या जुलुमाचा प्रतिकार करीत असतात. अनियंत्रित राज्यसत्ता याचाच अर्थ, "कोणावर केव्हां धाड पडेल याचा नियम नाहीं" असा करितां येतो. म्हणून लोकांचा हात चालूं लागला म्हणजे लोक राजाला म्हणूं लागतात—"हा अनियंत्रित कारभार बस झाला. लेखी स्पष्ट कायदेकानू झाले पाहिजेत; ते सर्वांना सारखे लागू असले पाहिजेत; व ते लोकांनाच काय पण तुम्हांलाहि लागू असले पाहिजेत !" कायदा केला तो फक्त प्रजाजनांपैकीं एकमेकांना लागू होण्यापुरताच केला. आणि स्वतः राजाला मात्र तो लागू नाहीं, तर तें नियंत्रण नव्हे. तो कायदा नव्हे. राजाचें राज्य चालण्याला म्हणजे अप्रत्यक्ष रीतीनें लोकांच्याच हिताकरितां, ज्या गोष्टी प्रजेपासून घेणें व मिळणें हें रास्त असेल त्या, सारासार विचारानें योग्य तितक्या लोकांकडून घ्याव्या. पण त्या कांहीं ठराविक नियमानें ! तसें झालें तरच त्यांची मागणी करणें हें जसें राजाच्या दृष्टीनें कायदेशीर ठरेल, त्याचप्रमाणें ठरल्याहून अधिक मागणी करणें हें प्रजेच्या दृष्टीनें बेकायदेशीर ठरेल. असा दुतर्फी लागू होणारा कायदा झाला म्हणजे त्यांतूनच ज्याला आपण 'हक्क' म्हणतों ते निर्माण होतात. एका रुपयाच्या दोन बाजूला जसे दोन छाप असतात, तसें या कायद्याच्या एका अंगच्या छापाला कर्तव्याचें बंधन किंवा जबाबदारी हें नांव देतां येईल, तर दुसऱ्या अंगच्या छापाला हक्क हें नांव देतां येईल.

## ( १८९ ) आधुनिक प्रजा राजाला काय म्हणते !

" राज्य चालावयाला पैसा हवा! कबूल! त्याकरितां कर मागा. देतों. पण कोणापासून किती कर केव्हां घ्यावा हें कायद्यानें आधीं निश्चित ठरवा; व त्यांतून दुतर्फी कर्तव्यें व हक्क निर्माण होऊं द्या. म्हणजे तो कर आम्ही देऊं. परदेशाशीं युद्ध जुंपलें आणि आम्हीं आपखुषीनें सैन्यांत दाखल झालोंच नाहीं व राष्ट्ररक्षणाला मदत केली नाहीं, तर सक्तीच्या लष्करी नोकरीचा कायदा करा. आणि कोण किती लोक घ्यावयाचे, त्यांना पगार किती द्यावयाचा, मेल्यावर त्यांच्या बायकापोरांना पेन्शन किती द्यावयाचें, अन्नवस्त्र, रजा, सुट्या, व सवलती कोणत्या मिळणार, याचा कायदा किंवा कानू किंवा नियम करा; आणि मग त्याप्रमाणें आम्हीं लष्करभरती न केली तर आम्हांला शिक्षा करा. कोणत्या कृत्याला गुन्हा म्हणावें हें आधीं निश्चित ठरवून पीनल कोड तयार करा; तसेंच दिवाणी मुलकी कारभार चालविण्याचे व न्यायादानाचे योग्य ते कायदे-कानू करा; म्हणजे मग आम्ही त्याप्रमाणें वागूं; व न वागल्यास शिक्षा करण्याची सत्ता तुम्हांला आहेच. आम्ही ही सत्ता अजिबात काढून घ्यावी असें म्हणत नाहीं. फक्त तिचें नियमन म्हणजे नियमांनीं नियंत्रण करूं इच्छितों. याशिवाय आणखीहि एक गोष्ट झाली पाहिजे ती अशी कीं, कायदेकानू कराल ते मुख्यतः आमच्या माहितीकरितां व वर्तनाकरितां असल्यामुळें आमचाहि त्या कामीं सल्ला घेणें योग्य ठरेल. म्हणून तोहि घेत जा. अगदींच एकतर्फी तुमच्या एकट्याच्या मर्जीस येईल तसा कायदा केलात तर तो कायदाच होऊं शकत नाहीं. कारण आमची त्याला संमति नाहीं. तुमच्या एकट्याच्याच इच्छेनें कायदा केला काय, न केला काय, सारखाच. आज कराल उद्यां काढून टाकाल. आज कराल उद्यां बदलाल. पण आमचा सल्ला घ्यावा, संमति घ्यावी असें ठरल्यास वरील गोष्टी उठल्या बसल्या तुम्हांला करतां येणार नाहींत. तुम्हांला तें करतांना अडचण पडेल.तात्पर्य, तुमच्या स्वैरकारभाराला अडचण हीच आमच्या स्वातंत्र्याची सनद, आमच्या हक्कांची जामिनकी. "

## ( १९० ) कायद्याचें नियंत्रण म्हणजे स्वातंत्र्य !

अशा रीतीनें गेल्या दोन तीन शतकांत अनेक राज्यांतील प्रजाजनांनीं जागें होऊन राज्यसत्तेवर जो पहिला हल्ला केला व पहिलें ठाणें काबीज केलें तें राजाच्या बेकायदा बेलगामी वर्तनाचें;व असें करतांना त्यांनीं ज्या तीन मागण्या

केल्या व पदरांत पाडून घेतल्या त्या अशा. ( १ ) राजाचें वर्तन व प्रजेची वागणूक हीं ( ज्याचे शब्द व ज्याचा अर्थ निश्चित आहे व ज्याला कालाच्या दृष्टीनें कायमपणा आहे अशा ) कायद्यानें नियंत्रित झालीं पाहिजेत. ( २ ) तो कायदा प्रजाजनांतील सर्वांना व स्वतः राजालाहि बंधनकारक असला पाहिजे; आणि ( ३ ) तो कायदा करतांना कोणत्या ना कोणत्या तरी रीतीनें राजानें प्रजाजनांची संमति घेतली पाहिजे. या मागणीला इंग्रजींत Reign of Law अर्थात् "कायद्याचें राज्य" असे शब्द लावतात. म्हणजे कारकीर्द राजाची असली तरी सत्ता कायद्याची पाहिजे! आतां असे कायदे केल्यावरहि ठेवणींतले म्हणून कांहीं अधिकार राजा आपल्या खिशांत राखून ठेवीत असतो, व जरूरीप्रमाणें त्यांचा उपयोग तो करीत असतो. उदाहरणार्थ, हिंदुस्थानांत सामान्यतः कायद्याचें राज्य सुरू असलें तरी, एखादे वेळीं गव्हर्नर जनरल हा ऑर्डिनन्स म्हणून काढतो हें प्रसिद्ध आहे; व या ठेवणींतल्या राखीव अधिकाराचेंच तें उदाहरण होय. तसेंच फ्रान्समध्यें Lettre de cachet म्हणून बेलगामी वॉरंटाचा एक प्रकार आहे; तो रिपब्लिकच्या अध्यक्षाला अजूनहि अमलांत आणतां येतो. तसेंच पूर्वी आयर्लंडांत बंडाळी सुरू होती तेव्हां Coercion Acts नांवाचे कायदे केले जात. किंवा हल्लीं हिंदुस्थानांतहि बंगाल्याकरितां दडपशाहीचे कांहीं विशेष कायदे केले आहेत; ते फक्त नांवाचे कायदे असून वस्तुतः त्यांनीं पोलिस मॅजिस्ट्रेट यांना हवी तशी दडपशाही व जुलूम करण्याचाच परवाना दिलेला असतो. वरील विषांवर विलायतेंतील Petition of Rights व हिंदुस्थानांतील 'हॅबिअस कॉर्पस ॲक्ट' असले कांहीं उतारे आहेत. अर्थात् विषाचा अंमल किती व उताऱ्याचा गुण किती हें जसें अनुभवास येईल तसें खरें. पण ठेवणींतले हे कायद्यांचे प्रकार अपवाद म्हणून वगळले तर सर्वांना सारखे लागू होणाऱ्या कायद्याचें नियंत्रण म्हणजे तें एक प्रकारें स्वातंत्र्यच होय असें म्हणतां येतें.

## ( १९१ ) करांबाबत स्वतंत्रता

पण राज्यांत नुसतें कायद्याचें वर्चस्व स्थापून भागत नाहीं. तर राज्याचा जमाखर्च म्हणजे राज्याच्या पिशवीचें तोंड हातीं ठेवण्याची सत्ताहि लोकांना राजांकडून काढून घ्यावयाची होती. आणि गेल्या चार शतकांत ती त्यांनीं काढून घेतली. १७ व्या शतकांत इंग्लंडांत राजा व प्रजा यांचें युद्ध झालें याचें कारण, पहिल्या चार्लस राजानें लोकांकडून कराच्या रूपानें वाटेल तितका

पैसा मिळविणें सुरू केलें हें होय. १८ व्या शतकांत इंग्लंडच्या राजाच्या हातून अमेरिकन वसाहत निघून गेली व स्वतंत्र झाली त्याचें कारण, तिसऱ्या जॉर्ज राजाच्या प्रधानमंडळानें अमेरिकन वसाहतवाल्यांवर सक्तीनें बसविलेला कर हा होय. फ्रान्सच्या राज्यक्रांतीलाहि हेंच कारण झालें. म्हणजे गरीब लोकांकडून हवा तसा कर वसूल होत असे; पण उमराववर्ग व उपाध्यायवर्ग हे स्वतःला कर देण्यापासून मुक्त समजत. हल्लीं जुन्या व नव्या राज्यांतून कर बसवावयाचा तो लोकसभेच्या संमतीनें व मंजुरीनेंच बसविला जातो आणि उमराव सभांना जरी एकंदर राज्यघटनेंत स्थान असलें तरी, कर बसविणें न बसविणें याविषयीं कायदे करण्याच्या बाबतींत या उमरावसभेची लुडबूड लोक चालूं देत नाहींत. त्यांनीं राजापासून स्वातंत्र्य मिळविलें व उमराव लोकांवर समानतेचें तत्त्व हक्कानें प्रस्थापित केलें; किंबहुना एक पायरी पुढेंच जाऊन उमराव लोकांवर कर बसविण्यांत कांहीं कमीपणा उरूं दिला नाहीं. पण ते बसविण्याची सत्ता मात्र उमराव सभा वगळून लोकसभेनें आपल्या हातीं घेतली. तसेंच, लोकसभेंत झालें तरी प्रधानमंडळ हेंच कर बसविण्याची योजना तयार करितें, व आपल्या बहुमताच्या जोरावर ती अमलांत आणूं पाहातें. पण पूर्वीं निवडणुकींत विश्वासार्ह मानलेल्याहि पक्षानें व त्यांतील मंत्रिमंडळानें तयार केलेली योजना मान्य नसल्यास लोकसभेंत प्रधानमंडळाचा पराभव होतो. आणि अशा रीतीनें लोक आपली सत्ता बजावण्याचें काम आपलेच हातीं घेतात, व एक जबाबदार प्रधानमंडळ घालवून देऊन त्याचे जागीं दुसरें प्रस्थापित करतात. अशा रीतीनें राज्याच्या पिशवीचें तोंड आपल्या हातीं ठेवण्याची स्वतंत्रता हा राजकीय स्वतंत्रतेचा एक भाग ठरतो.

### ( १९२ ) ‘ दुःखा मिळतां वांटेकरी ’

राजावर नियंत्रण घालण्याकरितां कायदा करावयाचा तो नुसत्या राजाला न लागतां सर्व प्रजाजनांनाहि सारखाच लागूं व्हावयाचा असतो आणि यांतूनच एक विरोधाभासात्मक असा सिद्धान्त, म्हणजे दिसण्यांत चमत्कारिक असा सिद्धान्त, निर्माण होतो. तो असा कीं, सामुदायिक स्वतंत्रता म्हणजेच सामुदायिक परतंत्रता होय ! पण जें सर्वांना सारखें लागूं होतें त्यामुळें परतंत्रतेचें दुःख वाटत नाहीं. कारण स्वतंत्रता व परतंत्रता ही भावना कांहींशी अन्यसापेक्ष असते. शिवाय सामुदायिक बंधन म्हणजे परतंत्रता ही तरी

सामुदायिक फायद्याकरितांच असते अशीहि लोकांना आंतून जाणीव असते. निदान परस्परसमानता दिसली म्हणजे मनुष्याचें पुष्कळसें समाधान आपोआपच होतें. कारण मग प्रश्न इतकाच उरतो कीं, सर्वांच्याच स्वतंत्रतेंत जें सामुदायिक वैगुण्य आहे तें समाजाच्या राज्याच्या फायद्याकरितांच आहे किंवा कसें आणि तें वैगुण्य किती उरूं द्यावें, किती काढून टाकावें ? याचा विचार सर्वच जण मिळून सामुदायिक दृष्टीनें करूं लागले, म्हणजे तो विचार निःस्वार्थी ( व्यक्ति—स्वार्थ ज्यांत नाहीं असा ) म्हणून निर्विकारपणानें व शुद्ध बुद्धीनें होतो. आणि तो केल्यानंतर मग, जर स्वतंत्रतेचें माप थोडें कमी भरलें, परतंत्रता किंचित् उरली ती राहिली, तरी चालेल असें लोकांचें लोकांनाच वाटूं लागून त्यामुळें त्यांना दुःख होत नाहीं. Social sorrow loses half its pain असें इंग्रजींत एक वाक्य आहे. त्याचें भाषांतर "दुःखा मिळतां वांटेकरी। दुःखभार हलका शिरीं ॥ " असें करितां येईल. ' स्निग्धजनसंविभक्तं दुःखं सह्यवेदनं भवति ' ! गांवांत रोगराई नाहीं ती अवचित प्रगट होऊन एकाच घराला बाधली म्हणजे तें दुःख फार वाटतें. पण प्लेग कॉलरा इन्फ्ल्युएंझा यांची सांथ गांवांत आली म्हणजे घरोघरीं तेंच असें पाहून दुःख हलकें होतें. एक मूल रडत असलें म्हणजे त्याला दुसऱ्या रडणाऱ्या मुलापुढें करावें; म्हणजे दोन्हीं मुलें रडण्याचीं थांबतात असा चमत्कार केव्हां केव्हां घडतो असें मानसशास्त्रज्ञ म्हणतात.

## ( १९३ ) समानतेच्याद्वारें स्वातंत्र्यलाभ

कायद्याच्या राज्यांत मुख्य गोष्ट समानता ही आहे व तिचा पहिला अंमल राजावर झाला हें आपण पाहिलें. पण समानतेचें कार्य तेवढ्यानें संपत नाहीं. कारण समाजांतली, राज्यांतली विषमता ही एकट्या राजामध्येंच सांठविलेली नसते. तिचे इतर आधारस्तंभ पुष्कळच असतात. एखादें गांठाळ लांकूड असावें, म्हणजे ठिकठिकाणीं त्याच्या शरीरांत गांठीच गांठी असतात. आणि लांकूडफोड्याला ती एकेक गांठ घेऊन फोडावी लागते. त्याप्रमाणेंच समाजांतील अनेक वर्ग व व्यक्ति या पूर्वार्जित परंपरागत हक्काच्या जोरावर आवळून गांठाळून बसलेल्या असतात. या हक्कांना " Vested Rights " असें म्हणतात. वतनदारी हें त्याचेंच भाषांतर. आणि राजाला नियंत्रण लावून त्याला वतनदारीच्या गुहेंतून ओढून काढून चौकांत चवाठ्यावर आणण्याला समाजाला जितके श्रम पडले त्यांहून अधिक श्रम हे इतर वतनदार मोडून काढण्याला पडले आहेत. ही सामा-

जिक समता प्रस्थापित करणें हें काम देखील राजकीय सत्तेनेंच लोकांना आपल्या अभिरुचिप्रमाणें करून घेतां येतें, व तसें त्यांनीं तें आजवर करून घेतलें आहे. इंग्लंडांत लोकसत्ता प्रभावी असली तरी राजा हा अजून शिल्लक उरलेला आहे, व एक राजदरबारमंडळ म्हटलें म्हणजे त्याच्या अनुषंगानें त्यांतील अठरा सोंगेंहि आलींच. या सोंगांचें मुख्य लक्षण म्हटलें म्हणजे सामाजिक उच्चनीचपणाचा भेद्भाव. यामुळें विलायतेंत राजाच्या खालोखाल गिरानिराळ्या दर्जांचे पदवीविभूषित अमीर उमराव अजून शिल्लक आहेत. कोणी ड्यूक, कोणी मार्किस, कोणी व्हायकाउंट, कोणी लॉर्ड, कोणी बॅरन, कोणी सर इत्यादि अनेक दर्जाच्या उमरावांच्या पायऱ्यांनीं राजसिंहासन उंच होऊन बसलेलें आहे आणि त्यावर बसणारा राजा हा अर्थात् त्याहून उंच. पण अमेरिका, फ्रान्स वगैरे लोकसत्ताक राज्यांत हे सामाजिक दर्जे व त्यांतील भेदाभेद हे शिल्लक उरलेले नाहींत. लष्कर, आरमार व बजावणी इत्यादि सरकारी खात्यांतील अधिकारीवर्ग यांना अधिकारपरत्वें लहान मोठे हुद्दे देण्यांत येतात, कारण त्यांच्या कामांत अधिकारपद हाच शिस्तीचा मुख्य पाया आहे. परंतु अमेरिकेचा व फ्रान्सचा प्रेसिडेंट व रस्त्यांतून चालणारा कोणताहि इतर सामान्य प्रतीचा प्रजाजन यांचेमध्यें कोणताहि सामाजिक भेद्भाव अगर तद्दर्शक भेद्भाव नाहीं. येथेंहि समानतेच्या द्वारेंच स्वातंत्र्य प्रतीत होत आहे. सामाजिक उच्चनीच भाव काढून टाकल्यावर कोणत्याहि विशिष्ट वर्गाला राज्यांतील कोणताहि विशिष्ट फायदा उरूं देऊं नये ही गोष्ट आपोआपच पुढें येणारी आहे. म्हणून सरकारी पैशानें ज्या ज्या लोकोपयोगी कामावर खर्च होतो त्यांचा फायदा घेण्याचा हक्क सर्व वर्गांना व लोकांना सारखाच राहिला पाहिजे हें तत्त्व मान्य करावें लागतें. उदाहरणार्थ, शिक्षण घेण्याचा अधिकार सर्व वर्गांना सारखाच आहे. आणि राष्ट्रांतील यच्चयावत् मुलांना कोणताहि भेद्भाव न ठेवतां निदान प्राथमिक तरी शिक्षण दिलें पाहिजे, हा सिद्धान्त लोकसत्ताप्रधान काय पण राजसत्ताप्रधान राष्ट्रांतहि मान्य झाला आहे व अंमलांत येऊं लागला आहे.

### ( १९४ ) समानतेच्या आणखी बाबी

वंशपरंपरागत म्हणून जितके हक्क पूर्वीं होते तितके सगळे आतां जवळ जवळ नष्ट झाले आहेत. हल्लीं भेद्भावाचीं कांहीं टेंगळें समाजाच्या अंगावर दिसून येत असलीं तरी तीं नवीं आहेत. म्हणजे समान हक्काच्या पायावरच

उभें राहून, बुद्धिवान लोक, चाणाक्ष हुशार लोक, द्रव्यदृष्ट्या व्यापार धंदा करून बेसुमार पैसा मिळवितात. असे लोक हीं एक प्रकारचीं प्रस्थें बनतात, व लोकांच्या डोळ्यांत खड्यासारखीं खुपूं लागतात. शिवाय अशा लोकांना संहति, सहकारिता, संघटना यांचें रहस्य समजत असल्यामुळें ते आपले संघ किंवा सिंडिकेटस, कॉरपोरेशन्स देखील बनवितात. "एकैकमपि अनर्थाय किमुयत्र चतुष्टयं।" या न्यायानें गरिबांना होणारा श्रीमंतांचा उपद्रव अनेक परीनें वाढतो. जुन्या काळच्या राजांनीं आपली सत्ता चालवून, आपल्या आवडत्या लोकांना विशेष हक्क, मोठ्या नोकऱ्या, व्यापाराचे परवाने, किंवा सरकारी खजिन्यांतील पैसा वगैरे देऊन, मोठेपणाला चढविलें म्हणून त्यांच्याविरुद्ध लोकांना सहजच गवगवा करतां आला. पण आतां समानतेच्या जागेवर गरिबांच्या बरोबरीनें प्रथम उभे राहून, केवळ आपल्या बुद्धिबळावर, पुढें ज्यांनीं संपत्ति मिळविली त्यांच्याविरुद्ध तक्रार करण्याला काय जागा? अर्थात् हीं नवीं विषमतेचीं टेंगळें समाजाच्या अंगावर उठलेलीं नाहींशीं करावयाचीं तर, या बुद्धीच्या पैशाच्या भांडवलावरच नियंत्रण घातलें पाहिजे. आणि ही गोष्ट हल्लीं रशियासारख्या कांहीं देशांत प्रयोगावस्थेंत आहे. पण राजाची सत्ता घालवून आपल्या हातीं सत्ता आणणें हें ज्यांना पटलें व न्यायाचें वाटलें त्यांना ही पुढची पायरी एकदम मान्य होत नाहीं. म्हणून फ्रान्स अमेरिकेसारख्या लोकसत्ताक राष्ट्रांत वडिलार्जित किंवा वंशपरंपरागत विशेष हक्क जरी सर्वस्वीं नष्ट केले आहेत तरी श्रीमंत व गरीब हा भेद त्यांना अद्यापि बुडवितां आला नाहीं, किंवा बुडविण्याची इच्छाहि झाली नाहीं. अमेरिकेंत तर श्रीमंतीचीं टेंगळेंच काय पण टेंकाडेंहि समाजाच्या अंगावर उमटलेलीं असून, कांहीं लोकांनीं लोकशाही सत्तेचा उपयोग करून, कायद्याचे मोठमोठे वाफेचे नांगर लावून, हीं टेंकाडें जमीनदोस्त करण्याची खटपट सुरू केली आहे. परंतु हें युद्ध अद्यापि संपलेलें नाहीं. तसेंच रशियांतहि जुलमी राजसत्ता गेली, पण जुलमी लोकसत्ता जवळ जवळ जुलमी राजसत्तेइतकीच त्रासदायक होऊं लागली आहे, व त्याविरुद्ध आंतून प्रतिक्रियाहि सुरू आहे. पण तेथेंहि हें युद्ध अजून नुकतेंच सुरू असून, त्याचा निकाल लागण्याला बराच अवकाश आहे. आज लोकशाहीनें मिळविलें तें इतकेंच कीं, राजसत्ता व राजकर्तृक विषमता हीं नाहींशीं करून टाकलीं आहेत.

## ( १९५ ) आर्थिक व्यवहारस्वातंत्र्य

यानंतर मनुष्याच्या आर्थिक स्वातंत्र्याचा प्रश्न येतो. पूर्वी राजे लोकांनीं आपल्या स्वराज्याकरितां, किंवा आपल्या समाजांतील विशिष्ट वर्गांच्या स्वार्था-

करितां, मक्ते देण्याची पद्धति ठेवली होती व व्यापार उद्योगधंदे यांच्यामध्यें पक्षपाती कायदाहि ते करीत. आधींच ईश्वरानें बुद्धिबळ मनुष्यांना सारखें वांटून दिलेलें नाहीं. त्यांतून वरील प्रकारचे कायदे किंवा प्रघात अंमलांत राहिले तर ईश्वरनिर्मित वैषम्याच्या कारणांना मनुष्यनिर्मित वैषम्याच्या कारणांची भर पडणार आणि त्याप्रमाणें लोकसत्ता प्रभावी होऊं लागल्यावर ही आर्थिक विषमता नाहींशी करून टाकण्याचे प्रयत्न लोकांनीं चालविले. खुल्या व्यापाराचें तत्त्व जें इतकें उदयाला मध्यंतरीं आलें त्याचें कारण हेंच. हल्लीं उद्योग व व्यापारधंदे या बाबतींत बोलूनचालून पक्षपाती असे कायदे होत नाहींत. राष्ट्रांनीं खुल्या व्यापाराला कांहीं वेळ आळा घातला तरी तो कांहीं अंशीं सरकारी खजिन्याच्या फायद्याकरितां म्हणजे उत्पन्न वाढविण्याकरितां, पण मुख्यतः देशांतील उगवत्या उद्योगधंद्यांना व कारागिरीला संरक्षण देण्याकरितां घातला जातो. असें झाल्यास राष्ट्रांतील कांहीं वर्गांकडून हाकाटी होते. पण ती राजकीय स्वातंत्र्य नष्ट झालें, समानता बुडाली अशा मुद्यावर होत नसून, आर्थिकदृष्ट्या एक धोरण दुसऱ्यापेक्षां अधिक बरें किंवा वाईट, आणि यापैकीं एका धोरणानें दुसऱ्यापेक्षां राष्ट्राचा आर्थिक फायदा अधिक किंवा कमी होण्याचा संभव, या मुद्यावरच माजलें तर भांडण माजतें. खुल्या व्यापाराला आळा घालणें ही गोष्ट कायदा केल्याशिवाय होत नाहीं. आणि तो कायदा मतदारांच्या विश्वासाला पात्र अशा मतदारांकडून व प्रधानमंडळाकडून होत असतो. त्याचप्रमाणें कांहीं निवडक उद्योगधंदे हे खाजगी लोकांच्या हातीं राहूं द्यावे कीं, राष्ट्रीय सरकारनें ते आपल्या खातेवारींत ओढून व आपल्या हक्कानें चालवून, त्याचा नफा एका वर्गाला होऊं न देतां राष्ट्राच्या तिजोरींत तो भरावा, या वादांतील तत्त्व हळूहळू पुढें येत आहे. हिंदुस्थानांत कांहीं आगगाड्या व जंगलें हीं सरकारच्या मालकीचीं असून, त्यांचा सर्व कारभार सरकारी मालकीनें चालतो. रशियाची मजल याचेही पलीकडे गेलेली आहे; म्हणजे तेथें जवळ जवळ कोणताही उद्योगधंदा खाजगी लोकांच्या हातीं राहूं नये तो सर्व राष्ट्रीय सरकारचे स्वाधीन करून चालवावा, अशाविषयीं प्रयोग सुरू आहेत. इंग्लंडांतील रेल्वे या अद्यापि खाजगी कंपनीच्या मालकीच्या आहेत, व देशांतील कोळशाच्या वगैरे खाणी या सरकारी मालकीच्या व्हाव्या अशीं मतें पुढें येत आहेत. आणि या मतांना कायद्याचें स्वरूप आल्यास, पूर्वीं खाजगी व्यक्तींना व खाजगी संघांना जे हक्क होते ते सक्तीनें काढून घेतल्यासारखें होणार आहे; पण यामुळें लोकसत्तेची कोणी पिछेहाट झाली असें म्हणत नाहीं. राष्ट्राकरितां

व्यक्तीवर बंधन घालणें हें लोकशाहीचें लक्षण समजलें जातें. आणि तें लोकांना मानवतें याचें कारण हेंच कीं, जुन्या काळीं या सर्व नियंत्रणाचा फायदा राजा किंवा त्याच्या आश्रयाखालीं वाढणाऱ्या कांहीं मोजक्या व्यक्ती यांच्या पदरांत पडतो असें धडधडीत दिसून येत असे. आज व्यक्तींच्या हक्काचें नियंत्रण झालें तरी त्याचा फायदा पर्यायानें सर्व राष्ट्रांच्या खिशांत पडणारा आहे. तो कांहीं राष्ट्राच्या किंवा पार्लमेंटच्या अध्यक्षाच्या खिशांत पडणारा नाहीं, अशी खात्री वाटल्यामुळें पुढें मागें लोकसभेनेंहि या गोष्टीला अनुमोदन देणें संभवनीय आहे. अर्थात् येथें व्यक्तिनियंत्रणाचें किंवा विषमतेचें फक्त रूपांतर झालें असें जरी कोणी म्हटलें तरी त्या नुसत्या नांवावरून कोणीं फसलें जाणार नाहीं. कारण लोकसत्तेच्या प्रगतीची दिशा येथें बदललेली नाहीं. फक्त तिच्या अमलाचा प्रकार बदललेला असेल.

### ( १९६ ) स्त्रीवर्गाला समान हक्काची प्राप्ति

तसेंच आत्मौपम्यबुद्धीनें मनुष्यसमाजांतील स्त्रियांना जे सामान्यहि हक्क पूर्वी नव्हते ते द्यावे ही गोष्ट लोकशाहीला पटत चालली असून, स्त्रिया व पुरुष यांच्या दरम्यान, प्रजाजन किंवा नागरिक किंवा लोकसमाजाचा अवयव या नात्यानें, कोणचाहि राजकीय भेदभाव यापुढें राहणार नाहीं असें दिसतें. पूर्वीं पुरुष वारस नसेल तेव्हां राजघराण्यांतील स्त्रिया गादीवर बसत आल्या आहेत, आणि अमीर उमराव पुरुषांबरोबर त्यांच्या स्त्रियांनाहि उमरावगिरीचे सर्व हक्क मिळत आले आहेत. पण सामान्य समाजांतील स्त्रियांना हक्कांपासून व अधिकारापासून दूर ठेवण्याचा जो गुन्हा घडला तो पूर्वीं लोकांचा लोकांनींच केला होता. आणि त्यांच्या मनांत आतां पुढें समताबुद्धि उत्पन्न झाली असल्यामुळें आपल्या बरोबरीचे हक्क स्त्रियांनाहि द्यावे असें पुरुषांना वाटूं लागलें आहे, समाजाच्या खाजगी किंवा घरगुती कारभारांत स्त्रियांना पुरुषांच्या बरोबरीचे हक्क मिळणें याला कायद्याची मदत नको आहे. परंतु समाजांतील इतर लोकांशीं करार करणें, स्वतःची म्हणून मालमिळकत पुरुष—नातेवाईकाच्या मालमिळकतीहून वेगळी व स्वतंत्र ठेवणें व भोगणें, राष्ट्रीय पार्लमेंटाच्या निवडणुकींत व स्थानिक स्वराज्याच्या निवडणुकींत स्त्रियांनीं मतदार होणें, किंवा त्यांतील सभासदांच्या जागेकरितां निवडणुकीस उभें राहणें, वगैरे गोष्टी कायद्याशिवाय होणाऱ्या नाहींत. त्याहि लोकांनीं आतां केल्या आहेत. या दृष्टीनें स्त्रियांना समानता मिळवून देणें हा राजकीय स्वातंत्र्याचाच एक भाग आहे.

### ( १९७ ) कुटुंबियांना स्वातंत्र्यप्राप्ति

कौटुंबिक स्वातंत्र्य याचा राजसत्तेशीं संबंध पोहोंचत नाहीं. म्हणजे कौटुंबिक संबंधांत कुटुंबांतील लोकांना परस्पर स्वातंत्र्य पूर्वींहून अधिक मिळालें तरी तें राजसत्तेंतून काढून घेतलें असें नाहीं. तर कदाचित् कुटुंबांतल्या कुटुंबांतच जी राजसत्ता पूर्वीं चालत असेल तिच्यांतून काढून घेतलें असें फार तर म्हणतां

येईल. उदाहरणार्थ, पूर्वीं खुद्द विलायतेंतहि स्त्रियांना स्वतःची म्हणून मिळकत कायदेशीर अधिकारानें धारण करतां येत नसे. अलिकडे स्त्रियांना हा अधिकार मिळाला आहे. आणि विवाहित स्त्रियांना वादीप्रतिवादी या नात्यानें स्वतंत्र अधिकारानें न्यायकोर्टांत काम चालवितां येतें. तसेंच पूर्वीं विवाहाला करारांचें स्वरूप नव्हतें त पाश्चात्य देशांत आतां सरसकट प्राप्त झालें आहे; म्हणजे हा करार करून शिवाय जर वधुवरांना विवाहाचा धार्मिक विधि करावासा वाटलाच तर त्यांनीं तो खुशाल करावा. अर्थात् येथें धर्माधिकाऱ्याच्या हातीं जी सत्ता पूर्वीं होती ती आतां राहिली नाहीं. वधूवरांनीं करार केला तर तो नोंदवीत नाहीं असें सरकारी अधिकाऱ्याला म्हणतां येत नाहीं. तसेंच मुलांचें रक्षण व पालनपोषण करण्यासंबंधीं पूर्वीं आईबापांवर कायदेशीर बंधनें नव्हतीं तीं हल्लीं कायद्यानें घातलीं आहेत. वधुवरांच्या बाबतींत समानतेच्या तत्त्वाची प्रगति दिसून येते, तर मुलांच्या बाबतींत कायद्याचा बहाणा असा दिसून येतो कीं, कोणतींहि मुलें हीं आईबापांचीं मुलें असलीं तरी तीं एका अर्थीं राष्ट्राचींहि मुलें आहेत. म्हणून त्यांची घ्यावी तशी काळजी जनक आईबापांनीं न घेतली तर आईबापांच्या ठिकाणीं दुसऱ्या दृष्टीनें असणारें राष्ट्र हें ती घेऊं शकेल, व त्याकरितां जरूर तर आईबापांवरहि बंधन घालील. सक्तीचें शिक्षण हें आईबापांवर घातलेलें नवीन बंधन होय, व हें घालतांना आईबापांची सत्ता कमी होऊन त्या जागीं लोकशाहीची सत्ता प्रस्थापित झाली. म्हणजे याचा अर्थ असा झाला कीं, राष्ट्रांतील प्रजाव्यक्तींवर बंधनें घालावीं, त्यांची स्वतंत्रता जरूर तर कमी करावी, पण ती पूर्वीप्रमाणें राजानें करावयाची नाहीं तर लोकशाहीनें करावयाची किंवा तीच गोष्ट मुलांच्या हक्कांना प्राधान्य देऊनहि संपादितां येण्यासारखी आहे. कारण " आम्ही अल्पवयी असतां आमची काळजी आईबापांनीं घ्यावी किंवा राष्ट्रानें ती घेण्याला त्यांना भाग पाडावें हा आमचा जन्मसिद्ध हक्क आहे. " असें मुलांनीं म्हटल्यास तें शोभण्यासारखें आहे.

## ( १९८ ) गरीब वर्गांना स्वातंत्र्यप्राप्ति

जुन्या काळीं मक्त्यांची पद्धति असून जकाती, दर्यावर्दी वाहतूक वगैरेंचे कायदे विशिष्ट वर्गांना मदत करणारे असे होते. यामुळें कोणी मनुष्य म्हणाला कीं, आपण आपल्या बुद्धीप्रमाणें हवा तो हवा तेवढा धंदा करून पैसे मिळवूं तर त्याला अनेक बाजूंनीं अडचण होती. धंद्याधंद्यांतहि समानता नव्हती. एका धंद्याला सरकारी मदत अधिक, दुसऱ्याला कमी असें असे. यामुळें कांहीं भांडवल किफायतशीर धंद्यांत न पडतां मोकळें राही. ती स्थिति प्रथम बदलली व ती बदलल्यानें लोकांना आर्थिक स्वातंत्र्य मिळालें असें वाटलें. खुला व्यापार सुरू झाला. परंतु फिरून लवकरच कारखानदारी अशा पद्धतीवर गेली कीं, तिच्या योगानेंहि कांहीं वर्गांवर, दुसऱ्या प्रकारचा असला तरी, जुलूमच होत

आहे असें लोकांना वाटूं लागलें. आपलें भांडवल हवें त्यांनीं हव्या त्या धंद्यांत घालावें ही मोकळीक मिळाली. पण मोठें भांडवल घालून उभारलेल्या धंद्यांत पुष्कळ नफा व्हावा म्हणून रात्रंदिवस कारखाने चालविण्यांत येऊं लागले. कारखान्यांतील हवा व जागा रोगट असली तरी कारखानदार ती सुधारण्याला पैसा खर्च न करितां मजुरांना त्यांत राबवून घेऊं लागले. तसेंच मजुरीच्या आशेनें किती अल्पवयी मुलांमुलींना कामावर घ्यावें, किती वेळ त्यांना राबवावें, किती थोडी मजुरी त्यांना द्यावी, या गोष्टींना ताळतंत्र उरलें नाहीं. तेव्हां सदरील लोकांनीं तक्रारी केल्यामुळें या बड्या कारखानदारांच्या निर्दय वर्तनाला कायद्यानेंच आळा घालावा अशी कल्पना निघाली. म्हणजे भांडवलवाल्या लोकांना एक स्वातंत्र्य मिळालें तर दुसरें गेलें. नोकरीचा करार सज्ञान मनुष्यांना हवातसा करितां यावा हें वाढत्या स्वातंत्र्याचें लक्षण असें प्रथम वाटलें. पण वर उल्लेखिलेल्या दयाबुद्धीनेंच असें सुचविलें कीं, मजूर लोकांना आपल्या हिताविरुद्ध करार करून देतांच येऊं नये. म्हणजे काम मिळणाऱ्या गरजेमुळें त्यांनीं वाटेल तसले करार कारखानदाराला लिहून दिले तरी न्यायकोर्टानें किंवा सरकारनें त्यांतले कोणते मानावे व कोणते मानूं नये याविषयीं विवेक सुरू झाला. याचा अर्थ रीतसर केलेले करार बजावण्याचें जें स्वातंत्र्य तें नाहींसें झालें! म्हणजे येथेंहि फिरून प्रश्न उत्पन्न झाला कीं, एका दारानें स्वतंत्रता येते व दुसऱ्या दारानें जाते तेव्हां ही स्वतंत्रतेची प्रगति कशी म्हणावी? पण ही खरोखर स्वतंत्रतेची प्रगतिच आहे. कारण जीं बंधनें पूर्वीं एकतंत्री जुलमी राजा घालीत होता, व स्वार्थाकरितां घालीत होता, तीं आतां घातलीं तरी लोकसत्ताच घालते, व त्यांचा हेतू कोणत्या एकाच वर्गाचा सांपत्तिक स्वार्थ साधून देण्यांचा नसून तीं बंधनें भूतदयेमुळें घातलीं जातात. अर्थात् भूतदयेकरतां कोणावरहि घातलेलें बंधन याला बंधन म्हणतां येत नाहीं.

## ( १९१ ) राष्ट्राला स्वातंत्र्यप्राप्ति

स्वातंत्र्याचा हक्क हा जसा कुटुंबांतील व्यक्तींना व राष्ट्रांतील कोणत्याहि वर्गाला जन्मसिद्ध असतो त्याप्रमाणें सामुदायिक रीतीनें तो प्रत्येक राष्ट्रालाहि असतो; व तो हक्क इतर म्हणजे अतिक्रमणशील राष्ट्राविरुद्ध बजावण्याचा असतो. राष्ट्रांतल्या राष्ट्रांत सत्तेचें पारडें थोडें राजाकडे झुको किंवा थोडें प्रजेकडे झुकतें असो, तो राजा व ती प्रजा ही त्याच राष्ट्राची म्हणून ताटांत सांडलें काय वाटींत सांडलें काय एकच. पण एका राष्ट्राला दुसऱ्या राष्ट्रावर अतिक्रमण करण्याचा हक्क पोंचत नाहीं, असाहि राज्यशास्त्रांतला एक सिद्धान्त आहे. या सिद्धान्ताच्या जोरावर एकोणिसाव्या शतकांत राष्ट्रीयत्त्वाची कल्पना विशेष उदयाला आली. आणि युरोपियन राष्ट्रांनीं नेपोलियन विरुद्ध, इटालीनें ऑस्ट्रियाविरुद्ध, ग्रीस वगैरे ख्रिस्ती राष्ट्रांनीं तुर्की सुलतानाविरुद्ध लढाया केल्या. तसेंच

चालू शतकांत महायुद्धानंतर स्वयंनिर्णयाच्या तत्त्वावर लहानसहान राष्ट्रांची पुनर्रचना झाली, किंवा आयर्लंडला स्वराज्य मिळालें, किंवा हिंदुस्थान स्वराज्याची मागणी करीत आहे, या सर्वांना आधार म्हणजे प्रत्येक राष्ट्राचा स्वतंत्र राहाण्याचा जन्मसिद्ध हक्क. अमेरिकेनें इंग्लंडविरुद्ध बंड केलें, किंवा कॅनडा, ऑस्ट्रेलिया वगैरे ब्रिटिश लोकांच्याच वसाहती स्वातंत्र्याचा हक्क इंग्लंडविरुद्ध पुरेपूर पदरांत पाडून घेण्याच्या खटपटींत आहेत, या ठिकाणीं वरील उदाहरणांतल्याप्रमाणें स्वकीय विरुद्ध परकीय अशा स्वरूपाचें भांडण नसून, एकाच राष्ट्रांत निरनिराळे वर्ग समानतेच्या तत्त्वावर इतरांच्या बरोबरीचे हक्क मागतात त्याप्रकारचें हें भांडण आहे. मध्यें महासागर असले तरी इंग्लंड व या वसाहती यांना परस्परांना आपण एकाच झाडाच्या खांद्या किंवा एकाच शरीराचे अवयव आहों असें वाटतें. हिंदुस्थान वगैरेंचें तसें नाहीं. आयर्लंडांत रोमन कॅथॉलिक व प्रॉटेस्टंट हा भेद तीक्ष्ण आहे. हिंदुस्थानांत तर धर्मांचें व जातींचें भांडण प्रसिद्ध आहे म्हणून आयर्लंडला व हिंदुस्थानाला तुम्ही मुळांत राष्ट्रच नाहीं, अठरा धान्यांचें कडबोळें आहां, असें म्हणून इंग्लंडनें धुडकावून लावण्याचा प्रयत्न केला. पण दक्षिण आयर्लंडांतील म्हणजे मूळच्या आयरिश राष्ट्रांतील लोकांनीं धर्मभेद विसरून जाऊन एकमुखानें स्वराज्याची मागणी केली तेव्हां इंग्लंडला ती नाकारतां आली नाहीं. आयर्लंडचें राष्ट्रीयत्व मान्यच करावें लागलें. हिंदुस्थानासंबंधानें इंग्लंड आज तोच डाव खेळत आहे. पण समजा, उद्यां हा डाव फसून हिंदु, मुसलमान, शीख, अस्पृश्य, पारशी, ख्रिश्चन हे सर्व लोक एकमुखानें स्वराज्याची मागणी करतील, तर इंग्लंडला हिंदुस्थानचें एकराष्ट्रीयत्व मान्य केल्याशिवाय गत्यंतर नाहीं. कॅनडाच्या राज्यांतील फ्रेंच व इंग्रज हे वंशानें वेगवेगळे असतांहि त्यांनीं एकराष्ट्रीयत्व सिद्ध केलें. इटली, जर्मनी, यांच्यासंबंधानेंहि परकी राजांनीं प्रथम त्यांच्या अराष्ट्रीयत्वाचीच सबब पुढें आणली होती, परंतु ती पुढें टिकली नाहीं.

### ( १०० ) स्वातंत्र्यवादाचा निष्कर्ष

वरील सर्व विवेचनावरून हें दिसून येईल कीं, राज्यसंस्थेच्या हल्लींच्या परिणत स्वरूपांत अनियमबद्ध राजसत्ता बहुतेक नष्ट होऊन समाज व व्यक्ति यांना पूर्वीपेक्षां पुष्कळ अधिक स्वातंत्र्य लाभलें आहे. मात्र स्वातंत्र्य या शब्दाचा अर्थ एकच व निश्चित नाहीं. तो परिस्थितीप्रमाणें बदलत असतो. व्यक्तिदृष्ट्या मनुष्याला मूलभूत व निसर्गसिद्ध हक्कांचेंहि स्वातंत्र्य पूर्वींच्या अनियंत्रित राजसत्तेच्या काळांत नव्हतें तें आतां त्याला अबाधित रीतीनें प्राप्त झालें आहे. पण याहून अन्यप्रतीचें त्याचें स्वातंत्र्य समाज व त्यांतील राज्यसंस्था यांच्या हक्कांनीं व कर्तव्यक्षेत्रांनीं कमी अधिक मर्यादित होत असतें. समाजहित हें व्यक्तिहितापेक्षां अधिक श्रेष्ठ मानण्याकडे जगाची आज प्रवृत्ति आहे. तथापि उलटपक्षीं ज्या कायद्यांच्या योगानें समाजहिताकरितां व्यक्तिस्वातंत्र्याला मर्यादा पडते, ते कायदे

करणें न करणें याविषयीं मत देण्याचा अधिकार बहुधा प्रत्येक राष्ट्रांतील जनतेला मिळाला आहे. यामुळें ही मर्यादा मनुष्यमात्र हा एका अर्थानें आपली आपणच घालून घेतो असें म्हणतां येतें. आणि असें झालें म्हणजे मग मनुष्याला आपल्या स्वातंत्र्याला मर्यादा पडल्याची तक्रार करितां येत नाहीं. एक गोष्ट निश्चित दिसते ती ही कीं, यापुढें जें काय बरेंवाईट होईल तें समाज आपल्या हातानें व आपल्या हिताकरितांच करील. पण आपल्याच हातानें हवें तें करून घेण्याची कल्पना निश्चित राहिली तरी हितसाधनाच्या कल्पना वरचेवर बदलणार. यामुळें समाजांतील निरनिराळे वर्ग व उपवर्ग यांच्यापैकीं केव्हां एकाला तर केव्हां दुसऱ्याला अधिक स्वातंत्र्य मिळालें किंवा अधिक बंधन पडलें असा देखावा दिसल्याशिवाय व त्यामुळें थोडासा असंतोष उत्पन्न झाल्याशिवाय केव्हांहि व कोठेंहि राहाणार नाहीं.

---

# भाग ८ वा

## स्वराज्य व सुराज्य

### ( २०१ ) स्वराज्य म्हणजे ‘ स्वयं-पाक ’

या ग्रंथाच्या प्रारंभीं राज्यशास्त्र व राज्यकला यांचें विवेचन आलेंच आहे. तेथें हेंच दर्शविलें आहे कीं, राज्यशास्त्राचें अध्ययन केलें म्हणजे त्यामुळें कोणालाहि राज्यकारभाराचें कोणतेंहि एकादें कार्य हटकून निर्दोष रीतीनें करितां येईल असें कोणीं समजूं नये. आणि जी गोष्ट एकाद्या मनुष्यव्यक्तीची तीच मनुष्यसमाजाचीहि समजावी. एकाद्या गालिचाकरितां नक्षीचा नमुना काढावयाचा असल्यास, व तो काढण्याचें काम कोणा एकाच्याच हातीं दिल्यास, तो केवळ आपल्या एकट्याच्याच मताप्रमाणें व एकच हेतू मनांत धरून तें चित्र काढील. पण शंभर स्वतंत्र माणसांचे हातीं तो नमुना तयार करण्याचें काम दिलें तर त्यांत किती गोंधळ माजेल याची कल्पना सहज करितां येते. आधुनिक काळचा राज्यकारभार हा अशाच प्रकारें शंभर माणसांच्या हातीं करण्यास दिलेला नक्षीच्या नमुन्याचा खेळ असतो. तेथें सर्वसाधारणपणें समा-

जाचें हित व सुख हा हेतु असा दिसला ( व तो तसा असतोहि ) तरी त्या शंभर माणसांच्या दोनशें हातांनीं कशा प्रकारचा कारभार निष्पन्न होईल हें हटकून कोण सांगूं शकेल ? शेवटीं बनेल तोच नमुना खरा. म्हणून राज्यकारभारांतले नमुने वाईट चांगले असें म्हणत बसण्यांत फारसा अर्थ नाहीं. राज्यकारभारांतलें सुख म्हणजे सुराज्याचें सुख हें स्वतंत्र अधिकाराच्या व स्वतंत्र बुद्धीच्या लोकसमाजानें आपल्या इच्छेला येईल त्याप्रमाणें घडवून व मानून घ्यावयाचें असतें. म्हणून त्यांतून जें कांहीं बरें वाईट निघेल तें त्याचें त्याला. जो स्वयंपाक करणारा तोच खाणारा असला म्हणजे पदार्थांना चांगले वाईट म्हणण्याचा हक्क इतरांना काय आहे ? पण त्याबरोबर हेंहि म्हटलें पाहिजे कीं, स्वतः स्वयंपाक करणारानें मात्र तो खातांना वाईट तोंड करतां कामा नये. कारण दुसऱ्यानें स्वयंपाक केला तर नांवें ठेवतां येतात. पण स्वतःच्या स्वयंपाकाकरितां तो दुसऱ्याला नांवें कशीं ठेवणार व तीं कोण ठेवूं देईल ? भाकरी कच्ची राहिली किंवा करपली तर ती ज्याची त्यालाच खावी लागणार हें ठरलेलेंच आहे. पण अशा प्रकारच्या सिद्धान्ताला कोलदांडा न म्हणतां सरळ सत्य सिद्धान्त असेंच म्हटलें पाहिजे. चांगला स्वयंपाक खावयाला मिळाला पाहिजे. मग तो कोणाच्याहि हातून मिळो, ही एक मनोभूमिका. आणि दुसरी मनोभूमिका अशी कीं शब्दशः स्वयंपाकच हवा, म्हणजे माझा मीच करून खाईन, मग तो कसा का होईना ? या दोन भूमिकांपैकीं मनुष्यानें कोणती तरी एक पसंत केली पाहिजे. मग तिनें अखेर जें काय साधेल तें साधेल व न साधेल तें न साधेल. साधेल तेंच चांगलें ठरलें तर तो पुरुषार्थाचा पराक्रम मानावा. पण बिघडेल तर तक्रार करीत बसणें हें नादानपणाचें ठरेल. आणि तें कोणीहि ऐकणार नाहीं. मुख्य दृष्टि चांगले पदार्थ खाण्याला मिळण्यावरच ठेवली असतां, एकादे वेळेला दुसऱ्याच्या हातचा स्वयंपाक खाल्ल्यानें स्वतःचे श्रम वांचतील व पदार्थहि चांगला मिळेल असा दुहेरी संभव असतो. पण तसें न होतां स्वयंपाक बिघडला तर, वाईट पदार्थ खावयाला लागावयाचा तो लागून शिवाय परावलंबित्वाची दुष्कीर्ति ! आणि बिघाडांत सांगूं तशी दुरुस्ती होण्याची खात्री नाहीं !

### ( २०१ ) जबाबदारीचें स्वराज्य

वास्तविक मनुष्याला सुराज्य हवें व स्वराज्यहि हवें. आणि वर सांगित-

लेल्या दुतर्फी अडचणी लक्षांत घेतल्या म्हणजे तो स्वराज्यच पसंत करील असें वाटतें. अर्थात् स्वतः निवड करणाराची ही गोष्ट झाली. आणि ज्याची त्यानें आपण होऊन निवड केली म्हणजे दुसऱ्याला त्यांत बोलण्याला अवकाशच उरत नाहीं. जबाबदारीचें स्वराज्य ही एकच गुरुकिल्ली अशी आहे कीं तिनें राज्यशास्त्रांतले सर्व प्रश्न सुटतात. पण मनुष्य परतंत्र झाला म्हणजे ज्या भानगडी व जीं दुःखें उत्पन्न होतात त्यांना राज्यशास्त्राच्या दृष्टीनें प्रश्नच म्हणतां येत नाहींत. राज्यकारभाराची स्वाधीनता प्राप्त झाल्यावर जे उत्पन्न होतील तेच खरे प्रश्न. आणि त्या प्रश्नांचें उत्तर एकच. लोकांनीं आपल्या स्वतंत्र इच्छेनें राज्यकारभाराचा जो नमुना पसंत केला व ज्यांत त्यांनीं समाधान मानलें आणि जबाबदारीचे सर्व परिणाम आनंदानें स्वीकारले, तो नमुना, ती राज्यघटना उत्तम. मात्र त्या लोकांकरतां ती उत्तम हें खरें. कारण उत्तम हा शब्दच असा आहे कीं तो निरपेक्ष रीतीनें लावतांच येत नाहीं. त्याचा उपयोग नेहमीं सापेक्ष रीतीनेंच केला पाहिजे. अमुक राज्यघटना किंवा राज्यकारभाराचा अमुक नमुना हाच सर्वोत्कृष्ट आहे हा वाद घालीत बसणें हा मूर्खपणा होय. कारण जें आनंदानें स्वीकारलें तेंच चांगलें. चांगलें म्हणजे ज्याचें त्याला चांगलें. सगळ्या जगाला चांगलें असें नाहीं. जगांतलें सुख-दुःख, चांगलेपणा वाईटपणा हें ठरविण्याचा जर एकच छाप ईश्वरानें अमलांत ठेवला असता तर नीतिशास्त्र किंवा आचारविषयक तत्त्वज्ञान हें जन्मालाच आलें नसतें. ठराविक शिक्क्याचें माप सरकारी बाजारांत असेल, पण ईश्वर-निर्मित संस्कृतीच्या बाजारांत नाहीं. तेथें बिनशिक्क्याच्या मापाच्या राशीच्या राशी पडलेल्या असतात. आणि सवद्याचा माल व त्याचा दरदाम यांत जशी दुकानदार व गिऱ्हाईक यांची एकवाक्यता व्हावयाची, तशीच ती वजनामापा-संबंधानेंहि होण्याची असते. आपल्या शक्तीनें मिळवूं तें स्वराज्य व आपल्या हातानें पदरांत पाडून घेऊं तें सुराज्य अशा चालचलाऊ व्यावहारिक व्याख्या केल्याशिवाय राजकीय व्यवहारच काय पण राजकीय तत्त्वज्ञानहि निभावणार नाहीं. एरवीं निरपेक्ष व निश्चित अशी म्हणून कोणतीहि बाब सांगितली तरी तिच्यावर हटकून आक्षेप व अपवाद घेऊन दाखवितां येतात. मागें एके ठिकाणीं आम्हीं राज्यघटनेच्या नमुन्याचीं सात आठ नांवें दिलीं आहेत. पण इतिहासानें अशी मौज केली आहे कीं हे सर्व नमुने उत्कृष्ट म्हणून एकेकाळीं

लोकसमाजानें स्वीकारले, व दुसऱ्या काळीं म्हणजे कालांतरानें तेच नमुने लोकनिंदित व त्याज्य ठरले !

## ( २०३ ) क्रिया व प्रतिक्रिया हेंच जीवन

जुन्या चित्रपद्धतीप्रमाणें देवता व सत्पुरुष यांच्या मुखाभोंवतीं एक प्रकारचें तेजोवलय दाखविण्याची रीत असे. तें अर्थात् शुभ्र रंगाचें वलय असे. पण राज्यघटनांचे जे सात आठ प्रकार वर सांगितले त्यांपैकीं प्रत्येकाच्या ऐतिहासिक आकृतिचित्रांत त्याच्या मुखाभोंवतीं एकेक रंगवलय दिसून येतें. मात्र तें शुभ्र रंगाचें नसून काळ्या रंगाचें असतें ! क्रियेबरोबरच तिची प्रतिक्रिया जन्मते असें म्हणतात तें कांहीं खोटें नाहीं. आणि या क्रिया–प्रतिक्रियांचें आंदोलन म्हणजेच जगाचें जीवन होय. मग त्या जीवनाचें कोणतेंहि अंग घ्या. हरबर्ट स्पेन्सर यानें 'Life is Rhythm' अशी जीवनाची व्याख्या केली आहे. आणि कोठेंहि चिच्छक्ति प्रगट होते ती दुहेरी तालबद्ध ठोक्यांनींच प्रगट होते असा अनुभव पाहिला म्हणजे स्पेन्सरची ही व्याख्या पुष्कळ अंशीं समर्पक आहे असें वाटतें. शरीरांतील काळजाचे ठोके, नाडीचे ठोके, व रुधिराभिसरणाचें स्पंदन या गोष्टी आहेत तोंपर्यंतच जीवन आहे. तसेंच कोणतेंहि यंत्र घेतलें तरी एक क्रिया सुलट व दुसरी क्रिया उलट अशा पद्धतीनेंच त्यांतील भागांची रचना केलेली आढळते. मग राज्यशास्त्रांत राज्यसंस्थेच्या जीवनाचीहि तीच व्याख्या कां मानूं नये ? एरवीं, कोणचीहि एक राज्यपद्धति चांगली म्हणून एकदां लोकांना पटली म्हणजे मग तीच सतत अखंड चालू कां न राहावी ? आणि तीच तशी चालूं राहात नाहीं याला परतंत्र परिस्थिति ही जशी कारणीभूत होते, तशी स्वतंत्र अशा समजल्या जाणाऱ्या स्थितींतहि तशींच कारणें उत्पन्न होतात. आपण गादीवर निजलों असतां दुसऱ्या कोणाला ती हवी झाली म्हणून त्यानें आपल्याला उचलून फेंकून दिलें तर तें पराधीन कारण म्हणतां येईल. पण आपण आपल्याच हातानें तयार केलेल्या बिछान्यावर उजव्या कुशीला निजलों असतां कांहीं वेळानें आपण होऊनच डाव्या कुशीला वळतों, या परिवर्तनाला स्वाधीन समजल्या जाणाऱ्या स्थितींतलेंच कांहीं कारण असत नाहीं काय ? आणि तें कारण अगदीं सोप्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे

ज्या कुशीवर निजलों ती कूस आपलीच, आणि भारावतें तें अंगहि आपलेंच. असें असतां इच्छाशक्तीला हें भारावणें काढून कां टाकतां येऊं नये ? तसें झालें तर एका कुशीवरून दुसऱ्या कुशीवर वळण्याचे श्रम वांचणार नाहींत काय ? व झालेल्या या परिवर्तनांत गर्भित असलेली वस्तुनिंदा वांचणार नाहीं काय ? पण याचें उत्तर स्पेन्सरनें दिलेल्या जीवनाच्या व्याख्येला अनुसरूनच दिलें म्हणजे झालें.

## ( २०४ ) इतिहास तींच साक्ष देतो

राजसत्ता, लोकसत्ता, व या दोहोंचे मिळून निरनिराळ्या प्रमाणांत बनलेले मिश्र प्रकार, यांचें अखंड परिवर्तनच इतिहासांत दिसून येतें, आणि राज्यशास्त्र हें कल्पनेपेक्षां इतिहासाच्या दुर्बिणींतून किंवा चष्म्यांतूनच पाहिलें पाहिजे असें जें मत या ग्रंथाच्या प्रास्ताविक भागांत आम्हीं दर्शविलें आहे तें याचकरितां. जे एकतंत्री राज्यसत्तेचे भोक्ते म्हणून दिसावे त्यांचीं खरीं मतें पाहिलीं तर तीं लोकसत्तेकडे झुकणारीं. आणि जे तोंडानें लोकशाहीचा पुकारा करणारे दिसतात ते प्रत्यक्ष कृतींत सर्वसत्ता आपल्या हातीं ठेवण्याची पराकाष्ठा करतात. नेपोलियन बोनापार्ट हा जुलमी एकतंत्री बादशाहा वाटतो. परंतु त्याच्याच राज्यांत फ्रान्समध्यें अशा कांहीं पांच चार संस्था निर्माण झाल्या, म्हणजे त्यानें होऊन निर्माण केल्या कीं, लोकसत्तेचीं बीजें त्यांत रुजलीं तींच पुढें फळाला आलीं. उलट फ्रेंच राज्यक्रांतीचा एक विधाता अशी पदवी ज्याला देण्यांत येते तो व्हॉलटेअरच लोकसत्ताक राज्यासंबंधानें काय म्हणतो तें ऐका. तो म्हणतोः– " राज्यसत्ताप्रकारांची चिकित्सा फोल ठरते. सत्ता लोकांच्या हातीं असावी हें तत्त्वदृष्ट्या ठीक आहे. पण लोकसत्तेमुळेंच राजकीय पक्ष संभवतात, व त्यांच्या योगानें प्रत्यक्ष यादवीच न जुंपली तरी राष्ट्रीय एकतानता बिघडते. गरीब व लहानशा क्षेत्रमर्यादेंतील लोकांना लोकसत्ताक घटना चांगली. पण सामान्यतः बोलावयाचें तर मनुष्य आपलें राज्य आपण करण्याला बहुधा अपात्रच असतो! राजशाही बरी कीं लोकशाही बरी असें मला विचाराल तर मी म्हणेन कीं आज चार हजार वर्षे या प्रश्नावर वाद सुरू आहे. श्रीमंतांना विचारा कीं ते म्हणतील राज्य हें शिष्टतंत्र असावें; कारण श्रीमंत थोडे असतात व तेच शिष्ट होऊन बसतात. बरें, सामान्य लोकांना विचारा. ते म्हणतील समाजांतील प्रत्येकाचे हातीं राज्यसत्ता सारखी वांटून गेली पाहिजे. आणि राजांना

विचारा म्हणजे त्यांचें उत्तर ठरलेलें कीं एकतंत्र राज्यपद्धति हीच सर्वोत्कृष्ट. आणि तें खरें असावें असें जवळजवळ दिसतेंहि. कारण एरवीं सगळ्या जगभर राज्यें राजसत्ताकच कशीं ? उंदरांना मांजराच्या गळ्यांत घांट बांधावीशी वाटते खरी. पण त्यांना ती बांधतां येईल तर ! गरीब मनुष्याला विचारून पाहावें म्हणजे तोच खरें उत्तर देतो. तो म्हणतो, " मी पडलों गरीब निर्बळ. मला कोणी प्रबळानें खाऊन टाकूं नये इतकीच माझी इच्छा. सिंहानें माझा एकच घास केला काय किंवा शंभर उंदरांनीं मला कुरतडून खाल्लें काय ! मी मेलों हेंच खरें कीं नाहीं ! तात्पर्य, मला कोणीहि जगवो. मग तो राजा असो नाहींतर माझेच लोक असोत. "

## ( २०५ ) चांगलें व वाईट ? कीं स्थिर व चंचल ?

जगांत आज लोकसत्तेशिवाय दुसरा शब्द ऐकूं येत नाहीं. पण हा राजसत्तेविरुद्ध प्रतिक्रियेचा काल आहे येवढें लक्षांत ठेवलें म्हणजे पुर. समाजाचें जें भांडें आज हजारों वर्षें राजसत्तेच्या तापानें तापलें तें हल्लीं निवत चाललें आहे. अशा वेळीं लोकसत्तेच्या स्तुतीचे शीतल वारे सहजच उपयोगी पडतात. पण ज्याला आपण प्रजासत्ताक राज्यघटनेचा उत्तम नमुना आज मानतों तोच भविष्यकाळीं उत्तम ठरेल असा नियम नाहीं. म्हणून राज्यशास्त्राच्या दृष्टीनें वस्तूंचे विभाग चांगले व वाईट असे न पाडतां, स्थिर व चल असे भाग पाडले पाहिजेत; पैकीं स्वतःकरितां व स्वकीयांकरितां सुख व स्वातंत्र्य यांची मनुष्याची इच्छा ही स्थिर व अचल गोष्ट समजावी. हें त्याचें ध्येय हजारों वर्षांच्या इतिहासांत टिकलेलें दिसून आलें आहे, व हें आपलें ध्येय पुढेंहि केव्हां तो बदलील अशी कल्पना करवत नाहीं. मग काळाच्या उदरांत काय असेल तें खरें ! पण हें ध्येय सफल होण्याचीं साधनें मात्र नुसतीं चलच नव्हेत तर चंचलहि आहेत. म्हणून भविष्यकाळीं तीं कोणतीं अनुभवास येतील हें काय सांगावें ! एका बाजूनें समाज विस्कळित होत आहे तर दुसऱ्या बाजूनें तो संघटित होत आहे तेव्हां त्याचें स्थिर लक्षण कोणतें म्हणावें ! साहाराच्या मैदानांत वाळूचे ढीग एका ठिकाणाहून उचलून ते दुसऱ्या ठिकाणीं व दुसऱ्या आकाराचे घालण्याचें काम वारा नित्य करीत असतो. तसेंच सिंधु व गंगा या नद्या आज या तीराला तर उद्यां त्या तीराला वाहतांना दिसतात. राज्यसत्ताभिलाषी, स्वातंत्र्याभिलाषी, व सुखाभिलाषी मनुष्यव्यक्ति व समाज

यांची इच्छा व प्रयत्न असेच खेळ आजवर खेळत आले आहेत व पुढेंहि खेळत राहतील.

## (२०६) सत्ताबदल ही सुखाची जामीनकी नव्हे

रामराज्याचें सुवर्ण युगाचें चित्र अर्थातच पुष्कळसें कल्पनाशक्तीनें व दैदीप्य-भावनेच्या रंगानें काढलेलें. तें सर्वस्वीं सर्व ठिकाणीं अनुभवाला येणें शक्य नसतें, व आज तर नाहींच नाहीं, हें कोणीहि कबूल करील. जुन्या काळीं झालें तरी तें चित्र सर्व ठिकाणीं सारखेंच लागू पडणारें होतें असेंहि नाहीं. कारण ज्या पहिल्या राजाला राजा बनवून ब्रह्मदेवानें अराजकता मोडली, व बृहस्पतिनीति शुक्रनीति अशासारखे उत्कृष्ट राजनीतीचे ग्रंथ त्याच्या हातीं देऊन सुराज्य प्रवृत्त केलें, त्याचाच नातु वेन राजा हा जुलमी ठरून प्रजेनें त्याचा वध केला. तेव्हां आतां जुन्या काळचा म्हणून तरी विश्वास काय धरावा ! किंवा त्याचे गोडवे गावे ! सूर्यवंशांतील राजे झाले म्हणून ते एकसारखे एक सर्वच तेजस्वी असे झाले नाहींत. किंवा आपल्या राज्यांतील कोना-कोपऱ्यांत सूर्यकिरणाप्रमाणें शिरून, अनीति अन्याय दुःखें हीं पाहून त्यांनीं त्यांचें निवारण केलेलें नाहीं. किंवा चंद्रवंशांतील राजे झाले म्हणून, त्यांचाहि कारभार एकजात प्रजेला शीतल झाला असें तरी कोठें आहे ? वेन राजा रामचंद्रापूर्वीं होऊन गेला. कालिदासानें रघुवंशाच्या शेवटल्या सर्गात वर्णन केलेला रघुवंशांतील अग्निवर्ण राजा हा रामचंद्रापासून कितीशा पिढ्यांनीं दूर होता ! किंबहुना खोखोच्या खेळांतील गड्याप्रमाणें चांगले व वाईट राजे एका शेजारीं एक पण एकमेकांच्या उलट दिशेकडे तोंड करून बसलेले सगळ्या इतिहासांत आढळतात. त्यांत कोणा राष्ट्राला वंदावयाला नको व कोणाला निंदावयाला नको ! कारण मनुष्यस्वभावच तसा आहे. जें कुटुंबांत घडतें तेंच राज्यसंस्थेंत घडतें. पण आतां दिवसेंदिवस राजा नाहींसा होत चालला आहे. रोज उठून ऐकावें तों एखाद्या नव्या प्रजासत्ताक राज्याची वार्ता कानीं पडते. चीन, जर्मनी, ऑस्ट्रेलिया, रशिया, टर्की, ग्रीस, पोर्तुगल, स्पेन या देशांतल्या राज्यक्रान्त्या अगदीं तुमच्या आमच्या डोळ्यांदेखतच झाल्या नाहींत काय ? तेव्हां आतां आपण असेंच घेऊन चाललें पाहिजे कीं, राजसत्तेचें युग संपलें व प्रजासत्तेचें युग आलें. पण तेथेंहि पुनः हाच प्रश्न उद्भवल्याशिवाय राहात नाहीं. तो असा कीं, एकतंत्री राजा जाऊन त्याच्या ठिकाणीं रिप-

बिलक व त्याचा लोकनियुक्त अध्यक्ष हे आले तरी सुराज्य पूर्णपणें पदरांत पडलें काय ? जेथें प्रजासत्ताक राज्य जुनें होतें किंवा नवीन झालें, तेथें तरी प्रजा सर्वस्वीं आपल्या अधिकारी मंडळावर खूष असून तिला सुराज्याबद्दल सर्टिफिकेट देत आहे काय ? जबाबदारीचें तत्त्व अंमलांत आलें तरी ती जबाबदारी कितपत खरोखर अंमलांत येते ? जुन्याकाळीं राजे लोकांचे हस्तक होऊन प्रधानानें जुलूम केला तर त्याचा इन्साफ करण्याचा हक्क बजावून, प्रजा प्रधानाचा शिरच्छेद करीत असे त्याप्रमाणें, आज एका तरी प्रधानमंडळाला, निदान त्यांतल्यात्यांत एखाद्याला तरी इनसाफ करून फांशी दिल्याचें किंवा तुरुंगांत टाकल्याचें उदाहरण आहे काय ?

### ( २०७ ) जबाबदारीचें राज्य म्हटलें तरी तेंच

हल्लींच्या जबाबदारीचा अर्थ फार सौम्य व सोज्वल झालेला नाहीं काय ? सुरपाटाच्या खेळांत गडी मारला तर त्याच्या पाठींत रपाटा तरी बसतो. पदच्युत होणाऱ्या मुख्य प्रधानाला आज इतकेंहि दुःख किंवा लाज वाटत नाहीं ! " इन अँड आऊट " म्हणजे " पदारूढ व्हावें, पदच्युत व्हावें " हा नव्यायुगांतल्या राजकारणांत एक खेळच होऊन बसल्यासारखा झाला आहे. कारण पदच्युत झालेले प्रधान लगेच समोरच्या म्हणजे विरोधकांच्या बाकांवर खुशाल जाऊन बसतात. आणि त्यांना मनांत असें घेऊन चालतां येतें कीं, प्रधानमंडळाची क्रान्ति हा नुसता लंबकाचा खेळ आहे. हलता लंबक एका टोंकाला गेला कीं, कांहीं काळानें तो दुसऱ्या टोंकाला जाणारच. प्रधानमंडळांत बसलें म्हणजे ओठ आवळून, खिशांत हात घालून, गंभीर चेहरा करून, जबाबदारीच्या ओझ्यानें मान वांकून ती आतां मोडते असें भासवित लचकत लचकत भाषणें करावीं ! आणि विरोधकांच्या बाकांवर जाऊन बसलें म्हणजे तोंडाचा पट्टा मोकळा सोडावा, बाष्कळपणाचा हास्यविनोद करावा, तोंडाला येतील त्या कोट्या प्रतिकोट्या कराव्या, आणि प्रधानमंडळ एखादें वेळीं जुनेंच धोरण अमलांत आणित असतांहि " देश बुडाला, लोक बुडाले " अशी हाकाटी करावी, व्यक्तिशः कांहीं प्रसाद खिशांत पडला तर तो घ्यावा, व एक ट्रेन चुकली तर तिच्या मागोमाग हटकून येणाऱ्या दुसऱ्या लोकल ट्रेनमध्यें उडी मारून बसण्याकरितां प्रवासी हातांत बॅग घेऊन प्लॅटफॉर्मवर उभा राहतो त्याप्रमाणें, प्रधानमंडळांत शिरण्याकरितां फिरून येणाऱ्या सुवर्णसंधीची वाट पहावी !

## ( २०८ ) ईश्वराकडे मागण्याचा खरा वर

सांगण्याचें तात्पर्य इतकेंच कीं, पूर्वी एकतंत्री राजे झाले म्हणून त्यांच्या-पैकीं कोणालाहि आपल्या देशाची, आपल्या लोकांची भक्ति नव्हती असें नाहीं. किंवा जुन्या काळच्या एकतंत्री राजाचा प्रधान होणारा प्रत्येक मनुष्य आपमतलबी व देशबुडव्या होता, त्याला राष्ट्राभिमान मुळींच नव्हता, असें खरोखर म्हणतां येत नाहीं. आणि आज जरी राज्यसंस्थेचें नांव बदलून तिच्या डोक्यावर डेमॉक्रसीचें 'लोकसत्ते'चें लेबल लागलें असलें तरी, जुने दुर्गुण जाऊन अध्यक्ष व प्रधानमंडळ यांच्या अंगीं कांहीं अलौकिक दिव्य गुण स्वर्गांतून उतरले आहेत असेंहि म्हणण्याचें कारण नाहीं. फरक झाला असेल तर तो इतकाच कीं पूर्वी आपल्या हातांत सत्ता नव्हती, आपल्याला राज्य-कारभारांत कांहीं बोलण्याची संधि नव्हती, अशी तक्रार लोकांना यथार्थपणें करितां येत असे ती हल्लीं जाऊन "ईश्वरा चूक होणारच तर ती माझी मलाच करण्याची संधि दे" असा वर मागून घेतल्याप्रमाणें, दुसऱ्याच्या ऐवजीं लोक आपल्या चुका आपणच करूं लागले आहेत. तसें नसतें तर राज्यक्रान्ति झाल्याबरोबर, म्हणजे राजा जाऊन त्याच्या जागीं रिपब्लिकचा अध्यक्ष आल्याबरोबर, राज्यव्यवस्थेचें रूप एकदम बदलावयाला पाहिजे होतें ! पण तसें घडल्याचें कोठेंहि दिसत नाहीं. म्हणून नव्या लोकशाहीचें म्हणणें जें पटण्यासारखें आहे तें इतकेंच कीं, "होय ! चूकच कां होईना ! पण ती करण्याचें श्रेय आमचें आम्हांला मिळूं दे. चुकाच व्हावयाच्या व कुराज्य गांजणारच, तर तें आमचें आमच्या हातानें तरी घडूं दे ! तोहि एक हक्कच आहे ! आणि तो हक्क, आत्मस्वातंत्र्याचा अनुभव व जन्मसिद्ध हक्काची फलश्रुति या नात्यानें आम्ही बजावूं इच्छितों. आमच्या अंगांत कर्तृत्व असेल किंवा आमच्या नशिबीं असेल तितकें सुराज्य आमच्या पदरांत पडेल. पण उगाच जन्मभर असंतुष्ट राहून लोकांनाच नांवें ठेवीत बसावयाचें, त्यापेक्षां आपलीं आपल्यालाच नांवें ठेवून घ्यावीं लागलीं तर त्यापासून मनाला कांहीं बोध तरी मिळेल. आणि उठल्या सुटल्या परनिंदा करणाऱ्या बेजबाबदार जिभेला थोडा तरी आळा पडेल."

## ( २०९ ) जबाबदारीचा खरा अर्थ

अशा प्रकारचा प्रांजल व मर्दपणाचा युक्तिवाद जे लोकशाहीचे प्रतिनिधी व

वकील करितात त्यांना मानच दिलाच पाहिजे. आणि त्यांच्या म्हणण्याविरुद्ध कांहीं आक्षेप घेतां येण्यासारखा नाहीं. आपल्या कृत्याची जबाबदारी आपण घेणें म्हणजे चांगल्याबरोबर वाईट फळाचा स्वीकार करण्याची तयारी ठेवणें हीच खरी जबाबदारी. राजबंधनें पूर्वीच्या राजांच्या जुलमापेक्षां वेगळ्या रीतीनें व्यक्तीवर अधिकाधिक जखडून बांधलीं जाऊं लागलीं, अशा स्थितींत व्यक्तिस्वातंत्र्याचा जो विकास हल्लींच्या युगांत होत आहे, त्याला वरील प्रकारचा प्रांजल व मर्दपणाचा युक्तिवाद शोभण्यासारखा आहे. बरें, हल्लींच्या लोकसत्तेच्या काळांत विभूतिपूजा सर्वस्वीं लोपली आहे असेंहि नाहीं. जुन्या काळीं जसें विभूतिपूजेच्या बुद्धीनें लोक राजाकडे पाहून त्याचा हुकूम मानणें यालाच राजभक्ति किंवा राजनिष्ठा हा भावनेला गोंजारणारा शब्द लावून, मिळेल त्या सुखांत कालक्रमणा करीत असत, त्याप्रमाणें आजच्या लोकसत्तेच्या काळांतहि ‘ डिक्टेटर ’ उत्पन्न होतच आहेत व लोक त्यांना भजतच आहेत. ग्रीसचा व्हेनिझेलॉस, इटलीचा मुसोलिनी, जर्मनीचा हिटलर, स्पेनचा प्रायमो डी रीव्हेरा, इंग्लंडचा ऑलिव्हर क्रॉम्वेल, फार काय पण आजहि हिंदुस्थानचे महात्मा गांधी, हे डिक्टेटर म्हणजे एका अर्थी राजापेक्षांहि मान्य होऊन राहिलेले पुढारी हे विभूतिपूजेशिवाय डिक्टेटर झाले काय ! तेव्हां मनुष्याच्या स्वभावांतील आत्मस्वातंत्र्याची बुद्धि जितकी खरी तितकी त्याची विभूतिपूजेची भावनाहि अजून खरी आहे. या दोहोंचा खेळ अगदीं सरमिसळ चाललेला असून, मनुष्य “ मी करितों तेंच बरोबर करीत आहें ” असें म्हणेल, तेव्हां “ होय बाबा, तेंच खरें ” असें नुसतें म्हणून गप्प बसणें भाग आहे. एरवीं लोकसत्ता प्रवृत्त झाली म्हणून, त्या प्रमाणानें प्रजेचा संतोष किंवा प्रजेला मिळणारें सुराज्यसुख वाढलें असें म्हणवत नाहीं.

## ( २१० ) राज्यशास्त्रांतली नीति

असो. शेवटीं एकाच गोष्टीचा विचार करावयाचा उरला तो करून हें प्रकरण संपवूं. राजकीयदृष्ट्या समाजांतील व्यक्तीच्या वर्तनाचा विचार करावयाचा असतां त्याला नीतिशास्त्र किंवा अध्यात्मशास्त्र यांची कसोटी लावितां येत नाहीं. कारण मनुष्य हा मुख्यतः स्वार्थी असतो. म्हणून त्याचें कार्याकार्य ठरवितांना त्याच्या दृष्टीनेंच बहुधा पहावें लागतें. त्याच्या या ‘ कर्तव्य ’ क्षेत्रांत अध्यात्मशास्त्रांतला परमार्थ येऊंच शकत नाहीं. निदान तो परमार्थ दृष्टीनें,

धार्मिक दृष्टीनें, जें करील त्याचा संबंध समाजाच्या राजकीय व्यवस्थेशीं येत नाहीं. त्याच्या कर्तव्यक्षेत्रांत परार्थ हा मात्र येऊं शकतो. पण तोहि निवळ परोपकारबुद्धीनें नव्हे, तर स्वार्थसाधक परार्थ म्हणून. त्याचें कर्तव्य ठरवितांना एका बाजूला स्वार्थाची प्रेरक शक्ति, व दुसऱ्या बाजूला समाजांतील इतर व्यक्तींचा तशाच प्रकरचा स्वार्थ न दुखविण्याविषयीं त्याजवर असलेल्या नियंत्रणाची शक्ति, या दोन शक्तींचा छेद कोठें कसा पडतो एवढेंच पहावयाचें असतें. अध्यात्म्याच्या दृष्टीनें परमार्थ हें ध्येय म्हणून उल्लेखितां येतें. पण राजकीय समाजांतील मनुष्याच्या कर्तव्याचा विचार करितांना त्या ध्येयाची गरजच नसते. त्यानें आपलें कर्तव्य समाजांतील इतर लोकांच्या संबंधांत निपरवाद रीतीनें केलें म्हणजे तो कृतकृत्य झाला असें म्हणावें लागतें.

## ( २११ ) चांगल्यावाईट नागरिकांच्या प्रति

भर्तृहरीनें एका सुप्रसिद्ध श्लोकांत चांगल्या वाईट मनुष्यांच्या प्रति लावून वर्णन केल्या आहेत. " एते सत्पुरुषाः परार्थघटकाः " इत्यादि हा तो श्लोक होय. त्यांत तो म्हणतो कीं, " आपला फायदा टाकून देऊनहि जो लोकांचें कल्याण करतो अथवा हित साधितो त्याची प्रत पहिली. त्याला सत्पुरुष असें म्हणावें. लोकांसाठीं झटणारा, पण त्याबरोबर स्वार्थ न सोडणारा, या मनुष्याची प्रत दुसरी. त्याला सामान्य म्हणावें. आपल्या फायद्यासाठीं लोकांचें नुकसान करणारा मनुष्य याची पायरी तिसरी. त्याला राक्षस असें म्हणतां येईल. पण स्वतःचा फायदा नसतांहि दुसऱ्याचें नुकसान करणाऱ्या मनुष्याची प्रत चौथी; व भर्तृहरि म्हणतो त्या मनुष्याला काय म्हणावें हें मला समजत नाहीं ! " कदाचित् त्याला राक्षसाधम असें म्हणतां येईल. पण ' राजकीय ' समाजांतील मनुष्यानें पहिल्या कोटींत पडावें अशी कोणीहि अपेक्षा करीत नाहीं. आतां असे कांहीं लोक राजकीय समाजांतहि असतात कीं ते स्वतःचें नुकसान करून समाजाचा फायदा करून देतात, व त्याकरितां लोकहि त्यांची देशभक्तांत व राजकीय सत्पुरुषांत गणना करितात हें वेगळें. पण अशा प्रकारची अलौकिक विधायक देशभक्ति करणें हें राजकीय समाजांतील मनुष्याचें ' कर्तव्य आहे ! ' अशी भाषा कोणी वापरीत नाहीं. कारण तशी समजूतच नाहीं. तसेंच चौथ्या प्रतीच्या म्हणजे राक्षसाधम मनुष्यालाही राजकीय समाजाच्या नीतिशास्त्रांत स्थान नाहीं. कारण दुसऱ्याचें नुकसान

केल्याबद्दल त्याला शासन होईल; व तेंहि निरर्थक केलें म्हणून कदाचित् थोडें अधिकच शासन होईल. राहतां राहिले मधले दोन वर्ग. त्यांपैकीं स्वार्थां-करितां दुसऱ्याचें नुकसान करणाऱ्या तिसऱ्या कोटींतल्या मनुष्यासंबंधानें मात्र एकदम निर्णय देतां येणार नाहीं. कारण त्यानें इतर कोणाचें नुकसान केलें हें खरें असेल पण स्वतःच्या कायदेशीर व न्यायाचा स्वार्थ साधण्याकरितां केलें असेल, आणि तो साधतांना जर आपाततः त्याच्या हातून तें नुकसान घडलें असेल, तर येथें सूक्ष्म धर्मांचा विचार अर्थातच उत्पन्न होईल. कारण स्वार्थ-संरक्षणाची योग्य मर्यादा कोठें संपते हें ठरलें म्हणजे मग, त्यापलीकडे गेल्यानें त्याच्या हातून इतरांचें जें नुकसान झालें असेल त्याबद्दल त्याला शासन भोगावें लागेल. त्या मर्यादेच्या आंत दुसऱ्याच्या हिताला अपाय करण्या-सारखी गोष्ट त्याच्या हातून घडली तरी त्याबद्दल त्याला शासन होणार नाहीं. त्याच्यावर जें नियंत्रण समाजानें किंवा कायद्यानें घातलेलें असतें तें "कोण-च्याहि स्थितींत दुसऱ्याचें नुकसान करूं नये" अशा स्वरूपाचें नसतें, तर "स्वार्थ–संरक्षणाची योग्य मर्यादा उल्लंघून त्यानें दुसऱ्याचें अनहित करूं नये" यावरच ती नियंत्रणाची मर्यादा पडते. राहतां राहिला दुसऱ्या कोटींतला 'सामान्य' म्हटलेला मनुष्य. म्हणजे जो स्वतःचा स्थार्थ न सोडतां त्यांतल्या त्यांत होईल तें लोकांचेंहि हित साधितो. अस्सल नीतिशास्त्र हें मनुष्याच्या कृत्यांचें परीक्षण हेतुमूलक दृष्टीनें करणारें असल्यामुळें, अशा दुटप्पी माण-साच्या वर्तनाला तें मोठेंसें सर्टिफिकेट देणार नाहीं. कारण या शास्त्राच्या मतें तेंच कृत्य सत्कृत्य ठरेल, कीं ज्यांत मुळामध्यें निस्वार्थीपणाच आहे. नीतिशास्त्राचा कटाक्षच तसा असतो.

## ( २१२ ) राजकीय कर्मयोगशास्त्र

पण राजकीय कर्मयोगशास्त्र हें नीतिशास्त्राइतकें कडक नाहीं. कारण तें आपले सिद्धान्त निस्वार्थीपणावर उभारीत नाहीं, तर स्वार्थ आणि परार्थ हीं दोन्हीं तत्त्वें स्वीकारूनच त्यांच्या तारतम्यानें कर्माकर्मांचे सिद्धान्त तें सांगतें. तात्त्विकदृष्ट्या परार्थसाधन हेंच श्रेष्ठ प्रतीचें ध्येय असेल. परंतु राजकीय समाजाच्या व्यवहारांत परमावधीची शुद्ध नीति कोणती हें न पाहतां, एका-सारख्या दुसऱ्या माणसानें सामान्यपणें कसें वागावें इतकेंच पाहणें असतें. या जगांत राहणाऱ्या सामान्य मनुष्याला इतर लोकांप्रमाणें स्वतःला ऐहिक

समृद्धि व ऐश्वर्य प्राप्त करून घेण्याची आवश्यकता असते, व ती मिळविण्याचा नैतिक हक्कहि त्याला असतो. म्हणून राजकीय समाजांत परम साध्य कोणतें या प्रश्नाचें उत्तर "स्वार्थाबरोबर साधणारा परार्थ" हेंच होय. म्हणून शहाणा स्वार्थ, दूरदर्शी स्वार्थ, सात्त्विक स्वार्थ हा राज्यशास्त्रांतील व्यक्तिधर्मांत ग्राह्य ठरतो. आत्मौपम्य बुद्धीनें जें आपणांला प्रिय व हितकर तेंच समाजांतील इतरांनाहि असणारच अशी बुद्धि ठेवून मनुष्य वागला तर ठीकच. त्याच्या हातून परहिताचा नाश होणार नाहीं, व राजसत्तेनें त्याला नियंत्रण घालण्याचा प्रसंग येणार नाहीं. पण त्याच्या ठिकाणीं आत्मौपम्य बुद्धि प्रगट झाली नाहीं, तरी व्यावहारिक समाजशास्त्राच्या दृष्टीनें त्याला नांव ठेवतां येत नाहीं व सरकारला त्याला नियंत्रण घालतां येत नाहीं. फक्त त्याच्या स्वार्थबुद्धीनें नंगानाच घालून त्याजकडून इतरांचें नुकसान न करविलें म्हणजे झालें. "मी मेलों तरी चालेल, पण स्वार्थाकरितां मी दुसऱ्याला मारणार नाहीं" ही गीतेंतल्या पहिल्या अध्यायांतल्या अर्जुनाची उंची भाषा मनुष्यानें बोलावी, किंवा तितक्या उच्च भावनेनें वागावें, अशी समाजशास्त्राची किंवा राज्यशास्त्राची अपेक्षाच नसते. फक्त स्वहितसंरक्षण व परहितनाश याचा छेद जेथें पडतो त्याच्या पलीकडे त्यानें पाऊल टाकलें कीं नाहीं इतकेंच पाहणें असतें. "मीं लोकांचा घात केला तर लोकहि माझा घात करतील" या कल्पनेनें तो नीट वागला तरी चालेल. दुसऱ्याविषयीं प्रेम नसलें तरी स्वार्थमूलक भीतीनेंहि तो मर्यादेंत राहिला तरी काम झालें. त्याच्यावर वेगळें नियंत्रण घालण्याचें कारण सरकारला उरत नाहीं. आणि अशा रीतीनें जो तो वागूं लागला म्हणजे, व प्रत्येकानें आपलें हित अशा निरपवाद रीतीनें साधलें म्हणजे, समाजांतील पुष्कळांचें पुष्कळ हित आपोआपच सिद्ध होण्यास मदत होते. याप्रकारें व्यक्तीचें व समाजाचें हित साधलेलें पाहणें इतकेंच राज्यशास्त्राचें कार्य आहे. अर्थात् त्याला कोणी पहिल्या प्रतीचें नीतिशास्त्र म्हणणार नाहीं. परंतु राज्यशास्त्रांत हें मर्यादित व्यावहारिक नीतिशास्त्रच पुरें असतें. आणि राष्ट्रांतील कायदे आणि राज्यसत्ता हीं हें व्यावहारिक नीतिशास्त्र पदरांत पडण्यापुरताच खटाटोप करितात.

---

# परिशिष्ट १

## जुन्या हिंदु समाजांतील राजधर्म व प्रजाधर्म

प्रस्तुत पुस्तकांत राज्यसंस्थाविषयीं निरनिराळ्या अंगांनीं विवेचन केलें आहे; व तें करितांना, अवश्य तेथें, हिंदुस्थानांतील राज्यसंस्थांचा उल्लेख मधून मधून केला आहे. तथापि, हिंदुस्थानांतील राज्यसंस्था व समाजरचना, आणि इतर देशांतील राज्यसंस्था व समाजरचना, यांच्यामध्यें कांहीं कांहीं बाबतींत फरक आहे. म्हणून या परिशिष्टांत जुन्या हिंदु लोकांच्या राजकीय कल्पना व संस्था यांच्या इतिहासाचें अगदीं थोडक्यांत दिग्दर्शन करण्याचें योजिलें आहे.

ऋग्वेदामध्यें राज्यशास्त्राला उपयोगी पडतील असे उल्लेख फारसे नाहींत. त्यांत 'राजा' हा शब्द आलेला असून, त्या काळीं लोकांना राज्यसंस्थेची कल्पना चांगली होती एवढें मात्र खास दिसतें. ऋग्वेदाच्या सातव्या मंडळांत 'दाशराज्ञ' संबंधानें बरींच सूक्तें आहेत. या युद्धांत सुदासाविरुद्ध दहा राजे एकत्र होऊन लढत होते असा उल्लेख आहे. आतां 'राजा' या शब्दाच्या उल्लेखानें तो गृहपति किंवा कुलपति किंवा गोत्रपति किंवा राष्ट्रपति किंवा तत्कालीन राजांचा राजा (सम्राट) यांपैकीं कोण कोणत्या अर्थीं तो शब्द प्रचारांत होता हें नक्की समजण्याला मार्ग नाहीं. तथापि राज्यसंस्थेचीं बीजें व राजाच्या कर्तव्यांपैकीं एक कर्तव्य, म्हणजे आपल्या प्रजेकरितां युद्ध करणें, याचा उल्लेख ऋग्वेदाच्या सातव्या मंडळांत आढळतो. याहून अधिक विस्तृत व मुद्याचा उल्लेख दहाव्या मंडळांत आढळतो. १७३ वें सूक्त अशा अर्थाचें आहे. "हे राजा! तुला आम्हीं उदयाला आणलें आहे. तूं आमचा राजा हो. तूं नित्य व स्थिर रहा. सर्व लोक राजा म्हणून तुझी इच्छा करोत. तुझ्या हातून राज्य नष्ट होऊं नये. तूं पर्वतासारखा स्थिर रहा. इंद्राप्रमाणें स्थिर रहा व राष्ट्राचें रक्षण कर. अभिषेक केलेल्या राजाला या निश्चित हविर्द्रव्यानें इंद्र स्थिर करो. त्याला सोम व ब्रह्मणस्पति आपला असें म्हणोत. आकाश, पृथ्वी व हें सर्व जग ज्याप्रमाणें अचल आहे त्याप्रमाणें लोकांचा हा राजा कायम टिको. राजा! वरुण, बृहस्पति, देव, इंद्र व अग्नि तुला राज्यावर स्थिर करोत व तुझें राष्ट्र स्थिर करोत. निश्चित हविर्द्रव्यानें आम्ही कायमचा सोम उत्पन्न करूं व तुलाहि कर देणाऱ्या अशा प्रजा इंद्र निर्माण करो." पुढें १७४ व्या सूक्ताचें तात्पर्य असें आहे—" देवांकडे ज्या हविर्द्रव्यानें

इंद्र येतो त्यानें आम्हांला राष्ट्राकरितां तयार कर. हे राजा! देव सविता राष्ट्र प्राप्त करून देवो कीं, ज्याच्यायोगें तूं सर्व सत्ताधारी होशील. जसा मी हविर्द्रव्यामुळें शत्रुरहित झालों, सर्व प्राण्यांचा व लोकांचा धनी झालों तसाच निःशत्रूहि झालों आहें. राष्ट्रयुक्त होत्साता व शत्रु पराभव करणारा झालों आहें."

अथर्ववेदांत राज्यसंस्थेसंबंधानें पुष्कळ उल्लेख आढळतात. या वेदांतील उल्लेख हे राज्यसंस्था अस्तित्वांत असलेली समाजस्थिति आणि त्याचप्रमाणें ती संस्था अंमलांत येण्यापूर्वीची समाजास्थिति हीं दोन्हीं दर्शवितात. राज्यसंस्था होण्यापूर्वीं अराजकता होती व ती लोकांना अप्रिय होती, भीतिप्रद होती, असें अथर्व वेद सांगतो. "प्रारंभीं हें सर्व जनपद विराज होतें. तें पाहून सर्व भयभीत झाले आणि आतां सर्वत्र असेंच होईल कीं काय अशी त्यांना भीति वाटली. ज्ञानी ऋषींनीं जगविण्याची इच्छा धरून तप केलें; त्यांतून बल, ओज आणि राष्ट्र यांची उत्पत्ति झाली."

पुढें महाभारतामध्यें जी अराजकतेची समाजास्थिति दर्शविली आहे ती वेदकालापूर्वीची असूं शकेल. पण अथर्ववेदकालीं समाज या अराजकतेच्या भयाण स्थितींतून निघून राज्यसंस्थेपर्यंत येऊन पोहोंचला होता, इतकेंच नव्हे तर, राजपद हें लोकनियुक्त असण्याच्या कल्पनेपर्यंत ती स्थिति येऊन पोहोंचली होती असें दिसतें. अराजकतेपुढें विराजकता आली, म्हणजे, तींत फक्त राजा नव्हता, पण समाज सुस्थित होता. या विराजकतेंतून सभा निर्माण झाली म्हणजे लोकसभा. त्या सभेची पुढें समिति झाली. त्या समितींत लोकांना निमंत्रण करून बोलावीत असत. कदाचित् ही प्राथमिक ग्रामसभाच असेल. या समिति शब्दाचें भाषांतर कित्येक इंग्रज ग्रंथकारांनीं Meeting Assembly किंवा 'कॉंग्रेस' असें केलें आहे. पण या समितीपेक्षांहि मोठी अशी एक राष्ट्रीय महासभा असे. राष्ट्र म्हणजे ज्याअर्थीं ग्राम किंवा गांव असाच अर्थ घेतां येत नाहीं, त्याअर्थीं ही सभा ग्रामपंचायतीपेक्षां अधिक महत्त्वाचीहि असावी. ती कदाचित् फार थोड्या वेळां भरत असेल, पण राजाची निवड करून त्याला गादीवर बसविणें, व अयोग्य राजाला गादीवरून काढून टाकणें वगैरे कामांचा या महासभेशीं संबंध दिसतो. 'संस्था' हा शब्द अथर्ववेदांत आढळतो. आणि त्याचा अर्थ 'घटना' अगर 'कॉन्स्टिट्यूशन' असा करतां येईल. राजांना निवडून देणारे लोक ते 'राजकर्ते' होत. आणि राजा जर लोकांनीं करावयाचा तर तो वंशपरंपरेचा नसावा असें दिसतें. "प्रजा हाच

राजाचा आश्रय आहे. देवांनीं राजाचें घर प्रजेमध्येंच ठेविलेलें आहे. हे राजा! राज्यकारभार चालविण्यासाठीं या पांचहि दिशांतील प्रजा तुझीच इच्छा करोत आणि तुलाच निवडून देवोत. हें तुझें राजपद नष्ट न होवो" वगैरे उल्लेख अगदीं स्पष्ट आहेत. उपनिषदांतील "राजा हेंच राष्ट्राचें सौंदर्य आहे, राजा हीच राष्ट्राची शोभा आहे" असे उल्लेखहि अथर्ववेदांत आढळतात.

महाभारताच्या आधीं रामायण झालें या दृष्टीनें प्रथम रामायणकालीं राजकीय कल्पना काय होती हें पाहूं. तसें पाहतां हें आढळतें कीं, अथर्ववेदामध्यें राजांना लोकांनीं निवडण्याची जी कल्पना व पद्धत तीच रामायणकालींहि होती. वाल्मिकी रामायणांत अयोध्याकांडाच्या तिसऱ्या सर्गांत श्रीरामचंद्राला 'युवराज' नेमण्याचा प्रसंग आहे. या गोष्टीचा विचार करण्याकरितां दशरथानें सभा भरविली. सभेला लोकसंमत असे राजे जानपद इत्यादि आले होते. त्यांना दशरथानें सल्ला विचारला. तेव्हां त्यांनीं रामाला युवराज नेमण्याबद्दल संमति दिली. तेव्हां दशरथ म्हणाला, "विचार करूनच संमति द्या. कारण मी म्हातारा म्हणून तुम्हाला त्रासदायक नाहीं. पण माझ्या जागीं तरुण तरतरीत युवराज येऊन त्यानें राजदंड हातीं घेतला तर कसें होईल?" त्यावर लोकांनीं उत्तर दिलें कीं, "महाराज, राम हा तुमचा वडील मुलगा आहे एवढ्याच कारणानें आम्ही त्याला युवराज नेमण्याविषयीं संमति देत आहों असें नाहीं. तर त्याच्या अंगीं तसेच विशेष गुण आहेत." यानंतर दुसराहि एक असाच प्रसंग घडला. रामाच्या विरहानें दशरथ मृत्यु पावला. रामाहून धाकटा भाऊ लक्ष्मण तोहि वनांत गेला. भरत आपल्या आजोळीं होता. मिळून गादीवर राजा नाहीं अशी स्थिति प्राप्त झाली. अराजक समाजस्थितीविषयीं समाजाच्या ठिकाणीं भीति व विद्वेष हीं पूर्वींपार होतींच. तेव्हां 'राजकर्त्या द्विजां' नीं पुढाकार घेऊन सभा भरविली, व इक्ष्वाकूच्या वंशापैकीं कोण पुरुष गादीवर बसववावा असा प्रश्न उपस्थित केला. तेव्हां निरनिराळ्या उपसभा ( Sub-committees ) भरवून वाटाघाट झाली. मुख्य सभेनें वसिष्ठाला पुढारी नेमलें व त्याला असा अधिकार देण्यांत आला कीं, "इक्ष्वाकूच्या कुळांतीलच कोणीतरी पुरुष गादीवर बसवावा असा निर्बंध आम्ही मानीत नाहीं, तरी तुम्ही कोणत्याहि कुळांतील योग्य पाहून राजपुत्राची शिफारस करावी." तेव्हां वशिष्ठानें सांगितलें कीं, "दशरथानें मरणसमयीं कैकेयीचा वर पूर्ण

करण्याकरितां भरताला राजपद देण्याचें वचन दिलें तेव्हां तेंच आपण पुरें केलें पाहिजे." हें मत महासभेला मान्य झालें व त्याप्रमाणें भरताला आजोळाहून आणून गादीवर बसविलें. फिरून रामायणाच्या किष्किंधाकांडांतहि असाच एक, म्हणजे राजा निवडण्याचा, प्रसंग आढळतो. कपिनायक वाली हा दुंदुभिसुताशीं युद्ध करण्याला गेला आणि त्याचा पत्ता पुष्कळ काळ लागेना, तेव्हां किष्किंधेच्या मंत्रिमंडळानें अशीच सभा भरवून वालीचा भाऊ सुग्रीव याला गादीवर बसविलें. या निवडणुकींत मंत्रिमंडळाबरोबर लोकांनींहि भाग घेतला होता. इतकेंच नव्हे तर सुग्रीवाची इच्छा नसतां लोकांनीं आपल्या इच्छेच्या जोरावर त्याला राजा केला.

यानंतर महाभारताकडे वळूं. अराजकाची स्थिति चांगली नाहीं, याविषयीं महाभारतांत विशेष जोराचें प्रतिपादन आहे. तत्कालीन लोकांची अशी खात्री होती कीं, वाईट जुलमी राजा एक वेळ पुरवला, त्याला कांहीं तरी आळा घालितां येतो, उपाय करतां येतो, पण अराजकतेपासून होणारे दुष्परिणाम त्याहून फारच भयंकर असतात हें खालील सोपपत्तिक शब्दांत सांगितलें आहे ( शांतिपर्व, अध्याय ६८ ) " सर्व धर्मांचें मूळ राजा हें आहे. तो नसेल तर अधर्मानें वागणाऱ्या लोकांना कोण दंड करील ? चंद्रसूर्यांच्या अभावीं जग अंधारमय होईल. तीच स्थिति अराजकाची समजावी. अराजक असेल तर अमुक एक वस्तु माझी असें कोणास म्हणतां येणार नाहीं, व म्हटलें तरी तें प्रबळलोकांपुढें टिकणार नाहीं. स्त्री–पुत्र–द्रव्य–सर्व नाहींशीं होऊन शून्याकार होईल. बलात्कार, वध होऊं लागतील. दरवडे पडूं लागतील. शेतकी व व्यापार बुडतील. लग्नसंस्था, धर्म, यज्ञ, वेदाध्ययन सर्व नष्ट होऊन लोक भयानें जिकडे तिकडे पळून जाऊं लागतील. म्हणून समाजाला राजा असलाच पाहिजे " अशी लोकांची खात्री झाली होती. पण त्याबरोबरच सुराज्य म्हणजे काय, व प्रजेला स्वराज्याचा हक्क निदान राजा निवडण्यापुरता असावा, अशीहि लोकांची समजूत होती. " रक्षण करण्याला राजा असला म्हणजे लोक आपल्या घरांचीं दारें उघडीं टाकून निर्भयपणें झोंप घेऊं शकतात. " असें म्हणण्याइतका सुराज्याचा अनुभव लोकांना आला होता. पण त्यांतल्या त्यांत "राजा करावयाचा तर चांगला पाहून निवडावा" असाहि प्रजेचा आग्रह असे.

निवडलेल्या राजाबद्दल प्रजेचा आदर व प्रेम हीं हल्लींच्या काळापेक्षां तेव्हां प्रजेमध्यें अधिक होतीं असें दिसतें. "एकदा नीट पाहून राजा निवडला म्हणजे मग त्याच्याविषयीं मनांत कोणी पाप आणील किंवा त्याला अपाय करील तर तो

नरकांत जाईल " असें शांतिपर्वांत सांगितलें आहे. याचाच अर्थ हा कीं, राजा ही पृथ्वीवरील एक देवता आहे. " त्याच्या ठिकाणीं निरनिराळ्या प्रसंगीं यम, अग्नि, सूर्य, कुबेर इत्यादि देवतांचें रूप प्रगट होत असतें; व त्या त्या देवतागुणांना योग्य अशीं कृत्यें राजा करीत असतो. " राजाच्या कर्तव्यांत अनुग्रह व निग्रह या दोहोंचाहि समावेश केलेला महाभारतांत आढळतो. शांतिपर्वांत राजदंडासंबंधीं मोठेंच रूपक केलें आहे. या दंडाचीं नांवें व्यवहार, धर्म, वाक्वचन अशीं आहेत. त्याचा योग्य उपयोग केला असतां, म्हणजे राजानें तो समताबुद्धीनें व रागद्वेषरहित असा उपयोगांत आणिला असतां धर्म, अर्थ व काम यांची प्राप्ति प्रजेला होते. "हा उपयोग दंडनीतीला अनुसरूनच राजानें करावा, व बृहस्पतिनीति व शुक्रनीति हेच ते दंडनीतीचे ग्रंथ " म्हणून सांगितले आहेत. हें सर्व दंडाचें अत्यंत उदात्त पण साधें विधान झालें. पण रूपकांत त्याचें विशेष वर्णन असें केलें आहे कीं, " दंड हा शामवर्ण, त्याला चार प्रचंड दाढा, चार हात, आठ पाय, अनेक नेत्र व शंकूसारखे कर्ण असून तो जटाधारण करणारा व मृगचर्म परिधान करणारा आहे. " मात्र हा दंड फक्त क्षत्रियांच्या हातीं असतो असें सांगितलें आहे. याचा अर्थ प्रत्यक्ष राज्याच्या गादीवर बसण्याला क्षत्रिय हेच योग्य असा दिसतो. तथापि ब्राह्मणांची योग्यता राजांनाहि सदुपदेश करण्याची असेंहि सांगितलें आहे. इतकेंच नव्हे तर विद्याविनयसंपन्न ब्राह्मण हा राजदंडापासून मुक्त आहे असेंहि सांगितलें आहे.

बृहस्पतिनीतीचे विषय व शुक्रनीतीचे विषय शांतिपर्वामध्यें सविस्तर व तपशीलवार वर्णन करून सांगितले आहेत; व हल्लींची चाणक्यनीति पाहिली म्हणजे तिजवरून राजांच्यासंबंधीं जी माहिती मिळते तीच पुष्कळशी शांतिपर्वांत दिलेली आहे. इटॅलियन तत्त्ववेत्ता व मुत्सद्दी मॅकिव्हेली यानें प्रजेशीं राजानें कपटाचें, अरेरावीचें, कठोरपणाचें व निष्प्रेम वर्तन कसें करावें असें ज्यांत सांगितलें आहे तो 'प्रिन्स' नामक ग्रंथ, आणि त्यापूर्वीं दीड दोन हजार वर्षें शांतिपर्वांत केलेल्या राजधर्माचें व प्रजाधर्माचें वर्णन वाचलें, आणि त्यांची तुलना केली, म्हणजें प्रत्येक हिंदुमात्राला आपल्या पूर्वजांच्या राजकीय संस्कृतीविषयीं अभिमानच वाटेल. चाणक्यनीतीमध्यें अठरा कारखान्यांची तपशीलवार माहिती दिली आहे. त्याविषयीं पाल्हाळ करण्याचें कारण नाहीं. परंतु इतकें खचित नमूद करतां येईल कीं, प्रजेचे व राजाचे संबंध लक्षांत घेतां राजानें करण्याच्या म्हणून ज्या ज्या गोष्टी

करण्याकरितां भरताला राजपद देण्याचें वचन दिलें तेव्हां तेंच आपण पुरें केलें पाहिजे." हें मत महासभेला मान्य झालें व त्याप्रमाणें भरताला आजोळाहून आणून गादीवर बसविलें. फिरून रामायणाच्या किष्किंधाकांडांतहि असाच एक, म्हणजे राजा निवडण्याचा, प्रसंग आढळतो. कपिनायक वाली हा दुंदुभिसुताशीं युद्ध करण्याला गेला आणि त्याचा पत्ता पुष्कळ काळ लागेना, तेव्हां किष्किंधेच्या मंत्रिमंडळानें अशीच सभा भरवून वालीचा भाऊ सुग्रीव याला गादीवर बसविलें. या निवडणुकींत मंत्रिमंडळाबरोबर लोकांनींहि भाग घेतला होता. इतकेंच नव्हे तर सुग्रीवाची इच्छा नसतां लोकांनीं आपल्या इच्छेच्या जोरावर त्याला राजा केला.

यानंतर महाभारताकडे वळूं. अराजकाची स्थिति चांगली नाहीं, याविषयीं महाभारतांत विशेष जोराचें प्रतिपादन आहे. तत्कालीन लोकांची अशी खात्री होती कीं, वाईट जुलमी राजा एक वेळ पुरवला, त्याला कांहीं तरी आळा घालितां येतो, उपाय करतां येतो, पण अराजकतेपासून होणारे दुष्परिणाम त्याहून फारच भयंकर असतात हें खालील सोपपत्तिक शब्दांत सांगितलें आहे ( शांतिपर्व, अध्याय ६८ ) "सर्व धर्मांचें मूळ राजा हें आहे. तो नसेल तर अधर्मानें वागणाऱ्या लोकांना कोण दंड करील ? चंद्रसूर्यांच्या अभावीं जग अंधारमय होईल. तीच स्थिति अराजकाची समजावी. अराजक असेल तर अमुक एक वस्तु माझी असें कोणास म्हणतां येणार नाहीं, व म्हटलें तरी तें प्रबळलोकांपुढें टिकणार नाहीं. स्त्री–पुत्र–द्रव्य-सर्व नाहींशीं होऊन शून्याकार होईल. बलात्कार, वध होऊं लागतील. दरवडे पडूं लागतील. शेतकी व व्यापार बुडतील. लग्नसंस्था, धर्म, यज्ञ, वेदाध्ययन सर्व नष्ट होऊन लोक भयानें जिकडे तिकडे पळून जाऊं लागतील. म्हणून समाजाला राजा असलाच पाहिजे " अशी लोकांची खात्री झाली होती. पण त्याबरोबरच सुराज्य म्हणजे काय, व प्रजेला स्वराज्याचा हक्क निदान राजा निवडण्यापुरता असावा, अशीहि लोकांची समजूत होती. "रक्षण करण्याला राजा असला म्हणजे लोक आपल्या घरांचीं दारें उघडीं टाकून निर्भयपणें झोंप घेऊं शकतात." असें म्हणण्याइतका सुराज्याचा अनुभव लोकांना आला होता. पण त्यांतल्या त्यांत "राजा करावयाचा तर चांगला पाहून निवडावा" असाहि प्रजेचा आग्रह असे.

निवडलेल्या राजाबद्दल प्रजेचा आदर व प्रेम हीं हल्लींच्या काळापेक्षां तेव्हां प्रजेमध्यें अधिक होतीं असें दिसतें. "एकदा नीट पाहून राजा निवडला म्हणजे मग त्याच्याविषयीं मनांत कोणी पाप आणील किंवा त्याला अपाय करील तर तो

नरकांत जाईल " असें शांतिपर्वांत सांगितलें आहे. याचाच अर्थ हा कीं, राजा ही पृथ्वीवरील एक देवता आहे. " त्याच्या ठिकाणीं निरनिराळ्या प्रसंगीं यम, अग्नि, सूर्य, कुबेर इत्यादि देवतांचें रूप प्रगट होत असतें; व त्या त्या देवतागुणांना योग्य अशीं कृत्यें राजा करीत असतो. " राजाच्या कर्तव्यांत अनुग्रह व निग्रह या दोहोंचाहि समावेश केलेला महाभारतांत आढळतो. शांतिपर्वांत राजदंडासंबंधीं मोठेंच रूपक केलें आहे. या दंडाचीं नांवें व्यवहार, धर्म, वाक्वचन अशीं आहेत. त्याचा योग्य उपयोग केला असतां, म्हणजे राजानें तो समताबुद्धीनें व रागद्वेषरहित असा उपयोगांत आणिला असतां धर्म, अर्थ व काम यांची प्राप्ति प्रजेला होते. "हा उपयोग दंडनीतीला अनुसरूनच राजानें करावा, व बृहस्पतिनीति व शुक्रनीति हेच ते दंडनीतीचे ग्रंथ " म्हणून सांगितले आहेत. हें सर्व दंडाचें अत्यंत उदात्त पण साधें विधान झालें. पण रूपकांत त्याचें विशेष वर्णन असें केलें आहे कीं, " दंड हा शामवर्ण, त्याला चार प्रचंड दाढा, चार हात, आठ पाय, अनेक नेत्र व शंकूसारखे कर्ण असून तो जटाधारण करणारा व मृगचर्म परिधान करणारा आहे. " मात्र हा दंड फक्त क्षत्रियांच्या हातीं असतो असें सांगितलें आहे. याचा अर्थ प्रत्यक्ष राज्याच्या गादीवर बसण्याला क्षत्रिय हेच योग्य असा दिसतो. तथापि ब्राह्मणांची योग्यता राजांनाहि सदुपदेश करण्याची असेंहि सांगितलें आहे. इतकेंच नव्हे तर विद्याविनयसंपन्न ब्राह्मण हा राजदंडापासून मुक्त आहे असेंहि सांगितलें आहे.

बृहस्पतिनीतीचे विषय व शुक्रनीतीचे विषय शांतिपर्वामध्यें सविस्तर व तपशीलवार वर्णन करून सांगितले आहेत; व हल्लींची चाणक्यनीति पाहिली म्हणजे तिजवरून राजांच्यासंबंधीं जी माहिती मिळते तीच पुष्कळशी शांतिपर्वांत दिलेली आहे. इटॅलियन तत्त्ववेत्ता व मुत्सद्दी मॅकिव्हेली यानें प्रजेशीं राजानें कपटाचें, अरेरावीचें, कठोरपणाचें व निष्प्रेम वर्तन कसें करावें असें ज्यांत सांगितलें आहे तो 'प्रिन्स' नामक ग्रंथ, आणि त्यापूर्वीं दीड दोन हजार वर्षें शांतिपर्वांत केलेल्या राजधर्माचें व प्रजाधर्माचें वर्णन वाचलें, आणि त्यांची तुलना केली, म्हणजे प्रत्येक हिंदुमात्राला आपल्या पूर्वजांच्या राजकीय संस्कृतीविषयीं अभिमानच वाटेल. चाणक्यनीतीमध्यें अठरा कारखान्यांची तपशीलवार माहिती दिली आहे. त्याविषयीं पाल्हाळ करण्याचें कारण नाहीं. परंतु इतकें खचित नमूद करतां येईल कीं, प्रजेचे व राजाचे संबंध लक्षांत घेतां राजानें करण्याच्या म्हणून ज्या ज्या गोष्टी

त्या ग्रंथांत सांगितल्या आहेत त्यांना सुराज्यव्यवस्थेचें उत्तम स्वरूप आहे. यावर कोणी म्हणेल कीं, "पुराणांतल्या वांग्याची भाजी करून खातां येत नाहीं !" तर तो आक्षेप आधुनिक काळांतील युरोपियन तत्त्ववेत्त्यांच्या राजनीति ग्रंथांनाहि सारखाच लागतो. या आधुनिक ग्रंथांतील विवेचन केवळ कल्पनासिद्ध असतांहि जर त्याबद्दल पाश्चात्य संस्कृतीचे गोडवे गावयाचे, तर तितक्याच प्रमाणानें कल्पनासिद्ध असलेल्या राजनीतीवरून हिंदु लोकांच्या संस्कृतीचे गोडवे कोणीहि कां गाऊं नयेत ! आज जगांत अनेक कारणांनीं लोकसत्तेचा प्रभाव जितका दिसून येतो तितका हिंदुस्थानांत दोन हजार वर्षांपूर्वीं दिसत नव्हता, ही गोष्ट खरी आहे. तथापि युरोपखंडांत झालें तरी लोकसत्तेचा उदय, एक इंग्लंडखेरिजकरून, सन १८४८ पर्यंत इतर कोणत्या देशांत कितीसा झाला होता ? भरतवर्षांत जुन्या काळीं एका दृष्टीनें राजाला देव बनवून राज्याची सर्व मालकी त्याच्याकडे आहे असें मत प्रचलित असलें तरी, भारतीय काळीं समाजांतील सर्व लोक राजकीय बाबतींत लक्ष घालीत असत. आणि कोणतीहि महत्त्वाची गोष्ट जरी राजा आपल्या अधिकारानें करी, तरी आपण करतों तें बरोबर आहे ही गोष्ट प्रजेला निदान समजावून तरी देण्याची जबाबदारी आपल्यावर आहे असें राजे मानीत असत. कौरव–पांडवांचें युद्ध उपस्थित झालें असतां, "यांत न्याय कोणाच्या बाजूला व अन्याय कोणाच्या बाजूला हें ठरवून पांडवांची बाजू न्यायाची वाटते म्हणूनच मी त्यांना साहाय्य करणार आहें, असें आपल्या राज्यांतील पौरजानपदांना मी समजावून सांगेन " असें श्रीकृष्णानें म्हटल्याचें महाभारतांत आहे. इतकेंच काय पण एका राजानें जर दुसऱ्या राजाला जिंकलें तर जेत्या राजानें जित राजाच्या प्रजेला असें विचारावें कीं, "मी तुमचा राजा होणार आहें तर मला करभार द्याल ना ?" असेंहि महाभारतांत सांगितलें आहे. अर्थात् जेत्या राजाला कर देत नाहीं असें म्हणून कोणत्याहि जित प्रजेचें कसें निभावणार ही गोष्ट वेगळी. पण राजानें नव्या प्रजेला विचारून तिच्या संमतीनें राज्याधिकार घ्यावा हें तत्त्व काल्पनिक असलें तरी रम्य व मोहक आहे यांत काय संशय ? आणि व्यवहारांत तरी नसेल कशावरून ?

महाभारतांत वर्णिलेलें मुख्य कथानक राजे लोकांचेंच असल्यामुळें, महाभारत हा एक प्रकारें भरतखंडाच्या इतिहासांतील एका विशिष्ट काळच्या राजकारणाचा व राजकीय कल्पनांचा इतिहास होऊन राहातो हें उघडच आहे. तथापि प्रत्यक्ष

कौरव–पांडवांच्या राजकारणाच्या इतिहासाशिवाय त्या ग्रंथांत ठिकठिकाणीं सामान्य राजनीतीची व राजधर्मांची चर्चा पुष्कळच आलेली आहे. विशेषतः शांतिपर्वांत यासंबंधीं बरेंच विवेचन आहे. यामुळें महाभारतांत जीं राजकीय मतें उल्लेखिलेलीं व प्रतिपादिलेलीं आढळतात त्यांवरून सुमारें २००० वर्षांपूर्वींच्या हिंदुसमाजाचीं राजकीय मतें काय होतीं याविषयीं अनुमान बांधण्यास हरकत नाहीं.

महाभारतकालीं, व अर्थात् त्यापूर्वींहि हिंदुस्थानांत जिकडे तिकडे लहान सहान राज्येंच शेंकडों असून तीं स्वतंत्र होतीं. प्रत्येक राज्य आपल्यापुरतें स्वायत्त पूर्णाधिकार-संपन्न व स्वावलंबी असें होतें. ज्या स्थितीला इंग्रजींत 'Sovereignty' असें म्हणतात ती या राज्यांमध्यें पूर्णांशानें प्रगट झालेली होती. यापैकीं पुष्कळ राज्यें हीं नगरांतर्गत अशींच असलीं पाहिजेत हें उघड आहे. याच सुमारास नगराहूनहि मोठ्या प्रदेशावरील राज्यांची कल्पना उदित होऊं लागली होती. परंतु पांडवांनीं केलेला दिग्विजय म्हणजे कांहीं 'साम्राज्य स्थापना' नव्हती. निदान हल्लींच्या अर्थानें त्या वेळची ती साम्राज्यस्थापना नव्हती. क्षात्रवृत्तीचें तें एक प्रकारचें महत्त्वप्रदर्शन होतें. "भरतखंडांत क्षात्रबलानें व पराक्रमानें आम्हीच सर्वश्रेष्ठ आहों" अशी ती घोषणा होती. आणि ती घोषणा यथार्थ आहे असें सिद्ध करण्याकरितां पांडववीर चारहि दिशांना युद्धाला आव्हानें देत फिरून परत आले. त्यांत कांहीं ठिकाणीं पांडवांना विरोध झाला, कांहीं ठिकाणीं त्यांना प्रत्यक्ष युद्ध करून अजिंक्यपत्र मिळवावें लागलें. व एक दोन ठिकाणीं तर अर्जुनाचा पराभवहि झाला. पांडव हे भरतखंडांतले या काळचे 'अधिराजे' होत ही गोष्ट कोणाहि तत्कालीन राजांनीं नाकबूल केली नाहीं. पण हल्लींच्या काळाप्रमाणें "ज्याला जिंकला त्याला पायाखालीं तुडवून नाहींसा केला" असें मात्र पांडवांनीं केलें नाहीं. कुस्तीच्या फडांत एका मल्लानें दुसऱ्याला पाडलें म्हणजे तत्पूर्वीं त्यांच्यांत उत्पन्न झालेलें क्षणिक वैर त्या कुस्तीनेंच संपतें. पराभव पावलेला मल्ल हा कांहीं विजयी मल्लाचा जन्मभर गुलाम बनून, त्याच्या घरीं पाण्याच्या माकणी वाहत किंवा जळणाचीं लांकडें फोडीत राहात नाहीं. ही दुष्ट राजनीति आधुनिक काळचीच आहे. तेव्हांची राजनीति अशी कीं, युद्धाचा निकाल लागतांच करभाराचा बहुमान दिला घेतला गेला कीं वैर संपलें, व जित व जेते यांची पुनः मैत्री झाली! युद्धांत पराजय झाला तरी त्यामुळें कोणाहि राजाचें मांडलिकाचें राजकीय स्वातंत्र्य नष्ट होत नसे. ही गोष्ट फक्त पांडवकालापर्यंतचीच आहे.

या विशिष्ट राजनीतीमुळें अल्पप्रमाण अशीं राज्यें स्वतंत्र राहूं शकत. आधुनिक काळीं आक्रमणाचें धोरण, विजिगीषा व महत्त्वाकांक्षा हीं सर्वच वाढलीं असून त्यांच्या शमनाचीं साधनेंहि उपलब्ध होत गेल्यानें, राज्यांचा देशविस्तार वाढला. अर्थातच त्यामुळें राज्यांना त्यांतील लोकांवरून पडणारें नांव अपुरें ठरूं लागलें व प्रादेशिक नांव मिळूं लागलें. परंतु त्या जुन्या काळीं प्रायः लोकांवरूनच राज्यांना नांवें पडत असत. यावरून त्या वेळचीं राज्यें अल्पप्रमाण असावीं, व राज्याचा मुख्य आधार त्यांतील लोकांमध्यें आपण एकवंशीय आहों, या भावनेचा असावा, असें वाटतें. राजा लोक व देश यांचें नांव एकच असाहि प्रकार पुष्कळशा तत्कालीन उदाहरणांत दिसून येतो. महाभारतकालीन देशांच्या यादींत दोनशें बारा लोक वर्णिलेले आहेत. त्यांच्या त्यांच्यांत विवाहसंबंध होत असला तरी प्रत्येकाला आपापल्या विशिष्ट कुलांचा, गोतांचा अभिमान होता, व म्हणून या दोनशें बारा लोकांचीं अल्पप्रमाणांचीं निरनिराळीं लहान लहान राज्येंच होतीं; व त्यांच्यामध्यें कलह व लढाया राजकारणावरून होत असें वाटतें. केवळ पंजाब व सिंध येवढ्या टापूंतच आलेक्झांडर यानें जिंकलेल्या पन्नास लोकांची म्हणजे राज्यांची यादी उपलब्ध आहे. पुढें सर्व भरतखंडभर दिग्विजय करून स्वतःला श्रेष्ठ क्षत्रिय वीर म्हणवून घेणारे जे पांडव त्यांनीं प्रथम अवघ्या पांच गांवांची मागणी आपल्या हिश्याकरितां म्हणून करावी, या दोन गोष्टींचा मेळ घालणाऱ्या मार्मिक मनाला तत्कालीन राजकीय समाजरचनेची चांगली कल्पना येईल. सभापर्वांत 'गृहे गृहे हि राजानः' असें वचन आढळतें. त्याचा अर्थ शब्दशः घरोघर, म्हणजे 'My house is my Castle' या इंग्रजी म्हणीप्रमाणें, माझ्या घरचा मी राजा आहें असा घ्यावयाचा नाहीं. तर कदाचित् प्रत्येक शहर नगर हें एकेका राज्यासारखेंच असे, असा त्या वचनाचा लाक्षणिक अर्थ घेतला पाहिजे.

युधिष्ठिराला व्यासानें एके ठिकाणीं खालीलप्रमाणें उपदेश केला आहेः—"जिंकलेल्या भूपतींच्या राष्ट्रांकडे आणि नगरांकडे जाऊन त्यांचे बंधू, पुत्र अथवा पौत्र यांना त्यांच्या राज्यांवर अभिषेक करून बसवावें. मग ते बाल्यावस्थेंत असोत किंवा गर्भावस्थेंत असोत! ज्यांना पुत्र नसेल त्यांच्या कन्यांना अभिषेक करावा!" हें उदात्त धोरण कोणीकडे व अधिराजाचा केवळ कृपा-प्रसाद म्हणजे फक्त तीन पिढ्या टिकणारें राज्य, किंवा राजवंशांत सरळ शाखेंत पुरुष संतती

असेल तेथपर्यंतचें राज्य, हें आधुनिक काळचें कृपणपणाचें धोरण कोणीकडे ! खुद्द जे अधिराजे त्यांचीहि उदार दृष्टि असल्यावर लहान सहान राज्यें त्या काळीं निर्भयपणें जगत असल्यास काय आश्चर्य ! शांतिपर्वांत तर असेंहि स्पष्ट म्हटलें आहे कीं, " जिंकलेल्या राजास कधींहि पदच्युत करूं नये, तर तो जिवंत असल्यास पुनः गादीवर कायम ठेवला जावा. किंवा मृत झाला असल्यास त्याच्या मुलाला किंवा " नातेवाईकालाहि गादीवर बसवावें. " महाभारतांतील शांतिपर्वांत जें राजकीय स्थितीचें म्हणून वर्णन आहे तें कौरवपांडवांच्याहि पूर्वींच्या काळांतलें, म्हणजे जेव्हां सर्वच लोकसंघ स्वतंत्र होते, एक दुसऱ्यावर राज्य करीत नव्हता, व राज्यसंस्थेची म्हणजे राजाची कल्पना अद्यापि उदित झालेली नव्हती, अशा काळाचें तें वर्णन आहे. कारण खुद्द कौरव पांडव कालीं जुन्या सुवर्ण युगाच्या उज्ज्वल राजकीय कल्पना किंचित् सदोष होऊन, राजा हा सर्व सत्ताधारी, अनियंत्रित व ईश्वरी अंश ही कल्पना पुढें येऊं लागली होती.

कृतयुग केव्हां अवतरलें असेल तें असो, पण भीष्मांच्या माहितीप्रमाणें, " कृतयुगांत मुळीं राजेच नव्हते. लोक सर्वस्वीं स्वतंत्र होते. व आपल्या इच्छेनेंच धर्माचें परिपालन करीत होते. पण पुढें कामक्रोधादि षड्रिपूंचा उठाव झाला; ज्ञानाचा लोप व धर्माचा नाश झाला; कर्तव्याकर्तव्य कळेनासें झालें; तेव्हां ब्रह्मदेवानें राजनीतीचा एक मोठा ग्रंथ लिहिला; तो संक्षेपरूपानें प्रजापतीनें पृथ्वीचा पहिला राजा अनंग याला दिला; व या ग्रंथांतील राजनीतीप्रमाणें राज्य कर असें त्याला सांगितलें. पण या राजनीतिग्रंथाचा प्रभाव अवघा तीन पिढ्याहि टिकला नाहीं. कारण अनंग राजाचा प्रत्यक्ष नातू जो राजा वेन त्यानें हा ग्रंथ बाजूला ठेवून लोकांवर जुलूम केला. तेव्हां लोकांनीं त्याला ठार मारून त्याच्या मांडीपासून पृथू या नांवाचा राजा उत्पन्न केला. त्यानें सर्व लोकांना सुखी करून प्रजेचें रंजन केलें म्हणून त्याला ' राजा ' ही यथार्थ संज्ञा मिळाली व तेव्हांपासून राजा हा विष्णूचा अवतार असें लोक मानूं लागले. पण पुढें झालेल्या राजांपैकीं सर्वांनींच राजधर्म उत्तम तऱ्हेनें पाळला हें जसें घडलें नाहीं, तसेंच प्रजेनेंहि प्रजाधर्म सर्वस्वीं उत्तम प्रकारें पाळला असेंहि घडलें नाहीं. यांत काय आश्चर्य ! अर्थात् प्रजेलाहि योग्य नियंत्रणाखालीं ठेवण्याला कांहीं साधन हवेंच होतें, आणि तें साधन म्हणजे राजदंड हा होय. आणि या दंडावरून राजनीतीला दंडनीति असें नांव पडलें." वरील कथा शब्दशः खरी न मानली तरी तिजवरून एक गोष्ट

दिसून येते ती ही कीं, प्राचीन काळापासून कौरव पांडव कालापर्यंत भरतखंडांतील लोकांच्या राजकीय कल्पनांत व वस्तुस्थितींत एक मोठें स्थित्यंतर झालें होतें. भारतीय राज्यशास्त्राच्या सिद्धान्त–सोपानांतील पहिली पाहिरी म्हणजेच हें स्थित्यंतर होय. आणि तें स्थित्यंतर असें कीं अगदीं अल्पप्रमाण लोकसंघ म्हणजे कुटुंबें कुळें गोत्रें हीं सर्वस्वीं स्वतंत्रपणें आपआपलीं राज्यें चालवीत होतीं, ती स्थिति जाऊन तिच्या जागीं राजा आला व तो राजा तत्कालीन आधिदैविक संस्कृतीमुळें दैवी स्वरूपांत आला.

हस्तिनापूरच्या राजपदावर कोणाला बसवावें, धर्माला कीं दुर्योधनाला, अशी वाटाघाट सुरू झाली तेव्हां दुर्योधनाला भीति पडली कीं, पांडवांच्या गुणांवर लुब्ध होऊन प्रजाजन त्यांनाच राज्यावर बसवितील ! यावरून गादीवर बसण्याचा अधिकार प्रजाजनांच्या हातीं होता असें उघड दिसतें. या ठिकाणीं सभा व परिषदा यांचा उल्लेख आहे. लोकांनीं असें ठरविलें कीं, कौरव दुर्गुणी आहेत, आणि त्यांच्या अंधळ्या बापाला पूर्वीं गादी दिली नाहीं तशी त्याच्या मुलांनाहि देऊं नये. भीष्माला हस्तिनापूरची गादी द्यावी असा लोकांत एक पक्ष होता. पण "मी केव्हांहि राजपद घेणार नाहीं" अशी त्यानें प्रतिज्ञा केली असल्यामुळें लोकांची निराशा झाली; आणि भीष्माच्या अभावीं त्यांनीं धर्माला गादीवर बसविलें. वरील सर्व वर्णनांत राजा निवडण्यासंबंधीं जे उल्लेख आहेत त्यांचा खुलासा एकच मार्गानें होतो व तो हा कीं, राजाच्या निवडणुकींत हल्लींच्या प्रजासत्ताक राज्यांच्या अध्यक्षाच्या निवडणुकीप्रमाणें लोकांना अधिकार होता. तसेच इतरहि उल्लेख विचार करण्यासारखे आहेत. भारतपूर्वकालीं अराजक प्रजेनें मनूला राज्यपद देऊं केलें. पण प्रजेचें पाप राजालाहि लागतें या भीतीमुळें तो तें घेईना. पण प्रजाजनांनीं त्या भीतीचें निराकरण केल्यावर त्यानें तें राजपद पतकरलें. यांत राजकारणाला 'कृत्यतम' म्हणजे 'सर्वोत्कृष्ट कर्तव्य' असें म्हटलें आहे.

पौराणिक काळ सोडून देऊन आपण ऐतिहासिक काळांत आलों तरी तेव्हांहि ग्रामाध्यक्ष किंवा राज्याध्यक्ष यांची निवड लोकांनीं करण्याविषयींचे उल्लेख सांपडतात. प्रो. व्हिस डेव्हिड्स् यांनीं बुद्धकालीन इतिहास लिहिला; त्यांत असें लिहिलें आहे कीं, त्यावेळीं हिंदुस्थानच्या बऱ्याच मोठ्या भागावर अधिराजा असा कोणी नव्हता. पण राज्यसंस्थेची माहिती व परिचय लोकांना चांगला होता. या राज्यसंस्था क्वचित् राजांच्या क्वचित् अभिजन-

नियंत्रित पुढाऱ्यांच्या अमलाखालीं होत्या. जैन ग्रंथांवरूनहि भरतखंडांत स्वतंत्र प्रजासत्ताक राज्यांचें अस्तित्व दिसून येतें. त्यांत जातिनिहाय राज्यें, अथवा संयुक्त नगर राज्यें अशीं होतीं, पण सर्व स्वतंत्र अशीं होतीं. प्रोफेसर मजकुरांनीं अशा दहा अकरा ज्ञातिराज्यांचीं नांवें दिलीं आहेत त्यांतच गौतम-बुद्ध ज्या जातींत जन्माला आला तिचें राज्य होतें. या प्रत्येक राज्यांत सभा व सभागृहें असत. सर्व राज्यावर मिळून एका सभेपुरता एक असा अधिपति असे. ग्रीक इतिहासांतील ' अरकॉन्स ' व रोमन इतिहासांतील ' कॉन्सलस ' यांच्यासारखेच हे अधिकारी असत. या अधिकाऱ्यांच्या अमलाखालीं लोक आपल्या राज्यांतील सर्व कायद्यांचा अमल सभा-समित्यांतून करीत, व कोणीहि एक दुसऱ्याला करभार देत नसे. ' केरळोत्पत्ति ' ग्रंथामध्यें वर्णिल्याप्रमाणें मलबार प्रांतांत ब्राह्मणांचीं लोकसत्ताक राज्यें होतीं. प्रसंगविशेषीं निरनिराळ्या ग्रामराज्यांतील लोक एकत्र जमून सर्वांकरितां एखादा संरक्षक अधिकारी नेमून देत; व त्याला जमिनीच्या उत्पन्नांपैकीं एकषष्ठांश भाग तोडून देत. पुढें हे अधिकारी ग्रीस किंवा रोममधील अधिकाऱ्यांप्रमाणें जुलमी झाले, तेव्हां प्रजेनें ते अधिकारी काढून टाकून एका प्रसिद्ध गृहस्थाला घाटावरून बोलावून राजपद दिलें ! ही गोष्ट इ. स. २१६ या सुमारास घडली. या राजाला गादीवर बसवितांना प्रजेनें त्याजकडून शपथप्रमाण करवून एक करार करून घेतला, त्याचे शब्द लक्षांत घेण्याजोगे आहेत व ते असेः—" राज्यकारभारांतल्या ज्या गोष्टी प्रजेला करतां येणार नाहींत अशाच तेवढ्या मी स्वतः करीन. जे कज्जे, मुकद्मे, प्रजा आपले आपण तोडील त्यांत मी हात घालणार नाहीं. " केरळ प्रांतांत ही प्रजानियुक्त राजांची परंपरा बरींच वर्षें चालली. राजाची निवडणूक कांहीं ठराविक मुद्तीपर्यंत असे. पण ती मुद्त वाढविलीहि जाई. ही पद्धत मल्याळ प्रांतांतहि होती. नाड म्हणून नायर लोकांचा संघ असे. या संघाकडे राजा निवडणें व त्याच्या कारभारावर देखरेख ठेवणें या गोष्टी सोंपविलेल्या असत. केरळोत्पत्ति ग्रंथांत स्पष्टच म्हटलें आहे कीं, "या नाडसंघाचा हेतु हाच कीं, राजाविरुद्ध असणारे प्रजेचे हक्क कमी होऊं नयेत किंवा ते उपयोगांत न आल्यामुळें त्यांची विस्मृति लोकांना होऊं नये." या संघांना 'पार्लमेंट' असें नांव मलबारचें गॅझेटीयर लिहिणाऱ्या इंग्रजानें दिलें आहे.

कौटिलीय अर्थशास्त्र हा ग्रंथ प्रसिद्ध असून त्यांत राज्यशास्त्रांतील उपपत्ति अनेक

आढळतात. भारतादि ग्रंथांतील आधार कौटिल्यानें घेतलेच आहेत, तथापि त्याच्या ग्रंथांत दिलेल्या भरपूर माहितीवरून तत्कालीन राजकीय कल्पना काय होत्या, व विशेषतः प्रत्यक्ष राज्यकारभार कसा चालत होता हें चांगलें कळून येतें. कौटिल्याच्या मतें अराजकता ही स्थिति अत्यंत अनिष्ट होय; व एरवींहि मोठा मासा लहान माशाला खातो त्याप्रमाणें मनुष्याची एकमेकांशीं स्पर्धा, जुलूम व नाश करून स्वार्थ साधण्याची प्रवृत्ति असते. यामुळेंच राजसत्ता अस्तित्वांत येते, व राज्यसत्ताधिशांना प्रजा स्वेच्छेनें ठराविक कर वगैरे देऊन त्यांच्या मोबदल्यांत आपलें रक्षण करून घेते. कौटिल्यमतें राज्यसंस्था ही मनुष्यानें आपल्या बुद्धीनेंच निर्माण केली आहे. म्हणजे रूसोप्रमाणें राजा व प्रजा यांच्यामध्यें एक प्रकारचा करार आहे असें तो मानतो. लोकांनीं एक-मेकांचा नाश न करण्याचें कारण प्रेम हें नसून राजदंडाची भीति हें होय, व या दंडाचें महत्त्व त्याला दैवी स्वरूप देऊन वर्णन केलें असलें तरी तें केवळ काव्यबुद्धीनें होय हें 'अर्थशास्त्रा' वरून उघड दिसतें. इतकेंच नव्हे तर राजा हा राष्ट्राचें पालन करण्याकरितां नेमलेला सार्वजनिक सेवक आहे, अर्थात् लोकांकडून त्याची नेमणूक निवडणूक व्हावी व त्याचा पगार ठरविला जावा या गोष्टी कौटिल्याला संमत असून तत्कालीं त्या रूढ होत्या असें तो दर्शवितो. राज्यकारभारासंबंधानें युवराज म्हणजे राजप्रतिनिधी, मंत्रिमंडळ, त्याची कार्यपद्धति—तसेंच सेंद्रिय व जिवंत राजसंस्थेचीं अंगेंउपांगें—या सर्वां-विषयीं कौटिलीय अर्थशास्त्रांत जितका तपशील दिलेला आहे तितका संस्कृत ग्रंथांत इतर कोठेंहि आढळत नाहीं. मात्र कौटिल्याच्या ग्रंथांत राजांचीं कर्तव्यें कितीहि काटेकोर, कठोर व निश्चित रीतीनें सांगितलीं असलीं तरी, राजाचें कर्तव्य हें प्रजेच्या हक्कापासून वेगळें आहे असें तो मानतो असें दिसतें. म्हणजे राजा आपलें कर्तव्य न करील तर अधोगतीला जाईल, पण प्रजेला अमुक हक्क आहेत व तिनें ते अमुक प्रकारानें बजावावे असें स्पष्ट सांगितलेलें नाहीं.

प्राचीन हिंदु लोकांच्या मनांत स्वतंत्रतेचीं बीजें फार खोल रुजलीं होतीं याचें प्रत्यंतर राजे लोकांच्या निवडणुकीवरून दिसतेंच. पण भरतखंडांत गुलामगिरीची पद्धति नव्हती असें मिगॅस्थिनीस लिहितो त्यावरूनही तें दिसून येतें. वेदकालीं मुलाच्या प्राणावर बापाची सत्ता असेल, व तशा प्रकारचें एक प्रसिद्ध उदाहरण ब्राह्मणग्रंथांत आहेहि. तथापि इतिहास संशोधकांच्या

मतें, रोमच्या राज्यांत कुटुंबांतील बापाला मुलावर जितकी सत्ता होती तितकी हिंदु कुटुंबांतील बापांना केव्हांहि नव्हती. धर्माच्या बाबतींतहि राजापासून लोकांना स्वातंत्र्य होतें तें असें कीं, राजाला जरी विष्णूचा अंश असें कांहीं हेतूं-पुरतें मानण्यांत येई तरी, इतर देशांतील राजांप्रमाणें भरतवर्षांत धर्माज्ञा कर-ण्याचा अधिकार स्वतः राजांना नव्हता. श्रुति-स्मृति सदाचार इत्यादि धर्ममूलें मानलेलीं असून, श्रुति-स्मृतींचा अर्थ करण्याचा किंवा कोणताहि नवा आचार प्रवर्तित करण्याचा अधिकार स्वतः राजाला नव्हता. राजा हा फक्त अंमलब-जावणीचा मुख्य अधिकारी. त्याच्याकडे कायदा करण्याचा किंवा कायद्याचा अर्थ करण्याचा अधिकार नव्हता. तो अधिकार सर्वस्वीं ग्रामपंचायती, ज्ञाति-सभा इत्यादिकांकडे असे. ज्ञातिसंघ, धर्मसंघ, वृत्तिसंघ, व्यापारीसंघ इत्या-दिकांनीं बहुतेक लोकसत्ता आपल्या हातीं वांटून घेतली होती. या दृष्टीनें पाहातां भरतखंडांतील 'सॉव्हरिन्टी'ची कल्पना व इतर देशांतील सॉव्हरिन्टीची कल्पना यांत महत्त्वाचा फरक असल्याचें दिसून येईल. राजाचें मुख्य काम म्हटलें म्हणजे संकटसमयीं राज्याचें रक्षण करणें, परराष्ट्राशीं युद्ध व तह करणें, व स्वदेशाची कीर्ति परदेशांत पसरविणें हें होतें.

प्रधानमंडळाची उत्पत्ति हिंदुस्थानांत अलीकडची नसून पुरातन आहे. राजानें प्रधान कोणत्या कामाकरितां कसे नेमावे याविषयीं शुक्रनीतींत पुष्कळ सांगितलें आहे. आधुनिक राज्यपद्धतींत बहुधा असें एकहि खातें नाहीं किंवा एकहि कार-खाना नाहीं कीं, त्याचा प्रतिनिधि जुन्या हिंदु लोकांच्या राज्यकारभारांत आढळत नाहीं. शिवाजमिहाराजांच्या अष्टप्रधानमंडळाची कल्पना त्यांची स्वतःची नसून अगदीं जुन्या राजनीतीच्या ग्रंथांतून घेतली आहे. तसेंच "राजा हा स्वतः पापाचा धनी होत नाहीं; जो काय अपराध घडेल तो प्रधानाचा; व लोकांना अन्याय झाल्यास त्याबद्दल प्रधानाला शिक्षा व्हावी" असा शिरस्ता असे. मुद्रा-राक्षस नाटकांत असें म्हटलें आहे कीं, "हत्ती जर मस्त होऊन अपघात करूं लागला तर तो माहुताच्या हयगयीचा परिणाम म्हणून त्याला शिक्षा करावी, त्याप्रमाणें राजाच्या हातून चूक झाली तर तो अपराध प्रधानाच्या अंगीं लावावा."

मुख्य खात्यांच्या खालीं, हल्लींच्या स्थानिक स्वराज्य संस्थांप्रमाणें, जुन्या काळीं हिंदुस्थानांत सर्व स्थानिक कारभार मुखत्यारीनें करणाऱ्या ग्रामसंस्था होत्या. १९१४ सालीं सर शंकरन् नायर यांनीं मॉडर्न रिव्ह्यूमध्यें दक्षिण हिंदुस्थानांतील

दहाव्या शतकांतील ग्रामसंस्थांच्या निवडणुकीचे नियम तपशीलवार दिले आहेत. व सर शंकरन् यांनीं असें म्हटलें आहे कीं, "मतदारांमध्यें स्त्रियांचा समावेश होता; व स्त्रियाहि ग्रामसंस्थेच्या सभासद् निवडल्या जात. तसेंच त्या कामांतहि स्त्रियांना सभासद् नेमल्याचीं उदाहरणें आहेत." तसेंच व्हिन्सेंट स्मिथ यानें असें लिहिलें आहे कीं, "पाटलीपुत्र शहरांत जुन्या काळीं म्युनिसिपालिटी तीस सभासदांची होती; व त्या तिसांतून पोटमंडळें नेमून गांवांतील खातेवार कारभार त्यांजकडे सोंपविला होता." या निरनिराळ्या खातेवार उपमंडळांचीं कामें व्हिन्सेंट स्मिथ यानें अगदीं तपशीलवार दिलीं आहेत. नगररक्षणाविषयीं कशा प्रकारच्या योजना पूर्वी लोक करीत याविषयीं पाटलीपुत्र, कनोज, उज्जयिनी, विजयनगर, यांचीं वर्णनें वाचावीं म्हणजे कळून येईल.

भरतखंडांत होऊन गेलेल्या प्रसिद्ध व कीर्तिमान् अशा राजांचीं नांवें किती तरी सांगतां येतील. त्यांतील कांहीं देतों:—बिंबिसार, अजातशत्रु, उदयन, महापद्मनंद, चन्द्रगुप्त, बिंदुसार, अशोक, हाला, यज्ञश्री, समुद्रगुप्त, स्कन्दगुप्त, प्रतापगुप्त, शिलादित्य, प्रभाकरवर्धन, हर्ष, अनंगपाल, पृथ्वीराज, कलचूरि, भोज, मुंज, विक्रमादित्य, पुलकेशी, इत्यादि. याशिवाय पौराणिक राजांचीं नांवें पाहिलीं तर तीं वेगळींच. वरील सर्व हकीकतीवरून हिंदुस्थानांत राज्यव्यवस्था कशा उदयाला आल्या असतील हें चांगलें दिसून येईल. वरील हकीकतींत, राज्यसंस्थांचे सर्व प्रकार व लोकसत्तेचीं मुख्य अंगें व तत्त्वें, यांचा जो उल्लेख आला आहे त्यावरून राज्यांतील अधिकाराची विभागणी कशा पद्धतीनें होत असेल व राष्ट्राचा तोल कसा संभाळला जात असेल याचीहि कल्पना येईल. हिंदु लोक हे राजसत्ता स्वाधीन करण्याला योग्य नाहींत असा आक्षेप स्वार्थी इंग्रज मुत्सद्यांकडून घेतला जातो त्याचें उत्तर वरील हकीकतींत सांपडेल. आधुनिक काळांत केवळ निवडणुकीची पद्धति व प्रातिनिधिक संस्थांची पद्धति पुष्कळ फैलावली आहे, आणि राजसत्ताक राज्यें जाऊन त्यांच्या जागीं प्रजासत्ताक राज्यें निर्माण झालीं आहेत, या गोष्टीवरून पाश्चात्य मुत्सद्दी आपलीं राजकीय श्रेष्ठता प्रस्थापित करूं पाहतात. पण प्रातिनिधिक संस्था, मतदारसंघ व निवडणुकीचे नियम, एवढ्यांनींच कोणतेंहि राज्ययंत्र बिनबोभाट चालतें किंवा राज्यकारभारापासून प्रजेला अवश्य तें सुख मिळतें, ही गोष्ट हटकून सिद्ध होत नाहीं. हिंदुस्थानच्या प्राचीन युगांत राज्यक्रांत्यांचीं उदाहरणें थोडीं असलीं तर त्याचा

# राष्ट्रीय सभेचा त्रोटक पूर्ववृत्तांत

## केसरींतील अद्भुत वार्ता

तारीख ८ डिसेंबर १८८५ च्या केसरींत, महाराष्ट्रांतील वाचकांना एक अद्भुत व आनंददायक अशी बातमी वाचावयास मिळाली. ती अशी. "पुण्यास लवकरच एक जंगी कॉन्फरन्स म्हणजे सभा होणार आहे. या सभेस इतर इलाख्यांतील सार्वजनिक सभेसारख्या सभांचे 'डेलिगेट्स' म्हणजे प्रतिनिधी आणविण्याचा बेत आहे. या कॉन्फरन्सच्या पुरस्कर्त्यांचा, तें भरविण्यांत असा हेतु आहे कीं, सर्व हिंदुस्थानाच्या संबंधानें अतिशय महत्त्वाचे जे सामाजिक विषय आहेत त्यांचा ऊहापोह होऊन जे हक्क सरकारापासून घेणें जरूर आहे असें ठरेल त्या हक्कांचें संपादन होण्यासाठीं जे उपाय करावयाचे, त्यांचा निश्चय झाल्यावर, ते घडवून आणण्यासाठीं सर्व हिंदुस्थानभर एकमेकांच्या साह्यानें, एक दिलानें, व एकोप्यानें परिश्रम चालावे. हा हेतु तडीस गेल्यास ब्रिटिश सरकाराच्या अंमलाखालीं आतांपर्यंत संकीर्ण असलेले जे महाराष्ट्र, कानडा, बंगाल, सिंध, मध्यप्रांत, वायव्यप्रांत इत्यादि राष्ट्रमाणि, ते अन्योन्य-साधारण अशा कार्यसरांत गुंफिले जाऊन राष्ट्रीय संबंधांत त्याची एक माला होईल; व असें झाल्यास 'कलौ संघे शक्तिः' या वाक्याची पूर्तता होऊन आमच्या सुधारणेचें पाऊल आतांपेक्षां थोडेंसें जलदीनें पडूं लागेल. ज्यांना दूरचा विचार करण्याची संवय नाहीं त्यांच्या लक्षांत अशा प्रकारच्या कॉन्फरन्सचें खरें स्वरूप व महत्त्व येणार नाहीं. पण ज्यांना राष्ट्राच्या सुधारणा कशा होतात हें इतिहासवाचनानें किंवा विचारानें कळून आलें असेल, त्यांना ही कॉन्फरन्सें भरविणारांस शाबासकी दिल्यावांचून राहवणार नाहीं. प्रथम प्रथम भावल्यांच्या खेळासारखा या सभांचा खेळ होईल. पण तसा झाल्या-खेरीज पार्लमेंटचें स्वरूप त्यांस कधींच येणार नाहीं. सध्यां दिवसच असे आहेत कीं, अशा खपपटी केल्याशिवाय आम्हांस गत्यंतर नाहीं."

केसरीनें वर लिहिल्याप्रमाणें हें जंगी कॉन्फरन्स त्याच डिसेंबरच्या अखेरीस तारीख २८, २९, ३० रोजीं भरलें. पण तें पुण्यास न भरतां मुंबईस भरलें.

या सुमारास पुण्यास कॉलऱ्याचा तुरळक प्रादुर्भाव झाला होता. या आकस्मिक कारणामुळें पहिली काँग्रेस भरविण्याचा पुण्याचा मान मुंबईस मिळाला. पण त्यांत फारसें कांहीं बिघडलें नाहीं. मुंबई ही झाली तरी मुंबई इलाख्याची राजधानीच होती; व तेथें राष्ट्रीय सभा भरल्यानें मिळणारें जें श्रेय सर्व इलाख्याला मिळालें त्यांत पुणेंहि आलेंच.

## रानडे व काँग्रेस

पण काँग्रेसची मूळ कल्पना निघतांना ती सभा मुंबईस न भरतां पुण्यास, म्हणजे इलाख्याची राजधानी नसलेल्या शहरीं भरविण्याचें चालकांनीं ठरवून तसें जाहीरहि केलें, यांतील इंगित ध्यानांत घेण्यासारखें व पुण्यास भूषणास्पद असेंच आहे. तें इंगित असें कीं, मुंबईस फेरोजशहा मेहता, तेलंग, बद्रुद्दीन तय्यबजी, वगैरे राजकीय पुढारी होते, तथापि पुण्याचे एकमेवाद्वितीय पुढारी कै. महादेव गोविंद रानडे यांना हे मुंबईकर पुढारी वडीलकीचा मान खऱ्या मनानें देत. वास्तविक मुंबईचे हे तीन पुढारी कायदेपंडित असून, स्वतंत्र असा वकीलीचा धंदा मुंबई हायकोर्टांत करीत; याच्या उलट महादेवराव रानडे हे न्यायखात्यांत सरकारी नोकर होते. परंतु रानड्यांनीं नोकरींत राहूनच अनेक सार्वजनिक कार्यें वकील लोकांइतक्या स्वतंत्रतेच्या बाण्यानें केलीं होतीं. त्यांना 'पदवीधरांचे अनभिषिक्त राजे' असें मानीत आणि त्यांची विद्वत्ता इतकी व्यापक व सर्वस्पर्शी होती कीं, तत्कालीन तरुणांची पिढी रानड्यांना ज्ञानाच्या सर्व बाबींत गुरु मानी. रानडे हे सरकारी नोकरींत होते तरी त्यांनीं हस्तेंपरहस्तें महाराष्ट्रांत राजकारण पायावर खडें केलें होतें. राष्ट्रीय सभेच्या जन्माच्या आधीं सुमारें पंधरा वर्षें रानड्यांनीं पुण्यास सार्वजनिक सभा स्थापन केली. बडोद्याचे मल्हारराव गायकवाड यांच्यावर विषप्रयोगाची तोहमत आली तेव्हां रानड्यांनीं कै. अण्णासाहेब पटवर्धन व गणेश वासुदेव जोशी ऊर्फ सार्वजनिक काका, यांच्या करवीं सरकारला तार पाठवून "आम्ही मल्हारराव महाराजांच्या बचावाची तजवीज करण्याची जबाबदारी घेतों" असें जाहीर केलें. नवीन पिढीला राजकीय शिक्षण देण्याची आपल्या घरीं एकप्रकारची शाळा उघडून चिपळूणकर, गोखले, यांसारखे तरतरीत शिष्य तयार केले. टिळकांनीं रानडे यांच्या मृत्युलेखांत खालील अगदीं यथार्थ असे उद्गार काढलेले आढळतात—"महाराष्ट्रांतील तेज अनेक कारणांनीं सर्वस्वीं नष्ट होऊन तो एक

थंड गोळा बनला असतां त्यांत फिरून जीवंतपणाची ऊब कशी येईल, व तो गोळा आपले हातपाय कसे हालवूं लागेल, याचा रात्रंदिवस विचार करून आणि तें दुर्धर काम स्वतः अंगावर घेऊन, त्याकरितां जिवापाड मेहनत जर कोणीं केली असेल तर ती प्रथम माधवरावजींनींच केली असें म्हटलें पाहिजे. "

ही गोष्ट महाराष्ट्रापुरती झाली, हें खरें. इतर प्रांतांत राजकीय पुढारी नव्हते असेंहि नाहीं. पण रानडे यांची कीर्ति सर्व हिंदुस्थानभर पसरलेली होती. म्हणून मुंबईच्या पुढाऱ्यांप्रमाणें या परप्रांतीय पुढाऱ्यांनीं देखील पहिली अखिल भारतीय राजकीय परिषद् पुण्यास भरविण्याला संमति दिली, हा रानड्यांना एक प्रकारचा करभारच होता. पुण्यास ही परिषद् भरली असतां रानडे यांच्या प्रत्यक्ष सल्लामसलतीचा फायदा मिळेल असाहि एक हेतु असणारच. पण याशिवाय आणखी एक कारण असें होतें कीं, पुण्यास सभा भरवावी याविषयीं रानडे यांच्या स्फूर्तीनें पुणें ॲसोसिएशन व सार्वजनिक सभा यांनीं उचल करून मागणी केली तशी इतर कोणत्याहि प्रांतांतून झाली नव्हती. राष्ट्रीय सभा भरविण्याची मूळ कल्पना कशी कोठें निघाली, कोणीं काढली इत्यादि प्रश्नांविषयीं सविस्तर माहिती विचारण्याकरितां प्रस्तुत लेखक १८९६ सालीं मुंबईस रानडे यांना भेटण्याकरितां गेला होता, व त्या प्रसंगीं त्यांनीं आपला मौल्यवान् वेळ खर्च करून सर्व हकीकत मोकळ्या मनानें सांगितली. ही गोड आठवण प्रस्तुत लेखकाला नेहमीं आनंद देते.

## पुण्याचें पुढारीपण

राष्ट्रीय सभेचा उगम होण्यापूर्वीं मुंबई, कलकत्ता व मद्रास हे तीन मुख्य प्रांतच त्या वेळीं त्यांतल्यात्यांत पुढारलेले असे होते. आणि मुंबई इलाख्यांतहि महाराष्ट्र हाच मुंबई शहराखालोखाल पुढारलेला होता. याचें कारण मुंबई शहराकडे व्यापार व उद्योगधंदे यांतील पुढारीपण असलें तरी अभिजात संस्कृति, राजकीय परंपरा व नव्या युगांतील शिक्षणादि लोकोपयुक्त कार्य या गोष्टी महाराष्ट्रांतच दिसून येत. १८१८ सालीं पेशवाई नष्ट होईपर्यंत मुंबई ही एक फक्त मोठी व्यापारी पेठ, व इंग्रजांच्या व्यापारी कंपनीच्या वसाहतीची वखारीची मुख्य जागा इतकेंच महत्त्व तिला होतें. या व्यापारी कंपनीला वसाहतीबाहेर राज्याधिकार नव्हते म्हणून मुंबई 'राजधानी' नव्हती. मुंबई इलाख्यांत पेशवाई नष्ट झाली तरी, मराठ्यांच्या राज्याची

राजधानी सातान्यास ठेवून कारभारीपणाचे अधिकार पुण्यास पेशवे हेच पूर्वी शंभर वर्षेपर्यंत चालवीत असल्यामुळें, पेशवाई बुडाल्यावर इंग्रजांनीं सातारच्या राज्याला एखाद्या आश्रित किंवा संरक्षित जहागिरीपेक्षां अधिक महत्त्व उरूं दिलें नव्हतें. ग्वालेर, इंदूर, येथें मराठी राज्यांचे दोन मोठे खंड उरले होते. पण ते लांब उत्तर हिंदुस्थानांत. आणि पेशवाईनंतर इंग्रजांनीं महाराष्ट्रांत, प्रथम आपल्या उपयोगाकरितां म्हणून कां होईना, नवी पिढी शिकवून तयार करण्याची योजना केली ती महाराष्ट्राच्या पेशवाई राजधानींतच केली.

## पेशवाईनंतरची स्थिति

१८४८ हें साल इतिहासांत अत्यंत क्रांतिकारक म्हणून नमूद करण्यासारखें आहे. कारण त्या सालाइतक्या इतर कोणत्याहि सालांत राज्यक्रांत्या झाल्या नसतील. युरोपांत आधींच ज्या त्या लोकराष्ट्राचीं स्वतःचीं राज्यें असल्यामुळें क्रांति झाली ती इतकीच कीं, सत्ताधीश राजा जाऊन स्वतः लोकच सत्ताधीश म्हणून पुढें येण्याची आकांक्षा करूं लागले. पण इकडे महाराष्ट्रांत सातारचें राज्य खालसा होऊन राज्यक्रांतिच झाली तरी लोकांच्या हातीं सत्ता आली नाहीं. इतकेंच नव्हे; तर जो जुना आपलाच राज्याधिकारी होता तो जाऊन तेथें परका इंग्रज हा राज्याधिकारी झाला. यामुळें पेशवाईच्या नाशापासून पुढें, महाराष्ट्राचीं सुमारें साठ वर्षें दुरवस्थेंत गेलीं. एखाद्या प्रचंड वाड्यावरील सर्व छपराचें छत्र कोसळून गेल्यावर, वारा पाऊस लागत राहिल्यानें, हात फिरून दुरुस्ती न झाल्यानें पडझड सुरू होते, व अखेर जोत्यावर पडक्या भिंती, कोसळून पडलेले दगड व अव्यवस्थित मातीचे ढिगारे यांशिवाय कांहीं उरत नाहीं. महाराष्ट्राची तशीच स्थिति झाली. राजकीय स्वराज्य तर गेलेंच, पण ख्रिस्ती धर्मोपदेशकांच्या उद्योगामुळें धर्महि हळूहळू नष्ट होत चालला. व्यापार कांहीं वाढला. पण त्याचा राजाश्रय गेला व तो परदेशी व्यापाराला मिळूं लागला. शास्त्री, पंडित, भिक्षुक यांच्याजवळ काय ती जुनी विद्या. पण त्यांचाहि आश्रय जाऊन तो वर्ग हीन दीन झाला. दिवसेंदिवस पाश्चात्य विद्येचें व सुधारणेचें ते[illegible]शमान होऊं लागल्यामुळें जुनी विद्या ही फिकी पडूं लागली ! इंग्रजांनीं जुन्या धर्मादायाच्या कांहीं देणग्या चालू ठेविल्या तरी, प्रत्यक्ष देणग्या न देतांहि मिळणारा राजाश्रय ख्रिस्ती मिशनरी लोकांना मिळूं लागला. जुन्या जमीनदारी पद्धतीमुळें छोटे संस्थानिक, सरदार, सरंजामदार,

वतनदार इत्यादिकांमध्यें जो लष्करी पेशा होता तो जागच्या जागीं जिरून जाऊं लागला. कारण इंग्रजांनीं आपल्या लष्करी फौजेकरितां या सरंजामी पद्धतीवर भिस्त न ठेवतां आपल्या लष्कराची स्वतंत्र रचना करण्यास सुरवात केली. आणि जुन्या सरदार संस्थानिकांकडून नजराणे किंवा इतर मोबदले ठरवून घेऊन त्यांना लष्करी नोकरींतून मुक्त केलें. म्हणजे पर्यायानें त्यांच्या तरवारींना कायमचें म्यान केलें, किंवा त्यांचे नांगराचे फाळ बनविले. शेतकरी वर्ग हा मात्र अबाधित राहिला. लष्करी नोकरींतून त्याच्या मिळकतींत पडणारी नैमित्तिक भर कमी झाली. कुणबाव्यावर लोकसंख्येचा भर अधिक पडला. पण त्याबरोबर शेती-मशागतींचें क्षेत्रहि वाढूं लागलें. व सरकारनें जमिनीची पाहणी करून, प्रथम तरी, डोळ्यांत भरण्यासारखें करपट्ट्यांचें ओझें कमी करून त्याला शाश्वततेचें आश्वासन दिलें. पण ही ठरलेलीच गोष्ट असते कीं, सामान्य शेतकऱ्याला राजकारणाची दृष्टि नसते. त्याला राजा कोणीहि चालतो, जो त्याला आपली शेतवाडी सुखानें खाऊं देईल तो त्याचा धर्मराज. लोकमान्य टिळक नेहमीं म्हणत कीं, "खांद्यावर आसूड टाकून नांगर हातीं धरणारा शेतकरी कृत-त्रेता-द्वापार युगांत व आजहि एकसारखाच असणार."

## इंग्रजी शिक्षणाचा प्रसार

पण शास्त्री, पंडित, भिक्षुक, शेतकरी किंवा शिपाई किंवा व्यापारी या वर्गांत न मोडणारा असा एक वर्ग महाराष्ट्रांत होता. त्याच्या स्थितींत, म्हणजे सांपत्तिक स्थितीप्रमाणें मनःस्थितींतहि, फारसा फरक पडला नाहीं. तो वर्ग म्हणजे कारकुनी पेशांतला. कारण पेशवाईतील कारकुनी फडाची त्यांची जागा गेली तर त्या जागीं नवी साहेबाची कचेरी आली. राज्यकारभार व्यवस्थित चालू ठेवणें, त्याच्या मार्गांतील कांटेकुटे झाडून काढणें, आणि खातेवारीची जमीन मऊ करून तींत लेखणीला सफाईच्चीं वळणें बांधून देणें, हेंच कारकुनी पेशाचें मुख्य काम असतें. ही त्यांची सेवा घेण्याला इंग्रज सरकार तयारच होतें. फक्त मराठी विद्येबरोबर त्यांना इंग्रजी शिक्षणहि देणें अवश्य होतें. व ती गोष्ट पेशवाईचें राज्य हातीं येतांच त्यांनीं सुरूहि केली. १८४२ सालीं महाराष्ट्रांत सरकारी शाळेंतूनच इंग्रजी शिक्षणाची सुरुवात झाली. १८५१ सालीं पूना कॉलेज स्थापण्यांत आलें. १८५५ सालीं शाळाखात्यावर डायरेक्टर ऑफ पब्लिक इन्स्ट्रक्शन नेमला गेला. १८५७ सालीं मुंबई युनिव्हर्सिटीची स्थापना

झाली. १८४२ सालानंतर, म्हणजे इंग्रजी शिक्षणाची सुरुवात झाल्यानंतर, अवघ्या चौदा वर्षांनीं खुद्द युरोपियन इन्स्पेक्टर कॉलेजच्या शेरेबुकांत असें नमूद करूं लागले कीं, "मुलांचें मोडी अक्षर वाईट आहे. त्यावर अधिक लक्ष द्यावयास पाहिजे." पण याचें कारण विद्यार्थ्यांचें सर्व लक्ष इंग्रजी अभ्यासाकडे वळलें. सरकारी शाळांतून प्रथम संस्कृत काढून टाकून मराठीच सुरू केलें होतें. परंतु लवकरच मराठीहि मागें पडलें व १८५८ सालीं एड्विन आर्नोल्ड यानें असा शेरा लिहिला कीं, "वरच्या वरच्या वर्गांतील विद्यार्थ्यांना आतां मराठीपेक्षां इंग्रजीच अधिक चांगलें येतें." स्त्रियांचें शिक्षण अद्याप सुरू झालें नव्हतें. परंतु नव्या पिढीच्या सुशिक्षितांनीं स्त्रीशिक्षण, स्त्रीसहवास व संसारांतील स्त्रियांचें स्थान यांविषयींच्या पाश्चात्य कल्पना उसन्या घेऊन स्त्रीवर्गाला त्याचा मोबदला देण्यास सुरुवात केली होती. १८८६ सालीं मुंबई युनिव्हर्सिटींत गव्हर्नर सर रिचर्ड टेंपल यांचें भाषण झालें. त्यांत ते म्हणाले कीं, "आम्ही जें मानसिक व नैतिक शिक्षण तरुण पिढीला देत आहों त्याची मुख्य कसोटी आम्ही हीच मानतों कीं, या सुशिक्षितांनीं मुलकी खात्यांतील नोकरी उत्तम रितीनें करून दाखविण्यांत यश मिळविलें आहे कीं नाहीं!" पण मनुष्य कोणत्याहि एका हेतूनें कांहीं कार्य करीत असला तरी त्याची इच्छा नसतां, किंबहुना त्याचा नाइलाज होऊनहि, त्याचे इतर स्वाभाविक परिणाम होत असतात. ते टळत नाहींत.

## वाघिणीच्या दुधाचा गुण

इंग्रजी शिक्षणाला "वाघिणीचें दूध" ही उपमा मूळ कोणीं दिली ती खरीच आहे. कारण इंग्रजी शिकलेल्या लोकांनीं सरकारी कारकुनी फड हवे तितके समृद्ध केले तरी त्या सर्वांनाच तेथें जागा मिळण्यासारखी नव्हती. तसेंच तेथें जागा मिळण्यासारखी असतांहि मनानें ती नको म्हणून स्वतंत्र व लोकोपयोगी धंदे करणारेहि लोक निघाले. त्यांनीं शाळा काढल्या, वर्तमानपत्रें चालविलीं, स्वदेशीच्या कल्पना पुढें आणल्या, मिशनऱ्यांविरुद्ध चळवळ केली, आणि राज्यकारभारांतील दोष दाखवून ते दूर करण्याची सत्ता आपणांस अधिकाधिक मिळावी या इच्छेनें राजकारणाचें प्राथमिक रूप प्रकट केलें, व असंतोषाचें बीज रोवलें. १८४२ सालीं इंग्रजी शिक्षणाला सुरवात झाल्यानंतर अवघ्या तीस पस्तीस वर्षांत सरकारला देशी वर्तमानपत्रांची मुस्कटदाबी कर-

ण्याचा कायदा करावा लागला. सरकारी नोकरींत असलेल्या कै. माधवराव रानड्यांसारख्यांवर सरकारनें राजद्रोहाचा खटला प्रत्यक्ष कोर्टांत भरला नाहीं, पण मनानें तो केला खास. १८८० सालच्या मुंबई विद्यापीठाच्या पदवीदान-प्रसंगीं चॅन्सेलर या नात्यानें गव्हर्नरसाहेबांनीं खालील उद्गार काढलेः—

"खुल्या दिलानें तरुण सुशिक्षित लोक बोलले म्हणून तेवढ्यामुळें त्यांना आम्ही राजद्रोही गणणार नाहीं. सुशिक्षित वर्ग कृतघ्न बनला तर त्याचें पाप स्वतः त्याच्या माथ्यावर राहील. त्यामुळें शिक्षणदानाचा हात आम्ही आखडून धरणार नाहीं. मात्र असंतोषाची भावना सुशिक्षिताला शोभते किंवा काय हें ठरविण्याचें काम आम्ही स्वतः त्यांच्या विवेकबुद्धीवरच सोंपवूं."

## कृतघ्नपणा नव्हे तर स्वाभिमान

हे उद्गार किती तरी उदारमतवादी दिसतात! मात्र मनांतली जळजळ मनांत गुप्त ठेवण्याची जी सुसंस्कृत कला इंग्रज मुत्सद्दी शिकून तयार झालेले असतात त्या कलेंत हे उदारमतवादी गव्हर्नर चॅन्सेलरहि निष्णात होते, हें लक्षांत ठेवलें पाहिजे. पण वर सांगितल्याप्रमाणें इंग्रजी शिक्षणाचे त्यांच्या दृष्टीचे दुष्परिणाम सरकाराला दिसत असतांहि त्यांना तें शिक्षण थांबविणें शक्य नव्हतें. कारण हें शिक्षण थांबवावें तर मुलकी राज्यकारभार चालावा कसा! म्हणून जाळ्यांतून निसटून जाऊन स्वतःचें रक्षण माशानें केलें असें पाहून "जाऊं दे, मीं हा धर्म केला" असें ढोंगी धीवर म्हणाल्याची गोष्ट सांगतात तीच, इंग्रजी शिक्षण घेतलेल्या तेजस्वी तरुणांची वृत्ति आणि त्या-विषयीं सरकारचें तत्त्वज्ञान यांजविषयींहि सांगतां येण्यासारखी आहे. इंग्रजी शिक्षण सरकारी खर्चानें घेऊन त्याचा मोबदला कृतघ्नतेच्या रूपानें सरकाराला हिंदी लोकांनीं द्यावा किंवा काय याचा गव्हर्नरांनीं निर्णय सुशिक्षितांच्या सदसद्विवेकबुद्धीवर सोंपविला. पण तो निर्णय करण्याला सुशिक्षित लोक कचरले नाहींत. त्यांनीं असा निर्णय दिला कीं, "सरकार इंग्रजी शिक्षण देतें तें मुख्यतः स्वार्थी हेतूनें, म्हणजे आपल्या नोकरींतील हमालखान्यांची भरती करण्याकरितां! हें शिक्षण आम्ही कांहीं लोक फी वगैरे देऊनच घेतों. तें घेण्याला आम्हांस सरकारला मना करतां येत नाहीं. फी देऊन शिक्षण घेतलें म्हणजे तो एक प्रकारचा रास्त सौदाच झाला. व्यापारी बाजारपेठेंत दुकान मांडून जो बसतो तो कांहीं गिऱ्हाइकांवर उपकार करण्याकरितां नव्हे.

म्हणून फी देऊन घेतलेल्या शिक्षणाचा उपयोग आम्हीं जर लोककार्याकरितां, देशकार्याकरितां, स्वाभिमान रक्षण करण्याकरितां, स्वातंत्र्य मिळविण्याकरितां केला तर तो कृतघ्नपणा होऊंच शकत नाहीं. कोणीं कोणावर उपकार केला तरी, उपकारकर्त्यालाहि उपकाराची किंमत म्हणून उपकृताचें स्वातंत्र्य किंवा स्वाभिमान हीं मागतां येत नाहींत. स्वाभिमानरक्षणार्थ कृतघ्नता पदरीं आली तरी ती घेणें हें अनीतिकारक ठरत नाहीं."

## बुद्धीचा सर्वांगीण विकास

परकीय सरकाराच्या कार्यसिद्धीकरितां म्हणण्यापेक्षां स्वतःच्या हिताकरितां व गरजेकरितां सरकारी नोकरींत शिरणारा सुशिक्षितांतील एक वर्ग असतो. तसेंच दुसरा एक वर्ग असा असतो कीं, त्याला सरकारी नोकरी मनासारखी मिळूं शकत नाहीं. केवळ यामुळें तो सार्वजनिक काम करण्याला मोकळा राहतो. पण नोकरी मिळण्याचा संभव असतांहि मनानें ती त्याज्य ठरवून, स्वतंत्र रीतीनें पोट भरून, लोकहितसाधन हेंच आपलें कर्तव्य मानणारा असाहि एक लहानसा वर्ग सुशिक्षितांत असतो. आणि कोणत्याहि देशांत हाच वर्ग स्वराज्याची किंवा स्वातंत्र्याची चळवळ उत्पन्न करतो. कांहीं सुशिक्षितांनीं राज्याची घडी बसविण्याचें काम करावें, व तें आयतें घडी बसलेलें राज्य आपल्या हातीं आणण्याची खटपट इतर कांहींनीं करावी, असा हा एक प्रकारचा श्रमविभागच होय व तो देशाच्या हिताचाच असतो. नोकरींत शिरणाऱ्या सुशिक्षितांची आकांक्षा लवकरच वाढून सर्वांत वरिष्ठ मानाच्या जागा आपणांस मिळाव्या अशा बुद्धीनें सत्तरीच्या सुमाराला हिंदी लोक विलायतेला जाऊं लागले.

आय. सी. एस्. करितां महाराष्ट्रांतून श्रीपाद बाबाजी ठाकूर हा पाहिला विद्यार्थी १८६८ सालीं विलायतेस गेला. माधवराव रानडे हेहि कदाचित् जाते, पण त्यांचें घरचें वळण सनातनी होतें. १८७२ सालीं विलायतेंत हिंदुस्थानच्या कारभाराची चौकशी करण्याकरितां एक पार्लमेंटरी कमिटी नेमिली गेली. तिच्यापुढें साक्ष देण्याकरितां महाराष्ट्रांतून प्रातिनिधि पाठविण्याची योजना झाली. पण परदेशगमननिषेधाचे वाद चालू होते, यामुळें कोणी प्रतिनिधि जाण्यास मिळेना. हौशी राजकारणी तुरुण पिढीला हीं सामाजिक बंधनें जाचक वाटत असून समाजसुधारणेकडे लोकांचें तोंड वळत होतें. आणि समुद्राला भरती आली म्हणजे त्याला मिळणाऱ्या नद्यांनाच काय पण त्यांशीं जोडलेल्या सरोवरांना, तळ्यांना व

डबक्यांनाहि भरती येते, त्याप्रमाणें तरुण पिढीचीं मतें शिक्षणामुळें सगळ्याच बाजूंनीं विकास पावूं लागलीं. सामाजिक सुधारणेसंबंधानें वाद होत ते अथात् आपापसांत होत. येथेंहि स्मृतिप्रणीत गुन्हेगारी, प्रायश्चित्तांच्या शिक्षा, ग्रामण्यांचीं प्रोसिजरें, सनातंनी फिर्यादी आणि शंकराचार्य व गांवसभा यांचीं न्यायकोर्टें होतींच. तथापि सुधारणेची चळवळ करून प्रायश्चित्ताची शिक्षा भोगणें, हें संकट राजद्रोहाचा गुन्हा व सरकारी तुरुंगाचा कोंडवाडा यांपेक्षां सहजच सौम्य वाटे. यामुळें प्रायश्चित्त घेऊन पण सत्याग्रहाच्या रीतीनें किंवा शिक्षेला सादर न होतां, बंडखोरी करून, बहिष्कृत राहून, समाजसुधारणा करणारे बरेच सुशिक्षित निघाले. पण त्याबरोबर थोडे कां होईनात, पण राजकारणांतील गुन्हेगारी पतकरणारे व शिक्षा भोगण्यास तयार होणारेहि कांहीं लोक निपजतात हेंहि लक्षांत ठेवलें पाहिजे.

## राजकीय चळवळीचा उगम

१८५७ सालचें बंड तर प्रसिद्धच आहे. पण सुशिक्षित समाजाशीं त्याचा कांहीं संबंध नव्हता. स्वाभिमानाखातर किंवा धर्मवेडाखातर सरकारी अधिकाऱ्यांवरहि हात टाकणारे लोक मधून मधून निघत होते. सरकारच्या लाडक्या आश्रित मिशनऱ्यांनाहि मधून मधून मार मिळे. १८७१ सालीं वसई येथें इन्कमटॅक्स कलेक्टर हंटर यांस पांचपंचवीस असामींनीं धरून बेदम मारलें! तात्पर्य, प्रसंगविशेषींहि अंगावर हात न पडेल इतकी कांहीं इंग्रजांची सद्दी किंवा इभ्रत मोठी नाहीं हें लोकांच्या नजरेस येऊं लागलें. १८७५ च्या पुढें लोकांच्या लक्षांत हेंहि येऊं लागलें कीं धार्मिक व सामाजिक सुधारणा हवी, पण ती आपल्या हातची असल्यामुळें त्या कामीं सरकारला दोष देतां येत नाहीं. पण राजकारणाची सुधारणा परतंत्र असल्यामुळें चळवळीचा मुख्य भर तिजवरच दिला पाहिजे. राजकारणाची चळवळ जोखमीची म्हणून ती करणारांच्या अंगीं बुद्धिमत्तेइतकीच धैर्याची व स्वार्थत्यागाची अवश्यकता असते. सामाजिक सुधारणापेक्षां राजकीय सुधारणा अधिक जोखमीची म्हणून ती करणारे थोडे लाभत. पण या थोड्या पुढाऱ्यांनींच जें बीज रोंवलें त्याचाच प्रचंड वृक्ष बनलेला आज आपण पाहतों. टिळक असें म्हणत कीं, "केवळ सामाजिक व धार्मिक सुधारणा उच्छृंखलतेनें करणारांची गति, उतूं गेलेलें दूध शेवटीं आगींत पडतें तशी झाली. पण राजकारणांत उतूं येणारे

पुढारी आगींत पडले तरी दुधासारखे जळून गेले नाहींत. त्यांनीं स्वतः एक वेगळीच आग निर्माण केली." बंड करून उठणाऱ्या वासुदेव बळवंत फडक्यांचें उदाहरण प्रसिद्धच आहे. ती आग लोकांच्या डोळ्याला उघड दिसली. पण त्या थराला न जातां त्याहून सौम्य स्वरूपाची जी चळवळ कांहीं पाणीदार सुशिक्षितांनीं सुरू केली, तिची ओली आग आंतल्या आंत इतकी पसरत चालली कीं, ती दुसरी पुरवली, पण ही नको, असें सरकारास वाटूं लागलें. हत्यारें घेऊन बंड करणें हें जितकें आज अशक्य तितकेंच तेव्हांहि होतें. आज क्रांतिकारकांनीं अथवा हुतात्म्यांनीं केलेल्या वैयक्तिक स्फोटांना सरकार बुजत असलें तरी जुमानीत नाहीं, ती स्थिति तेव्हां अधिक स्पष्ट होती. कारण असे हुतात्मे आजच्यापेक्षां तेव्हां फार कमी. क्वचितच म्हटलें तरी चालेल.

## नित्य स्वरूपाची चळवळ

पण सरकारला खरी भीति नैमित्तिक चळवळीपेक्षां नित्य चळवळीचीच मनांतून अधिक वाटते. कारण तिचा विस्तार व व्याप अधिक. व्यावहारिक राजकारणाशीं तिचा संबंध असल्यामुळें तिची सकारणता व न्यायीपणा जगालाहि मान्य करावा लागतो. आणि खालचा म्हणजे अज्ञानी शेतकरी कामकरी वर्गहि त्या प्रकाराच्या चळवळीला अनुकूल होऊं शकतो. ही नित्य स्वरूपाची चळवळ म्हणजे प्रथम चालू राज्यव्यवस्थेंतील लोकांना जाचक असे दोष, उणीवा व अन्याय चवाठ्यावर मांडून सरकाराला लाजविणें. ते दूर करण्यांत स्वार्थी सरकारचें जें नुकसान असेल तें सोसण्यास त्यांना भाग पाडणें. वरिष्ठ मानाच्या व पगाराच्या जागा देशी लोकांना मिळण्याची आकांक्षा प्रयत्नानें पणाला लावणें. इत्यादि प्रकारची नित्य चळवळ होय. पण ही चळवळ सौम्य दिसली तरी तिचें तत्त्वज्ञान फार खोल असतें. आणि कोणी एकदम मुद्याची गोष्ट न बोलला तरी, कारणाचें कारण व फिरून त्या कारणाचें कारण अशा रीतीनें मागें मागें शोधीत गेल्यास, देशावरील परकीय राज्य म्हणजे स्वातंत्र्याचा नाश हेंच सर्व राजकीय दुःखाचें मूळ कारण होय, असें सरळ तर्कपद्धतीनें ठरतें. त्या मूळ कारणाचा नाश करण्याकरितां एकदम हातांत हत्यार घेऊन उठणें हें माणसाच्या हातून होत नसलें तरी, तें राजकीय तत्त्वज्ञान जगापुढें मांडण्यास तो भीत नाहीं. त्या कामीं मनाला

पडणारा पीळ भाषणानें किंवा लेखानें प्रकट झाल्याशिवाय रहात नाहीं. या गोष्टीला खरोखर भिऊन, पण वरपांगीं आपल्या टीकाकारांच्या जहालपणाचें निमित्त करून, सरकारला १८८० पूर्वींच देशी वर्तमानपत्रांच्या मुस्कटदाबीचा कायदा करावा लागला; व माधवराव रानड्यांसारख्या प्रामाणिक बड्या सरकारी नोकराच्याहि मागें गुप्त पोलिसांचा ससेमिरा लावावेंसें वाटलें.

## वाढता असंतोष

कायदेशीर दृष्ट्या आपलें हिंदुस्थानांतील आसन खुद्द सरकारालाहि डळमळीत वाटत होतें. व्यापारी कंपनीचें राज्य ही गोष्टच मुळांत चमत्कारिक होती. म्हणून १८५८ चा कयदा झाला असतांहि त्या कायद्यानें हिंदुस्थानचे लोक व विलायत सरकार यांचा खरा संबंध ठरत नाहीं, व्यक्त होत नाहीं, म्हणून इंग्लंडच्या राणीनें ‘ हिंदुस्थानची बादशाहीण ’ असा किताब घ्यावा ही युक्ति विलायती मुत्सद्यांनीं काढिली; व त्याप्रमाणें लिटनशाहींत मोठा दरबार भरून राणीनें हा किताब घेतल्याची गोष्ट जगजाहीर केली. पण बादशाही म्हणजे अनियंत्रिक जुलमी राज्यपद्धति ! तींत प्रजेची संमति नाहीं. जसा जुलमाचा कारभार तसा त्याला जुलमाचा रामराम. हा रामराम जनतेच्या वतीनें म्हणून दिल्ली दरबारांत राजेरजवाड्यांनीं केला तरी त्यामुळें जनतेची संमति मिळाली असें ठरलें नाहीं. किंबहुना सुशिक्षित राजकारणी लोकांना हिंदुस्थानचा तो अपमानच वाटला. याहि दृष्टीनें राजकीय असंतोषांत भरच पडली. आणि “ गेलें ” या अर्थाचा स्वराज्य शब्द लोकांना माहीत होता, तो “ मिळवावयाचें ” या अर्थाचा स्वराज्य शब्द लोकांना सुचण्याची तयारी झाली. तोच शब्द १९०६ सालीं महर्षि दादाभाई यांच्या तोंडून कॉंग्रेसचे अध्यक्ष या नात्यानें निघाला; व महायुद्धानंतर तो शब्द विकृत कां होईना पण कसा तरी उच्चारण्याला स्वतः इंग्रज बादशाहा शिकले !

## स्वराज्याच्या कल्पनेचा पाया

राजकारणाचें तत्त्वज्ञान मनुष्याच्या अंगीं कांहींसें उपजतच असतें. स्वराज्य किंवा स्वातंत्र्य हा मनुष्याचा जन्मसिद्ध हक्क असतो. कायदेशीर भाषेनें तो बोलून दाखविण्याला मनुष्याला शिकावें लागतें, पण त्याविषयीं मनांतली जाणिव व आकांक्षा ही उपजतच असते. बियाला खतपाणी मिळाल्यानेंच त्याचा वृक्ष बनतो. त्याप्रमाणें राजकीय समाजांत स्वातंत्र्याच्या मागणीला आत्मप्रत्ययाच्या

जीवनाबरोबर परप्रत्ययाचें खत फार उपयोगीं पडतें. हें खत त्या काळच्या सुशिक्षित पिढीला इंग्रजी शिक्षणांतून आपोआप मिळालें. प्रजेनें आपली भाषा व संस्कृति शिकावी, व अशा रितीनें आपण तिला आत्मसात् करावें, या हेतूनें हिंदी जनतेला उच्च प्रतीचें शिक्षण देणाऱ्या इंग्रजांना आपल्या देशांतील सर्व प्रकारचें उच्च वाङ्मय तिच्या हातीं देण्याशिवाय गत्यंतर नव्हतें. पौष्टिक अन्न गुलामाला दिलें म्हणून तें पुष्टि देण्याचा आपला गुण कमी करीत नाहीं. किंवा सोमरस किंवा मद्य हें गुलामाला पाजलें म्हणून तें स्वतंत्र माणसापेक्षां गुलामाच्या डोक्यावर कमी परिणाम घडवील असें होत नाहीं. उच्च प्रतीच्या इंग्रजी वाङ्मयांत हिंदी तरुणांच्या वाचण्यांत येई तें पुष्कळसें १९ व्या शतकांत युरोपांत प्रतिष्ठा पावलेलें वाङ्मय असे. त्यांत तात्त्विक व व्यावहारिकहि उदारमतवादित्व पूर्णपणें भरलें होतें. दास्यविमोचनाच्या चळवळीपासून तों समता, बंधुता व स्वातंत्र्य हीं शिकविणाऱ्या राज्यक्रांतीच्या चळवळीपर्यंतचें वाङ्मय वाचल्यावरहि, त्यापासून मिळणाऱ्या पुराव्याचा, परप्रत्ययाचा व स्फूर्तिदायक तत्त्वज्ञानाचा परिणाम हिंदी तरुणांच्या मनावर झाल्याशिवाय कसा राहील ? इंग्रज मुत्सद्यांचीं भाषणें घेतलीं तर त्यांतहि उदार मतांचीच घोषणा ! तात्पर्य (१) स्वराज्याची, स्वातंत्र्याची उपजत आकांक्षा, ( २ ) जगांतील इतिहासांतून मिळणारें तिचें समर्थन व ( ३ ) स्वतः इंग्रज राज्यकर्त्यांच्या अघळपघळ कबुल्या व अभिवचनें—अशा तीन साधनांनीं हिंदी राष्ट्राच्या मनांतील स्वराज्य—प्रेमाचा भक्कम पाया कायम घातला गेला. त्याच पायावर गेल्या पन्नास साठ वर्षांत निरनिराळ्या राजकीय कलावंतांनीं आपल्या अभिरुचीप्रमाणें राजकीय चळवळीच्या इमारतींचे निरनिराळे नमुने उभारलेले दृष्टीस पडतात.

## गोरें गुरुमुख

पण कोणत्याहि विद्येंत गुरुमुखाला विशेष महत्त्व असतें. त्याप्रमाणें साठ पाऊणशें वर्षांच्या पूर्वीच्या हिंदी राजकारणाचेंहि झालें. इंग्रजी वाङ्मयानें स्वराज्य व स्वातंत्र्य यांच्या सगुण पूजेचा मंत्र हिंदी सुशिक्षितांना शिकविला, तरी प्रत्यक्ष तंत्राचें शिक्षण देण्याला गुरु किंवा उपाध्याय अवश्य होता. तो त्या वेळीं ह्यूम वेडरबर्न यासारख्या हिंदुस्थानांत असलेल्या निकट परिचयाच्या उदारमतवादी इंग्रज सद्गृहस्थांच्या रूपानें मिळाला. हिंदुस्थानचें हित पाहणारे हेन्री फॉसेट प्रभृति चार दोन लिबरल खुद्द ब्रिटिश पार्लमेंटांत होते. पण

ते पडले फार दूर. शिवाय स्वतः त्यांच्या प्रयत्नालाहि उपकारक व समर्थनपर अशी चळवळ हिंदुस्थानांत खुद्द हिंदी लोकांकडूनच होणें अवश्य होतें; व ती चळवळ करण्याची शिकवण व उत्तेजन ह्यूम वेडरबर्न यांसारख्यांनींच दिलें ही गोष्ट मान्य करावीच लागते.

## ह्यूम व वेडरबर्न

ए. ओ. ह्यूम हे बंडाच्या सालीं इटावा येथें कलेक्टर होते व अर्थात् त्यावेळीं त्यांनीं बंडखोरांशीं लढून स्थानिक बंड मोडलें. पण बंड संपतांच "शांततेचा स्वीकार सरकारानेंहि करून राजकीय सुधारणा व प्रजेची उन्नति साधण्याचे मार्ग शोधण्याला एकदम लागावें" असा सल्ला त्यांनीं सरकारला दिला. बंडानंतर हिंदी लोकांना शिक्षण देऊन नोकरींत घेण्याविरुद्ध कांहीं अधिकाऱ्यांनीं उचल केली तिचा ह्यूम साहेबांनीं उघड निषेध केला. स्वतः नोकरींत असतांच पोलीसखातें, अबकारीखातें, तुरुंगखातें, कस्टमखातें, शेतकीखातें इत्यादिकांत लोकहिताच्या दृष्टीनें सुधारणा करण्याच्या योजना त्यांनीं सुचविल्या होत्या. १८५९ सालीं 'लोकमित्र' नांवाचें एक वर्तमानपत्र हिंदी भाषेंत सुरू करून तें त्यांनीं कांहीं दिवस चालविलें; व त्याच्या प्रती विलायतेंत स्टेट सेक्रेटरी व खुद्द व्हिक्टोरिया राणी यांना पाहण्याला ते पाठवीत. त्याच सालीं महाराष्ट्रांतील शेतकऱ्यांचें कर्ज व इतर दुःखें यांचें निवारण करण्याची एक योजना लिहून त्यांनीं मुंबई-सरकाराकडे पाठविली होती. हिंदी जनतेविरुद्ध किंवा सुशिक्षितांच्या आकांक्षांविरुद्ध कोणी युरोपियन लोक बोलले कीं त्यांना उत्तर देण्याला ह्यूम साहेब सदा तयार असत. देशांत राजकीय असंतोष उत्पन्न झाला आहे. निरनिराळ्या धर्मपंथांच्या गुरूंच्या चिथावणीनें जनमत सरकारविरुद्ध क्षुब्ध केलें जात आहे. आणि त्या क्षोभाचा स्फोट उघड होणें अवघड झाल्यामुळें तो तिच्या मनोभूमींत शिरून खोल घर करूं पाहत आहे. यामुळें पुढें स्फोट होईल तो फारच मोठा होईल. म्हणून लोकमतप्रदर्शनाच्या रूपानें त्या तापलेल्या वाफेला बाहेर पडण्याला वाव द्यावा. त्याकरितां लोकांना आपल्या सभा, परिषदा भरविण्यास उत्तेजन द्यावें. समाजांतील मोठे म्हणविणाऱ्या लोकांनीं निःस्वार्थीपणें जनतेला शिक्षण देऊन शहाणपण शिकविण्याच्या योजना व्हाव्या व या कामीं सरकारनें सवलती द्याव्या—असें ह्यूमचें मत होतें. याविषयीं त्यांनीं रिपन, डलहौसी, केअर्ड, ब्राईट वगैरे

इंग्रज मुत्सद्यांचें मन वळवून अनुकूल अभिप्राय मिळविले होते. हिंदुस्थानांतून वरील कामाला उपकारक अशा बातम्या तारेनें विलायतेस पाठविण्याची योजना करून तिच्या खर्चाकरितां त्यांनीं फंड उभारला होता ! आणि सर्वांत मोठी गोष्ट म्हणजे विलायतेंत हिंदुस्थानाच्या वतीनें एक पार्लमेंटरी कमिटी स्थापून तिजकडून पार्लमेंटांतील सभासदांकडून हिंदुस्थानच्या हिताचें काम करण्याबद्दल शपथा घेववाव्या, स्टेट सेक्रेटरीच्या कौन्सिलाला ही कमिटी प्रतिस्पर्धी म्हणून राहावी, आणि इकडे हिंदुस्थानांत जी राजकीय चळवळ होईल तिचें प्रतिबिंब खुद्द विलायतेंत व पार्लमेंट सभागृहांत नेहमीं पडत जावें, अशी त्यांची योजना होती. हिंदुस्थानांतील सुशिक्षित वर्ग हा जनतेचा खरा प्रतिनिधि नव्हे या आक्षेपाला ते असें उत्तर देत कीं, "विलायतेंत झालें तरी वेगळें काय आहे ! ॲबर्डीनसारखें पुढारलेलें शहर घ्याना. तेथील लोकांपैकीं शेंकडा दहा लोकांनाहि मतदारीचा हक्क नाहीं. वेमथसारख्या गांवाला पार्लमेंटांतील दोन जागा दिल्या आहेत. पण त्यांतली निदान एक जागा कोणाहि पैसेवाल्याला आपल्याकरितां राखून ठेवितां येते; व ती कित्येक वर्षें खुद्द माझ्या वडिलांनीं आपल्याकरितां विकत घेऊन राखून ठेविली होती ! तात्पर्य, खुद्द ब्रिटिश पार्लमेंट तरी जनतेच्या दृष्टीनें कितपत प्रातिनिधिक म्हणतां येईल ! मग हिंदुस्थान तर काय बोलूनचालून त्या मार्गांवर अगदीं नवें."

ह्यूम व वेडरबर्न हे दोघे गृहस्थ गेल्या शतकांतील खऱ्या उदारमतवादी इंग्रजांचे उत्तम नमुने होते असें म्हणतां येईल. ह्यूमसाहेब हे हिंदुस्थान सरकारचे सेक्रेटरी, व वेडरबर्न हे मुंबई सरकारचे सेक्रेटरी, आपल्या नोकरीच्या शेवटीं होते. ह्यूम हे तर कदाचित् लेफ्टनंट गव्हर्नरहि व्हावयाचे. पण या दोघांनीं प्रत्यक्ष नोकरींत असतां मनानें व नोकरींतून निवृत्त झाल्यावर कृतीनेंहि हिंदुस्थानाविषयीं खरी कळकळ दाखविली. फार काय, पण आर्थिक स्वार्थत्यागाची कसोटी लाविली तरी त्यांनीं एखाद्या तीव्र देशाभिमानी हिंदी गृहस्थाइतका स्वार्थत्याग केला. कदाचित् अधिकच. ह्यूमसाहेबांनीं सुमारें वीस वर्षें कॉंग्रेस सेक्रेटरीचें काम केलें व वेडरबर्नसाहेबांनीं पुष्कळ दिवस आपल्या खर्चानें 'इंडिया' नांवाचें वर्तमानपत्र इंग्लंडांत जगविलें. हे दोन गृहस्थ सिव्हिल सर्व्हंट असून त्यांनीं हिंदुस्थानांत राष्ट्रीय सभेची मूळ कल्पना काढली, हें आजच्या स्थितींत, म्हणजे कॉंग्रेसमन व सिव्हिलियन यांना एकमेकांचें तोंडहि पाहूं नये असें वाटण्याच्या स्थितींत,

नवख्या नवशिक्या माणसाला आश्र्यर्यकारक वाटल्याशिवाय राहणार नाहीं. परंतु ती अगदीं खरी वस्तुस्थिति आहे.

## हिंदुस्थानची एकजीवता

वर वर्णन केलेली महाराष्ट्राची राजकयि स्थिति हीच थोड्या फार फरकानें इतर अनेक प्रांतांचीहि होती. मद्रास व बंगाल या इलाख्यांत स्वराज्याची परंपरा फार वर्षें नष्ट झाली होती. यामुळें त्यांची राजकीय भावना त्या दृष्टीनें महाराष्ट्राइतकी तीव्र नव्हती. पण त्यांना इंग्रजी शिक्षण महाराष्ट्राच्या आधीं मिळूं लागलें होतें. मिळून तीनहि प्रांतांची बरोबरी होती. वेडरबर्न यांची नोकरी नुसत्या मुंबई इलाख्यांतच झाली. पण ह्यूम हे हिंदुस्थान सरकारच्या सेक्रेटॅरिएटमध्यें असल्यामुळें त्यांची नजर सर्व प्रांतांवर होती, व अनेक प्रांतीय पुढाऱ्यांशीं त्यांचा परिचय होता. यामुळें सर्व हिंदुस्थानची मिळून एकादी विलायतेंतल्यासारखी असोसिएशन अगर संस्था निघेल तर फार बरें असें त्यांना वाटे. हिंदी पुढाऱ्यांनाहि वर्तमानपत्रांच्या द्वारें एकमेकांच्या प्रांतांची स्थिति समजून येत असे; व स्वतंत्र रितीनें प्रत्येकानें चालविलेल्या प्रयत्नाबद्दल इतरांना आदर वाटे. अर्थात् हे सर्व लोक कांहीं कारणानें व निमित्तानें एकदां किंवा शक्य तर वरचेवर एकमेकांस भेटून विचारविनिमय करूं शकतील तर तें फार बरें होईल अशी दुसऱ्या बाजूस तयारी होती. सर्व हिंदुस्थानभर एकच स्थिति म्हणजे एकच सुखदुःख व एकच आकांक्षा, याहून दुसरी तयारी एकत्र जमण्याच्या इच्छेला किंवा घटनेला कोणती लागणार ! तात्पर्य, मानसिक योगायोगाचा क्षण यावा त्याप्रमाणें ह्यूम व वेडरबर्न यांनीं राष्ट्रीय परिषदेची कल्पना सुचविली ती जशी कांहीं स्वयंस्फूर्त अशी हिंदी पुढाऱ्यांनाहि पटली.

## सामाजिक व राजकीय राष्ट्रीय सभा

अखिल भारतीय परिषद् भरविण्यांत आली तर तींत सामाजिक व राजकीय दोनही गोष्टींची चर्चा सहजच होणार. मलबारीशेठसारखे कांहीं पुढारी सामाजिक सुधारणा हीच आधीं व्हावी या मताचे सर्वस्वीं होते. इतर कित्येक राजकीय सुधारणांना अधिक महत्त्व देणारे होते. म्हणून त्यांना राजकीय सुधारणा आधीं व सामाजिक सुधारणा मागाहून झाली तरी चालेल असें वाटे. पण ते सामाजिक सुधारणेला प्रतिकूल नव्हते. माधवराव रानड्यांसारखे कांहीं लोक या दोनही सुधारणा एकाच वेळीं होत जाव्या अशा मताचे होते. आणि

ह्यूम व वेडरबर्न हेहि एकाच वेळीं उभय सुधारणा होत जाव्या अशा मताचे होते. सामाजिक सुधारणेचा उत्तम नमुना तेव्हां इंग्लंडांत होता, तोच त्यांच्या डोळ्यांपुढें होता. परंतु जेव्हां इंग्लंड सामाजिकरीत्या सुधारलें नव्हतें तेव्हांहि त्याकरितां त्यानें राजकारण थांबविलें नव्हतें हाहि त्यांना आपल्या लोकांचा अनुभव होता. कसेंहि असो, या तीनहि वृत्तींच्या लोकांना राष्ट्रीय परिषद् भरवावी ही गोष्ट एकसारखीच इष्ट होती. कर्मधर्मसंयोग असा कीं, लॉर्ड डफरिनसारख्या व्हाइसरॉयालाहि ही गोष्ट पसंत पडली. त्याचें पाहणें असें होतें कीं, अशा परिषदेकडून लोकमताला वाचा फुटेल, व राज्यकारभारांतील दोष, निदान लोकांच्या आकांक्षा—ज्या एरवीं पद्धतशीरपणें कळण्याला दुसरा मार्ग नाहीं—त्या अखिल भारतीय परिषदेच्या द्वारां कळतील. लोकांना सांगावयाचें होतें तसेंच सरकारला ऐकावयाचें होतें. यामुळें न्या. रानडे आदिकरून पुढाऱ्यांच्या प्रोत्साहनानें लोकांनीं हौसेनें परिषद् भरविली व लॉर्ड डफरिन यांनीं तिला प्रथम आदरानें मान्यता दिली.

ही सर्वसंमततेची स्थिति पुढें टिकली नाहीं; आणि आज सरकार व राष्ट्रीय सभा यांचे संबंध काय आहेत हें आपण पाहतोंच. या दोन स्थितींतील फरक मोठा असला तरी तो थोडक्यांत समजावून सांगतां येण्यासारखा आहे. तो असा:—

मूळ कॉंग्रेस भरविणाऱ्या हिंदी पुढाऱ्यांच्या मनांत फार फार तर वसाहतीचें स्वराज्य हें साध्य व केवळ सनदशीर चळवळ हें साधन यापलीकडे मजल जाणारी नव्हती. ह्यूम व वेडरबर्न हे उदारमतवादी असल्यामुळें त्यांना या दोनही गोष्टी संमत होत्या. पण यापलीकडे हे पुढारी जाणार नाहींत अशी त्यांची खात्री होती. वसाहतीच्या स्वराज्याची मागणी लॉर्ड डफरिन यांना पचण्यासारखी नव्हती. परंतु ती एकदम प्रथमच मागण्याची घाई किंवा धाडस हिंदी पुढारी करणार नाहींत असा विश्वास त्यांना वाटला असावा. त्यांना असेंहि वाटण्याचा संभव होता कीं, या राष्ट्रीय परिषदेंत राजकीय विषयांबरोबर किंवा त्याहूनहि अधिक सामाजिक विषयांची चर्चा होईल. आणि ही चर्चा करितांना हिंदी पुढाऱ्यांना आपल्या समाजाचे दोष आपल्या तोंडून वदावे लागतील. तीच त्यांना स्वराज्याधिकार मागण्याविषयीं स्वतःची अपात्रता वाटेल. यामुळें राजकीय मागणीला फारसें तीव्र स्वरूप राहाणार नाहीं. असो. अशा

निरनिराळ्या संमिश्र हेतूंनीं व अटकळींनीं पहिली राष्ट्रीय सभा मुंबईस भरली. पण तींत पास झालेले ठराव पाहिले म्हणजे राजकीय सुधारणेनें आपलें डोकें सामाजिक सुधारणेच्या पुढें काढलें असेंच दिसतें. तीच गोष्ट पुढील एक दोन राष्ट्रीय सभांत झाली. आणि पहिल्या एक दोन सभांतच राजकारणाची इतकी कसून चर्चा झाली कीं, नवसानें मागितलें तें मुळावर आलें, तसें लॉर्ड डफरिन यांना वाटून त्यांनीं राष्ट्रीय सभेला मान्यता देण्याकरितां प्रथम पुढें केलेला हात मागें घेतला.

## पहिली राष्ट्रीय सभा

पहिल्या राष्ट्रीय सभेंत जे ठराव झाले त्यांतील प्रमेयें थोडक्यांत खालीं दिल्याप्रमाणें होतीं—

( १ ) हिंदुस्थानचा राज्यकारभार इकडे व इंग्लंडांत कसा चालविला जात आहे, याची चौकशी करण्याकरितां एक रॉयल कमिशन नेमण्यांत यावें. कारण अशा चौकशीविषयीं पार्लमेंटकडून पूर्वांपार आश्वासनें मिळत आलेलीं आहेत. या रॉयल कमिशनवर हिंदुस्थानच्या लोकांचे प्रतिनिधि योग्य प्रमाणांत नेमले जावेत. कमिशननें चौकशीच्या प्रश्नासंबंधानें हिंदुस्थान व इंग्लंड या दोनही देशांत साक्षीपुरावे घ्यावेत.

( २ ) स्टेट-सेक्रेटरीचें कौन्सिल बरखास्त करावें. ही एक सुधारणा इतर सर्व राजकीय सुधारणांच्या मुळाशीं आहे.

( ३ ) प्रत्येक प्रांताला एक एक कायदेमंडळ व सर्व हिंदुस्थानाकरितां म्हणून एक कायदेमंडळ असावें. हल्लीं ज्या प्रांतांत अशीं मंडळें नाहींत तेथें तीं स्थापिलीं जावींत. जेथें तीं आहेत तेथें वाढवावीं. त्यांत लोकांनीं निवडलेले प्रतिनिधि बरेचसे असावे. सरकारी जमाखर्चाचीं अंदाजपत्रकें या मंडळांपुढें मांडण्यांत यावीं. मंडळाच्या सभासदांना सरकाराला राज्यकारभारासंबंधीं प्रश्न विचारण्याचा अधिकार असावा. कायदेमंडळांतील बहुमतानें मंजूर केलेल्या ठरावांना सरकारानें संमति दिली नाहीं तर त्याविरुद्ध वर कागाळी केलेली ऐकून घेण्याकरितां पार्लमेंट सभेनें आपली एक कायम कमिटी नेमावी.

( ४ ) सिव्हिल सर्व्हिस परीक्षा, पूर्वीं १८६० सालीं इंडिया ऑफिस कमिटीनें ठरविल्याप्रमाणें, हिंदुस्थानांत व इंग्लंडांत अशा एकदम एकाच वेळीं,

घेण्यांत याव्या. हिंदुस्थानांतील परीक्षेंत पास झालेल्या उमेदवारांना अभ्यासा-करितां कांहीं दिवस विलायतेस पाठवावें. याखालच्या नोकरींतील जागा, हिंदुस्थानांतच परीक्षा घेऊन, त्यांतील निकालाप्रमाणें भराव्या.

( ५ ) लष्करी खर्च वाढवूं नये. तो अनवश्यक आहे व हिंदुस्थानच्या उत्पन्नाच्या मानानें भारी आहे.

( ६ ) लष्करी खर्च वाढवावयाचाच तर ती जादा रकम, काटकसर करून, आयात जकाती पुनः बसवून, व प्राप्तीवरील कराची व्याप्ति वाढवून उभारावी.

( ७ ) उत्तर–ब्रह्मदेश खालसा करून हिंदुस्थानाला जोडला ही गोष्ट वाईट झाली. तो खालसा म्हणून ठेवावयाचाच तर हिंदुस्थान सरकारच्या ताब्यांत ठेवूं नये. वाटल्यास सिलोनसारखी ती बादशाहींतील वसाहत ( Crown Colony ) मानावी.

( ८ ) या परिषदेंत झालेले ठराव हिंदुस्थानांतील सर्व प्रांतांतील राजकीय संस्थांकडे पाठवावे; व त्यांना अशी विनंति करावी कीं, स्वतः त्यांनीं आपल्या-सारख्या इतर संस्थांच्या साहाय्यानें मुंबईच्या सभेनें केलेल्या मागण्यांची तड लावण्याचा प्रयत्न जोरानें करावा.

वरील ठरावांत* सामाजिक सुधारणेचा एकहि सवाल निघाला नाहीं. त्यांत प्रतिनिधि म्हणून नव्हे पण सहानुभूति दाखविणारे मित्र म्हणून कित्येक युरो-पियन व हिंदी सरकारी नोकर परिषदेला हजर राहिले होते. अध्यक्ष उमेश-चंद्र बानर्जी यांनीं आपल्या भाषणांत राष्ट्रीय सभेचे उद्देश म्हणून सांगितले ते असेः—

---

* मुंबईची ही पहिली सभा गवालिया टँकजवळ गोकुळदास तेजपाळ ट्रस्टच्या इमारतींत भरली होती. परिषदेला एकंदर बाहात्तर प्रतिनिधि आले होते. त्यांची वांटणी खालीलप्रमाणें—

कराची २, विरमगांव १, सुरत ६, पुणें ८, कलकत्ता ३, आग्रा २, बनारस १, सिमला १, लखनौ ३, अलाहाबाद १, लाहोर १, अंबाला १, अहमदाबाद ३, मुंबई १८, मद्रास ८, बऱ्हाणपूर १, मच्छलिपट्टम् १, चिंगलपट्ट १, तंजावर २, कुंभकोणम् १, मदुरा १, तिनिवल्ली १, कोईमतुर १, सालेम १, कडाप्पा १, अनंतपूर १, बल्लारी १,–एकूण ७२

या बाहात्तर प्रतिनिधींची नांवनिशी सांगण्याचें कारण नाहीं. परंतु त्यांत वकील, व्यापारी, जमीनदार, सावकार, डॉक्टर, संपादक, छापखानेवाले, प्रोफेसर, हेडमास्तर, धर्मप्रसारक, सुधारक वगैरे सर्व प्रकारचे लोक होते.

(१) हिंदुस्थानचें हित चिंतिणाऱ्या व त्याविषयीं काम करणाऱ्या अशा सर्व लोकांचा परस्पर परिचय व स्नेहवर्धन.

(२) राष्ट्रीय सभेस न आलेल्या व न येणाऱ्या अशाहि सर्ववंशीय व सर्वजातीय लोकांमध्यें दळणवळणाची व परिचयाची वाढ, त्या योगानें एकराष्ट्रीयत्वाच्या बुद्धीस घातक असे पूर्वग्रह किंवा दुष्टग्रह यांचें उन्मूलन, आणि राष्ट्रीय ऐक्याचें संवर्धन.

(३) देशांतील सुशिक्षित लोकांनीं परिश्रमपूर्वक मिळविलेली माहिती व विचारपूर्वक बनविलेलीं मतें यांची पूर्ण चर्चा करून विद्यमान सामाजिक प्रश्नांवर जनतेचें म्हणून जें मत दिसेल त्याची अधिकृत नोंदणी.

(४) पुढील बारा महिन्यांत देशाहिताचें काम कोणकोणत्या मार्गांनीं हिंदी राजकीय पुढाऱ्यांनीं करावें याविषयींची योजना.

## काँग्रेस काढण्यांत वेगवेगळे हेतु

वरील उद्देशविधानांत सामाजिक सुधारणांचा फक्त ओझरता उल्लेख आहे हें ध्यानांत येईलच. ठरावांत त्याविषयीं कांहीं नाहीं हें वर सांगितलेंच आहे. पण सामाजिक प्रश्नांचा हा कोंडमारा, रा. ब. रानडे यांनीं राष्ट्रीय सभेबरोबरच पण वेगळ्या भरणाऱ्या सामाजिक परिषदेची योजना अमलांत आणून नाहींसा केला. अध्यक्ष उमेशचंद्र बानर्जी यांनीं आपल्या भाषणांत असें सांगितलें कीं, सामान्यतः ज्या पद्धतीनें विलायतेंतल्या लोकांनीं स्वराज्य मिळविलें व तें ते वहिवाटीत असतात, त्याच पद्धतीचा उपयोग हिंदुस्थानांतील लोकांना करावयाचा आहे. त्यामुळें राजनिष्ठेला भंग येत नाहीं; व भंग येतो अशी कल्पना करून घेण्यांत येणारे आक्षेप फोल आहेत. कायदेभंग, सत्याग्रह, इत्यादि मार्ग त्या काळच्या पुढाऱ्यांच्या स्वप्नांतहि आलेले नसणार. ह्यूमसाहेबांनीं काँग्रेस निर्माण केली तर दुसऱ्या एका साहेबांनींच म्हणजे कर्झनसाहेबांनीं तीव्र अशांतता व बेकायदेशीर चळवळ निर्माण केली असें म्हणतां येईल.

पूर आला तर पाट काढून द्यावा, बांध फोडूं देऊं नये, हेंच राष्ट्रीय सभेच्या इंग्रज व हिंदी चालकांचें धोरण होतें. त्याला उद्देशून कांहीं लोक असा आक्षेप घेत कीं, काँग्रेसची चळवळ ही सरकारविरुद्ध होणाऱ्या तीव्र चळवळीला सौम्य करण्याचा फक्त एक मार्ग आहे. तिच्या प्रयत्नामुळें सरकार लोकांच्या राजकीय आकांक्षा तृप्त करणार नाहींच; पण ही सभा म्हणजे जनतेच्या

धावत्या उमेदीच्या गळ्यांत एक जड अवजड चाक घालावें तशी अडचणीची होईल. ह्यूमसाहेबांच्या कांहीं उद्गारांवरून तसें भासेहि. ते सरकाराला उद्देशून म्हणत, " राष्ट्रीय सभा माझ्या हातीं आहे. याचा अर्थ हिंदुस्थानांतील राज्यक्रांतीच्या किल्ल्याच माझ्या हातीं आहेत. क्रांतिकारक मतांना मीं हें कुलूप लावलेलें आहे, व सुशिक्षितांच्या राजनिष्ठेची मोहोर त्यावर लाखबंद बसविली आहे. म्हणून इंग्रजांचा येथें निभाव आहे. हें कुलूप जर तुटलें तर क्रांतीचा पूर देशभर पसरेल. " याच शब्दांकडे बोट दाखवून कित्येक लोक म्हणत ह्यूम, वेडरबर्न हे हिंदुस्थानचे खरे मित्र नसून शत्रु आहेत. लोकांची बाजू आपण घेतों असें वरकरणी दाखवून वास्तविक सरकाराचेंच कार्य ते करीत आहेत. पण आक्षेपकांची ही रीत परिचयाचीच आहे. स्वतः उडी घेऊन क्रांतिकारक चळवळ करून प्राणाची आहुति देण्यास तयार असलेल्या लोकांनीं असला आक्षेप घेतला तर तो एक वेळ रास्त म्हणतां येईल. कारण त्यांना जनतेचा क्षोभ कमी न होतां अधिक तीव्र व स्फोटकारक व्हावा असें वाटत असतें व त्यांत भाग घेण्याचीहि त्यांची तयारी असते. पण स्वतः चळवळीची एक काडीहि न हालवितां, आपण घरीं बसून लोकांनीं चळवळ करावी, क्षोभ उत्पन्न करावा, बंड अत्याचार करावे, मरून जावें, व ग्रांनीं घराचीं दारें लावून त्यांचें कौतुक करावें, त्यांना शाबासकी द्यावी असे "परस्पर" साहाय्यकारीच पुष्कळ. अशांना कायदेशीर मार्गानें चळवळीस प्रारंभ करणारी राष्ट्रीय सभा व तिचे हे युरोपियन सल्लागार हितशत्रु वाटल्यास काय नवल ? हा परस्पर साहाय्यकारी वर्ग अजूनहि देशांत दृष्टीस पडतोच. मग ती बंडाची चळवळ नसून कायदेभंगाच्या सत्याग्रहाची कां असेना !

## हेतुभिन्नतेची मीमांसा

राष्ट्रीय सभेला अनिष्ट मानणारे असे आणखी दोन वर्ग होते. पण ते अगदीं उलट्या दिशेनें. पैकीं एक वर्ग कॉन्झर्व्हेटिव इंग्रजांचा. म्हणजे ज्यांना असें वाटे कीं, हिंदी राष्ट्र हें अशिक्षित राहावें व त्याला शिक्षण दिलें तरी तें इतक्या बेताचें द्यावें कीं, जनता सरकारच्या नेहमीं आधीन व अंकित राहील; आणि वरिष्ठ प्रतीचे राजकीय हक्क मागण्याची आकांक्षा त्यांच्या मनांत प्रादुर्भूत न होईल. अशा वर्गांपैकीं अलाहाबाद प्रांताचे ले. गव्हर्नर सर ऑकलंड कॉल्व्हिन हे एक होते. त्यांचा व ह्यूम साहेबांचा जाहीर वाद झाला. कॉल्व्हिनसाहेबांनीं सुशिक्षितां-

वर गहजब केला; ह्यूमसाहेबांनीं त्यांचें सर्वस्वीं समर्थन केलें. दुर्दैवानें ह्यूमसाहेबांचा सांप्रदाय दिवसेंदिवस किती कमी होत चालला आहे, व कॉलव्हिनसाहेबांचा सांप्रदाय मात्र कसा वाढत आहे, हें आज आपल्या अनुभवाला येतच आहे. पण ह्यूमसाहेबांच्या सांप्रदायाचा निर्वंश होत असला तरी त्यांनीं रुजत घातलेलें बीज अगदींच कुजून फुकट गेलें नाहीं. तर सुशिक्षित लोकांनीं स्वतंत्रपणें स्वावलंबी रितीनें राजकीय चळवळ सुरू ठेवून ह्यूमसाहेबांची शिकवण सार्थ केली. पण खरें बोलावयाचें तर त्या शिकवणीच्या सार्थकतेची मजल इतकी पुढें नेली आहे कीं, स्वतः ह्यूमसाहेब आज जिवंत असते तर कदाचित् त्यांनाहि ती मान्य न होती ! हिंदुस्थानची राजकीय प्रगति किती व्हावी याविषयींच्या, उपकारी अशाहि इंग्रजांच्या कल्पनेंत व हिंदी देशभक्तांच्या कल्पनेंत नेहमीं अंतर पडणारच. अशा इंग्रजांची भूमिका जी पूर्वीं होती तीच आजहि आहे. त्यांच्यांत आंत बाहेर असें कांहीं नव्हतें व नाहीं. ह्यूमसाहेबांना हिंदुस्थान देश स्वतंत्र व्हावा, म्हणजे साम्राज्यांतून फुटून निघावा, असें कधींच वाटलें नाहीं व वाटणें शक्य नव्हतें. आज विलायतेंतील मजूर किंवा सोशालिस्ट पक्षांतील हिंदुस्थानचे मित्र म्हणविणारांचीहि तीच मर्यादित भावना आहे. आणि याविषयीं समजण्यासारखें ठळक उदाहरण द्यावयाचें तर खुद्द बेझंटबाईंचेंच देतां येईल. त्याहि हिंदुस्थानाला स्वातंत्र्य मिळावें हे शब्द वापरीत. पण स्वातंत्र्य या त्यांच्या शब्दाचा अर्थ व लाहोर येथें १९२९ सालीं राष्ट्रीय सभेनें ठराव करून जाहीर केलेल्या स्वातंत्र्य शब्दाचा अर्थ फार वेगळा आहे. लाहोरच्या राष्ट्रीय सभेंत बेझंटबाई भाग घेत्या तर त्यांनीं त्याला विरोधच केला असता. कोणाहि उदारमतवादी इंग्रजाला चालू साम्राज्य बुडावें असें वाटणें शक्य नाहीं. आजचा कम्यूनिस्ट इंग्रज घेतला तरी तो याविषयीं काय म्हणतो हें निःसंदिग्धपणें सांगणें कठीण. उलट हिंदी लोकांना आपल्या स्वातंत्र्याच्या आकांक्षेला मर्यादा घालण्याचें कांहींच कारण नाहीं. म्हणूनच टिळकांनीं म्हटलें कीं, " स्वराज्य हा माझा जन्मसिद्ध हक्क आहे व मी तें मिळवीनच मिळवीन. " या ठिकाणीं स्वराज्य याचा अर्थ क्रमानें पूर्ण स्वराज्य किंवा स्वातंत्र्य असाच होतो. मर्यादित स्वराज्य म्हणजे उदाहरणार्थ वसाहतीचें स्वराज्य असा होत नाहीं. पण ह्यूम किंवा बेझंटबाई यासारख्यांच्या स्वराज्याच्या कल्पना प्रथमपासून आतांपर्यंत मर्यादितच असल्याकारणानें ह्यांच्या उद्गारांत कधींहि फरक

पडला नाहीं. सुसंगतता राहिली. हिंदी लोकांचें मात्र तसें झालें नाहीं. कारण मनांत एक व जनांत एक असें ह्यांना करावें लागलें. प्रथम मर्यादित स्वराज्य मागत असतां आतां स्वराज्य शब्दाचा अर्थ पूर्ण स्वराज्य असा त्यांनीं केला आहे.

## दान व संटघना हा चळवळीचा पाया

राष्ट्रीय सभेच्या जन्मापूर्वी प्रांतानिहाय संघटित असें सार्वजनिक कार्य तुटक व तुरळक चाले. संघटित कार्य हें केव्हांहि शिकून व आंगवळणीं पडूनच येतें. त्याला लागणारीं साधनें हळू हळू जुळवावीं लागतात. सर्वांत मोठें साधन पैसा. सार्वजनिक कार्याला वर्गण्या, देणग्या देण्याची संवय त्याकाळीं लोकांना फारशी लागली नव्हती. लोकांजवळ पैसा नव्हता असें नाहीं. परंतु देवदेवळें, सदावर्तें, अन्नछत्रें यापलीकडे धर्मदायाची दृष्टि जात नव्हती. देह व देव हेच दोन त्यांच्या खर्चांचे विषय प्रायः असत. पण या दोहोंमध्यें असणारा जो देश (आणि खरोखर श हें मूळाक्षर व आणि ह यांच्या दरम्यानच येत नाहीं कीं काय ! ) त्यावर खर्च कसा करावा हें लोकांना अद्यापि समजूं लागलें नव्हतें. श्रीमंतांकडून देहावर म्हणजे स्वतःच्या सुखोपभोगावर पैसा हवा तितका खर्च होई. तीच गोष्ट देवाची. इतकी कीं, आत्मौपम्यानें देवाची कल्पना करून ‘ यथा देहे तथा देवे ’ या वचनाप्रमाणें देवाच्या दिनचर्यैतील सर्व भोगांची उपचारांची तजवीज मोठ्या खर्चानें करणारे भेटत. पण देश म्हणून देहानंतर व देवाच्या आधीं कोणी तरी एक सेव्य म्हणून आहे, व त्याचीहि सेवा सर्वोपचारपूर्ण करावयाची तर त्याला खर्च लागतो तो करावा, ही गोष्ट श्रीमंतांना समजूं लागली नव्हती. आतां ती समजूं लागल्यानें, म्हणजे श्रीमंत लोक देशकार्याला वर्गण्या देणग्या देऊं लागल्यानें, देवाचें कांहीं कमी पडलें आहे अशांतला प्रकार नाहीं, कारण त्याचें उणें पडेल तर तो देव कसला ! पण देवाचें काम न बुडतां त्याबरोबर देशाचें मात्र काम साधूं लागलें. याचा अर्थ, समाजांतील विचारी लोकांना स्वार्थ व परमार्थ यांचे दरम्यान परार्थ नांवाचा एक तिसरा पुरुषार्थ आहे हें समजूं लागलें. आत्मप्रीति व मोक्ष यांच्याप्रमाणेंच देशभक्ति हें एक इष्ट व साध्य आहे, आणि त्याकरितां संपत्तीचा व्यय करणें योग्य आहे असें लोकांना वाटूं व पटूं लागलें. आजकाल वर्गण्या जमतात त्यांच्याशीं तेव्हांच्या वर्गण्यांची तुलनाच होऊं शकत नाहीं. नुसता महाराष्ट्र घेतला तर गेल्या वीस

वर्षांमध्यें, त्यांतील अनेक व्यक्ति व संस्था यांना मिळालेल्या देणग्या वर्गण्या यांची रक्कम निदान पन्नास लक्ष भरेल असें वाटतें. अखिल हिंदुस्थान घेतल्यास हा आंकडा कोटींनींच गणावा लागेल. शिवाय ही गोष्ट देखील लक्षांत घेतली पाहिजे कीं, या वर्गण्या देणारांमध्यें श्रीमंतांच्या मानानें मध्यवर्गांचेच लोक अधिक भरतील. देशभक्तीची भावना सुशिक्षित, उद्योगी, श्रमोपजीवी लोकांच्या मनांत श्रीमंतांपेक्षांहि अधिक उदित होते. श्रीमंतांना आपल्याजवळच्या पैशाच्या जोरावर सुखें भोगतां येतात त्याप्रमाणेंच फुकाची मान्यता श्रम केल्याशिवाय मिळते. मग ते देशाची आठवण कशाला करतील !

## निःस्वार्थी याचक

असो. पैसा हें जसें सार्वजनिक कार्यांच्या उठावणीचें व सिद्धीचें म्हणून एक साधन सांगितलें, तसेंच पण कांहीं अंशीं त्याहून अधिक महत्त्वाचें साधन म्हणजे सार्वजनिक कार्यांची इच्छा व हौस बाळगणारे लोक हे प्रायः सुशिक्षित वर्गांतूनच येतात. श्रीमंत बेफिकीर म्हणून, व खालच्या वर्गांचे लोक अशिक्षित व केवळ आपल्याच व्यवसायांत चूर म्हणून, हे दोन्हीहि सार्वजनिक कार्याला लाभत नाहींत. तो सर्व भार सुशिक्षित मध्यम वर्गांवर पडतो, व ते तो भार हौसेनें आत्मस्फूर्तीनें घेतातहि. हे लोक स्वतः वर्गण्या देणग्याहि यथाप्रमाण देतातच, पण ते जी एक मोठी गोष्ट करितात ती ही कीं, कार्यांच्या सिद्धीला लागणारा पैसा मागण्यामिळविण्याची खटपट करतात. देणगीच्या पैशाचा हा धर्मच आहे कीं सामान्यतः तो कोणी हात पुढें करून याचना केल्याशिवाय मिळत नाहीं. गाईम्हशींच्या कासेंत दूध सांचत असतें, पण त्याची धार काढणारा न भेटला तर तें दूध त्यांच्या कासेंतच जिरून जातें. तसेंच देणगीच्या पैशाचें आहे. धार काढण्यासारखेंच वर्गण्या मागणें हें कर्म फलद्रूप होतें. मागणें म्हणजे याचना करणें. ती करण्यास भणंगभिकारी भिक्षुक हे जन्मापासून तयार झालेले असतात. यामुळें त्याची त्यांना लाज वाटत नाहीं. उदरंभरणाच्या गरजेपुढें त्यांची ती लाज मरून जाते. मग सार्वजनिक कार्यकर्त्यांना झालें तरी याचनेची तीच लाज वाटत नाहीं असें होतें काय ? नाहीं. पण त्यांची ती लाज कार्योत्सुकतेनें मरून जाते. शिवाय दुसऱ्याहि एका गोष्टीची मदत त्यांना या कामीं होते; ती म्हणजे आपण याचना करतों ती निःस्वार्थीपणानें करतों ही उमदी खंबीरपणाची भावना !

असो. १८५७ पासून सुशिक्षितांच्या ज्या पिढीचा आरंभ झाला तिनें संघटित पद्धतीनें सार्वजनिक कार्य करण्यास सुरुवात केली. पैकीं कांहीं कार्य बुद्धिबळानें संपादण्यासारखें तर कांहीं द्रव्यबळावर संपादण्यासारखें होतें. तें दोन्ही प्रकारांनीं त्यांनीं केलें. संघटित कार्य करण्याला आधीं व्यक्तिशः कार्य करण्याची जी पात्रता लागते ती त्यांनीं सिद्ध करून दाखविली होती.

## कॉंग्रेसपूर्वीचा बंगाल

राष्ट्रीय सभेसारखी संस्था निघण्याची पूर्वतयारी देशांत कशी होऊन राहिली होती हें महाराष्ट्रापेक्षांहि बंगालच्या उदाहरणावरून अधिक लक्षांत येण्यासारखें आहे. बंगाल्यांत इंग्रजी शिक्षणाचा प्रारंभ महाराष्ट्रापूर्वीं बरेच दिवस झाला होता. विलायतेस जाऊन उद्योग करण्याची प्रथा राजा राममोहन रॉय यांनीं १८३०–३२ च्या सुमारास पाडली होती.

राजा राममोहन रॉय म्हणजे बंगाल्यांतला पहिला नवमतवादी संस्कृत पंडित, ग्रंथकार, आंग्लपंडित, प्रवासी, संपादक, आत्मीय सभेचा संस्थापक, राष्ट्रीय वृत्तीचा राजकीय पुढारी, वाग्योद्धा, एकेश्वरवादी, पाश्चात्य संस्कृतीचा पुरस्कर्ता, स्त्रीशिक्षणाचा कैवारी, सतीच्या रूढीविरुद्ध चळवळ करून कायदा मिळविणारा, हिंदु कॉलेज व ब्राह्म समाज यांचा संस्थापक, भौतिक शिक्षणाचा पाठीराखा, मुद्रणस्वातंत्र्याकरितां सरकारशीं झगडणारा पहिला बंगाली वीर, व देशी बंगाली वाङ्मयाचा पुरस्कार करणारा होय.

## राममोहन रॉय

राजा राममोहन रॉय हा बंगाल्यांतील नव्या युगाचा आद्य प्रवर्तक. त्याच्या चळवळीचें क्षेत्र सर्वस्पर्शी होतें. आमच्या इकडे माधवराव रानडे यांच्या कार्याचें क्षेत्र फार विस्तृत होतें असें आपण समजतों. पण राममोहन रॉय यांच्या उद्योगक्षेत्राच्या मानानें तें संकुचितच ठरतें. तसेंच राजकारणांत राममोहन रॉय याची उडी रानड्यांपेक्षां अधिक पल्लेदार होती. तो अंतर्बाह्य स्वातंत्र्याचा भोक्ता होता. पाश्चात्य संस्कृति व सुधारणा यांचा उपदेश व पुरस्कार त्यानें अतिशयच केला. पण इंग्रजांचें हिंदुस्थानावरील राज्य हें ईश्वरी कृपेचें फळ आहे असें त्यानें कधीं मानलें नाहीं. रानडे यांनीं जगाच्या इतिहासाचा चांगला अभ्यास केला होता, परंतु तो घरच्या घरीं राहून. प्रवासी राममोहन रॉय यानें हिंदुस्थानाबाहेर पडून परदेशाच्या लोकांचा प्रत्यक्ष परिचय केला. यामुळें

राजकीय चळवळीचा जिवंतपणा त्याला अनुभवावयाला मिळाला. १८२१ सालीं इटाली देशांत नेपल्सच्या लोकांनीं राजाकडून मिळविलेली लोकमतानुवर्ति राज्यघटना क्रांतिकारक वाटून रशिया, प्रशिया, ऑस्ट्रिया, यांनीं नेपल्सच्या सैन्याची मदत घेऊन ती घटना परत घ्यावयास लावली. युद्धांत लोकपक्षाची कत्तल झाली. ही बातमी ता. ११ ऑगस्ट रोजीं राममोहन यानें वाचली. ती ऐकतांच त्या दिवसापुरतें त्यानें सुतक पाळलें. त्या दिवशीं मि. बॅकिंगहॅम नांवाच्या त्याच्या एका युरोपियन गृहस्थाच्या घरीं कांहीं आनंददायक सामाजिक कार्यक्रम ठरलेला असून त्याला राममोहन जाणार होता. परंतु ही वरील बातमी ऐकतांच त्यानें बकिंगहॅमला पत्र लिहून कळविलें कीं, 'आज स्वातंत्र्याच्या मृत्यूची वार्ता आली. मला ख्यालीखुशाली रुचणार नाहीं. तरी मी तुमचेकडे येऊं शकत नाहीं याबद्दल क्षमा करा.' राममोहनच्या मिरात-उल-अखबार नामक वृत्तपत्रांत तो आयरिश लोकांतर्फें व इंग्रजांविरुद्ध लेख नेहमीं लिहीत असे. स्पेन देशांतील लोकपक्षाचा जय होऊन राजाकडून प्रजेनें लोकमतानुवर्ति राज्यघटना मिळविली त्या दिवशीं त्यानें कलकत्ता येथील टाऊनहॉलमध्यें मित्रमंडळींना मेजवानी दिली.

## स्वातंत्र्यवादी राममोहन

राममोहन रॉय विलायतेस जाण्यापूर्वीं दुसऱ्या फ्रेंच राज्यक्रांतीची बातमी कलकत्त्यास पोंचली. तेव्हां सर्व दिवसभर तो तिच्या अभिनंदनाशिवाय दुसरी गोष्ट बोलत नव्हता. विलायतेस जातांना वाटेंत एका बंदरांत त्याला दोन फ्रेंच जहाजें भेटलीं. त्यांवर नव्या लोकसत्ताक राज्याचीं निशाणें पाहतांच त्याला आनंदाचें भरतें येऊन तो आजारी असतांहि त्या जहाजांवर गेला व त्यांवरील अधिकाऱ्यांचें त्यानें अभिनंदन केलें. १९३२ सालीं राममोहन विलायतेंत होता त्या वेळीं जनतेला मतदारीचे अधिक हक्क देणारें रिफॉर्म बिल पार्लमेंटपुढें असून देशभर वादाची दंगल माजली होती. तेव्हां जनतेचा पक्ष घेऊन एका सभेंत त्यानें असें सांगितलें कीं, पार्लमेंटनें हें बिल फेटाळलें तर इंग्लंड हें स्वातंत्र्यप्रिय नाहीं असें समजून मी त्याच्याशीं पुढें कोणताहि संबंध ठेवणार नाहीं. स्वतःच्या आत्मचारित्रांत त्यानें इंग्रजांविषयीं अनुकूल मत प्रकट केलें आहे. कारण त्याला आशा होती कीं, यांच्या राज्यांत जनतेला स्वातंत्र्य मिळेल. या वेळीं हिंदुस्थानांत मुद्रणस्वातंत्र्य नव्हतें. विलायतेसारखा इकडेहि

डेहि मुद्रणप्रतिबंधक कायदा होता. त्याविरुद्ध राममोहननें इंग्लंडचा राजा व सुप्रीम कोर्ट यांना एक जोरदार व वक्तृत्वपूर्ण अर्ज केला होता. ज्यूरी पद्धतीनें हिंदी लोकांना न्याय मिळावा व न्यायाच्या कामीं जात किंवा धर्म यामुळें भेद करण्यांत येऊं नये असें त्यानें सुचाविलें होतें. १८३१ सालीं पार्लमेंटनें नेमलेल्या चौकशी कमिटीपुढें त्यानें लेखी साक्ष दिली. तींत त्यानें बंगाल्यांतील जमीनदारांविरुद्ध रयतेची बाजू उचलली होती. तसेंच हिंदी लोकांना वरिष्ठ अधिकाऱ्याच्या जागा द्याव्या अशी मागणी केली होती. न्याय व मुलकी खातें यांची विभागणी करावी, विलायतेकडे जाणारा हिंदुस्थानांतील पैशाचा ओघ थांबवावा व त्याकरितां वाटल्यास युरोपियन कामगार परत विलायतेस जातात त्याऐवजीं त्यांना हिंदुस्थानांतच राहण्याची परवानगी द्यावी असें त्यानें सुचविलें होतें. हिंदी लोकांच्या अंगीं इतर कोणत्याहि देशाइतकी राजकीय प्रगतीची पात्रता आहे असें प्रतिपादन तो करी. संस्कृतीच्या बाबतींत तर प्राचीन काळीं हिंदुस्थान हाच युरोपच्या गुरुस्थानीं होता. मात्र अलीकडील यांत्रिक युगांत युरोपियन लोकांनीं जी भौतिक सुधारणा केली आहे तिचा स्वीकार हिंदुस्थान कृतज्ञतापूर्वक करील असे उद्गार त्यानें काढले होते. वरील सर्व गोष्टी लक्षांत घेतां राममोहन हा बंगाल्यांतीलच काय पण हिंदुस्थानांतील नव्या युगाचा भविष्यवादी असें म्हणण्यास हरकत नाहीं. इंग्रज लोकांवर त्यानें इतकी छाप पाडली होती कीं त्याच्या मृत्यूनंतर त्याचीं चरित्रें इंग्रज लोकांनीं लिहिलीं. इंग्लंडला जसा बेकन तसा हिंदुस्थानाला राममोहन रॉय होय असें एके ठिकाणीं कोणीं म्हटलें आहे तें खरें आहे असें म्हणावें लागतें.

राममोहन यानें राष्ट्राराष्ट्रांतील राजकारणाचाहि विचार केला होता. इंग्लंडमध्यें असतांना त्यानें फ्रेंच प्रधानमंडळाला फ्रान्समध्यें जाण्याची परवानगी मागितली व तींतच आजच्या राष्ट्रसंघासारखी एखादी संस्था असावी व राष्ट्रांनीं एखादी कॉंग्रेस भरवून आपल्या हितसंबंधाआड येणारे प्रश्न सोडवून घ्यावे असेंहि त्यानें सुचविलें होतें. राममोहनच्या हयातींत राष्ट्रीय सभेसारखी एखादी संस्था निघती तर त्यानें तिचा जोरानें पुरस्कार केला असता, व तिचा पहिला अध्यक्ष तोच निवडला गेला असता यांत शंका नाहीं. राममोहन यानें नवीन धर्मपंथ स्थापन केला त्याप्रमाणें त्याच्यासारख्या उदारमतवादी लोकांचा एक

संप्रदायहि सुरू केला. त्याची परंपरा राष्ट्रीय सभेच्या स्थापनेनंतरहि बरेच दिवस बंगाल्यांत दिसून येत होती. राष्ट्रीय सभेच्या पहिल्या युगांतच काय पण कांहीं काल पुढेंहि राष्ट्रीय सभेनें जे विषय चर्चेला घेतले त्यांचा पूर्व उद्गार राममोहन याच्या तोंडून निघाला होता.

## आघाडीचे तेजस्वी बंगाली

१८७० पूर्वींच मनमोहन घोष, उमेशचंद्र बानर्जी, तारकानाथ पलीत, रमेशचंद्र दत्त, बिहारीलाल गुप्त, सुरेंद्रनाथ बानर्जी इत्यादि तरुण बंगाली सामाजिक बहिष्काराला न जुमानतां विलायतेस गेले. पैकीं शेवटचे तिघे हे सिव्हिल सर्व्हिस परीक्षेकरितां गेले. तिघेही परीक्षा पास झाले. परंतु वयाच्या दाखल्यांत कांहीं घोटाळा झाल्यामुळें सुरेंद्र बानर्जी व त्यांचेबरोबर श्रीपाद बाबाजी ठाकूर या दोघांचीं नांवें सिव्हिल सर्व्हिस कमिशननें रद्द केलीं. त्या गोष्टीचा बंगाल्यांत फार गवगवा झाला. महाराष्ट्रांतहि तो झाला. पण कमिशनविरुद्ध चळवळ जी महाराष्ट्रांत झाली नाहीं ती बंगाल्यांत झाली व फारच जोराची झाली. मोठमोठे जमीनदार व प्रतिष्ठित लोक पुढें आले; त्यांनीं शपथेवर ॲफिडेव्हिटें करून सुरेंद्रनाथांचें म्हणणें बरोबर आहे, कमिशनचें चुकीचें आहे, असा पुरावा दिला. पुढें हें प्रकरण किंग्ज बेंचच्या न्यायकोर्टापुढें न्यावें असें ठरून फिर्याद मांडण्यांत आली व सिव्हिल सर्व्हिस कमिशनला प्रतिवादी म्हणून नोटीस निघाली. एक दोन इंग्रज बॅरिस्टरांनीं हें काम न्यायाचें म्हणून फी न घेतां फुकट चालविण्याचें आश्वासन दिलें. फिर्यादीचा निकाल होण्यापूर्वींच कमिशननें आपली चूक कबूल केली, व बानर्जी व ठाकूर यांना फिरून पास झालेल्या उमेदवारांच्या यादींत दाखल करण्यांत आलें. पण सुरेंद्रनाथांचें दुर्दैव त्यांना सोडीना. ते सिव्हिलियन म्हणून नोकरींत शिरल्यावर १८७२ सालीं त्यांच्या हातून एक सामान्य चुकी झाली. तिला फाजील महत्त्व देऊन बंगाल सरकारनें त्यांना बडतर्फ करण्याचा घाट घातला व त्यांची चौकशी करण्याकरितां कमिशन नेमलें. त्यानें बानर्जींना दोषी ठरविलें व स्टेट सेक्रेटरीनें त्यांना बडतर्फ करून महिना फक्त पन्नास रुपये पेन्शन ठरविलें ! याहि गोष्टीनें बंगाल्यांत मोठी खळबळ उडाली. नंतर बॅरिस्टर तरी व्हावें म्हणून ते फिरून विलायतेस गेले. तेव्हां सिव्हिल सर्व्हिसमधून काढून टाकलेल्या या माणसाला बॅरिस्टर करून घेऊं नये अशी कारवाई सुरू झाली. ती यशस्वी

होऊन १८७५ सालीं बानर्जींना कलकत्त्यास परत यावें लागलें. तेव्हां अर्थात्‌च त्यांनीं प्रोफेसरी पतकरली व वर्तमानपत्रांत लिहिण्यास सुरुवात केली. लवकरच बानर्जी यांनीं सार्वजनिक कार्यांत लक्ष घातलें. आणि 'इंडियन ॲसोसिएशन' नांवाची संस्था १८७६ सालीं स्थापन केली. यापूर्वी 'इंडियन लीग' आणि 'ब्रिटिश इंडियन ॲसोसिएशन' नांवाच्या संस्था होत्या. पैकीं लीग ही बरीचशी हिंदि ख्रिश्चन लोकांच्या हातीं होती, आणि ब्रि. इं. ॲसोसिएशनमध्यें जमीनदारांचें फार प्रस्थ होतें. दोन्ही संस्था आपापल्या परीनें काम करीत. परंतु मध्यम सुशिक्षित वर्गाचें खरें लोकमत प्रगट करणारी संस्था म्हणून बानर्जी यांनीं काढलेल्या ॲसोसिएशनलाच लोक महत्त्व देत.

## सिव्हिल सर्व्हिस परीक्षेची चळवळ

या सुमारास हिंदद्वेष्ट्या कॉन्झर्व्हेटिव्ह लोकांनीं कारस्थान करून पूर्वी सिव्हिल सर्व्हिस परीक्षेला एकवीस वर्षांच्या वयाची मर्यादा होती ती एकोणिस वर्षांपर्यंत खालीं आणली. हेतु हा कीं, हिंदी लोकांना या परीक्षेला बसण्याला फार जड जावें. फिरून बंगाल्यांत याविरुद्ध मोठी चळवळ झाली. व फिरून जमीनदारांनीं या चळवळीला मदत केली. सर्व हिंदुस्थानभर या प्रश्नाविषयीं चळवळ करण्याकरितां शिष्टमंडळ नेमलें. त्यांत सुरेंद्र बानर्जी हे प्रमुख होते. त्यांनीं बहुतेक प्रांतांत दौरा काढला. त्यांत मुंबई व पुणें येथेंहि त्यांनीं व्याख्यानें दिलीं. सर्व हिंदुस्थानचें मिळून एक मेमोरियल पार्लमेंटपुढें सादर करण्याकरितां तयार झालें. या कामांत सहकारिता करण्याला पुणें सार्वजनिक सभेनें कलकत्त्यास एक शिष्टमंडळ पाठविलें. अखेर ब्रि. इं. ॲसोसिएशनमध्यें एक परिषद् भरली, आणि सिव्हिल सर्व्हिसच्या निमित्तानें सर्व हिंदुस्थानानें मिळून केलेली ही पहिली चळवळ होय असा उल्लेख परिषदेंत करण्यांत आला. पुढेंहि अशाच सहकारितेनें आणखी चळवळी व्हाव्या असें सर्वांचें मत पडलें. सुप्रसिद्ध वक्ते लालमोहन घोस यांना पार्लमेंटचा अर्ज घेऊन प्रतिनिधि म्हणून विलायतेस पाठविण्यांत आलें. तेथें जॉन ब्राईट यांच्या अध्यक्षतेखालीं 'वुइलिस रूम' मध्यें एक मोठी सभा होऊन मेमोरिअलला पार्लमेंटच्या सभासदांनीं पाठबळ द्यावें असें ठरलें. त्याचा तात्काळ परिणाम असा झाला कीं, दुसऱ्याच दिवशीं स्टेट सेक्रेटरींनीं सनदी सिव्हिल सर्व्हिसचे नियम तयार करून ते पार्लमेंटपुढें मांडले. ते पाहून सि. सर्व्हिस परीक्षेचें वय

जें कमी केलें त्याबद्दल सरकारनें कांहीं मोबदला हिंदी जनतेला दिला असें वाटून, वय कमी करण्याविरुद्धची चळवळ थोडी शिथिल झाली. सनदी सि. स. चा अर्थ असा कीं, परीक्षा वगैरे न घेतां खानदानीचीं व राजनिष्ठ घराणीं पाहून त्यांतील तरुण मुलांना डे. कलेक्टरची जागा द्यावी व पुढें कलेक्टरची जागा द्यावी. पण याचा परिणाम असा झाला कीं, सि. सर्व्हिसचें वय कमी झाल्यानें आपल्या बुद्धिबलावर व गुणांनीं जागा मिळवूं म्हणणाऱ्या तरुणांची गळचेपी झाली, व केवळ बडे बापके बेटे सि. सर्व्हिसमध्यें शिरूं लागले. हे लोक मिजासी व निर्बुद्ध असल्यामुळें हिंदी सिव्हिलियनांचें नांव सहजच खराब करतील, आणि मग त्यांच्या अपात्रतेचें उदाहरण देऊन सरसकट हिंदी लोकांच्या गळ्यांत नादानी बांधून सिव्हिल सर्व्हिस ही प्रायः इंग्रज मुलांकरितां राखून ठेविली जाईल असा मुत्सद्यांचा डाव होता. सनदी सिव्हिल सर्व्हिसचे नियम याचे आधींच सात वर्षें लिहून तयार होते असें म्हणतात. पण वुइलिस रूममधील सभेमुळें पुढील चोवीस तासांतच ते पार्लमेंटमध्यें मंजुरीकरितां ठेवण्यांत आले. अशा रीतीनें एक गेलें एक साधलें, म्हणजे मोठें जाऊन धाकटें हातीं आलें, तरी चळवळ केली असतां तिचा कांहीं तरी परिणाम होतो हा धडा लोकांना सहजच मिळाला. असो. लालमोहन घोष हे पुढें इतके लोकप्रिय झाले कीं, त्यांना लिबरल पक्षानें जनरल निवडणुकींत आपल्यातर्फे एक उमेदवार म्हणून पार्लमेंटच्या निवडणुकींत उभें केलें. पण याच वेळीं आयरिश नॅशनॅलिस्ट लोकांचा व लिबरलपक्षाचा वाद चालू असल्यामुळें इंग्लंड विरोधी आयरिश मतदारांनीं प्रतिपक्षी उमेदवाराला मतें दिलीं. यामुळें लालमोहन यांची उमेदवारी फसली. नाहीं तर दादाभाई नौरोजी यांच्या आधींच पार्लमेंटचा सभासद म्हणून बसण्याचा मान या बंगाली गृहस्थाला मिळावयाचा. लवकरच पुढें देशी पत्रांविरुद्ध मुस्कटदाबीचा कायदा झाला. लॉर्ड लिटन यांची कारकीर्द फार अप्रिय झाली. यामुळें सि. सर्व्हिस परीक्षेच्या प्रश्नाहून अधिक जिव्हाळ्याचीं गाऱ्हाणीं निर्माण होऊन, हिंदुस्थानांतील निरनिराळ्या प्रांतांनीं मिळून राजकीय चळवळ करण्याचे प्रसंग येऊन, ती कशी करावी याचें शिक्षणहि लोकांना अधिकाधिक मिळूं लागलें.

## सुरेंद्रनाथ बानर्जींचा उदय

सुरेंद्रनाथ बानर्जी हे पुन्हां एका वेगळ्या निमित्तानें बंगाल्यांत खळबळ

उत्पन्न करण्याला कारणीभूत झाले. १८७९ च्या प्रारंभीं त्यांनीं ‘ बंगाली ’ नांवाचें इंग्रजी वर्तमानपत्र पूर्वीच्या मालकापासून विकत घेतलें व तें इं. ॲसोसिएशनच्यातर्फे ते चालवूं लागले. दुसरें इंग्रजी पत्र ‘ हिंदु पेट्रियट ’ हें बाबू ख्रिस्तोदास पाल हे ब्रि. इं. ॲसोसिएशनच्यातर्फें चालवीत होते. ‘ बंगाली ’ वर्तमानपत्राची मालकी सुरेंद्रांना अवघी दहा रुपयाला मिळाली ! व छापखाना वगैरे विकत घेण्याकरितां कांहीं कर्ज वगैरे काढून सुरेंद्र बाबूंनीं सतराशें रुपये देऊन वर्तमानपत्राला लागणारी सर्व व्यवस्था केली. संपादक या नात्यानें त्यांना कांहींच पगार मिळूं शकत नव्हता. या पत्रांत ता. २ एप्रिल सन १८८३ रोजीं कलकत्ता हायकोर्टावर कडक टीका आली. न्या. मू. नॉरिस यांनीं एक दिवस आपल्यापुढील कज्जांतील पुरावा म्हणून एका देवस्थानांतील शालिग्राम कोर्टापुढें आणिला ! व तो जुना नसून नवीन घडणीचा आहे अशी त्यावर टीका केली. त्यावर ‘ बंगाली ’ पत्रानें केलेल्या टीकेवर हायकोर्टानें आक्षेप घेतला. रीतिप्रमाणें कोर्टाच्या बदनामीचा खटला भरण्यांत येऊन, सुरेंद्रबाबूंना पांचापैकीं चार न्यायाधिशांनीं दोषी ठरवून साध्या कैदेची शिक्षा फर्माविली. पण पांचवे न्या. मू. रमेश मित्र यांनीं फक्त दंड करावा असा आग्रह धरला. शिक्षा ऐकून कोर्टाबाहेर लोकांनीं मोठा दंगा केला. कांहीं तरुण विद्यार्थीहि त्यांत सामील होते. त्यांपैकीं पुढें प्रसिद्धीस आलेले सर आशुतोष मुकर्जी हेहि एक होते. सार्वजनिक चारित्र्यांतील गुन्ह्याबद्दल तुरुंगवास घडलेले असे हे पहिलेच बंगाली गृहस्थ असल्यामुळें सर्व प्रांतभर मोठीच चळवळ झाली. हजारों लोकांच्या जाहिर सभा भरूं लागल्या. सनातनी लोक तर फारच खवळले. भावी वंगभंगाच्या चळवळीचा तो एक पन्नास वर्षांपूर्वीचा नमुना होता. इल्बर्ट बिलाचीहि चळवळ याच वेळीं झालेली होती. या बिलाचा उद्देश न्यायासनापुढें हिंदी लोकांपेक्षां युरोपियन लोकांना कांहीं विशेष हक्क देऊं नये असा होता. या कामीं हायकोर्टातील युरोपियन न्यायाधिशांनीं आपल्या इंग्रज जातभाईंचा पक्ष धरल्यामुळें हायकोर्टाविषयीं लोकांचें फारच प्रतिकूल मत झालें होतें. उलटपक्षीं लॉर्ड रिपन म्हणजे तत्कालीन व्हाइसरॉय हे कॅथॉलिक पंथाचे व उदारमतवादी असल्यामुळें व इल्बर्ट बिलाला त्यांचा पाठिंबा असल्यामुळें युरोपियन समाजानें त्यांजवर बहिष्कार घातला होता. व अशीहि बातमी उठली होती कीं, एखाद्या

रात्रीं रिपनसाहेबांना गुप्तपणें पकडून लगेच एका जहाजावर घालून विलायतेस पोंचविण्याचा कट झाला होता.

## कलकत्ता ही राष्ट्रमताची राजधानी

या एका गोष्टीवरून बंगाल्यांत राजकीय चळवळीला किती तीव्र स्वरूप आलें होतें हें दिसून येईल. इतर प्रांतांपेक्षां बंगाल प्रांतांत अधिक तीव्रतेनें अशा चळवळी होण्याचें कारण तेव्हां कलकत्ता ही हिंदुस्थान सरकारची मुख्य राजधानी होती. यामुळें राजकारणाचे बरे वाईट आघात अगदीं जवळून धक्का दिल्याप्रमाणें कलकत्त्यांतील लोकपक्षाला जाणवत. या राजधानीच्याच कारणानें कलकत्त्याकडे सर्व लोकांचे डोळे असत व कलकत्त्याकडून इतर प्रांतांना चळवळीची स्फूर्ति मिळे. शिवाय इंग्रजी शिक्षणाच्या बाबतींत कलकत्ता पुढारलेला असल्यामुळें राजकीय चळवळीचीं सर्व साधनें तेथें इतर प्रांतांपेक्षां अधिक सुलभ होतीं. सुमारें दोन महिन्यांच्या कैदेनंतर तारीख ४ जुलै रोजीं सुरेंद्र बाबूंची सुटका झाली. तो दिवस अमेरिकन स्वातंत्र्य-प्रस्थापनेचा वार्षिक-दिन असतो. या योगानें लोकांच्या उत्साहाला फार भरती आली. सुरेंद्र बाबू सुधारक होते तरी सनातनी धर्मभावनांचें संरक्षण करण्याकरितां सुरेंद्र बाबूंना शिक्षा झाली, म्हणून त्यांच्या सुधारकी मतांचा गुन्हा माफ करून सनातनी पक्षानें सुरेंद्र बाबूंवर पुष्पवृष्टि केली. वेळ पडल्यास हाताशीं असावी म्हणून एक लष्करी तुकडीहि तयार ठेवण्यांत आली होती. इतका लोकमताचा क्षोभ त्या दिवशीं प्रकट झाला. सुरेंद्र बाबूंनीं फिरून, राजकीय चळवळ हातीं घेतली तेव्हां त्यांना जनतेकडून पूर्वींहून दुप्पट पाठबळ सहजच मिळूं लागलें. आणि इं. ॲसोसिएशनला हजारों रुपयांची देणगी कांहीं श्रीमंत लोकांनीं दिली.

## कॉंग्रेसचा अरुणोदय

१७ जुलै १८८३ रोजीं एक मोठी सभा सुमारें दहा हजार लोकांची भरून, राजकीय चळवळ अखंड चालू करण्याकरितां एक मोठा राष्ट्रीय फंड उभारण्याचें ठरलें. व भावी चळवळींत सर्व हिंदुस्थान सामील करावा अशी योजना झाली आणि ज्यांतून पुढें राष्ट्रीय सभेची कल्पना निर्माण झाली ती बंगालची प्रतिवार्षिक परिषद् १८८३ च्या डिसेंबरपासून भरूं लागली. या परिषदेंत प्रातिनिधिक कायदेमंडळें, स्थानिक स्वराज्य, शिक्षण, मुलकीखातें व न्यायखातें

यांची फारकत इत्यादि—म्हणजे पुढें राष्ट्रीय सभा चर्चा करूं लागली असे—विषय परिषदेंत चर्चेला घेण्यांत येऊं लागले. पुढील सालीं सुरेंद्र बाबूंनीं उत्तर हिंदुस्थानांत व्याख्यानांचा दौरा काढला. लॉर्ड रिपन जाऊन त्यांचे जागीं लॉर्ड डफरिन हे व्हाइसरॉय झाले. इंडियन असोसिएशननें त्यांना मानपत्र दिलें, त्यांत कायदेमंडळांविषयीं सरळ मागणी केली होती.

असो; १८८४ सालीं मद्रास ( अड्यार ) येथें थिऑसॉफिकल सोसायटीची परिषद् भरली होती. त्या परिषदेंत भाग घेतलेले व ती पाहण्याकरितां बाहेरून आलेले असे कांहीं निवडक लोक डिसेंबरच्या अखेरीस दि. ब. रघुनाथराव यांच्या घरीं जमले होते. त्यांत सुब्रह्मण्य अय्यर, रंगय्या नायडू, आनंदाचार्लू, नरेंद्रनाथ सेन, सुरेंद्रनाथ बानर्जी, मनमोहन घोष, दादाभाई नौरोजी, मंडलीक, तेलंग, विजयरंग मुदलियार, पांडुरंग गोपाळ, दयाळसिंग, हरिश्चंद्र, काशीप्रसाद, पंडित लक्ष्मीनारायण, चारुचंद्र मित्र व श्रीराम अशी प्रमुख मंडळी होती. या संमेलनांत पुढील वर्षीं ' राष्ट्रीय सभा ' नामक परिषद् भरविण्याच्या कल्पनेचीं चर्चा झाली. ही परिषद् म्हणजे देशी पार्लमेंट असेंच तिचें वर्णन जमलेल्या लोकांच्या तोंडून निघालें. हीच कल्पना परिणत होऊन पुढच्या सालीं पहिली राष्ट्रीय सभा भरविण्यांत आली.

बंगालची दुसरी राष्ट्रीय परिषद् १८८३ च्या परिषदेनंतर दोन वर्षांनीं कलकत्त्यास भरली. ही परिषद् इं. ॲसोसिएशन व ब्रि. इं. ॲसोसिएशन या दोन सभांनीं सहकारितेनें भरविली होती. पण या वेळीं अमीरअल्ली यांच्या स्फूर्तीनें सेंट्रल महॉमेडन ॲसोसिएशन ही मुसलमानांची सभाहि ही परिषद् भरविण्यांत सामील झाली. ही परिषद् व मुंबईची पहिली राष्ट्रीय सभा या जवळ जवळ एकाच वेळीं पण स्वतंत्र रितीनें भरविण्यांत आल्या. बंगालची सभा २५, २६, २७ डिसेंबर रोजीं भरली. व मुंबईची कॉंग्रेस २८, २९, ३०, डिसेंबर रोजीं भरली. पुढें अ. भारतीय परिषद् कॉंग्रेसच्या रूपानें भरूं लागल्यामुळें बंगाली पुढारी तींत येऊन सामील झाले. व तेव्हांपासून बंगाल परिषद् ही प्रांतिक स्वरूपाची म्हणून राहिली. व दुसऱ्या राष्ट्रीय सभेला खुद्द कलकत्त्यासच भरविण्याचें आमंत्रण देण्यांत आलें.

पहिली राष्ट्रीय सभा पुण्यास भरणार होती. आणि तेथें ती कां भरणार होती हें सांगण्याकरितां आम्हीं पुणें व महाराष्ट्र यांतील कॉंग्रेसच्या पूर्वींच्या

स्थितीचें वर्णन ओघानें केलें. परंतु विशेष दृष्टीनें पुणें व रा. ब. माधवराव रानडे यांना अग्रपूजेचा मान मिळाला असला तरी रानड्यांच्यापूर्वीं मुंबई येथें सार्वजनिक कार्यांची जी प्रस्तावना झाली होती, तिची माहिती देणें अवश्य आहे. आणि ही माहिती द्यावयाची म्हणजे दादाभाई नौरोजी यांचेंच पूर्व-चरित्र देणें होय. पुण्यापूर्वीं कलकत्त्यानें राजकारणांत अघाडी मारली होती. तथापि ह्याहिपूर्वीं मुंबईनें अघाडी मारली होती. पण त्या बाबतींत मुंबईचें नांव घेतां येण्याचें एक कारण ही अघाडी मारणारे दे. भ. दादाभाई नौरोजी यांचें कार्य हिंदुस्थानापेक्षां विलायतेंतच अधिक झालें. म्हणून तें इकडील लोकांच्या नजरेपुढें फारसें नसे. असो.

## दादाभाई नौरोजी

दादाभाईंचा जन्म सन १८२५ च्या सप्टेंबर महिन्यांत झाला. अगदीं लहानपणीं त्यांचे वडील वारले. त्यांच्या आईनें त्यांचें लग्न वयाच्या अवघ्या पांचव्या वर्षीं केलें. आईच्या मनाविरुद्ध त्यांना इंग्रजी शिक्षण हट्टानें मिळवावें लागलें; पण तें मोफत मिळालें. त्यांना शिष्यवृत्त्या मिळाल्या आणि ते फार बुद्धिवान् होते, यामुळें तें सहज पार पडलें. त्यांच्या वेळीं युनिव्हर्सिटीहि स्थापिली नव्हती. परंतु नेटिव्ह एज्युकेशन सोसायटीच्या कॉलेजांतलें सर्व शिक्षण त्यांना मिळालें. हें शिक्षण घेतांनाच देशभक्ति व परोपकार हे गुण त्यांच्या मनांत बिंबले. पुढील शिक्षणाकरितां विलायतेस जावें असें त्यांना व त्यांची बुद्धिमत्ता पाहून इतरांना वाटे. परंतु पारशी हेहि हिंदूंप्रमाणेंच तेव्हां फार धर्मभीरु होते. यामुळें तें घडलें नाहीं.

१८४७ मध्यें दादाभाईंना खाजगी शाळेंत नोकरी मिळाली व त्याबरोबर त्यांनीं सार्वजनिक कार्याला प्रारंभ केला. त्यांनीं स्त्रीशिक्षणाचें काम सुरू केलें. विद्यार्थ्यांकरितां 'वाङ्मयमंडळ' व 'शास्त्रविचारमंडळ' स्थापलें. १८६१ सालीं 'रास्त गोफ्तर' नांवाचें वर्तमानपत्र सुरू केलें. त्यांत सामाजिक व तत्त्वज्ञान-विषयक निबंध ते लिहीत. 'धर्ममार्गदर्शक' नांवाचेंहि एक मंडळ त्यांनीं काढलें. त्याचा हेतु समाजसुधारणा हा होता. वक्तृत्वाला उत्तेजन देण्याकरितां फ्रामजी कावसजी या उपकारकर्त्याची फेड स्मारकानें करावी म्हणून, त्यांनीं एक इमारत बांधण्याची खटपट केली. तींत पुढें मुंबईची 'नेटिव्ह जनरल लायब्ररी' ठेवण्यांत आली. १८५३ सालीं त्यांनीं 'मुंबई प्रेसिडेन्सी ॲसोसिएशन' नामक

राजकारणसंबंधीं संस्था काढली १८५४ सालीं त्यांना एल्फिन्स्टन कॉलेजांत प्रोफेसराची जागा मिळाली. पुढील वर्षी अकल्पित रितीनें कामा कंपनीच्या व्यापारी पेढीच्या मॅनेजराचें काम त्यांना मिळाल्यामुळें ते विलायतेस गेले व तेथें त्यांनीं व्यापार सुरू केला. तें काम करीत असतांना लंडन येथील सुमारें दहा मोठ्या संस्था व सोसायट्या यांचे ते सभासद झाले.

हिंदुस्थानच्या राज्यकारभाराची मुख्य जागा विलायतेंत स्टेट सेक्रेटरीच्या कचेरींतच असल्यामुळें हिंदुस्थानचें गाऱ्हाणें तेथेंच मांडण्यास त्यांनीं सुरवात केली. १८५९ सालीं त्यांनीं सिव्हिल सर्व्हिसचा प्रश्न हातीं घेतला. दिवसेंदिवस या नोकऱ्यांच्या बाबतींत इंग्रज लोक प्रतिगामी धोरण ठेवणार असें दिसूं लागल्यामुळें ही चळवळ करणें त्यांना अवश्य वाटलें. पुढें कामा कंपनीची मॅनेजरी सोडून दादाभाईनीं आपल्या नांवानें एक व्यापारी कंपनी काढली. परंतु एका सट्टेबाज पारशाच्या कारणानें दादाभाईची ही कंपनी बुडाली. तथापि होईल तसें करून इंग्लंडमध्यें राहूनच राजकारणी चळवळ करावी असें ठरवून त्यांनीं १८६७ सालीं लंडन येथें 'ईस्ट इंडिया ॲसोसिएशन' नांवाचें मंडळ स्थापलें. त्या सुमारास हिंदुस्थानांत सिव्हिल सर्व्हिस सोडून, सुमारें, ८५० इंग्रज लोक प्रत्येकीं तीन चार हजार रुपये पगार मिळविणारे होते. हिंदी लोकांची वाढ सामान्यपणें सहाशें रुपयांवर होत नसे. हजार दीड हजार रुपये मिळविणारा एखादाच. म्हणून सिव्हिल सर्व्हिस परीक्षा हिंदुस्थानांत घ्यावी अशी चळवळ त्यांनीं सुरू केली. १८६९ सालीं दादाभाई हिंदुस्थानला परत आले. तोंपर्यंत त्यांच्या चळवळीची कीर्ति इकडे सर्वत्र पसरली होती. इकडे येतांच त्यांनीं एक व्याख्यानमाला सुरू केली, व मुंबईबाहेर बऱ्याच शहरीं ते हिंडले. त्याच सालीं त्यांनीं मुंबईस 'ईस्ट इंडिया ॲसोसिएशन' ची शाखा स्थापली. आणि फिरून कच्छच्या महाराजांच्या मदतीनें आपली व्यापारी कंपनी सुरू करून दादाभाई विलायतेला गेले.

१८७३ सालीं हिंदुस्थानच्या कारभाराची चौकशी करण्याकरितां विलायत सरकारानें एक कमिटी नेमिली. तिजपुढें दादाभाईनीं साक्ष देऊन हिंदुस्थान दिवसेंदिवस दारिद्र्यांत किती खोल बुडत चाललें आहे याविषयीं साधार माहिती दिली. पुढील सालीं ते हिंदुस्थानास परत आले तों बडोद्याचे महाराज मल्हारराव यांचें प्रकरण सुरू झालें. याच वेळीं दादाभाईना बडोद्याचे दिवाण नेमण्यांत

आलें व महाराजांवरील दोषारोपांच्या चौकशींत दादाभाईंनीं महाराजांना पुष्कळ मदत केली. परंतु ब्रि. रेसिडेंटचें न पटल्यामुळें त्यांनीं दिवाणगिरीचा राजीनामा दिला. १८७५ सालीं ते मुंबई कॉर्पोरेशनचे सभासद झाल्यावर मुंबई शहरच्या पुष्कळ सुधारणांत त्यांनीं लक्ष घातलें. पुढें दुष्काळ व लिटनशाही यांची आपत्ति सुरू असतां त्यांनीं एकसारखे निबंध लिहून, व पत्रकें प्रसिद्ध करून, पुष्कळ देशसेवा केली.

१८८२ ते १८८५ या सालांत लॉर्ड रिपन यांची कारकीर्द हिंदुस्थानाला फार लाभदायक अशी झाल्यामुळें दादाभाईंना आपल्या राजकीय चळवळीला यश येणार अशी उमेद वाटूं लागली. पस्तीस वर्षें सतत केलेल्या श्रमांचें कांहींसें फळ मिळालें. यामुळें इतर पुढाऱ्यांच्या सहकारितेनें, त्यांनीं १८८५ सालीं राष्ट्रीय सभा स्थापण्याच्या कामीं बरीच खटपट केली. ह्यूम व वेडरबर्न हे दादाभाईंना सख्ख्या भावाप्रमाणें मानीत. पुढल्याच वर्षी दादाभाई स्वतः कलकत्त्यास झालेल्या राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष होते. पुढें ते विलायतेस गेले. तेथें त्यांनीं पुन्हां चळवळ केली. व पार्लमेंटच्या निवडणुकींत यश मिळवून ते सभासद झाले. हिंदुस्थानांत सिव्हिल सर्व्हिस परीक्षा घेण्याचा ठराव त्यांनीं पास करवून घेतला. त्यांनीं १८९६ सालीं वेल्बी कमिशनपुढें साक्ष दिली व १९०६ सालीं कलकत्त्याच्या राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष या नात्यानें स्वराज्याची घोषणा केली वगैरे गोष्टी प्रसिद्ध आहेत. परंतु त्यांचा समावेश काँग्रेसपूर्वीच्या वृत्तांतांत होत नसल्यामुळें तो तेथें अधिक देतां येत नाहीं. परंतु काँग्रेस-पूर्वीच्या काळांत अगदीं प्रारंभीं राजकीय चळवळीला हात घालणारे असे राजा राममोहन रॉय यांच्यानंतर दादाभाई नौरोजी हेच झाले. त्यांनीं आपल्या आयुष्यांतील साठपांसष्ट वर्षें सार्वजनिक चळवळींत घालविलीं, व सर्व हिंदुस्थानाला एक नमुनेदार उदाहरण करून ठेविलें. दादाभाईंचें पूर्वचरित्र हें असें झालें नसतें तर राष्ट्रीय सभेच्या कल्पनेला मुंबई इलाख्यांत इतका जोर चढला नसता.

राममोहन रॉय, दादाभाई नौरोजी, सुरेंद्रनाथ बानर्जी यांचीं चरित्रें थोड्या विस्तारानें वर दिलीं आहेत. तथापि राष्ट्रीय सभेच्या जन्मापूर्वीच्या तीस—चाळीस वर्षांतील पिढींत हिंदुस्थानच्या निरनिराळ्या भागांत विद्वान्, देशहित-दक्ष सार्वजनिक कार्यकर्ते अनेक होऊन गेले. त्यांपैकीं कांहींचीं नांवें इलाखा-

वार याखालीं दिलीं आहेत. त्यांचें अनेकविध कार्य हें राष्ट्रीय सभेचा पाया भरण्याला कसें उपयोगीं पडलें असेल हें न सांगतांहि समजण्यासारखें आहे. हे पुढारी लोक आपल्या विद्वत्तेनें व बुद्धिमत्तेनें इकडे आलेल्या अधिकारी वा बिनअधिकारी इंग्रजांची बरोबरी करणारे होते. शिवाय त्यांनीं आपापल्या परीनें परदेशांच्या इतिहासांचें अध्ययन केलेलें असल्यामुळें राष्ट्राची राजकीय परिषद् कशी होते व ती घडवून आणण्याचीं साधनें कोणतीं असतात याचें ज्ञान त्यांना झालें होतें. इंग्रजांपूर्वीं इकडे सर्व देशभर एकछत्री असें राज्य नव्हतें. शिवाय देश मोठा व वाहतुकीचीं साधनें कमी. यामुळें निरनिराळ्या भागांतलि समाज अलग राहत, व त्यांच्यामध्यें विचारविनिमय थोडा होई. मग संघटना कोठून होणार ? परंतु इंग्रजांचें एकछत्री राज्य इकडे सुरू झाल्यापासून हा फुट-कळपणा कमी होऊं लागला. एकाच प्रकारचें शिक्षण, राज्यकारभाराची एकाच प्रकारची शिस्त, धोरण व वळण, आणि एकाच प्रकारचीं राजकीय सुखदुःखें, यांमुळें निरनिराळ्या प्रांतांतील समाजांचें एकीकरण व संघटन होऊं लागलें आणि जसजशी स्वाभिमानबुद्धि वाढूं लागली व राजकीय आकांक्षा बळावत गेली, तसतशी ऐक्य भावना उपजूं लागली. ही भावना वाढविण्याला त्या तीस–चाळीस वर्षांतील प्रमुख लोकांचे उद्योग कारणीभूत झाले; म्हणून राष्ट्रीय सभेच्या जन्मापूर्वीचा वृत्तांत लिहितांना त्यांची आठवण करून, त्यांचा नामनिर्देश करणें योग्यच ठरतें. म्हणून ही खालील नामावलि दिली आहे. नव्या पिढीनें त्यांचेविषयीं कृतज्ञताबुद्धि बाळगणें हें योग्यच होईल.

## बंगाल प्रांत

**देवेंद्रनाथ टागोरः**—आदिब्रह्म समाजाचा एक संस्थापक, अत्यंत बहुश्रुत, धार्मिक वृत्तीचा, परोपकारांत उदार, बोलपूर येथील 'शांतिनिकेतना'चा आद्य संस्थापक, त्यांच्या धार्मिक वृत्तीमुळें त्यांना बंगाल्यांत मुनि महर्षि असें म्हणत !

**पं. ईश्वरचंद्र विद्यासागरः**—संस्कृत पंडित, प्रोफेसर, विधवाविवाहाच्या सुधारणेचे बंगाल्यांतील आद्यप्रवर्तक, 'सोमप्रकाश' पत्राचे एक संस्थापक.

**पं. द्वारकानाथ विद्याभूषणः**—' सोमप्रकाश ' पत्राचे संपादक व ' कल्प-द्रुम ' मासिकाचे संपादक, कवि व विद्वान् लेखक.

**आनंद मोहन बोसः**—बॅरिस्टर, साधारण ब्रह्म समाजाचे एक संस्थापक,

प्रोफेसर, इंडियन असोसिएशनचे प्रमुख सभासद, विद्यार्थ्यांचे परममित्र, उत्कृष्ट वक्ता, १८९८ च्या मद्रास काँग्रेसचे अध्यक्ष.

**श्रीरामकृष्ण परमहंसः**—स्वामी विवेकानंदांचे गुरु.

**डॉ. महेंद्रलाल सरकारः**—प्रख्यात डाक्टर, व होमिओपाथीचे बंगाल्यांतील आद्य पुरस्कर्ते.

**राजनारायण बोसः**—कट्टया राष्ट्रीय वृत्तीचा पुढारी, राष्ट्रीय मेळ्याचा संस्थापक, सामाजिक सुधारक.

**बंकिमचंद्र चतर्जीः**—विख्यात कादंबरीकार, 'वंदे मातरम्' या राष्ट्रीय गानाचा व आनंद मठ इत्यादि देशाभिमानी कादंबऱ्यांचा कर्ता.

**केशवचंद्र सेनः**—प्रार्थनासमाजाचा संस्थापक व धर्मोपदेशक.

**राजा राजेंद्रलाल मित्रः**—विद्वान् पंडित व संशोधक डाक्टर, कायदेपंडित, अनेक भाषाकोविद, बंगालच्या एशियाटिक सोसायटीचे प्रथम अ० सेक्रेटरी व नंतर अध्यक्ष, कमींत कमी पन्नास ग्रंथांचे कर्ते, कलकत्ता येथील १८८६ च्या राष्ट्रीय सभेच्या स्वागतसमितीचे अध्यक्ष.

## मद्रास इलाखा

**सर रामवर्माः**—(ज.१८३७; मृ.१८९१) त्रावणकोरचे महाराज, राजा (असून) फार विद्वान्, सार्वजनिक हिताची दृष्टि मोठी, आर्य संस्कृतिरक्षणाबद्दल उद्योग करणारा, भौतिकशास्त्रांचा प्रेमी, विशेषतः वनस्पतिशास्त्रांविषयीं, चित्रकलेचा पुरस्कर्ता, औद्योगिक प्रदर्शनांचा शोकी, यांनीं आपल्या राज्यांत सर्व खात्यांतील कारभार पुष्कळ सुधारला, कित्येक परदेशी विद्वान् मंडळांनीं त्यांना आपले सभासद करून घेतलें होतें. सद्धर्म, संस्कृति व प्रगतिशील राजकारण यांच्या योगानें राजाधिष्ठित राज्यांत लोकहित कसें साधतां येतें तें यांनीं दाखविलें.

**राजा सर टी. माधवरावः**—( ज. १८२८; मृ. १८९१ ):—हे महाराष्ट्रीय होते. शहाजीच्या वेळीं बंगलूर, तंजावरकडे जाऊन वसाहत केलेल्या घराण्यांतील. प्रसिद्ध मुत्सद्दी. अनेक संस्थानांत दिवाणगिरी केली. हिंदी लोकांना राज्यकारभार उत्तम रीतीनें करतां येतो हें यांनीं इंग्रजांच्या मनावर

उत्तम रीतीनें बिंबविलें. १८८७ च्या मद्रास येथील राष्ट्रीय सभेच्या स्वागतमंडळाचे ते अध्यक्ष होते. सर्व विषयांत त्यांची मति चाले. त्यांनीं जर्मन मुत्सद्दी प्रिन्स बिस्मार्क यांना आफ्रिकेंतील जर्मन वसाहतीसंबंधानें सूचनापर निबंध पाठविला होता.

**व्ही. रामी आयंगार** (ज. १८२६):—राज्यकारभारप्रवीण. बारा वर्षें मद्रास कायदे कौन्सिलचे सभासद. पेपर करन्सी खात्याचे असिस्टंट कमिशनर. विलायतेंतील फायनॅन्स कमिटीपुढें हिंदुस्थानतर्फे साक्ष देण्याकरितां १८७३ सालीं त्यांची नेमणूक करण्यांत आली होती. सुप्रसिद्ध पाच्यापा ट्रस्ट कमिटीचे ते सभासद होते. त्यांनीं त्रावणकोरची दिवाणगिरी यशस्वी केली. कायदे कौन्सिलें वाढवावीं व लोकमतानुवर्ति करावीं याविषयींचें मत त्यांनीं सरकारजवळ उघडपणें प्रतिपादिलें.

**सी. व्ही. रंगचार्लू** ( ज. १८३१ ):—महान् मुत्सद्दी, राजकार्य धुरंधर, म्हैसूरचे यशस्वी दिवाण. यांनीं म्हैसुरांत लोकप्रतिनिधि सभेची स्थापना केली. तिची पहिली बैठक काँग्रेसच्या स्थापनेपूर्वीं चार वर्षें झाली.

**सी. रंगानंदशास्त्री** ( ज. १८१९ ):—वरिष्ठ न्यायाधीश. भाषापंडित. पाच्यापा ट्रस्ट कमिटीचे सभासद. १८५३ सालीं पार्लमेंटरी कमिटी-कडून हिंदुस्थानच्या कारभाराची चौकशी झाली तेव्हां जॉर्ज नॉर्टन यांनीं कमिटीला असें सांगितलें कीं, रंगानंदशास्त्री हा गृहस्थ विद्वत्ता, बुद्धिमत्ता यांच्या दृष्टीनें कोणाहि युरोपियनाची बरोबरी करील व इंग्लं-डच्या कोणत्याहि युनिव्हर्सिटींत प्रोफेसर म्हणून तो शोभेल. जुन्या नव्याचा उत्तम मेळ त्यांनीं घातला होता. त्यांना चौदा भाषा येत होत्या.

**सर टी. मुथुस्वामी अय्यर** ( ज. १८३२ ):—मद्रास हायकोर्टांतील पहिले सरन्यायाधीश. त्यांच्याइतका विद्वान् कायदेपंडित व हिंदुधर्मशास्त्रप्रवीण मद्रासेकडे क्वचितच झाला. चित्रकला व संगीत यांचा तो पुरस्कर्ता होता. युरोपियन लोकांशीं व सरकाराशीं त्याचें वर्तन फार बाणेदार-पणाचें असे.

**टी. गोपाळराव** ( ज. १८३२; मृ. १८८६ ):—हेहि महाराष्ट्रीयच. मद्रासच्या

विद्याखात्यांत वरिष्ठ अधिकारी म्हणून बरेच दिवस काम केलें. ते संस्कृत व मराठी कविता करीत.

**पी. रंगानंद मुदलियार** ( ज. १८४७; मृ. १८९३ ):—मद्रास युनिव्हर्सिटी, म्युनिसिपॅलिटी यांच्या कामांत ते फार लक्ष घालीत. सार्वजनिक कार्यांत पुढारीपण त्यांजकडे असे. १८८२ च्या एज्युकेशन कमिशनचे ते एक प्रमुख सभासद होते.

**जी. लक्ष्मी नरसू चेट्टी** ( ज. १८०६ ):—जुन्या काळांतील मोठा राजकीय पुढारी. घरचा फार मोठा व्यापार असतां त्याकडे दुर्लक्ष करून ते राजकारणांत पडले. मद्रास 'नेटिव्ह ॲसोसिएशन' नामक संस्था त्यांनीं स्थापिली. तिचे पहिले अध्यक्ष तेच होते. सभेचे हेतु मद्रासची महाजन सभा किंवा पुण्याची सार्वजनिक सभा यांच्यासारखेच होते. खिस्ती मिशनरी लोकांच्या कारवाईविरुद्ध त्यांनीं मोठी चळवळ केली व सरकारशीं झगडा केला. हें भांडण विलायतेंत कोर्ट ऑफ डायरेक्टर्संपर्यंत पोंचविलें. फौजदारी चौकशींत व सारावसुलीच्या कामीं रयतेवर फार जुलूम होई. त्याविरुद्ध त्यांनीं चळवळ केली. १८५३ सालीं रयतेच्या गाऱ्हाण्यांसंबंधीं हाऊस ऑफ लॉर्ड्स्मध्यें एक अर्ज त्यांनीं दाखल केला. १८५५ सालीं असाच एक अर्ज पार्लमेंटला करून त्यांनीं खालील मागण्या केल्या. ( १ ) हिंदुस्थानचा राज्यकारभार कंपनी सरकारकडून काढून खुद्द राणी सरकारच्या हातीं द्यावा. ( २ ) कोर्ट ऑफ डायरेक्टर्सच्या सभासदांची संख्या कमी करावी. ( ३ ) सिव्हिल सर्व्हिस परीक्षेला हिंदी लोकांना बसण्यास परवानगी द्यावी व तिचा केवळ चढाओढीनें निकाल करावा. ( ४ ) ई. इं. कंपनीचीं कोर्टें बंद होऊन हायकोर्टें स्थापन व्हावीं. चेट्टी यांना राजद्रोही या नात्यानें सरकार लेखी व त्यांच्यामागें गुप्त पोलिसांची टेहेळणी असे. बंडाच्या सालीं त्यांनीं अर्ज करून धर्माच्या कामीं सरकारनें हात घालूं नये अशी मागणी केली होती. म्हैसुरचें राज्य खालसा होणार होतें तें न होतां टिपूच्या पूर्वीच्या हिंदु राजघराण्याला तें राज्य द्यावें अशी चळवळ त्यांनीं केली. पदरचा पैसा सार्वजनिक कार्यांत खर्च करून शेवटीं चेट्टी हे अगदीं गरीब झाले,

'क्रेसंट' या नांवाचें इंग्रजी वर्तमानपत्र केवळ सार्वजनिक चळवळीं-करितां त्यांनीं काढलें होतें. सामाजिक सुधारणेचेहि ते मोठे पुरस्कर्ते होते.

**एस. रामस्वामी मुदलियार** (ज. १८५२; मृ. १८९२) प्रथम हायकोर्ट वकील व नंतर न्यायाधीश. महाजनसभेचे ते एक मुख्य प्रवर्तक होते. १८८५ सालीं विलायतेंतील पार्लमेंटरी निवडणुकीच्या वेळीं त्यांना मद्रासचे प्रतिनिधि म्हणून हिंदी शिष्टमंडळाबरोबर पाठविण्यांत आलें होतें. १८८६ च्या पब्लिक सर्व्हिस कमिशनवर सभासद म्हणून त्यांची नेमणूक झाली होती. कमिशनवर असतांच त्यांनीं राष्ट्रीय सभेंत प्रमुखपणें भाग घेतला. पाचापा ट्रस्टचे ते एक ट्रस्टी होते.

याशिवाय खालील गृहस्थांचीं नांवेंहि ध्यानांत ठेवण्यासारखींच आहेत. १ सर सुब्रह्मण्य अय्यर, हायकोर्ट जज्ज व थिऑसॉफिस्ट. २ जी. सुब्रह्मण्य अय्यर, 'हिंदु व स्वदेशमित्रम्' पत्राचे एक संस्थापक. ३ वीर राघवाचारियर, 'हिंदु' पत्राचे एक सहसंपादक. ४ सालेम विजयराघवाचारियर, वकील पक्के राष्ट्रीय वृत्तीचे लढाऊ नागरिक, हिंदुमहासभेचे पुरस्कर्ते व एक वेळचे अध्यक्ष. ५ एन्. सुबराव, वकील, 'हिंदु' वर्तमानपत्राचे एक आद्य पुरस्कर्ते व लिबरल पक्षाचे पुढारी.

## मुंबई इलाखा

जगन्नाथ शंकरशेठ—मुंबई शहरांतले पहिले दानशूर, वजनदार गृहस्थ, सार्वजनिक चळवळीचे पुरस्कर्ते. मुरारजी गोकुळदास—गिरणीवाले. कर्सनदास मूळजी—प्रसिद्ध समाजसुधारक. पेटिट व बाटलीवाले—जगप्रसिद्ध पारशी व्यापारी व परोपकारप्रिय धनिक. नौरोजी फर्दुंजी—वजनदार सार्वजनिक पुढारी. रा. ब. विश्वनाथ नारायण मंडलीक—कायदे मंडळाचे सभासद, कायदेपंडित व संशोधक. डॉ. भाऊ दाजी लाड—सुप्रसिद्ध डाक्टर व प्राच्य संशोधक. सर फेरोजशहा मेथा—मुंबईचे अनभिषिक्त राजे. सर दिनशा वाच्छा—फेरोजशहांचे सहकारी मित्र व अर्थशास्त्री. बद्रुद्दिन तय्यबजी—बॅरिस्टर व लोकप्रिय निर्भय पुढारी. काशिनाथपंत तेलंग—कायदेपंडित, संशोधक व ग्रंथकार, युनिव्हर्सिटीचें व्हाइस चॅन्सेलर. डॉ. सर रामकृष्ण भांडारकर—जगप्रसिद्ध विद्वान् पंडित व संशोधक. गोपाळराव

हरि देशमूख, टिळक, गोपाळराव गोखले, आपटे, आगरकर, अण्णासाहेब पटवर्धन, सितारामपंत चिपळूणकर. इत्यादि अलीकडील पिढीच्याहि माहितीचे सुप्रसिद्ध गृहस्थ.

## पंजाब प्रांत

पंजाबमध्यें कॉंग्रेसच्या पूर्वीं राष्ट्रीय वृत्तीचें काम मुख्यतः आर्यसमाजानेंच केलें. आर्यसमाजाच्या पुढाऱ्यांत म. हंसराज, लाला लजपतराय, व म. मुनशीराम हे प्रमुख होत. हंसराज हे सात्त्विक वृत्तीचे व केवळ शिक्षणकार्याचे प्रेमी. लजपतराय यांना शिक्षण व संस्कृति हे विषय प्रिय असले तरी राजकारणाची विशेष आवड होती. ला. मुनशीराम यांना समाजसुधारणा व धर्म हे विषय आवडत. आर्यसमाजानें वरील सर्व प्रकारच्या उद्योगांना व चळवळींना क्षेत्र व केंद्र निर्माण करून दिलें होतें. १८८३ सालीं स्वामी दयानंद हे सर्व चारित्रिकार्य करून वारले. त्या हानीनें आर्यसमाज हताश न होतां अधिक जोरानें कार्य करूं लागला. स्वामीजींच्या नांवानें दयानंद कॉलेज काढण्याचें ठरलें आणि १८८४–८५ सालांत त्याकरितां हजारों रुपयांची वर्गणी जमली. या संस्थेनें चालविलेलें शिक्षणकार्य प्रसिद्धच आहे. सन १८८१ मध्यें लाला लजपतरायांना सुरेंद्रनाथ बानर्जी यांचीं व्याख्यानें व मॅझिनीचे ग्रंथ वाचून राष्ट्रीय स्फूर्ति झाली. १८८३ सालीं एका इंग्रजानें एका हिंदी इसमाला ठार केलें. पण कोर्टांतील इनसाफांत गोऱ्या जातभाईच्या ज्यूरीनें त्याला दोषमुक्त केलें यामुळें फार असंतोष माजला. यामुळें १८८५ सालीं लजपतराय वकिलीच्या परीक्षेंत पास झाले. तेथपासून त्यांनीं स्वतःस राजकारणाला वाहून घेतलें. लजपतराय हे प्रथम अलाहाबाद येथील कॉंग्रेसला हजर राहिले व त्यानंतर कॉंग्रेसच्या विषयावर त्यांनीं सर सय्यद अहमदखान यांच्याशीं लेखद्वारें मोठा वाद केला.

## आग्रा–अलहाबाद प्रांत

या प्रांतांत कॉंग्रेसपूर्वीं राजकीय चळवळ करणारे दोन प्रमुख पुढारी होते. ( १ ) पं. अयोध्यानाथ व ( २ ) पं. मदन मोहन मालवीय. दोघेहि वकील होते. तथापि वकिलीच्या वेळांतूनच वेळ काढून ते सार्वजनिक चळवळ करीत. हे दोघेहि पुढें कॉंग्रेस कार्यकर्ते झाले. मालवीय यांची मूर्ति लहान पण कीर्ति

प्रथमपासूनच मोठी. ते भाषण करतांना सर्व प्रेक्षकांना दिसावे म्हणून सभाध्यक्षांना पंडितजींना टेबलावर उभें करावें लागे. पण वक्तृत्वांत ते इतर कोणाहि वक्त्यावर ताण करीत. पंडितजींचें काँग्रेसवरील वजन आजतागायत अढळ आहे. पं. अयोध्यानाथ (विद्यमान हृदयनाथ कुंझरू, सर्व्हंट्स ऑफ इंडिया सोसायटीचे उपाध्यक्ष, यांचे वडील) हे राष्ट्रीय सभेचे सेक्रेटरी असतां १८९२ त वारले. पं. मोतीलाल नेहरू हेहि फार बडे वकील, वयानें मदनमोहन यांच्याहिपेक्षां मोठे होते. परंतु प्रथम ते सार्वजनिक कार्यांत मुळींच भाग घेत नसत. ते १९१९ पर्यंत केवळ चैनी व मिजासी असत.

---

